श्री.

ग्रंथसंपादक व ग्रंथ प्रसारक मंडळीची ग्रंथमाला,

ग्रंथ ४४ वा.

# आर्य लोकाचें मूलस्थान

अथवा

## उत्तर ध्रुवाजवळील आर्यांच्या वसतीविषयीं वेदांतील पुरावा.

हें पुस्तक

रा. रा. केशव लक्ष्मण ओगल, बी. ए.

यांनीं

ो० बाळ गंगाधर टिळक, यांच्या ‘ आर्क्टिक होम इन दि वेदाज ’ या ग्रंथावरून मराठीत लिहिलें.

प्रकाशक,

दामोदर सांवळाराम आणि मंडळी.

प्रिंटर्स, पब्लिशर्स व कमिशन एजंटस्, ठाकुरद्वार—मुंबई.

सन १९१५ इ.

किंमत १॥ रुपया.



# प्रस्तावना.

'कालनिर्णय' या पुस्तकाकडे ज्या कारणानें प्रस्तुत लेखकाची दृष्टी वळली, त्याच कारणानें या पुस्तकासंबंधानेंही त्याच्या मनांत प्रथम विचार उत्पन्न झाला. हें पुस्तक लो. **बाळ गंगाधर टिळक** यांच्या 'The Arctic Home in the Vedas' नांवाच्या इंग्रजी पुस्तकाचे सारांशभूत रूपान्तर आहे. मूळ पुस्तक प्रसिद्ध झाल्यापासून थोड्याच दिवसांनी त्याला मराठी रूप देण्याचे या लेखकांच्या मनांत आले. परंतु त्यावेळी **लो. टिळकांस** परवानगी विचारिली असतां त्यांनी सांगितले की, त्या पुस्तकासंबंधाने पाश्चात्य व देशी पंडितांचे अभिप्राय आल्यावर त्याचें मराठींत भाषांतर करविण्याचा विचार आहे. परंतु पुढे थोड्याच दिवसांनी देशांतील वातावरण बिघडल्यामुळें असल्या वाङ्मयात्मक रूक्ष विषयांकडून सर्वांचें मन राजकीय विषयांकडे वळलें. तेव्हां या पुस्तकासंबंधाचा विचार मागें पडल्यासारखा वाटूं लागला. मूळ पुस्तकाच्या सर्व प्रती खपून तें दुर्मिळही झाले. तेव्हां आतां अधिक वाट पहाण्यांत अर्थ नाहीं, असें मनांत आणून पुस्तकाला मराठी रूप देण्याची परवानगी द्यावी ह्मणून पुनः एकवार **टिळकांना** प्रस्तुत लेखकाने विनंति केली; व त्यांनीही परिस्थिति लक्षांत घेऊन होय ह्मटलें. परंतु त्याप्रमाणें कामास सुरुवात करण्यापूर्वीच **टिळकांवर** सर्वांना माहीत असलेला अनर्थ गुदरला. त्यामुळें पुनः कांहीं काळ अस्वास्थ्याचा गेला. परंतु एकदां मनांत आणलेलें काम करणे अवश्य समजून सवडीप्रमाणें 'आर्यांच्या उत्तर ध्रुवाजवळील वेदनिर्दिष्ट मूलस्थानाला' मराठी रूप दिलें. मागील पुस्तक स्वतः **टिळकांच्या** नजरेखालून गेलेले होतें. परंतु प्रस्तुत पुस्तकासंबंधानें तसा प्रसंग सध्यांतरी

लांबणीवर पडलेला दिसत आहे. असें असल्यामुळें त्यांच्यासारख्याच दुसऱ्या कोणा विद्वानास तें प्रथम दाखवावें असें वाटून रा. ब. चिंतामण-राव विनायक वैद्य यांस त्याचा हस्तलेख वाचून पहाण्यासाठीं विनंति केली. त्या विनंतीला मान देऊन त्यांनीं आपला अमूल्य वेळ खर्चून हस्तलेख समग्र वाचून पाहिला, आणि बऱ्याच महत्वाच्या सूचना केल्या. याबद्दल प्रस्तुत लेखक त्यांचा फार ऋणी आहे. या पुस्तकाच्या आरंभीं जोडलेला उपोद्घात त्यांच्याच सूचनेवरून जोडला आहे. असो. एवढें झाल्यावर प्रकाशकांच्या सवडीप्रमाणें काम होऊन पुस्तक वाचकांसमोर आले आहे.

हें पुस्तक ' वेदकालनिर्णयाच्या ' पुढची पायरी आहे. संपाताच्या क्रान्तिवृत्तांतील स्थानाचा प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष उल्लेख करणारीं जीं वचनें ऋग्वेदांत आढळतात, त्यांवरून वेदकाल ठरविण्याचा प्रयत्न ' वेदकालनिर्णय ' या पुस्तकात केलेला आहे. त्यांतील अतिप्राचीन कालाची मर्यादा शा. शकापूर्वी ६००० वर्षांपलीकडे जात नाही. परंतु हा काळ कांहीं वैदिक धर्माचा आरंभकाल असें ह्मणतां येणार नाही; कारण तेव्हां यज्ञयागांच्या नियमनासाठीं कोणत्या तरी कालमापनपद्धतीची आवश्यकता वाटूं लागली होती. अर्थात् त्याच्यापूर्वी बराच काळपर्यंत यज्ञयागांची वाढ होत होती असें उघड दिसते. ' वेदकालनिर्णयांत ' स्वीकारलेल्या पद्धतीनें या अति प्राचीन काळाचा मागमूस सांपडत नाहीं. कारण पुनर्व-सूंच्या पलीकडील संपाताच्या क्रांतिवृत्तांतील स्थितीचा उल्लेख वेदांत आढळत नाही. परंतु नवीन शास्त्रीय शोधांवरून या काळाची थोडी बहुत तरी कल्पना होण्यास मार्ग झाला आहे. भूस्तरशास्त्र आणि पुराण-वस्तुशास्त्र यांतील शोधांवरून अलीकडे कित्येक महत्वाच्या गोष्टी कळून आल्या आहेत. त्यांत उत्तरध्रुवप्रदेश पूर्वी एका काळी वसतियोग्य होते व पुढे हिमकालांत येथील हवा भयंकर थंड झाली असें कळून आलें. यूरोपांतील आर्य लोक मूळचे तेथील नव्हत, व ते उत्तरेकडून खालीं आले असावे असें मत अलीकडे विद्वानांत होऊं लागलें होतें. परंतु उत्तरेकडील प्रदेश मनुष्यांना राहावयास आजच्या सारखेच पूर्वीही सर्वथा अयोग्य होते, अशी जोंपर्यंत समजूत होती, तोंपर्यंत आ-र्यांच्या मूलस्थानाचा प्रश्न तसाच घुटमळत राहिला होता. त्या बरोबरच आ-मच्या वैदिक ग्रंथांतील कित्येक वरवर सरळ दिसणाऱ्या वचनांचा अर्थही

कसाबसा ओढून केल्यामुळें तो कित्येक पंडितांना समाधानकारक लागत नव्हता. पारशी लोकांचा धर्मग्रंथ जो 'अवेस्ता' त्यांत त्यांचें प्राचीन स्थान बर्फाच्या पुरामुळें नष्ट झाल्यामुळें तेथील लोकांना अन्यत्र जावें लागल्याचें जें वर्णन आहे, त्याचाही नीट उलगडा आजपर्यंत झाला नव्हता. परंतु उत्तरध्रुवप्रदेशांत पूर्वी एक भूखंड असून त्याचा बर्फाच्या पुरानें नाश केला असें भूस्तरशास्त्रावरून अलीकडे कळून आल्यामुळें आणि या हिम-युगाचा काळ आणि प्राचीन कालगणना यांचा मेळ पडत असल्यामुळें आर्यांचें मूलस्थान आणि त्यांच्या सुधारणेचें प्राचीनत्व यांवर नवीन प्रकाश पडला आहे. या प्रकाराचें वर्णन यथाक्रम या ग्रंथांत केलें आहे.

या प्रकरणीं टिळकांनीं दोन गोष्टींचें प्रतिपादन केलें आहे. पहिली अशी कीं, हिमकालाच्या पूर्वी वैदिक ऋषींचे पूर्वज ध्रुवाजवळच्या प्रदेशांत राहत होते. आणि दुसरी अशी कीं, हिमकालांत त्या स्थानाचा नाश झाल्यामुळें ते नवीन प्रदेश शोधीत दक्षिणेकडे उतरले. यांतील दुसरी गोष्ट ह्मणजे पहिल्या गोष्टीवरून साहजिकपणें निघणारें अनुमान होय. पहिली गोष्ट सिद्ध करण्यास वेदांतील वचनांचा आधार आहे, असें या पुस्तकांत दाखविले आहे. परंतु या वचनांचा अर्थ जसा येथें केला आहे, तसा अर्थ करतां येत नाहीं असें कित्येकांचें मत आहे. वाईचे धर्ममार्तंड वे. शा. सं. काशीनाथ वामन शास्त्री लेले यांनी आपल्या धर्म नांवाच्या साप्ताहिकांत टिळकांच्या मूळ पुस्तकावर सर्वस्वीं प्रतिकूल टीका केली आहे. त्यांच्या टीकेंत मुख्य दोन मुद्दे आहेत. पहिला मुद्दा असा की, आर्यांचें मूलस्थान भरतखंडांत असून तें उत्तरध्रुवाजवळ असणें केव्हांही शक्य नाहीं; कारण ऋग्वेदांत जीं स्थलांचीं नांवें आलेलीं आहेत, तीं भरतखंडांतील स्थलांनाच आज लाविलेलीं असून त्या नांवांची स्थलें उत्तरध्रुवा-जवळ मुळींच नाहींत; गंगा, यमुना इत्यादिक अनेक नद्यांचीं नांवें ऋग्वेदांत आलेलीं असल्यामुळें तत्कालीन लोक भरतखंडापेक्षां इतरत्र असणें शक्य नाहीं. पण हा शास्त्रीबोवांचा आक्षेप निरर्थक आहे. प्रश्न आहे तो वेदकालीन आर्यांच्या स्थानाचा नसून वैदिक ऋषींच्या पूर्वजांच्या स्थानाचा आहे. ऋग्वेदांत ३६० दिवसांचें व बारा महिन्यांचें वर्ष स्पष्ट सांगितलें असल्यामुळें, वैदिक ऋषी अशी स्थिति असणाऱ्या या भरतखंडांत रहात होते याविषयीं शंकाच नाहीं; पण त्याच ऋग्वेदांत

केवळ ध्रुवप्रदेशांतच आढळणाऱ्या अशाही गोष्टीचें वर्णन कोठें कोठें असल्यामुळे त्या गोष्टी वैदिक ऋषींना आपल्या पूर्वजांपासून परंपरेनें कळल्या होत्या, व ह्मणून ते पूर्वज पूर्वी ध्रुवाजवळ रहात असले पाहिजेत असे टिळकांचें प्रदिपादन आहे. या प्रतिपादनाला लेले शास्त्रीबुवांच्या पहिल्या मुद्यावरून मुळीच धक्का लागत नाही. शास्त्रीबुवांचा दुसरा मुद्दा असा आहे की, टिळकांनी प्रस्तुत ग्रंथांत जीं वैदिक वचनें आधाराला घेतली आहेत त्यांचा त्यांनी सुचविल्याप्रमाणे अर्थ होणे शक्य नाही, अतएव त्यांवरून ध्रौविक वसतिस्थान मुळीच सिद्ध होत नाहीं. शास्त्रीबुवांनीं या विपर्या आपल्या 'धर्मांत' जे विवेचन केलें आहे, त्याचा खरेखोटेपणा ठरविण्याची शक्ति प्रस्तुत लेखकाजवळ नाही. पण एवढे मात्र सांगता येईल की, त्या वचनांपैकी कित्येक जरी सोडून द्यावीं लागलीं, तरी दुसरी मूलसिद्धान्ताची खात्री करून देणारी अशी कांही वचनें त्यांत आहेत. हीं वचने अगदी थोडी असली तरीही त्यांवरून ध्रुववसतिस्थानाची सिद्धता होण्यास अडचण पडणार नाही. उषेच्या चक्राकार गतीचे वर्णन, दीर्घ रात्रीच्या अंताला पोहोचण्याविषयीची आतुरता दर्शविणारी वचनें, गवामयनाचे वर्णन, इत्यादि गोष्टी अगदी सरळ असून तेवढ्यावरूनच मूल सिद्धांत स्थापित होण्यासारखा आहे. या दुसऱ्या मुद्याच्या विवरणांत शास्त्रीबोवांचा कोटिक्रम कित्येक ठिकाणी तर अगदीं बालिश झालेला आहे, इतकेच नव्हे तर तो वाचला असतां लेखकाला खरोखर मनापासून टीका करावयाची आहे की केवळ थट्टा करण्यासाठी तो लिहित आहे, असा प्रश्न वाचकाच्या मनात सहज उत्पन्न होतो.

प्रस्तुत पुस्तकांत ग्रथित केलेल्या सिद्धांतावर 'श्रीसरस्वतीमंदिर' या मासिक पुस्तकांत रा. सा. नारायण भवानराव पावगी यांनीं 'सप्तसिंधूंचा प्रांत अथवा आर्यावर्तातील आमची जन्मभूमी' या मथळ्याखाली लिहिलेल्या कित्येक लेखांतही टीका केलेली आहे. ही टीका अंशतः अनुकूल आणि अंशतः प्रतिकूल आहे. रावसाहेब नाना पावगी यास **टिळकांनीं** प्रतिपादन केलेला पहिला मुद्दा तत्त्वतः कबूल आहे, परंतु दुसऱ्या मुद्यासंबंधाने त्याचें मत जरा निराळे आहे. त्यांच्या ह्मणण्याचा इत्यर्थ असा आहे कीं, आर्यांचें उत्पत्तिस्थान भरतखंडांतच असून पुढे ते

आपल्या पराक्रमानें दिग्विजय करीत उत्तरध्रुवप्रदेशांत गेले आणि तेथें त्यांनीं विस्तीर्ण वसाहती स्थापन केल्या; परंतु पुढे त्या प्रदेशांत हिमयुग सुरू झालें, तेव्हां त्यांना पुनः आपल्या मूळ ठिकाणीं यावे लागले. उत्तरध्रुवाजवळील प्रदेशांत आर्यांची वसति पूर्वीं होती हे दाखविण्यासाठीं जीं प्रमाणें ह्मणजे वैदिक वचने प्रस्तुत पुस्तकांत दिली आहेत त्याच प्रमाणांवरून पावगीनींही ती गोष्ट सिद्ध होते असे दाखविलें आहे. परंतु पुढे ते असे ह्मणतात कीं, आर्यलोक मूळचे उत्तरध्रुवावरील नसून तेथें ते वसाहत करण्यासाठीं मात्र गेले होते; खरोखर आर्यांचे उत्पत्तिस्थान भरतखंड होय. आपल्या सिद्धान्ताच्या पुष्ट्यर्थ पावगींनीं बरेच विवेचन करून श्रीसरस्वतीमंदिराच्या शेवटच्या अंकांत आठ कारणे सकलित करून दिली आहेत. त्यांचा सविस्तर विचार करण्याला येथे जागा नाही. येथे एवढे सांगितले ह्मणजे पुरे की, त्यांनी दिलेल्या कारणांवरून भरतखंडांत प्राणी व वनस्पति अगदीं प्राचीन काळीं उत्पन्न झालेल्या होत्या एवढें सिद्ध होईल. पण आर्यांचा उत्पत्ति तेथे झाली की काय, या प्रश्नाचा निर्णय त्यांवरून होईल असें खास ह्मणतां येत नाही. नाना पावगी यांच्या विवेचनांत कल्पनेचेंच साम्राज्य विशेष आहे, असे वाचकांस वाटल्यावांचून रहात नाहीं.

असो. आतां मूळपुस्तकासंबंधाने थोडी* माहिती सांगून ही प्रस्तावना पुरी करूं. ' वेदकालनिर्णयांत ' ठरविलेला वेदांचा काळ दुसऱ्या पंडितांनी स्वतंत्र शोधांनी ठरविलेल्या काळाशी मिळता झाला. परंतु पूर्वी सांगितल्याप्रमाणे तो कांही आर्यसुधारणेचा आरंभकाल नव्हे; कारण वेदांत आढळून येणारी आर्यसुधारणा बरीच उच्च दर्जाची आहे. या सुधारणेचा आरंभकाल संपाताच्या स्थानावरून दिसून येणाऱ्या कालापूर्वी बराच असला पाहिजे हें अगदी उघड आहे. 'मृगशीर्ष अथवा वेदांच्या प्राचीनत्वाविषयी शोध ' Researches into the antiquity of the Vedas हें पुस्तक लिहिल्यानंतर टिळकांनी या काळाचा शोध चालू ठेविला. इतक्यांत १८९७ साली महाराष्ट्रांत राजकीय वातावरणांत खळबड उडून सरकारने कित्येक देशी पत्रांवर खटले केले व त्यांत टिळकांच्या केसरीवर प्रामुख्यानें खटला होऊन त्यांना अठरा महिन्यांची सक्त मजुरीची

---

* हा मजकूर मूळ पुस्तकाच्या प्रस्तावनेवरून घेतला आहे.

शिक्षा झाली, आपल्या इकडे विद्याव्यासंगी लोकांना तुरुंगांत असतांना आपला व्यासंग चालू ठेवणें बहुतेक अशक्यच असतें. परंतु प्रसिद्ध संस्कृत पंडितँ परलोकवासी प्रो. मॅक्समुल्लरप्रभृति टिळकांच्या कित्येक स्नेह्यांच्या खटपटीमुळें त्यांना तुरंगावासांतही आपला व्यासंग चालू ठेवितां आला. प्रो. मजकुरांनीं आपण प्रसिद्ध केलेल्या ऋग्वेदाच्या दुसऱ्या आवृत्तीची एक प्रत टिळकांकडे पाठवून दिली आणि सरकारनेंही कृपाळू होऊन हें आणि दुसरीं पुस्तकें वाचण्यास, तसेंच रात्रींही थोडा वेळ दिव्याशीं वाचावयास त्यांना परवानगी दिली. या वाचनाच्या वेळेसच त्यांनीं उत्तर-ध्रुवावरील वसतीचीं दर्शक अशीं ऋग्वेदवचनें गोळा केलीं. एक वर्ष तुरुंगवास भोगल्यावर प्रो. मॅक्स मुल्लर साहेबांच्या विशेष खटपटीमुळें त्यांची सुटका झाली. प्रो. मॅक्स मुल्लर साहेबांस **टिळक** हे '**ओरायन**' पुस्तकाचे कर्ते एवढ्याच नात्यानें माहीत होते. तुरुंगांतून सुटल्यावर टिळकांनी प्रोफेसर साहेबांस त्यांच्या निरपेक्ष प्रेमाबद्दल मनःपूर्वक आभार मानण्यासाठीं पत्र लिहिलें आणि त्यांतच आपण काढिलेल्या नवीन सिद्धान्ताची प्रमाणें सारांशरूपानें लिहिली. या पत्राच्या उत्तरांत प्रो. मॅक्समुल्लर यांनी असें लिहिलें की, टिळकांनी सुचविल्या प्रमाणें कित्येक वैदिक वचनांचा अर्थ होणे शक्य आहे, तरी कदाचित् त्यांवरून निघणारा सिद्धांत भूस्तरशास्त्राच्या सिद्धातांशी जमणार नाहीं. पण संपूर्णविवेचनात्मक असा हा मूळग्रंथ बाहेर पडण्यापूर्वींच प्रो. मॅक्स मुल्लर परलोकवासी झाल्यामुळें त्यांच्या अधिकारयुक्त अभिप्रायाचा लाभ टिळकांस झाला नाहीं, ही दुःखाची गोष्ट होय. असो.

या ग्रंथाचा मूळ हस्तलेख १८९८ साली लिहिला. त्यानंतर टिळकांनीं हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांत प्रवास करीत असतां, मद्रास, कलकत्ता, लाहोर, काशी, इत्यादि ठिकाणी अनेक विद्वानांबरोबर या विषयासंबंधानें चर्चा केली. या ग्रंथांत काढिलेला सिद्धांत भूस्तरशास्त्राच्या सिद्धांताशीं जमणार नाहीं असा जो मॅक्समुल्लर साहेबांनी आक्षेप काढला होता, त्याचा आमच्या ग्रंथकारांनी पूर्वींच विचार करून ठेविला होता. तरीही भूस्तरादि अनेक सृष्टिशास्त्रांतील नवीन शोधांचें योग्य आकलन आपल्याला झालें आहे कीं नाहीं, अशा शंकेनें त्यांनी बरेच दिवस हें पुस्तक प्रसिद्ध करण्याचें काम लांबणीवर टाकिलें. पाश्चात्य देशांतील सकलशास्त्रकलांचीं क्रीडामंदिरें

झालेल्या विद्यापीठासारखीं विद्यापीठें आपल्या देशांत सांप्रत नसल्यामुळें, एखाद्या विषयासंबंधानें शोध करणाऱ्या विद्वानाला तदानुषंगिक इतर विद्यांच्या ज्ञानाचा वाटेल तेव्हां उपयोग करून घेण्याचें साधन नाहीं. त्यामुळें एखाद्याला एखादी कल्पना सुचली तर ती सांप्रतच्या ज्ञानाच्या स्थितींत शक्य आहे कीं नाहीं, याचा शोध येथें करतां येत नाहीं; आणि म्हणून कोणी काय ह्मणतील याचा विशेष विचार न करतां धैर्यानें ती कल्पना लोकांपुढें मांडिल्याशिवाय त्याला गत्यंतर नसतें. अशा स्थितीत शोधाचें काम चाललें असतां प्रसिद्ध आंग्ल विश्वकोशाची दहावी आवृत्ति इकडे प्रसिद्ध होऊन त्यांत दिलेल्या भूस्तरशास्त्रांतील अगदीं नवीन शोधांची संगति आपल्या सिद्धांताशी लागल्यामुळे टिळकांनी हे पुस्तक प्रसिद्ध केलें.

या ग्रंथाचा गर्भसंभव जसा संकटावस्थेंत असतांना झाला, तसा त्याचा जन्म त्याहूनही बिकट परिस्थितीत झालेला आहे. १९०२ पासून वर्ष दोन वर्षे महाराष्ट्रांत गाजत असलेल्या प्रसिद्ध ताई महाराजांच्या प्रकरणांतील टिळकांवरील फौजदारी खटला चालू असतांना या पुस्तकाचे प्रकाशन झालें. पुस्तक प्रसिद्ध झाल्यावर थोडक्याच दिवसांनी मुंबईच्या हायकोर्टांत या खटल्याचा शेवटचा निकाल होऊन टिळक पूर्ण निर्दोषी होऊन सुटले.

या ग्रंथाचें प्रकाशन झाल्यावर थोड्याच दिवसांनीं प्रस्तुत लेखकानें व्याख्यानरूपाने त्यांतील सिद्धांतांची मराठी जाणणाऱ्यांसाठी माहिती करून दिली होती, व तें व्याख्यान अंशतः तत्कालीन इंदुप्रकाशांत प्रसिद्धही झालें होतें. त्यावर त्याचें हे साग्र स्वरूप ( थोडें बहुत पाल्हाळिक विवेचन गाळून ) मराठी वाचकांस सादर करण्याचा ईश्वरकृपेनें योग आतां आला आहे. वाचकांना तें आवडल्यास आमच्या श्रमाची सार्थकता झाली असे होईल.

के. ल. ओगले.

# अनुक्रमणिका.

# शुद्धिपत्रक.

| पान. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
| --- | --- | --- | --- |
| १ | ८ | आधिमौतिक | आधिभौतिक |
| २५ | २५ | उपत्तीवरील | उपपत्तीवरील |
| ३५ | टीपेंत | प-म | प--म / म |
| ३६ | २८ | माणार | जाणार |
| ८० | २४ | १, ११, ११, | १, ११८, ११ |
| ८० | २८ | यया | यथा |
| ११५ | ९ | प्रभत्यहः | प्रभृत्यह |
| १३१ | २ | सूयही | सूर्यही |
| १३१ | ४ | श्रतिप्रमाण | श्रुतिप्रमाण |
| १३४ | ८ | नवग्न | नवग्व |
| १३९ | १५ | सभानार्थक | समानार्थक |
| १४६ | ७ | दोनें | दोन |
| १५१ | २६ | आहे | आहेत |
| १६४ | १३ | महाव्रात | महाव्रत |
| १६५ | १५ | महाव्रात | महाव्रत |
| १७६ | टीपेंत | क्रीणीषुः | क्रीणीयुः |
| १७८ | ११ | कारक | कारण |
| १९२ | १२ | निरक्त | निरुक्त |
| २२१ | ४ | शय्यूची | शयूची |
| ३०१ | १७ | क्रि | क्री |
| ३१० | २० | ध्रुववाशिष्ट | ध्रुवावीशिष्ट |
| ३२० | २२ | अंशापर्ययच्या | अंशापर्यंतच्या |

# आर्य लोकांचें मूलस्थान

## अथवा

# उत्तर ध्रुवाजवळील आर्यांच्या वसतीविषयीं वेदांतील पुरावा.

---

## उपोद्घात.


स्तुत ग्रंथासारखा ग्रंथ मराठींत प्रथमच होत असल्यामुळें त्यांत आलेल्या शास्त्रीय संज्ञा मराठी वाचकांस बहुतेक नव्याच आहेत. ग्रंथ वाचतांनां या नव्या अपरिचित शब्दांशीं वाचकांना अडखळावें लागूं नये ह्मणून त्यांचा अर्थ आधीं स्पष्ट करून मग प्रकृत विषयास सुरवात केली असतां ठीक पडेल. त्यांत मुख्यत्वेंकरून जीं शास्त्रें नवींच ह्मणजे बहुधा गेल्या शतकांत उत्पन्न झालीं आहेत, त्यांच्या नांवांचा अर्थ अगोदर सांगणें अगदीं अवश्य आहे. त्यांत मराठींत आधिभौतिक शास्त्रांवर ग्रंथ कमी असल्यामुळें व जे कांहीं आहेत ते बहुधा सार्वत्रिक वाचनांत नसल्यामुळें पारिभाषिक शब्द मराठी वाचकांच्या अंगवळणीं पडलेले नाहींत, इतकेंच नव्हे तर बरेच शास्त्रीय पारिभाषिक शब्द अद्यापि मराठींत आलेलेही नाहींत. अशा स्थितीत शास्त्रीय विषयांसंबंधानें मराठींत कांहीं लिहिणाराला प्रथम शब्दांची अडचण पडते व प्रसंगविशेषीं नवे शब्द बनवावे लागतात. पण अशा रीतीनें प्रत्येकानें आपआपल्या परीनें शब्द बनविल्यास एकंदर भाषेंत मोठाच गोंधळ उत्पन्न होतो. यासाठीं सर्वांची परिभाषा एक असणें अवश्य आहे. ह्मणून शास्त्रीय विषयांवर लिहिणारानें आपल्याला लागणारे शब्द पूर्वी कोणीं वापरले आहेत कीं नाहीं हें नीट पाहून, तसे वापरलेले असल्यास तेच कायम ठेवणें जरूर आहे. हा विचार मनांत ठेऊन प्रस्तुत ग्रंथांत

प्रो. रानडे यांचे कोशांतील शब्द कायम करण्याचा प्रयत्न केला आहे. तसेंच रा. रा. ना० भ० पावगी यांनीं भूस्तरशास्त्राची परिभाषा सूक्ष्म विचार करून हिंदुस्थानांतील लोकांना सुलभ होईल अशी ग्रंथाधारें बसविली आहे, तिचाच स्वीकार येथें केला आहे. प्रस्तुत ग्रंथाचा विषय फार प्राचीन काळच्या मनुष्यासंबंधाचा आहे. अर्थात् त्यांत प्राचीन मनुष्याविषयीं माहिती गोळा करणाऱ्या शास्त्रांचा ठिकठिकाणीं उपयोग केलेला आहे. तीं शास्त्रें अशीं:—१ गाथाशास्त्र (तुलनात्मक), २ व्युत्पत्तिशास्त्र ( तुलनात्मक ), ३ पुराणवस्तुशास्त्र, ४ मस्तकविज्ञानशास्त्र, ५ मानुष्यकशास्त्र, ६ भूस्तरशास्त्र, व ७ प्राण्यवशेषशास्त्र. या शास्त्रांचे उद्देश काय व त्यांचा प्रस्तुत ग्रंथांत उपयोग कोणत्या तऱ्हेनें होणार याची थोडीशी कल्पना यावी ह्मणून त्यांचें थोडेसें स्वरूप या उपोद्घातांत सांगण्याचें योजिलें आहे.

१. **गाथाशास्त्र**—हा शब्द इंग्रजी मायथॉलॉजी (Mythology) या शब्दाबद्दल योजिलेला आहे. गाथा ह्मणजे गोष्ट. प्राचीन काळापासून चालत आलेल्या ज्या देवादिकांच्या गोष्टी त्यांनाच हा शब्द लावावयाचा आहे. अशा गोष्टींना आपण पुराणांतील गोष्टी ह्मणतों. या गोष्टींमध्ये पुष्कळ भाग लाक्षणिक असण्याचा संभव असतो. ह्मणून या दृष्टीनें व शास्त्रीय पद्धतीनें त्यांचा विचार अलीकडे होऊं लागला आहे. त्यांत निरनिराळ्या देशांतील कथांचा परस्परसंबंध किंवा त्यांमधील साम्य कितपत आहे हें तुलनात्मक दृष्टीनें पहाण्यांत विशेष मौज आहे. कारण, त्यापासून पुष्कळ ऐतिहासिक गोष्टीही कळून येतात. पाश्चात्य पंडितांस संस्कृत भाषेचें ज्ञान झाल्यापासून अशा तुलनात्मक अध्ययनास विशेष जोर आला आहे, व त्यावरून इंग्लिश जर्मन इत्यादि पाश्चात्य जाति व पारशी आणि हिंदु या पौरस्त्य जाति मूळच्या एकच आहेत असें सिद्ध झालें आहे. याप्रमाणे पुराणांतील कथांचा विचार करणाऱ्या शास्त्राला ‘ गाथाशास्त्र ’ हें नांव दिलें आहे. त्यांतच निरनिराळ्या राष्ट्रांतील कथांची तुलना करावयाची असतां त्यास ‘ तुलनात्मक गाथाशास्त्र ’ ह्मणतात.

२. **व्युत्पत्तिशास्त्र**—निरनिराळ्या भाषांचा तुलनात्मक अभ्यास करून त्यांत शब्दसाम्य, रचनासाम्य, प्रत्ययसाम्य वगैरे किती आहे याचा

विचार करणाऱ्या शास्त्राला ' तुलनात्मक व्युत्पत्तिशास्त्र ' असें नांव दिलें आहे ( इंग्रजी. फाइलॉलॉजि—Philology ). एका भाषेंतून दुसऱ्या भाषेंत जातांना शब्दांत कोणते फेरफार होतात याचें सूक्ष्म अवलोकन करून त्यांवरून निरनिराळ्या भाषांसंबंधाचे नियम या शास्त्रांत बसविले आहेत. उदाहरणार्थ, लॅटिन भाषेंतील फ बद्दल इंग्रजींत ब आणि संस्कृतांत भ होतो, असें आढळून आलें आहे. जसेः—लॅ. फ्रेटर, इं. ब्रदर आणि सं. भ्रातृ. हे नियम मूळ ग्रिम नांवाच्या विद्वान् जर्मन पंडितानें दाखवून दिले. या नियमांना अपवादादाखल ह्मणून दुसरे गौण नियम व्हर्नर नांवाच्या पंडितानें ठरविले आहेत. या शास्त्राच्या अध्ययनापासून गाथा-शास्त्राप्रमाणेंच निरनिराळ्या लोकांच्या प्राचीन इतिहासाविषयीं थोडी बहुत माहिती मिळते. या शास्त्रालाही संस्कृत भाषेचें अध्ययन यूरोपांत सुरू झाल्यापासून विशेष महत्व आलें आहे. या दोन्ही शास्त्रांवरून निघणाऱ्या स्थूल अनुमानांची उदाहरणें प्रस्तुत ग्रंथांत शेवटच्या दोन प्रकरणांत पहावयास मिळतील.

३. **पुराणवस्तुशास्त्र**—( इं. आर्किऑलॉजि Archæology ). कोणत्याही राष्ट्रांचा विश्वसनीय असा इतिहास लेखरूपानें कांहीं नियमित काळापर्यन्तच मिळतो. त्याच्या पलीकडच्या काळाची माहिती मिळण्याचें साधन ह्मणजे त्या लोकांच्या राहिलेल्या वस्तु हेंच होय. जुन्या वसतीच्या ठिकाणांतून खणतांना किंवा इतर रीतीनें नाणीं, नानाप्रकारचीं हत्यारें, शिलालेख, ताम्रपट, मोठमोठ्या इमारतींचे अवशेष, इत्यादि अनेक वस्तु आढळतात. त्यांचें वर्गीकरण करून त्यावरून त्या वापरणाऱ्या माणसां-विषयीं अनुमानानें माहिती गोळा करितां येते. अशा प्रकारच्या वस्तूंचा विचार करणारें जें शास्त्र तें ' पुराणवस्तुशास्त्र ' होय. या शास्त्राच्या ठोकळ सिद्धांतांचें विवेचन पुढें प्रथम प्रकरणांत आलें आहे.

४. **मस्तकविज्ञानशास्त्र**—मनुष्यांच्या ज्या निरानिराळ्या जाति पृथ्वीवर अस्तित्वांत आहेत, त्या सर्व मूळ एकाच जातीपासून झाल्या कीं प्रत्येकीचे मूळ पुरुष स्वतंत्र होते असा एक मोठा वाद शास्त्रज्ञ लोकांत चालू आहे. प्रत्येक पक्षाला आपल्या बाजूच्या समर्थनार्थ पुष्कळ गोष्टी सांगतां येण्यासारख्या आहेत. त्यांत प्राचीन माणसांचे जे निरनिराळ्या ठिकाणीं सांगाडे सांपडतात, त्यांच्या मस्तकाच्या आकृतींवरून व लांबी-

रुंदीच्या प्रमाणांवरून त्यांचें वर्गीकरण करण्याचा एक पक्ष प्रयत्न करीत आहे. त्यांच्या उद्योगाला 'मस्तकविज्ञानशास्त्र' (इं. Craniology or phrenology.) असें नांव आहे. अशा प्रकारच्या मस्तकपरीक्षणावरून निघणारीं कांहीं अनुमानें या पुस्तकाच्या पहिल्या प्रकरणांत आलीं आहेत.

५. **मानुष्यकशास्त्र**—निरनिराळ्या मनुष्यजातीचे स्वभाव, त्यांनीं उत्पन्न केलेल्या निरनिराळ्या कला, त्यांची पूर्वपरंपरा, त्यांची शारीर रचना, मानसिक उन्नति, त्यांनीं उत्पन्न केलेल्या व त्यांच्यांत वाढलेल्या सामाजिक, धार्मिक व राजकीय संस्था इत्यादि गोष्टींचें विवेचन या शास्त्रांत केलेलें असतें. हें शास्त्र फार व्यापक असून त्यांतील कांहीं विशेष गोष्टीचा उहापोह करणारी कित्येक पोट शास्त्रे आहेत. (इ. Anthropology).

६. **भूस्तरशास्त्र**—पृथ्वीच्या उत्पत्तीसंबंधी ज्या कांहीं कल्पना आहेत त्यांतील विशेष सयुक्तिक कल्पना ह्मटली ह्मणजे ती मूळ बाष्पमय अथवा तेजोमेघ स्थितीत असून हळूहळू तिचें घनावस्थेत संक्रमण झालें, अशी आहे. ही घनावस्था येतांना तिच्या पृष्ठभागावर पातळ कवच बनत गेलें. या कवचांत एकामागून एक पापुद्रे ऊर्फ थर (स. स्तर) उत्पन्न होऊन कालान्तराने त्या थरांवर वनस्पतीपासून तो मनुष्यापर्यन्त अनेक जाति निर्माण झाल्या. त्यांत अगदी प्रथम उत्पन्न झालेला जो थर तो आज जमिनींत फारच खोल असला पाहिजे. परंतु पृथ्वीच्या गर्भांत अद्यापिही अत्यन्त उष्णता असल्यामुळे जी तिची कार्यें भूकंपादिरूपांनीं दृग्गोचर होतात त्यांत वरची जमीन खालीं व खालची वर अशी होत असल्यामुळें आद्य थर कित्येक ठिकाणी भूपृष्ठाजवळही पहावयास मिळतात. या निरनिराळ्या थरांची पहाणी करून ते प्रथम जेथें सांपडले त्या स्थलांवरून इंग्लिश भूस्तरशास्त्रवेत्यांनीं त्यांस निरनिराळी नांवें दिली आहेत. तसेंच भूपृष्ठाला घनावस्था येऊन त्यावर जीवनाला अनुकूल स्थिति उत्पन्न होण्याला बराच काळ लागला. हा काळ वर्षमासांनीं मोजण्यासारखा नसून हजारों वर्षांचा असल्यामुळें त्याला युग अशी संज्ञा देणेंच योग्य आहे. जीवनानुकूल परिस्थिति उत्पन्न झाल्यावर प्रथम तृणादि वनस्पति, मत्स्यादि साधे प्राणी इत्यादि हळूहळू उदयास आले. तदनंतर कूर्मादि सरपटत चालणारे प्राणी आणि मग वराहादि सस्तन प्राणी निर्माण

झाले. हे निरनिराळ्या प्रकारचे प्राणी उत्पन्न होण्याला जे महान् काळ लागले त्यांनांही तत्सदृर्थक नांवें दिली आहेत. असे महाकाळ ऊर्फ युगें भूस्तरशास्त्रवेत्यांनीं आजपर्यंत एकंदर पांच मानिलीं आहेत. या प्रत्येक युगामध्यें जे मातीचे किंवा दगडांचे अनेक थर बनत गेले त्यांना त्यांच्या स्थानांवरून किंवा प्रकृतिद्रव्यांवरून नांवें दिलीं आहेत. आपल्या हिंदुस्थानांतही बहुतेक ठिकाणी ही भूस्तरपहाणी झालेली असून तिच्यासंबंधीं जीं पुस्तकें प्रसिद्ध झालेलीं आहेत त्यांत या निरनिराळ्या थरांना आपलेकडील स्थानांवरून नांवे दिलेलीं आहेत. हीं पांच युगें व त्यांचे पोट-भेद पहिल्या प्रकरणांत कोष्टकरूपानें दिले आहेत. भूस्तरशास्त्रांत पृथ्वीच्या एकंदर सर्व घन कवचाचा विचार करावयाचा असतो. पहिल्या थरापासून अगदी आतांपर्यंतचे थर कसकसे बनत गेले, वारा, पाऊस, उष्णता इत्यादि सृष्टीच्या शक्तीचे त्यांवर परिणाम होऊन ते कित्येक ठिकाणीं फुटून कसे गेले आहेत, व नवीन थर बनण्याच्या कामीं या सृष्टीच्या शक्तींचा कसा उपयोग होत आहे या सर्व गोष्टीचा भूस्तरशास्त्रांत विचार करावयाचा असतो. एखादा थर बनल्यानंतर कालांतरानें त्यावर वनस्पतींची वाढ होऊन प्राण्यांचीही तेथें वसति होते. पण त्या थरावर कांहीं कारणानें एकाएकीं बर्फाचा मोठा जाडा थर येऊन बसल्यास तेथील वनस्पति, प्राणी वगैरे सर्व त्या बर्फात गडप होऊन जातात. या बर्फाबरोबर किंवा पाण्याच्या प्रवाहाबरोबर मातीही वहात येऊन तिचे थरही त्या प्राण्यांना व वनस्पतीना आपल्या उदरांत जागा देतात. पुढें युगांतरानें पृथ्वीच्या कवचांत दुसऱ्या कांहीं घडामोडी झाल्यावर किंवा खाणी खणतांना वगैरे या गडदलेल्या प्राण्यांचे व वनस्पतींचे अवशेष आपल्या दृष्टीस पडतात. या प्राण्यवशेषांच्या निरीक्षणानें ते प्राणी कोणत्या जातीचे होते, त्यांचा काल कोणता, इत्यादि गोष्टीविषयी ज्या शास्त्रांत अनुमानें केलेलीं असतात त्या शास्त्राला प्राण्यवशेष-शास्त्र म्हणतात (इं. पॅलिऑन्टॉलॉजि Palæontology). अशा रीतीनें प्राणी व वनस्पति एकदम गडप होऊन जाण्यासारखे बर्फाचे थर उत्पन्न होण्याचीं कारणें काय असावीं याचें सविस्तर विवेचन या ग्रंथाच्या दुसऱ्या प्रकरणांत केलें आहे. हीं कारणें सुरू होऊन व बर्फाचा पूर येऊन ती कारणें नाहींशीं होईपर्यंत जो काळ जातो त्याला हिमकाल किंवा हिमयुग (इं. ग्लेशिअल ईपॉक

किंवा पीरिअड Glacial Epoch or period) असें ह्मणतात. असल्या दोन हिमकालांमध्यें येणारा जो काळ त्याला हिमान्तरकाल (इं. इंटरग्लेशिअल पीरिअड Interglacial period ) ह्मणतात; आणि गेला हिमकाल संपल्यापासून आतांपर्यंत जो काळ चालत आला आहे त्याला हिमोत्तरकाल ( इं. पोस्टग्लेशिअल पीरिअड Post-glacial Period) ह्मणतात.†

या पुस्तकांत आणखीही कित्येक शब्द आलेले आहेत. त्या सर्वांचे अर्थ शेवटीं जोडलेल्या कोशांत दिले आहेत.



---

† पृथ्वीवरील पुष्कळ प्रदेशांची भूस्तर पहाणी अद्यापि व्हावयाची आहे. ग्रेट ब्रिटन्, उत्तर अमेरिका, हिंदुस्थान, इत्यादि देशांतील बहुतेक भागांची पहाणी झालेली आहे. हिंदुस्थानांतील भूस्तरांविषयीं सरकारी भूस्तर खात्याकडून पुस्तकही प्रसिद्ध झालें आहे. त्यावरून पहातां हिंदुस्थानाची आजची रचना प्राचीन भूस्तर युगांतील रचनेहून बऱ्याच निराळ्या प्रकारची आहे असें दिसतें.

# आर्य लोकांचें मूलस्थान.



## प्रकरण १ लें.

### इतिहासपूर्वकाल.

इतिहासकाल—त्याच्या पूर्वीचा इतिहासपूर्वकाल—इतिहासकाल सर्व देशांत एकदम सुरू झाला नाहीं—त्याच्या ग्रीस व ईजिप्ट देशांतील मर्यादा—इतिहासकालाची पूर्वपीठिका म्हणजे दंतकथा—गाथाशास्त्र—त्याला तुलनात्मक व्युत्पत्तिशास्त्राचें प्रोत्साहन—या शास्त्रांचीं प्राचीन आर्यांविषयींचीं अनुमानें—मनुष्यप्राणी हिमोत्तरकालीन होय असें मत—वेदांचा अर्थ करण्याची नैरुक्त पद्धत—तिचा पाश्चात्य पंडितांनीं केलेला अवलंब आर्यांच्या मूलस्थानाचा प्रश्न—मध्यआशियांतील स्थान—पुराणवस्तुशास्त्र व भूस्तरशास्त्र यांतील नवीन शोधांचा या अनुमानांवर झालेला परिणाम—आर्यांचें मूलस्थान उत्तरेकडे असावें असें मत—वेदांचें काठिण्य—भाष्यकारांची कामगिरी—ऋग्वेदाच्या भाषान्तराविषयीं मोक्षमुल्लरचें मत—नवीन शोधांवरून वेदांचा अर्थ करण्याचें नवें साधन कां मिळणार नाहीं?—डॉ. वारनचीं अनुमानें—सर्व मानव जातीचें उत्तरध्रुवाजवळील मूलस्थान—प्रस्तुत ग्रंथाचा संकुचित उद्देश—नवीन शास्त्रीय शोधांची कामगिरी—ध्रुवावरील वसतीविषयीं आक्षेप—शास्त्रीय शोधांचा सारांश—पुराणवस्तुशास्त्रांतील तीन युगें—सुधारणेच्या तीन पायऱ्या—पाषाणयुग, कांस्ययुग, आणि लोहयुग—हीं एकमेकांपासून अगदीं अलग नाहींत—लोहयुगाची सुधारणा युरोपांत बाहेरून गेली—या युगांचे आरंभ निरनिराळ्या देशांत निरनिराळ्या वेळीं झाले—पाषाणयुगाचे दोन भाग—पूर्व आणि नव—पुराणवस्तुशास्त्राचा भूस्तरशास्त्राशीं संबंध—पांच भूस्तरयुगें आणि त्यांचे पोटभाग—प्रस्तुत त्यांतील चतुर्थ युगाचाच संबंध आहे—तृतीय युगांत मनुष्याचें अस्तित्व होतें—नव पाषाणयुगाचा काल इ. स. पूर्वी ५००० वर्षें—पाषाणयुगाचा देवदारुकाल व ओककाल यांशीं समकालीनपणा—हिमोत्तरकालाचा आरंभ—प्रो. गीकीचें मत—इतर मतें—अमेरिकन शास्त्रज्ञांच्या मताच्या पुष्ट्यर्थ कारणें—मस्तकविज्ञान शास्त्राचे शोध—इतिहास पूर्वकालीन माणसांचें वर्गीकरण—यूरोपांतील सांप्रतच्या लोकांची पूर्वपीठिका—तीसंबंधानें निरनिराळीं मतें—सांप्रतच्या यूरोपीयांच्या पूर्वजांची सुधारणा—हे लोक मूळचे कोठले या प्रश्नाचा उलगडा अद्यापि झालेला नाहीं—यूरोपांतील मूळचे आर्य पूर्वपाषाण युगांतील माणसांचे वंशज नव्हत—आर्यांच्या आदिस्थानाचा प्रश्न—टेलरचें मत—हें स्थान मध्यआशियांत नाहीं—तें उत्तरध्रुवाजवळ असावें.

## इतिहासपूर्वकाल



कोणत्याही राष्ट्राच्या इतिहासाचा विचार केला तर असें आढळून येईल कीं, त्यासंबंधाची विश्वसनीय माहिती कांहीं एका विशिष्ट काळापर्यंतच मिळते. त्याच्या पूर्वी पाहिलें तर केवळ दंतकथा व काल्पनिक गोष्टी यांचें साम्राज्य असून त्यांच्याही पलीकडे पाहूं गेल्यास सर्वत्र अंधकार दिसून येतो.

ज्या काळापासून थोडी बहुत तरी विश्वसनीय अशी माहिती मिळते तो इतिहासकाळ, व त्याच्या पूर्वीचा तो इतिहास-पूर्वकाल होय. हा इतिहासकाल सर्व राष्ट्रांमध्यें एका वेळीच सुरू झाला असें नाही. ग्रीस देशाच्या या कालाची मजल इ. स. पूर्वी १००० वर्षांपर्यंत नेतां येते, तर ईजिप्ट देशांतील थडग्यांतून व दुसऱ्या स्मारक चिन्हांतून नुकत्याच उकरून काढिलेल्या लेखांवरून, तेथील इतिहासकाल इ. स. पूर्वी ५००० वर्षांइतका प्राचीन आहे असें दिसतें. इतके जरी हे काळ प्राचीन आहेत, तरी वरील दोन्हीही देशांच्या इतिहासकालाची पूर्वपीठिका म्हणजे दंतकथा व पौराणिक गोष्टीच होत. एकोणिसाव्या शतकाच्या अर्धापर्यंत, इतिहासपूर्वकालीन मनुष्य-जातीच्यासंबंधानें माहिती मिळविण्याचें साधन या दंतकथांशिवाय दुसरें कोणतेंही उपलब्ध नव्हतें आणि म्हणून या कथांचेंच पद्धतशीर व सोपपत्तिक विवेचन करून अति प्राचीन काळच्या मनुष्य जातीच्या इतिहासाची माहिती कांहीं मिळते कीं नाहीं हें पहाण्याचे बरेच जणांनीं प्रयत्न केले. परंतु निःपक्षपातानें विचार करणाऱ्या सर्व पंडितांस त्या कथांची मीमांसा करण्याच्या पद्धतीपैकीं कोणतीही पद्धत समाधानकारक नाही असें वाटत असे. परंतु तुलनात्मक व्युत्पत्तिशास्त्राच्या अध्ययनानें, या पुराण-गोष्टीविषयक प्रश्नाचा नवीन रीतीनें विचार करण्यास प्रथम प्रोत्साहन मिळालें. यूरोपीय लोकांस भरतखंडांतील प्राचीन भाषा व धर्मग्रंथ यांची माहिती झाली, तेव्हां जणूं काय आपणांस एक नवीन जगच सांपडलें असें त्यांस वाटलें. पुढें संस्कृत व झेन्द् या भाषांमध्यें निकट संबंध आहे, व तसाच तो यूरोपांतील मुख्य मुख्य लोकांच्या भाषांमध्येंही आहे असें आढळून आलें आणि त्यामुळें जगाच्या प्राचीन इतिहासासंबंधानें जीं मतें सामान्यतः प्रचलित होतीं त्यांमध्यें पूर्ण क्रांति झाली. यूरोपांतील प्राचीन व अर्वा-

चीन मुख्य मुख्य राष्ट्रांच्या भाषा व भरतखंडांतील ब्राह्मण आणि झोरो-आस्तरचे अनुयायी यांच्या भाषा, यांमध्यें निकट साम्य आहे असें आढळून आल्यावर सहजच असें अनुमान निघालें कीं, या सर्व भाषा एकाच मूळभाषेच्या शाखा असल्या पाहिजेत; व या अनुमानावरून आणखी असा तर्क झाला कीं, वरील सर्व राष्ट्रांतील लोकांचे मूळपुरुषही कोणी आदि आर्य असावे. अशा रीतीनें वैदिक ग्रंथ व नंतरचें संस्कृत वाङ्मय यांच्या अध्ययनानें, प्राचीन काळच्या मनुष्यांचा इतिहास व त्यांची सुधारणा यासंबंधाच्या पाश्चात्य लोकांच्या कल्पनांमध्यें हळूहळू क्रांति घडवून आणिली. त्यासंबंधानें सविस्तर विवेचन करणें हें येथें जरा अप्रस्तुतच होईल. तरी पण एवढें येथें सांगितलें पाहिजे कीं, एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात झालेल्या शास्त्रीय शोधांच्या योगानें, इतिहासपूर्वकालाहूनही अति प्राचीन अशा काळच्या माणसांसंबंधानें माहिती होण्याचीं नवीन साधनें उपलब्ध होईपर्यंत वरील प्रश्नासंबंधानें विचार व शोध करावयाचा सर्व मक्ता तुलनात्मकगाथाशास्त्रज्ञ व शब्दव्युत्पत्तिशास्त्रज्ञ लोकांनीं आपलेकडेच ठेवला होता.

हे गाथाशास्त्रज्ञ जेव्हां सदर प्रश्नांचा विचार करीत होते, तेव्हां त्यांसंबंधानें सर्व-संमत मत असें होतें की, मनुष्य-प्राणी हा हिमकालानंतर उत्पन्न झाला आहे; व म्हणून प्राचीन माणसांची भौतिक व भौगोलिक परिस्थिति आतांच्याहून फारशी भिन्न नव्हती, असें ते समजत. अर्थात् सर्व प्राचीन दंतकथा व पौराणिक गोष्टी यांची मीमांसा करणें ती, हल्लींच्या प्रमाणेच जवळ जवळ हवामानादि परिस्थिति असलेल्या देशांत त्या उत्पन्न व वृद्धिंगत झाल्या अशी पूर्वकल्पना करून ते करीत असत. उदाहरण, वेदांतील प्रत्येक गोष्टीचा अर्थ तिचा संबंध पर्जन्याशी किंवा उषःप्रकाशाशीं लावून ते करीत. पण हा अर्थ बऱ्याच ठिकाणीं मुळींच समाधानकारक नसे. इंद्र म्हणजे केवळ पर्जन्य-देवता व वृत्र म्हणजे अवर्षणाचा अथवा रोज सूर्यास्तानंतर येण्याच्या काळोखाचा दैत्य असें ते मानीत. ही पद्धति प्रथम आपल्या इकडील निरुक्तकारांनीं स्वीकारली होती; व पाश्चात्य पंडितांनीं थोडीशी सुधारणा करून तिचाच हल्लींही अवलंब केला आहे; तरी तिच्या पूर्वस्वरूपांत आजही कांहीं दृश्य फरक झाला आहे असें नाहीं.

## १. इतिहासपूर्वकाल



कोणत्याही राष्ट्राच्या इतिहासाचा विचार केला तर असें आढळून येईल कीं, त्यासंबंधाची विश्वसनीय माहिती कांहीं एका विशिष्ट काळापर्यंतच मिळते. त्याच्या पूर्वी पाहिलें तर केवळ दंतकथा व काल्पनिक गोष्टी यांचें साम्राज्य असून त्यांच्याही पलीकडे पाहूं गेल्यास सर्वत्र अंधकार दिसून येतो. ज्या काळापासून थोडी बहुत तरी विश्वसनीय अशी माहिती मिळते तो इतिहासकाळ, व त्याच्या पूर्वीचा तो इतिहास-पूर्वकाल होय. हा इतिहासकाल सर्व राष्ट्रांमध्यें एका वेळींच सुरू झाला असें नाही. ग्रीस देशाच्या या कालाची मजल इ. स. पूर्वी १००० वर्षांपर्यंत नेतां येते, तर ईजिप्ट देशांतील थडग्यांतून व दुसऱ्या स्मारक चिन्हांतून नुकत्याच उकरून काढिलेल्या लेखांवरून, तेथील इतिहासकाल इ. स. पूर्वी ५००० वर्षांइतका प्राचीन आहे असें दिसते. इतके जरी हे काळ प्राचीन आहेत, तरी वरील दोन्हीही देशांच्या इतिहासकालाचीं पूर्वपीठिका म्हणजे दंतकथा व पौराणिक गोष्टीच होत. एकोणिसाव्या शतकाच्या अर्धापर्यंत, इतिहासपूर्वकालीन मनुष्य-जातीच्यासंबंधानें माहिती मिळविण्याचें साधन या दंतकथांशिवाय दुसरें कोणतेंही उपलब्ध नव्हतें आणि म्हणून या कथांचेंच पद्धतशीर व सोपपत्तिक विवेचन करून अति प्राचीन काळच्या मनुष्य जातीच्या इतिहासाची माहिती कांहीं मिळते, कीं, नाही हें पहाण्याचे बरेच जणांनीं प्रयत्न केले. परंतु निःपक्षपातानें विचार करणाऱ्या सर्व पंडितांस त्या कथांची मीमांसा करण्याच्या पद्धतीपैकीं कोणतीही पद्धत समाधानकारक नाहीं असें वाटत असे. परंतु तुलनात्मक व्युत्पत्तिशास्त्राच्या अध्ययनानें, या पुराण-गोष्टीविषयक प्रश्नाचा नवीन रीतीनें विचार करण्यास प्रथम प्रोत्साहन मिळालें. यूरोपीय लोकांस भरतखंडांतील प्राचीन भाषा व धर्मग्रंथ यांची माहिती झाली, तेव्हां जणूं काय आपणांस एक नवीन जगच सांपडलें असें त्यांस वाटलें. पुढें संस्कृत व झेन्द् या भाषांमध्यें निकट संबंध आहे, व तसाच तो यूरोपांतील मुख्य मुख्य लोकांच्या भाषांमध्येंही आहे असें आढळून आले आणि त्यामुळें जगाच्या प्राचीन इतिहाससंबंधानें जीं मतें सामान्यतः प्रचलित होतीं त्यांमध्यें पूर्ण क्रांति झाली. यूरोपांतील प्राचीन व अर्वा-

चीन मुख्य मुख्य राष्ट्रांच्या भाषा व भरतखंडांतील ब्राह्मण 'आणि झोरो-आस्तरचे अनुयायी यांच्या भाषा, यांमध्यें निकट साम्य आहे असें आढळून आल्यावर सहजच असे अनुमान निघालें कीं, या सर्व भाषा एकाच मूळभाषेच्या शाखा असल्या पाहिजेत; व या अनुमानावरून आणखी असा तर्क झाला कीं, वरील सर्व राष्ट्रांतील लोकांचे मूळपुरुषही कोणी आदि आर्य असावे. अशा रीतीनें वैदिक ग्रंथ व नंतरचें संस्कृत वाङ्मय यांच्या अध्ययनानें, प्राचीन काळच्या मनुष्यांचा इतिहास व त्यांची सुधारणा यासंबंधाच्या पाश्चात्य लोकांच्या कल्पनांमध्यें हळूहळू क्रांति घडवून आणिली. त्यासंबंधानें सविस्तर विवेचन करणें हें येथें जरा अप्रस्तुतच होईल. तरी पण एवढें येथें सांगितलें पाहिजे कीं, एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत झालेल्या शास्त्रीय शोधांच्या योगानें, इतिहासपूर्वकालाहूनही अति प्राचीन अशा काळच्या माणसांसंबंधाने माहिती होण्याचीं नवीन साधनें उपलब्ध होईपर्यंत वरील प्रश्नासंबंधानें विचार व शोध करावयाचा सर्व मक्ता तुलनात्मकगाथाशास्त्रज्ञ व शब्दव्युत्पत्तिशास्त्रज्ञ लोकांनी आपलेकडेच ठेवला होता.

हे गाथाशास्त्रज्ञ जेव्हां सदर प्रश्नांचा विचार करीत होते, तेव्हां त्यांसंबंधानें सर्व-संमत मत असें होतें की, मनुष्य-प्राणी हा हिमकालानंतर उत्पन्न झाला आहे; व म्हणून प्राचीन माणसांची भौतिक व भौगोलिक परिस्थिति आतांच्याहून फारशी भिन्न नव्हती, असे ते समजत. अर्थात् सर्व प्राचीन दंतकथा व पौराणिक गोष्टी यांची मीमांसा करणें ती, हल्लींच्या प्रमाणेंच जवळ जवळ हवामानादि परिस्थिति असलेल्या देशांत त्या उत्पन्न व वृद्धिंगत झाल्या अशी पूर्वकल्पना करून ते करीत असत. उदाहरण, वेदांतील प्रत्येक गोष्टीचा अर्थ तिचा संबंध पर्जन्याशीं किंवा उषःप्रकाशाशीं लावून ते करीत. पण हा अर्थ बऱ्याच ठिकाणीं मुळीच समाधानकारक नसे. इंद्र म्हणजे केवळ पर्जन्य-देवता व वृत्र म्हणजे अवर्षणाचा अथवा रोज सूर्यास्तानंतर येण्याच्या काळोखाचा दैत्य असें ते मानीत. ही पद्धति प्रथम आपल्या इकडील निरुक्तकारांनीं स्वीकारली होती; व पाश्चात्य पंडितांनीं थोडीशी सुधारणा करून तिचाच हल्लींही अवलंब केला आहे; तरी तिच्या पूर्वस्वरूपांत आजही कांहीं दृश्य फरक झाला आहे असें नाहीं.

गाथाशास्त्रज्ञ लोकांनीं आणखी असेंही एक अनुमान काढलें की, आर्य लोकांचें मूलस्थान मध्यआशियांतील कोणतें तरी ठिकाण असावें, व भारतीय आर्य तेथून निघाल्यावर वैदिक सूक्तांची रचना झाली असल्यामुळें त्यांत, समशीतोष्ण कटिबंधांत रहाणाऱ्या लोकांच्या मात्र कल्पना आहेत. परंतु एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत झालेल्या शास्त्रीय शोधांनीं असल्या अनुमानांस पार हुसकून लाविलें आहे. यूरोपांत ठिकठिकाणीं जमिनींत आढळणाऱ्या शेंकडों दगडी व कांशाच्या हत्यारांच्या साहाय्यानें इतिहासकालाहून फार जुन्या काळीं आढळून येणारीं, जीं लोह, कांस्य व पाषाण युगें तीं एकामागून एक अशीं क्रमानें होऊन गेलीं असें पुराणवस्तुशास्त्रज्ञांनी ठरविलें आहे. परंतु आपल्या विषयाला प्रस्तुत अशी एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत घडलेली सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे * चतुर्थ युगाच्या अन्तीं हिमकाल होऊन गेला हें दाखविणारा पुरावा सांपडला ही होय. त्यावरून मनुष्यप्राणी हा फार प्राचीन म्हणजे चतुर्थ युगांतच केवळ नव्हे तर तृतीय युगांतही होता, व तेव्हां या पृथ्वीची हवामानासंबंधाची स्थिति आतांच्याहून, तशीच हिमोत्तरकालाहूनही अगदीं भिन्न होती, असे दाखवितां आलें. नवपाषाणयुग व पूर्वपाषाणयुग यांमध्यें बनलेल्या थरांत आढळून आलेल्या मनुष्यांच्या व इतर प्राण्यांच्या शरीरावशेषावरूनही, जेथें ते सांपडले त्या ठिकाणीं रहाणाऱ्या प्राचीन माणसांविषयीं कांहीं नवीन गोष्टी कळल्या. यावरून लवकरच असें स्पष्ट दिसून आलें कीं, गाथाशास्त्रज्ञांनीं योजिलेल्या प्राचीन कालदर्शक साधनांचा जास्त व्यापक रीतीनें उपयोग करून पुराणकथा व दंतकथा यांच्या विवेचनावरून पूर्वीं काढिलेल्या अनुमानांना, नवीन शास्त्रीय शोधांनीं उघडकीस आणिलेल्या गोष्टींच्या सहाय्यानें कांहीं तरी आळा घातला पाहिजे. व्युत्पत्तिशास्त्रज्ञांनां यापुढें आपलीं मतें जरा जपूनच बनवावीं लागूं लागलीं, त्यांपैकीं कित्येकांनी वर सांगितलेल्या नवीन शास्त्रीय शोधांची वास्तव योग्यता कबूल केली, व त्या शोधांवरून निघणारीं अनुमानेंही त्यांस लवकरच पटलीं. कित्येक जर्मन पंडित आर्य लोकांचें मूलस्थान मध्यआशिया नव्हे असें साफ म्हणूं

---

* या व आणखी कांहीं शब्दांचा अर्थ याच प्रकरणांत पुढें आलेला आहे.

लागले; आणि अलीकडे तर त्याचें मूलस्थान आणखी उत्तरेकडे कोठें तरी असावें असें बहुतेक सर्वसंमत मत झालें आहे.

आतां अशा रीतीनें जरी व्युत्पत्तिशास्त्रज्ञ व गाथाशास्त्रज्ञ यांनीं काढलेल्या अनुमानांमध्यें नवीन शास्त्रीय शोधांच्या अनुरोधानें फेरफार करण्यांत येत आहेत, तरी दुसरें तितक्याच महत्वाचें एक काम अद्यापि व्हावयाचेंच आहे. वर सांगितलेंच आहे कीं, पाश्चात्य पंडितांनां वैदिक ग्रंथांची माहिती झाल्यापासून प्राचीन कथापुराणांच्या अभ्यासाला नवीन प्रोत्साहन मिळालें. पण आर्य लोकांच्या ग्रंथांत अत्यंत प्राचीन म्हणून सर्वानुमतें ठरलेले जे वेद त्यांचा अद्यापि चांगला अर्थ लागलेला नाहीं. ब्राह्मणकाळीं म्हणजे इ. स. पूर्वी कित्येक शतकें इतक्या काळींही ते अंशतः समजत नाहींसे झाले होते; आणि जर आपल्या निरुक्तकारांनी व वैय्याकरणांनीं श्रम केले नसते, तर आजपर्यन्त ते अगदीं अज्ञातच राहिले असते. व्युत्पत्तिशास्त्र व गाथाशास्त्र यांच्या तुलनात्मक विवेचनाने समजणाऱ्या गोष्टींवरून पाश्चात्य पंडितांनीं आपले इकडील अर्थमीमांसा पद्धतीमध्यें थोडीबहुत सुधारणा केली आहे हें खरें; तरी अगदी परकी व अपरिचित अशा कल्पना व विचार ज्यांत आहेत अशा वाक्यांचा अर्थ व्युत्पत्तिशास्त्राच्या जोरावर पूर्णपणें लागणें शक्य नाहीं. वेदांचा अर्थ लावण्यांत हीच मोठी अडचण आहे. पर्जन्याच्या अथवा उषेच्या कल्पनेवर कांहीं गोष्टींचा अर्थ लागेल; परंतु वेदांमध्यें कित्येक वाक्यें अशीं आहेत कीं, त्यांतील शब्द तर अगदी साधे पण कोणत्याही कल्पनेवर त्यांचा अर्थ मात्र बसत नाहीं. अशा प्रकारची वाक्यें आलीं म्हणजे सायणाचार्यांसारखे टीकाकार केवळ शब्दास प्रतिशब्द देतात, नाहीं तर आपल्याला हवा असेल तो अर्थ त्यांतून निघावा म्हणून त्या शब्दांची वाटेल तशी ओढाताण करतात; आणि कित्येक यूरोपीय पंडित तर हे भाग चुकीचे आहेत, किंवा त्यांत कांहीं शब्द गळलेले आहेत असेंही म्हणतात. यावरून एक गोष्ट मात्र उघड होते, ती ही कीं, कांहीं वैदिक वाक्यांचा अर्थ प्रस्तुत मुळींच लागण्यासारखा नाहीं व म्हणून त्यांचें भाषान्तर करणेंही शक्य नाहीं. पंडित मोक्ष मुल्लर यांस ही गोष्ट सर्वस्वी कबूल होती. त्यानें लिहिलें आहे कीं, "ऋग्वेदाचें भाषान्तर करण्याचें काम पुढल्या शत-

कांतील लोकांचें आहे; आजच्या पंडितांचें काम एवढेच आहे की, यास्कप्रभृति भारतीय पंडितांनीं केल्याप्रमाणें कठीण वाक्यें म्हणून जीं आहेत त्यांचा विचार करून त्यांचें काठिण्य होईल तितकें कमी करावयाचें."

पण जर गेल्या शतकाच्या शेवटीं झालेल्या शास्त्रीय शोधांनी अति प्राचीन माणसांच्या इतिहासांतील कांहीं गोष्टी समजताल, तर आर्य लोकांच्या प्राचीनतम कल्पनांचा व विचारांचा सांठा जो वेद त्यांतील गोष्टींचा अर्थ करण्याचें एखादें नवें साधन त्यांवरून कां उपलब्ध होणार नाहीं ? हिमकालापूर्वी मनुष्यप्राणी जर अस्तित्वांत असेल; व बर्फा-मुळें पृथ्वीवर झालेलीं महान् स्थित्यन्तरें जर त्यानें पाहिलीं असतील, तर मनुष्यजातीच्या अति प्राचीन दंतकथा व कल्पना यांमध्यें त्या गोष्टींचा उल्लेख फार गूढ कां असेना, पण कांहीं तरी आढळला पाहिजे. डॉ. वॉरन नांवाच्या पंडिताने "नंदनवनोपलब्धि अथवा मानवजातीचें उत्तर ध्रुवाजवळचे आदिस्थान" या नांवाच्या आपल्या ग्रंथामध्यें प्राचीन परंपराप्राप्त कथांचा नवीन शास्त्रीय शोधांवरून अर्थ करून असे अनु-मान काढलें आहे कीं, सगळ्या मानवजातीचें मूलस्थान उत्तर ध्रुवा-जवळच्या प्रदेशांत कोठें तरी असावें. आपल्याला इतक्या विस्तृत दृष्टीने विचार करावयाचा नाहीं. आपल्याला फक्त वेदांसंबंधानें विचार करून असे दाखवावयाचे आहे कीं, आजपर्यन्त दुर्बोध म्हणून मानिलेल्या कांहीं वैदिक वाक्यांचा नवीन शास्त्रीय शोधान्वये अर्थ केल्यास वैदिक काळच्या लोकांच्या पूर्वजांचें वसतिस्थान गेल्या हिमकालाच्या पूर्वी उत्तर ध्रुवाजवळ कोठें तरी होतें असें अनुमान अवश्य करावें लागतें. हें दाख-विण्यासाठी ज्या वैदिक वाक्यांचा आधार आतां घ्यावयाचा आहे तीं पौरस्त्य व पाश्चात्य अशा सर्व पंडितांनी दुर्बोध म्हणून सोडून दिलीं होती किंवा प्रत्येकानें आपल्या मर्जीस येईल तसा त्यांचा वेडा वांकडा कसा तरी अर्थ लाविला होता; या गोष्टीचा विचार करतां प्रस्तुत काम बरेंच कठीण आहे हें खरें. त्या वाक्यांचे टीकाकारांनीं केलेले अर्थ आज-पर्यंत पंडितांनीं मान्य केले आहेत, तरी ते मुळींच समाधानकारक नाहींत. पण आतां पुराणवस्तुशास्त्र व भूस्तरशास्त्र यांमध्यें झालेल्या नवीन शो-धांच्या योगानें त्यांचा अर्थ करण्याचें अधिक चांगलें साधन आपल्याला

मिळालें आहे; आणि ही गोष्ट पुढील विवेचनावरून आपणांस दाखवितां येणार आहे. या शोधांच्या योगानें गाथाशास्त्र व व्युत्पत्तिशास्त्र यांवरून काढिलेलीं अनुमानें रद्द झालीं आहेत; पण याहूनही मोठी कामगिरी त्यांनीं केली आहे; ती ही कीं, आर्य लोकांच्या बहुतेक पौराणिक कथांचा अर्थ करण्याचें एक नवें साधन त्यांच्या योगानें उपलब्ध झालें आहे. या साधनांचा उपयोग करून निघालेल्या अनुमानांच्या योगानेंही पुनः आर्य लोकांच्या प्राचीन इतिहासावर जास्त प्रकाश पडून पुराणवस्तुशास्त्रज्ञ व भूस्तरशास्त्रज्ञ यांनी सांप्रत काढिलेल्या अनुमानांत भर पडून कदाचित् त्यामध्यें फेरफारही होतील.

आतां वैदिक लोकांचे पूर्वज उत्तर ध्रुवाजवळ रहात होते हे दाखविणाऱ्या वेदांतील वाक्यांचें विवेचन करण्यापूर्वी, पुराणवस्तुशास्त्र, भूस्तर शास्त्र, प्राण्यवशेषशास्त्र वगैरे शास्त्रांत झालेल्या ज्या नवीन शोधांचे उल्लेख वर आले आहेत त्यांचा थोडक्यांत गोषवारा देणे जरूर आहे. कारण, मनुष्यप्राणी हिमकालापूर्वी अस्तित्वांत नव्हता, व ध्रुवप्रदेश वसतियोग्य कधींही नव्हते अशी कल्पना अद्यापिहि बरेच जणाची आहे; अशी कल्पना असणाऱ्या लोकांस, आर्य—लोक ध्रुवाजवळ रहात होते हें ह्मणणें दर्शनींच खोटें वाटेल व ती गोष्ट केवळ अशक्य आहे असेही ते ह्मणतील. या करितां, उत्तरध्रुवप्रदेश एका काळीं वसतियोग्य होते हें दाखविण्यासाठी, भूस्तरादि शास्त्रांतील हे नवीन शोध काय आहेत हें सांगणें अवश्य आहे.

इतिहासपूर्व—काळच्या माणसांनीं आपल्या अस्तित्वाच्या बऱ्याच खुणा मागें ठेविलेल्या आहेत. पण त्या, इतिहासकालांतील मोठमोठीं स्मारकचिन्हें, थडगी, मनोरे, शिलालेख, इत्यादिकांसारख्या नसून अगदीं साध्या प्रकारच्या आहेत. यूरोपांत पुष्कळ ठिकाणीं जुन्या छावण्या, प्राचीन किल्यांचे तट, स्मशानें, देवालये, जलनिवासस्थानें वगैरे प्राचीनकाळच्या वस्तु सांपडतात. त्यांत खणतांना दगडांचीं किंवा धातूचीं हजारों हत्यारें सांपडलीं आहेत. त्यांपैकी कांहीं उत्तम घोटीव आहेत व कांहीं जरा ओबडधोबड आहेत. पुराणवस्तुशास्त्रज्ञांनीं त्यांचें परीक्षण करून, ईजिप्ट देशांतील चित्रलिपींतील लेखांवरून जीं अनुमानें निघतात तशींच अनु-

मानें काढिलीं आहेत. हीं दगडी व धातूचीं हत्यारें वगैरे आजपर्यन्त कोणाला माहीत नव्हतीं असें नाहीं, पण शास्त्रप्रवीण लोकांचें लक्ष आजपर्यन्त त्यांकडे गेलें नव्हतें. आशिया व यूरोप या खंडांतील शेत-कऱ्यांना शेतें खणतांनां ती आढळलीं ह्मणजे तीं आकाशांतून पडलेलीं देवतांचीं शस्त्रें वगैरे आहेत असें समजून ते त्यांची पूजा करीत. परंतु या वस्तूंचें सूक्ष्म निरीक्षण करून पुराणवस्तुशास्त्रज्ञ लोकांनीं त्यांचे तीन वर्ग केले आहेत. पहिल्या वर्गांत दगडी हत्यारें ( यांत शिंगें, लांकूड व हाडें यांचाही समावेश केला आहे ) येतात, दुसऱ्यांत कांशाचीं व तिस-ऱ्यांत लोखंडाचीं येतात. हे तीन वर्ग इतिहासपूर्वकालीन मनुष्यांच्या सुधारणेच्या तीन पायऱ्या दर्शवितात. धातूंची माहिती होण्यापूर्वी दगड, लांकूड अथवा हाडें यांचीं केलेली, विंझणें, कुदळ, बाणांची टोके, टांकी, कट्यार वगैरे हत्यारेंच वापरण्यांत होती. पण जशी जशी धातूंची माहिती होत गेली तशी तशीं प्रथमतः कांशाचीं नंतर लोखंडाची अशीं हत्यारें उपयोगांत येऊं लागून दगडाची हळुहळू कमी होऊं लागली. या वर सांगितलेल्या प्राचीन मनुष्याच्या सुधारणेच्या तीन पायऱ्या एकमेकांपासून अगदी अलग आहेत असें मात्र समजतां कामा नये. त्यासबंधाने अगदीं कडक निर्बंध करतां यावयाचा नाही. पाषाणयुग अमक्या एका वेळी संपलें व नंतर कांस्ययुग सुरू झालें, असें सांगतां येणार नाही. हे तीन विभाग ह्मणजे अगदी ढोबळ आहेत. एका पायरीवरून दुसऱ्या पायरीपर्यंत झालेले संक्रमण सावकाश क्रमाक्रमाने झालेले आहे. म्हणजे कांशाचीं हत्यारें उपयोगांत येऊं लागल्यावर सुद्धां बराच काळपर्यन्त दगडी हत्यारें लोक वापरीत होते; व अशीच गोष्ट पुढच्या ह्मणजे लोह-युगाचीही आहे. तांबे व कथील एका विशिष्ट प्रमाणांत मिळविलीं ह्मणजे कांसे होतें. यावरून कांस्ययुगापूर्वी एक ताम्रयुग मानावें लागतें. परंतु अशी ताम्र व वंग युगें वेगळीं होतीं अशी कल्पना करण्यास पुरेसा आधार अद्यापि मिळालेला नाहीं. ह्मणून कांसे करण्याची युक्ति मूळ यूरोपांत निघाली नसून तेथील लोक ती इतर देशांतील लोकांपासून शिकले, किंवा हिंदी—यूरोपीय आर्यच ती आपल्या बरोबर घेऊन तेथें गेले असा संभव दिसतो. या युगांसंबंधानें दुसरी लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ह्मटली ह्मणजे यांपैकीं कोणतेंही एकादें युग निरनिराळ्या देशांत एकाच

वेळीं होतें असें नाहीं. उदाहरणार्थ, यूरोपांतील लोक जेव्हां पाषाणयुगाच्या अगदीं पहिल्या पहिल्या पायरीवरच होते तेव्हां ह्मणजे इ. स. पूर्वी सुमारें ६००० वर्षांच्या सुमारास ईजिप्ट देशांतील लोक सुधारणेच्या बऱ्याच वरच्या पायरीवर चढले होते. त्याचप्रमाणे ग्रीक लोक लोहयुगापर्यंत गेले असतां इतालींतील लोक कांस्ययुगांतच होते व यूरोपच्या अगदीं पश्चिम भागांत तर पाषाणयुगच सुरू होते. या गोष्टीवरून असे दिसतें की, सुधारणेची प्रगति कित्येक ठिकाणी मंद व कित्येक ठिकाणी जलद होती, व ती प्रत्येक ठिकाणच्या परिस्थितीवर अवलंबून होती. तरी स्थूलमानानें पहातां ही तीन युगें ह्मणजे पाषाण, कांस्य व लोह हीं इतिहासकालाच्या पूर्वीच्या सुधारणेच्या तीन निरनिराळ्या पायऱ्या दर्शवितात असें ह्मणावयास हरकत नाहीं.

या युगांमध्ये सर्वांत जुने जें पाषाणयुग त्याचे आणखी दोन विभाग करतात. ते पूर्वपाषाणयुग व नवपाषाणयुग हे होत. या दोहोंमध्यें फरक एवढाच की, पहिल्यांत ह्मणजे पूर्व पाषाणयुगांत केलेलीं हत्यारें फार ओबडधोबड असत ह्मणजे त्यांस फोडून फोडून सरासरी आकार आणलेला असे; परंतु नवपाषाणयुगांतील हत्यारे चांगली कांतीव घोटीव असत. पूर्वपाषाणयुगासबंधाने आणखीही एक विशेष गोष्ट आहे ती अशी कीं, ज्या ठिकाणी त्या काळची हत्यारें सांपडतात त्या ठिकाणावरूनच नवपाषाणयुगांतील हत्यारापेक्षा ती जुनी आहेत असे स्पष्ट दिसते; शिवाय ही दोन्ही प्रकारची हत्यारें फार करून एके ठिकाणीं सापडत नाहीत. या दोन पोटविभागांमध्ये तिसरा फरक असा आहे की, पूर्वपाषाणयुगांतील माणसांच्या अवशेषांबरोबर पुष्कळ मोठ्या मोठ्या सस्तन प्राण्यांचेही अवशेष आढळतात व हे प्राणी ह्मणजे मोठे अस्वल, हत्ती, व गेंडे, हे नवपाषाणयुगांतील माणसाचा अवतार होण्यापूर्वीच जगांतून निर्वंश झाले. तात्पर्य, हे दोन विभाग निराळे मानणें वरील कारणास्तव भाग आहे. आणखी हेंही लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, पूर्वपाषाणयुगांत पृथ्वीवरील पाणी व जमीन यांची वांटणीही नवपाषाणयुगांतील वांटणीहून फार निराळी होती; पण नवपाषाणयुगाच्या आरंभापासून आतांपर्यन्त भूपृष्ठाची स्थिति व त्यावरील हवामान हीं बहुतेक कायमच आहेत.

या तीन युगांचा भूगर्भातील थरांच्या कालाशीं संबंध काय व कसा

मानें काढिलीं आहेत. हीं दगडी व धातूचीं हत्यारे वगैरे आजपर्यन्त कोणाला माहीत नव्हतीं असें नाहीं, पण शास्त्रप्रवीण लोकांचें लक्ष आजपर्यन्त त्यांकडे गेलें नव्हतें. आशिया व यूरोप या खंडांतील शेतकऱ्यांना शेते खणतांनां तीं आढळलीं ह्मणजे तीं आकाशांतून पडलेलीं देवतांचीं शस्त्रें वगैरे आहेत असें समजून ते त्यांची पूजा करीत. परंतु या वस्तूंचें सूक्ष्म निरीक्षण करून पुराणवस्तुशास्त्रज्ञ लोकांनीं त्यांचे तीन वर्ग केले आहेत. पहिल्या वर्गात दगडी हत्यारें ( यांत शिंगें, लांकूड व हाडें यांचाही समावेश केला आहे ) येतात, दुसऱ्यांत कांशाचीं व तिसऱ्यांत लोखंडाचीं येतात. हे तीन वर्ग इतिहासपूर्वकालीन मनुष्यांच्या सुधारणेच्या तीन पायऱ्या दर्शवितात. धातूंची माहिति होण्यापूर्वी दगड, लांकूड अथवा हाडें यांचीं केलेली, विंझणें, कुदळ, बाणांची टोके, टांकी, कट्यार वगैरे हत्यारेंच वापरण्यांत होती. पण जशी जशी धातूंची माहिति होत गेली तशीं तशी प्रथमतः कांशाचीं नंतर लोखंडाचीं अशी हत्यारें उपयोगांत येऊं लागून दगडाची हलुहळू कमी होऊं लागलीं. या वर सांगितलेल्या प्राचीन मनुष्याच्या सुधारणेच्या तीन पायऱ्या एकमेकांपासून अगदी अलग आहेत असे मात्र समजतां कामा नये. त्यासंबंधानें अगदी कडक निर्बंध करतां यावयाचा नाहीं. पाषाणयुग अमक्या एका वेळीं संपलें व नंतर कांस्ययुग सुरू झाले, असें सांगतां येणार नाही. हे तीन विभाग ह्मणजे अगदी ढोबळ आहेत. एका पायरीवरून दुसऱ्या पायरीपर्यंत झालेले संक्रमण सावकाश क्रमाक्रमाने झालेले आहे. म्हणजे कांशाचीं हत्यारे उपयोगांत येऊं लागल्यावर सुद्धां बराच काळपर्यन्त दगडी हत्यारें लोक वापरीत होते; व अशीच गोष्ट पुढच्या ह्मणजे लोहयुगाचीही आहे. तांबे व कथील एका विशिष्ट प्रमाणांत मिळविली ह्मणजे कांसे होतें. यावरून कांस्ययुगापूर्वी एक ताम्रयुग मानावे लागते. परतु अशी ताम्र व वंग युगें वेगळीं होतीं अशी कल्पना करण्यास पुरेसा आधार अद्यापि मिळालेला नाहीं. ह्मणून कांसे करण्याची युक्ति मूळ यूरोपांत निघाली नसून तेथील लोक ती इतर देशांतील लोकांपासून शिकले, किंवा हिंदी—यूरोपीय आर्यच ती आपल्या बरोबर घेऊन तेथें गेले असा संभव दिसतो. या युगांसंबंधानें दुसरी लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ह्मटली ह्मणजे यांपैकी कोणतेंही एकादें युग निरनिराळ्या देशांत एकाच

वेळीं होतें असें नाहीं. उदाहरणार्थ, यूरोपांतील लोक जेव्हां पाषाणयुगाच्या अगदीं पहिल्या पहिल्या पायरीवरच होते तेव्हां ह्मणजे इ. स. पूर्वी सुमारें ६००० वर्षांच्या सुमारास ईजिप्ट देशांतील लोक सुधारणेच्या बऱ्याच वरच्या पायरीवर चढले होते. त्याचप्रमाणें ग्रीक लोक लोहयुगापर्यंत गेले असतां इतालींतील लोक कांस्ययुगांतच होते व यूरोपच्या अगदीं पश्चिम भागांत तर पाषाणयुगच सुरू होतें. या गोष्टीवरून असें दिसतें कीं, सुधारणेची प्रगति कित्येक ठिकाणीं मंद व कित्येक ठिकाणीं जलद होती, व ती प्रत्येक ठिकाणच्या परिस्थितीवर अवलंबून होती. तरी स्थूलमानाने पहातां ही तीन युगें ह्मणजे पाषाण, कांस्य व लोह हीं इतिहासकालाच्या पूर्वीच्या सुधारणेच्या तीन निरनिराळ्या पायऱ्या दर्शवितात असें ह्मणावयास हरकत नाहीं.

या युगांमध्यें सर्वांत जुनें जें पाषाणयुग त्याचे आणखी दोन विभाग करतात. ते पूर्वपाषाणयुग व नवपाषाणयुग हे होत. या दोहोंमध्यें फरक एवढाच की, पहिल्यांत ह्मणजे पूर्व पाषाणयुगांत केलेली हत्यारे फार ओबडधोबड असत ह्मणजे त्यांस फोडून फोडून सरासरी आकार आणलेला असे; परंतु नवपाषाणयुगांतील हत्यारें चांगली कांतीव घोटीव असत. पूर्वपाषाणयुगासंबंधाने आणखीही एक विशेष गोष्ट आहे ती अशी की, ज्या ठिकाणी त्या काळची हत्यारें सांपडतात त्या ठिकाणावरूनच नवपाषाणयुगांतील हत्यारापेक्षा ती जुनीं आहेत असें स्पष्ट दिसतें; शिवाय ही दोन्ही प्रकारची हत्यारें फार करून एके ठिकाणीं सांपडत नाहीत. या दोन पोटविभागांमध्ये तिसरा फरक असा आहे कीं, पूर्वपाषाणयुगांतील माणसांच्या अवशेषांबरोबर पुष्कळ मोठ्या मोठ्या सस्तन प्राण्यांचेही अवशेष आढळतात व हे प्राणी ह्मणजे मोठे अस्वल, हत्ती, व गेंडे, हे नवपाषाणयुगांतील माणसाचा अवतार होण्यापूर्वीच जगांतून निर्वंश झाले. तात्पर्य, हे दोन विभाग निराळे मानणें वरील कारणास्तव भाग आहे. आणखी हेंही लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, पूर्वपाषाणयुगांत पृथ्वीवरील पाणी व जमीन यांची वांटणीही नवपाषाणयुगांतील वांटणीहून फार निराळी होती; पण नवपाषाणयुगाच्या आरंभापासून आतांपर्यन्त भूपृष्ठाची स्थिति व त्यावरील हवामान हीं बहुतेक कायमच आहेत.

या तीन युगांचा भूगर्भांतील थरांच्या कालाशीं संबंध काय व कसा

आहे हें समजण्याकरितां भूस्तरशास्त्रांत त्या थरांचें वर्गीकरण कसें केलें आहे हें थोडें पाहिलें पाहिजे. पुराणवस्तुशास्त्र आणि भूस्तरशास्त्र यांचा संबंध असा आहे कीं, पहिल्याची सीमा संपली कीं दुसऱ्याची लगेच सुरू होते. त्यांत भूस्तरशास्त्र पृथ्वीच्या आयुष्यक्रमांतील अति प्राचीन कालाचें विवेचन करतें. पुराणवस्तुशास्त्रज्ञ भूपृष्ठावर किंवा त्याच्या जरा खालीं सांपडलेल्या प्राचीन अवशिष्ट वस्तूंवरून आपलीं अनुमानें बांधतात. पण भूस्तरशास्त्रज्ञ त्याच्या पलीकडचे जे लक्षावधि वर्षांपासून बनलेले दगडाचे व मातीचे थर त्यांचें वर्गीकरण करून आपलीं अनुमानें करतात. या दगडाच्या थरांत आढळणाऱ्या प्राण्यांच्या अस्थिशेषांच्या प्रकारांवरून भूस्तरशास्त्रज्ञांनीं त्या थरांचे पांच वर्ग केले असून ते वर्ग या भूगोलाच्या आयुष्यक्रमांतील निरनिराळ्या युगांचे दर्शक आहेत. वर सांगितलेलीं पाषाण, कांस्य व लोह हीं युगें जशीं एकमेकांपासून अगदीं विलग नाहीत तशीं हीं भूस्तरयुगेही नाहीत; पण त्यांच्याप्रमाणेंच, हींही एकमेकांपासून भिन्न आहेत असें त्यांतील विशिष्ट प्रकारच्या अस्थिशेषांवरून उघड दिसतें. या भूस्तरयुगांतील प्रत्येकाचे आणखीही पोट—विभाग केले आहेत. हल्ली चालू असलेल्या युगापासून त्यांचा क्रम येणेंप्रमाणे आहे.

| युगनाम. | पोट विभाग. |
|---|---|
| १ तृतीयोत्तर ऊर्फ चतुर्थयुग... | १ हिमोत्तरकाल (चालू युग). २ हिमकाल. |
| २ तृतीययुग अथवा वराह-काल... ... ... | १ शिवालिकोत्तरकाल, २ शिवालिककाल, ३ प्राक्शिवालिककाल. |
| ३ द्वितीययुग अथवा कूर्म-काल... ... ... | १ कोहाट अथवा कठिकाकाल, २ पार किंवा हजाराकाल, ३ तालचीर किंवा कऱ्हाडबारीकाल. |
| ४ आद्यचैतन्ययुग किंवा ओषाधिमत्स्यकाल ... | १ गोंडवनकाल, २ आंगारिक अथवा कियोल काल, ३ त्रिविष्टप किंवा पुराण-रक्तवालुकोपलकाल, ४ विंध्योत्तर-काल, ५ विंध्यकाल, ६ प्राग्विंध्यकाल. |
| ५ अचैतन्ययुग किंवा जीव-शून्यकाल. | १ आदिस्फटिककाल. |

यावरून असें दिसून येईल कीं, सांप्रत माहित असलेल्या दगडांच्या थरांपैकीं सर्वांत जुने ह्मणजे अचैतन्ययुगीन थर होत. त्याच्या मागाहून झालेले आद्यचैतन्ययुगीन, द्वितीययुगीन, तृतीययुगीन व शेवटचे चतुर्थ-युगीन असे क्रमानें आहेत.

यांपैकी आपल्याला फक्त शेवटच्याचा ह्मणजे चतुर्थ युगाचाच काय तो विचार करावयाचा आहे. त्याचे हिमकाल व हिमोत्तरकाल असे दोन भाग केलेले आहेत. त्यांपैकी पहिल्याच्या शेवटी व दुसऱ्याच्या आरंभीं अतिशय बर्फ उत्पन्न होऊन त्याने यूरोप व अमेरिका या खंडांचा उत्तर भाग बहुतेक व्यापून टाकला होता. त्याच्या थराची जाडी कित्येक हजार फूट होती. वर सांगितलेली जी लोहादि युगें त्यां-पैकीं लोह, कांस्य व नव–पाषाण हीं युगें हिमोत्तरकालांतील होत. परंतु पूर्वपाषाणयुग हिमकालांतच होऊन गेले असावे असा तर्क कित्येक करतात. तरी पण या पूर्व–पाषाण युगांतील कांहीं अवशेष हिमोत्तर कालांतही सांपडत असल्यामुळे पूर्व–पाषाण युगांतील माणसें बर्फाचा पूर येऊन गेल्यावरही कांहीं काळपर्यन्त होतीं असें दिसतें. अगदी नवीन झालेल्या शोधांवरून मनुष्य प्राण्याचें प्राचीनत्व याहूनही जास्त आहे, ह्मणजे तृतीय युगामध्येंही तो होता असें समजून आलें आहे; निदान चतुर्थ युगामध्ये तरी त्याचें अस्तित्व सदैव होतें असे सिद्ध करण्याला आतां लागेल तितका पुरावा मिळाला आहे.

नव–पाषाणयुग ह्मणून जें वर सांगितलें ते कधीं सुरू झालें असा-वे याबद्दल निरनिराळ्या शास्त्रज्ञांचीं निरनिराळीं मतें आहेत; परंतु कोणीही तो काळ इ. स. पूर्वी ५००० वर्षांहून प्राचीन आहे असें ह्मणत नाही. पण त्या काळीं ह्मटलें तर ईजिप्ट व खाल्डिया या देशामध्ये सुधारणेच्या शिखरास पोंचलेलीं अशी साम्राज्यें नांदत होतीं. पूर्वपाषाण-युगांत स्विट्झरलंड देशांतील लोक लहान लहान तलावांत खांबांवर घरें बांधून रहात होते. त्या तलावांत तेव्हांपासून सांठलेल्या गाळाच्या प्रमाणावरून वर सांगितलेल्या काळाचा अदमास केलेला आहे. डेनमार्क देशांत आढळणाऱ्या एका प्रकारच्या सांठलेल्या शेवाळीवरूनही तेथील पूर्वपाषाणयुगाच्या आरंभकालाची कांहीं अटकळ करतां येते. हिम-कालांतील बर्फाच्या प्रवाहांत सांपडलेलीं झाडें कांहीं कालानें कुजून त्यांचा

कोळशासारखा एक पदार्थ झालेला आहे, त्यांत ही शेवाळ आढळते. या पृथक्कृत वृक्षांच्या थरांमध्यें तीन प्रकारचीं झाडें आढळतात. वर बीच, मध्यें ओक व खाली देवदार. हवेमध्यें हळू हळू होत जाणाऱ्या फरकामुळेंच हे उद्भिज्जांतील फरकही झाले असें ह्मणतात. या थरांत आढळणाऱ्या हत्यारांवरून व दुसऱ्या अवशेषांवरून शास्त्रज्ञांनी असें अनुमान काढलें आहे की, पाषाणयुग, देवदारुकाल आणि ओककालाचा थोडासा भाग ही समकालीन असावींत, व कांस्य आणि लोह ही युगें अनुक्रमें ओक व बीच यांच्या कालाशीं समान असावींत. वर सांगितलेले शेवाळीचे थर बनावयास सुमारें १६००० वर्षे लागलीं असावीं असा अदमास केलेला आहे; आणि या अदमासाप्रमाणें पहातां देनमार्क देशांतील नवपाषाणयुगाचा आरंभ कमींत कमी निदान १०००० वर्षांपूर्वीचा आहे असें ह्मणावें लागतें. परंतु हे केवळ अदमासच असल्यामुळें नवपाषाणयुगाचा आरंभ यूरोपांत इ. स. पूर्वी ५००० वर्षांच्या सुमारास झाला असें सामान्यतः ह्मणावयास हरकत नाहीं.

परंतु नवपाषाणयुग सोडून पूर्वपाषाणयुगाचा विचार करूं लागलें असतां त्याचा आरंभकाल ठरविणें फारच कठीण आहे असे दिसतें. पूर्वपाषाणयुगाचा काल ठरविणें ह्मणजे खरोखर हिमोत्तरकालाचाच आरंभकाल ठरविणें होय. बर्फाचा पूर नाहींसा झाल्यावर थोड्याच काळानें यूरोपाच्या पश्चिम भागांत पूर्वपाषाणयुगांतील माणसांनीं प्रवेश केला असला पाहिजे; आणि या युगांतील माणसें बर्फाचा पूर येण्यापूर्वीही अस्तित्वांत असावीं असे ह्मणण्यास चांगलीं कारणें आहेत; असें प्रसिद्ध इंग्लिश भूस्तरशास्त्रज्ञ प्रोफेसर गीकी यांचें मत आहे. हिमकालामध्यें भूपृष्ठ व त्यावरील हवामानाची स्थिति यांमध्यें अतिशय मोठे बदल झालेले आहेत. हे फरक कोणते व त्यांची कारणें काय यांचें विवेचन पुढें येईल. या ठिकाणीं आपल्याला फक्त हिमोत्तरकालाचा आरंभ केव्हां झाला हे ठरवावयाचें आहे. या विषयासंबंधानें भूस्तरशास्त्रवेत्त्यांमध्यें दोन निराळीं मतें आहेत. यूरोपीय शास्त्रज्ञ ह्मणतात की, हिमकाल सुरू झाल्याबरोबर जमीनीची मोठी आलटापालट होऊन ती कोठें उंचाची खोल, व कोठें खोलाची उंच झाली; हे एवढाले फरक फार सावकाश होत असतात; ह्मणून हिमोत्तरकालाचा आरंभ ५० किंवा ६० हजार वर्षांपेक्षां अली-

कडचा असूं शकणार नाहीं. परंतु बऱ्याच अमेरिकन भूस्तरशास्त्रज्ञांचें असें मत आहे की, हा काळ बराच अर्वाचीन आहे. बर्फाचा पूर येऊन गेल्यापासून झालेल्या दऱ्यांच्या झिजण्याला, व नदीकांठीं जमलेल्या गाळाला सांठवावयास लागणारा जो काळ त्याचा निरनिराळ्या प्रकारांनी हिशोब करून वरील अनुमान त्यांनीं काढलें आहे. उदाहरण, अमेरिकेतील नायगारा नदीच्या धबधब्याखालचा खळगा प्रस्तुत दिसणाऱ्या प्रमाणावरून पहातां ७००० वर्षांच्या आंतच पडला असला पाहिजे, असें गिलबर्ट नांवाचा एक अमेरिकन शास्त्रज्ञ ह्मणतो. दुसऱ्याही अमेरिकेतील भूस्तरशास्त्रज्ञानी इतर पुष्कळ ठिकाणीं घेतलेल्या अनुभवावरून असें अनुमान काढले आहे कीं, गेला हिमकाल सपल्याला आठ हजार वर्षांहून अधिक काल कांहीं लागला नाहीं. स्विट्झरलंडांतील कांहीं तलावांत सांठलेल्या गाळाच्या प्रमाणावरून नवपाषाणयुगाचा स्थूल रीतीनें काढिलेला काळ व वर सांगितलेला अमेरिकन शास्त्रज्ञांचा अंदाज हे बहुतेक बरोबर जमतात. परंतु यूरोपीय शास्त्रज्ञांच्या मतांशी त्याचा फारच विरोध येतो. सांप्रतच्या ज्ञानावरून यांतील कोणता अंदाज खरा आहे हें ठरविणें मुष्किलीच आहे. परंतु असा एक संभव दिसतो की, ज्याप्रमाणें पाषाण-कांस्यादि युगें निरनिराळ्या देशांत निरनिराळ्या वेळीं होऊन गेलीं, त्याप्रमाणें कांहीं स्थानिक कारणांवरून हिमकालही निरनिराळ्या देशांत निरनिराळ्या वेळीं सुरू होऊन संपला असेल. अमेरिकन शास्त्रज्ञांचा अंदाज ईजिप्ट देशांतील प्राचीन सुधारणाकालाशीं मुळींच जमत नाहीं ह्मणून तो खरा नव्हे असें प्रोफेसर गीकीचें ह्मणणें आहे. परंतु आफ्रिकेमध्यें हिमकालाची अद्यापिहीं कांहीं खूण दिसून येत नसल्यामुळें सदर शंकेचें महत्व अगदीं कमी होऊन, अमेरिकन शास्त्रज्ञांचें ह्मणणें कशाच्याही विरुद्ध नाहीं असें ठरतें.

अमेरिकन शास्त्रज्ञांचें ह्मणणें खरें आहे असें ह्मणावयास आणखीही कारणें आहेत. हिमकाल होऊन गेल्याबद्दलच्या ज्या कांहीं खुणा सांपडतात त्या सर्व यूरोप व अमेरिका यांच्या उत्तर भागांतच सांपडतात; एशियाचा उत्तरभाग किंवा उत्तर अलास्का यांत कांहीं त्या अद्यापि आढळल्या नाहींत. यावरून उत्तर आशियामध्यें पूर्वीं एका काळीं उत्तम हवा नव्हती असें मात्र ह्मणतां यावयाचें नाहीं. या विस्तृत प्रदेशांत पुष्कळ

ठिकाणीं गाळांत गडदलेले प्राचीनकाळचे मोठे मोठे हत्ती, गेंडे, गवे, व घोडे, यांच्या शरीरांचे अवशेष सांपडतात; आणि हे अवशेष इतक्या चांगल्या स्थितींत असतात कीं, एकदां तर एका हत्तीचें वर आलेले शरीर अगदीं ताजें दिसत असल्यामुळें त्याचे मांस कुत्रे खाऊं लागले. या व दुसऱ्याही अगदी निर्विवाद गोष्टींवरून असें दिसतें कीं, सैबीरिया-मध्यें एका काळीं चांगली सुखकर हवा होती; व तो काळ तेथें आढळ-णाऱ्या प्राचीन प्राण्यांच्या मृत शरीरांच्या ताजेपणावरून पहातां फार जुनाट असेल असें वाटत नाही. उत्तर आफ्रिका व सिरिया यांतील खरखीत प्रदेशांत नदीप्रवाहामुळे सांठलेला गाळ जिकडे तिकडे आढ-ळतो; व यावरून, यूरोपांत जेव्हां हिमकाल सुरू होता त्या वेळी आफ्रिकेत पाऊस पडत असे, असे समजतात. ही गोष्ट जर खरी असेल, ह्मणजे, यूरोपांत जेव्हां हिमकाल चालू होता तेव्हांच उत्तरआफ्रिकेंत जर पावसाळे सुरू असतील, तर यूरोपीय शास्त्रज्ञांचे यूरोपांतील हिमकालाच्या आरंभ-कालाविषयींचे बडे बडे तर्क मोडून द्यावे लागतील, निदान त्यांत बरीच वजावाट तरी करावी लागेल.

इतक्या प्राचीनकाळी यूरोपांत रहात असलेल्या लोकांसंबंधाने विचार करता, तेथे सापडणाऱ्या प्राचीन माणसाच्या शरीरशेषावरून व कपा-लावरून ( डोक्याच्या कवच्या ) असें दिसते कीं, ते साप्रत यूरोपाच्या निरनिराळ्या भागांत रहाणाऱ्या लोकांचे थेट पूर्वज होते. सध्यां मनुष्य जातीचे जें, आर्य, सेमेटिक, मंगोलियन इत्यादि वर्गीकरण केले आहे, ते भाषेच्या तत्वावर केलें आहे. परंतु प्राचीन लोकांचा विचार करतांना पुराणवस्तुशास्त्रज्ञ व भूस्तरशास्त्रज्ञ हे सदर वर्गीकरण मान्य करणार नाहीत; कारण, ते ज्या चैतन्यावशिष्टादि गोष्टीवरून आपली अनुमाने बांध-तात त्यांवरून त्या लोकांच्या भाषादिकांसंबधाने कांहींच तर्क करितां येत नाहीं. ह्मणून त्यानी कपालांच्या प्रमाणावरून व आकारावरूनच इतिहास-पूर्वकालीन माणसाचें वर्गीकरण केलें आहे. कपालाची जास्तीतजास्ती रुंदी जर लांबीच्या तीन चतुर्थांश किंवा त्याच्याहून कमी असेल तर त्याला ते दीर्घशीर्ष या वर्गात टाकतात; व ती रुंदी जर लांबीच्या शेकडा ८३ हून जास्त असेल तर त्याला ऱ्हस्वशीर्ष या वर्गात घालतात. या दोन वर्गाच्या मध्येंही आणखी एक वर्ग ते मानतात, तो ऋजुशीर्ष हा होय,

नव—पाषाणयुगांतील थरांमध्यें सांपडलेल्या निरनिराळ्या कपालांची परीक्षा करून मानववंशशास्त्रवेत्यानीं असें ठरविलें आहे की, यूरोपांत त्या युगांत चार प्रकारचे लोक रहात असून थेट त्यांच्यापासूनच सांप्रतचे यूरोपांतील लोक झालेले आहेत. या चार वर्गांपैकीं दोन दीर्घशीर्ष व दोन ऱ्हस्वशीर्ष असून या दोहोंपैकीं पुनः एक उंच व ठेंगणा असे होते. सध्या या सर्व वर्गांतील यूरोपीय लोक आर्यभाषाच बोलतात. परंतु यांपैकी कोणता तरी एकच वर्ग, खरोखर आर्य होता हे उघड आहे. हा खरोखरचा आर्यवर्ग कोणता याविषयीं मात्र निरनिराळ्या पंडितांची निरनिराळी मतें आहेत. कांहीं जर्मन पंडित ह्मणतात कीं, सध्याच्या जर्मन लोकांचे पूर्वज जे दीर्घशीर्ष वर्गातील उंच लोक तेच खरे मूळचे आर्य; पण फ्रेंच पंडितांच्या मते मूळचे प्राचीन आर्य ऱ्हस्वशीर्ष असून गाललोक ( फ्रान्स देशांतील मूळचे रहिवाशी ) हेच त्यांचे खरे प्रतिपुरुष होत. या वादावर कॅनन टेलर नांवाचा इंग्लिश ग्रंथकार ह्मणतो की, जेव्हां दोन प्रकारच्या लोकांचे संघट्टण होतें, तेव्हां त्यांपैकीं जे अधिक सुधारलेले असतात त्यांचीच भाषा बहुधा दुसरे लोक घेतात; ह्मणून बाल्टिक समुद्राच्या किनाऱ्यावरील दीर्घशीर्ष रानटी लोकांचा जेव्हां सुधारलेल्या ऱ्हस्वशीर्ष आर्यांशी संबध आला तेव्हां त्यांनीच आर्य भाषा आर्यांपासून उचलली असें ह्मणणें बरें दिसतें; उलट ह्मणणें, ह्मणजे त्या रानटी लोकांनीच हिंदु, ग्रीक व रोमन या लोकांना आर्य बनविलें असें मानणे बरोबर नाहीं.

सदरहू चार वर्गांपैकीं यूरोपांतील मूळ आर्य असें कोणत्या वर्गास ह्मणावें, हे ठरविण्याचे दुसरें साधन ह्मटले ह्मणजे भाषाविषयक अवशेषांवरून सर्व आर्य एके ठिकाणी असतांनां त्यांची जी सुधारणा झाली असावी असे दिसतें, त्या सुधारणेची व नवपाषाणयुगीन माणसांच्या निवासस्थानांमध्ये सांपडलेल्या वस्तूंवरून दिसून येणाऱ्या त्यांच्या सुधारणेची तुलना करणें हे होय. पूर्वपाषाणयुगांतील माणसांची समाजस्थिति ह्मटली तर अविभक्त आर्यांच्या स्थितीहून फारच कनिष्ट होती. पूर्वपाषाणयुगांतील माणसें दगडी परशु व हाडांच्या सुया वापरीत असून शिल्पकला व चित्रकला याही त्यांस थोड्याबहुत अवगत होत्या; असें त्यांनीं हाडांवर कोरलेल्या निरनिराळ्या प्राण्यांच्या आकृतींवरून दिसतें. परंतु त्यांस मातीचीं भांडीं करण्याची कला व धातूंचा उपयोग हीं मुळींच माहीत

नव्हतीं. मांतोचीं भ.डीं प्रथम सांपडतात, तीं नवपाषाणयुगांत स्विट्झरलंडांतील तडागवासी लोकांच्या खांबांच्या घरांत सांपडतात. पण या लोकांपकीही जे जुने लोक, त्यांना तरी धातु व रथ यांची माहिती होतीसे दिसत नाहीं. पण या दोन्ही गोष्टींची माहिती आर्य लोक एकत्र असतांना त्यांस होती. शिवाय, या तडागनिवासी लोकांमध्यें लोंकरीच्या कापडाचा कांहीं मागमूसही मिळत नाहीं; कांस्य युगामध्ये त्यांच्यापाशी मेढ्याही पुष्कळ होत्या, नाही असे नाहीं. पण इतक्या गोष्टी खेरीज करून स्विटझरलंडांतील तडागवासी लोकांची सुधारणा, युरोपांतील इंडोजर्मन आर्यशाखांतील लोकांच्या सुधारणेच्या सारखीच बहुतेक होती असे डाक्टर श्रेडर नांवाच्या जर्मन पंडिताचे मत आहे; व त्यावरून तो ह्मणतो कीं, स्विटझरलंडांतील प्राचीन रहिवासी हे यूरोपीय आर्य शाखांतील एका शाखेचे होते असे मानावयास कांहीं हरकत नाहीं.

याप्रमाणे अर्वाचीन शास्त्रीय शोधांवरून जरी यूरोपामध्ये इतिहासकालापूर्वी रहात असलेल्या माणसांची इतकी माहिती मिळते, व त्यावरून नवपाषाणयुगांतील मनुष्यांच्या चार वर्गांपैकीं एका वर्गांतील लोक हेच यूरोपांतील आदि आर्य होते असे जरी आपण मानिलें, तरी ते आर्य लोक तेथें मूळचेच रहाणारे होते की, त्यांनी दुसऱ्या कोठून तरी तेथें येऊन आपल्या श्रेष्ठ सुधारणेच्या जोरावर मूळच्या लोकांस आपल्यासारखे आर्य बनविले, या प्रश्नाचा त्या शोधावरून निकाल होत नाहीं. नवपाषाणयुगांतील स्विटझरलंडांतल्या तडागवासी लोकांचा काल इ. स. पूर्वी ५००० वर्षांहून अलीकडचा नाही; त्या वेळी आर्य लोक मध्य आशियांतील यक्षावर्त (जग्झार्टिस) नदीच्या काठीं वसाहत करून राहिले होते. यूरोपांतील मूळचे आर्य हे पूर्वपाषाणयुगांतील माणसांचे वंशज नव्हत, हें सर्व कबूल करतात. ह्मणजे यावरून उघड झालें की, जर नवपाषाणयुगाच्या आरंभी आर्य लोक यूरोपांत असतील, तर ते तेथें दुसऱ्या कोठून तरी गेले असले पाहिजेत. असे नसेल, तर दुसरा एकच पक्ष उरला; तो ह्मणजे यूरोपांतील नवपाषाणयुगीन माणसांच्या चार वर्गांपैकीं एकाने इतर वर्गांशीं कोणत्याही प्रकारचा संबंध न ठेवतां आर्यांप्रमाणे आपली सुधरणा करून घेतली, अशी कल्पना करणें हा होय. पण ही कल्पना दर्शनींच असंभवनीय दिसते. ह्मणजे प्राचीन काळीं मध्य आशियांतील मूलस्थानापासून आर्य

लोकांच्या निरनिराळ्या टोळ्या क्रमाक्रमानें यूरोपांत गेल्या, असें ह्मणणें खोटें आहे हें जरी नवीन शास्त्रीय शोधांवरून आपल्याला समजलें, तरी आपला प्रस्तुत प्रश्न जो आर्य लोकांचे आदिस्थान त्याचा कांहीं उलगडा होत नाहीं. तो तसाच रहातो. मूळ आर्यभाषा ही कधीं व कोठें उत्पन्न झाली, हाही प्रश्न तसाच फार बिकट असून त्याचेंही आज-पर्यंत समाधानकारक उत्तर कोणी दिलेलें नाहीं. कॅनन टेलरनें आर्य-भाषा व उरल पर्वतापासून आलताई पर्वतापर्यंतच्या लोकांच्या भाषा यांची तुलना करून असें संदिग्ध अनुमान काढलें आहे कीं, पूर्वपाषाणयुगाच्या अन्तीं फिन्लंडांतील एका जातीचे लोक यूरोपांत आले व त्यांची बहुतेक वाढल्याशिवाय राहिलेली भाषा व सध्यांची संश्लिष्ट अशी बास्क भाषा ( बिस्केच्या उपसागराच्या किनाऱ्यानजीक व पिरनीज पर्वतांच्या दोन्ही बाजूंकडे बोलण्यांत असलेली भाषा ) या एकरूपच आहेत. तो आणखी असें ह्मणतो कीं, त्या काळानंतर पुष्कळ वेळानें, ह्मणजे मेंढ्या गाई वगैरे जनावरांचे कळप पाळून त्यांवर लोक उपजीविका करूं लागल्यावर, फिन्लडांतील पहिल्या लोकांपेक्षां उंच व शक्तिमान् अशा फिनो-ऊग्रिक नांवाच्या लोकांनीं मध्य यूरोपांत येऊन तेथें विभक्तिविशिष्ट अशी जी आर्यभाषा ती उत्पन्न केली. परंतु हा केवळ तर्क असल्यामुळें, यूरो-पांतील लोक नवपाषाणयुगांत असतांना इंडो-इराणी लोक आशियामध्यें चांगल्या सुधारलेल्या स्थितींत होते हें कसें, या प्रश्नाचें त्याच्यावरून उत्तर मिळत नाहीं. शिवाय, फिन्लंडांतील भाषांमध्यें किती तरी सुधारणा-विषयक शब्द आर्य लोकांपासून घेतलेले दिसतात. आर्य लोकांनीं आपले विभक्तिप्रत्यय वगैरे फिनिश भाषांतून घेतले असावे हें असं-भवनीय आहे. नुसत्या विभक्तिप्रत्ययांमध्यें वगैरे साम्य आहे, एवढ्या गोष्टीवरूनच कोणी कोणाची उसनवारी केली हें मुळींच ठरवितां येणार नाहीं. परंतु भाषातत्वाच्या जोरावर काढिलेली मध्य आशियांतील आर्यांच्या मूलस्थानाची कल्पना हाणून पाडणाऱ्या पंडितांनींच पुनः भाषेच्या तत्वावरच वरच्या सारखीं विधानें करावी हें मोठें आश्चर्य आहे. शिवाय, त्या अनुमानांवरून फिनिश लोक आपलें स्थान दोन वेळां सोडून खालीं कां उतरले, ह्याही प्रश्नाचा उलगडा होत नाहीं. या प्रकारच्या कारणांवरून असें विशेष संभवनीय दिसतें कीं, फिनिश लोकांचा जेव्हां

आर्य लोकांशी संबंध आला, तेव्हां त्यांनीं आपले सुधारणाविषयक शब्द आर्य लोकांपासून घेतले; व आर्य लोक हे मूळचे आशिया किंवा यूरोप यांतील नसून त्यांचे मूलस्थान नवपाषाणयुगांत उत्तरध्रुवाजवळ कोठे तरी होते व तेथून ते दक्षिणेकडे आशिया व युरोपमध्यें गेले; आणि याचे कारण केवळ अनिवार्य मनःप्रवृत्ति एवढेच नसून त्यांच्या मूलस्थानांतील हवामानांत होणारे अहितकारक फेरबदल हे होत. या ह्मणण्याला पारशी लोकांच्या धर्मग्रंथांमध्ये पुष्कळच पुरावा आहे. आजपर्यंत त्यांतील गोष्टी निरर्थक ह्मणून पंडितांनीं सोडून दिल्या आहेत व त्यास वेदांत कांहीं पुरावा नाहीं असेंही ते ह्मणतात. मनुष्यप्राणी हा हिमकालान्तरचा आहे अशी त्यांची पूर्वकल्पना होती. परंतु नवीन शास्त्रीय शोधांनी अतिप्राचीनकाळदर्शक असें साधन आतां आपल्याला उपलब्ध करून दिले असल्यामुळें, अवेस्त्यांत वर्णिलेल्या गोष्टी इतिहास असून त्यांस वेदांचाही भरपूर पाठिंबा आहे, असे आपल्याला दाखवितां येणार आहे. कांही प्रसिद्ध शास्त्रज्ञांनीं सर्व वनस्पति व जीवकोटीचे आदिस्थान उत्तरध्रुव असें मानिले आहे; व आर्य लोकांचे अगदी आद्यस्थान उत्तरध्रुवाजवळ कोठें तरी होतें, हें सिद्ध करण्यास वेद व अवेस्ता यांमध्यें भरपूर पुरावा आहे, हेही आपणांस दाखवितां येईल. हिमकालांत पृथ्वीवर हवामानाची स्थिति कशी होती व उत्तरध्रुवप्रदेशांमध्यें ज्योतिषविषयक विशिष्ट गोष्टी काय दिसतात, याचा विचार पुढील दोन प्रकरणांत करून नंतर आपण त्या पुराव्याकडे वळूं.



# प्रकरण २ रें.

## हिमकाल अथवा बर्फाचा पूर.

ऋतुपर्याय होण्याचें कारण क्रान्तिवृत्त व विषुववृत्त यांतील कोन—एवढेंच एक कारण नाहीं—अन्य कारणें—जमिनीचें उंचसखल होणें, सामुद्रप्रवाह वगैरे—गल्फ् स्ट्रीम नांवाच्या प्रवाहाचा परिणाम—जमीन आणि पाणी यांच्या वाटणीवर हवामान अवलंबून असतें—प्राचीन भूस्तरयुगांत पृथ्वीवर सर्वत्र समधात हवा होती—पुढील युगांत फरक झाला—द्वितीय व तृतीययुगांत कटिबंधाचा भेद झाला नव्हता—चतुर्थयुगाच्या आरंभीं हवेंत भयंकर फेरफार झाले—त्याच्यापूर्वी ध्रुवप्रदेशांत ऊष्ण हवा होती—चतुर्थयुगांतील हिमकाल—त्याच्या अद्यापि आढणाऱ्या खुणा—उत्तर यूरोप व अमेरिका येथील हिमावरण—बर्फाबरोबर आलेल्या गदळाचा पूर्वीचा विस्तार—यूरोपांत १० लक्ष चौरसमैल—अमेरिकेंत याहूनही जास्त—गदळाचे दोन थर—त्यांवरून दोन हिमकालाचें अनुमान—प्रो० गीकीच्या मतें चार हिमकाल झाले—हिमकालांत जमीन उच्च होई व बर्फाचे लोट उत्पन्न होत—या बर्फाच्या थरांत माणसाचे अवशेष सापडतात—हा हवेच्या स्थित्यन्तराचा काल होता—आजची हवामानाची स्थिति हिमोत्तरकालीन होय—हिमकालाच्या कारणाचा शोध—त्याला ऊष्ण हवा व विशिष्ट वायुप्रवाहाची आवश्यकता—या कारणानीं दोन हिमकालाचें तरी समर्थन झालें पाहिजे—बऱ्याच लोकांच्या कल्पना या कसाला टिकत नाहींत—लियलचें मत—डॉ० क्रोलचें मत—लियलच्या अनुयायांचीं मतें—हिमकालाचा अवधि २ लक्ष वर्षे—इतरांचें मत २५ हजार वर्षे—वॉलचे मत—हिमकालाचे कारण ज्योतिःशास्त्रात शोधिलें पाहिजे—क्रोलच्या उपपत्तीचा सयुक्तिकपणा—तिचा सारांश—संपातचलन आणि बदलणारी पृथ्वीच्या कक्षेची केन्द्रच्युति यांच्यामुळें ठराविक काळानें हिंवाळा व उन्हाळा यांच्या अवधींत फार फरक पडतो—केन्द्रच्युतीची व्याख्या—हर्शलची कल्पना—तीसंबंधानें बालचें मत—पृथ्वीला सूर्यापासून मिळणाऱ्या ऊष्णतेच्या प्रमाणासंबंधानें बालचें ह्मणणें—त्यावरून दिसून येणारें हिमकालाचें कारण—क्रोलच्या उपपत्तीवरील आक्षेप—केन्द्रच्युतीचीं मानें विश्वसनीय नाहींत—न्यूकोंबचे मत—क्रोलची उपपत्ति पूर्वी एकदा बरी वाटत होती—या उपपत्तीप्रमाणें प्राचीन भूस्तरयुगांत अनेक हिमयुगें झालीं पाहिजे होतीं—परंतु तसें कांहीं दिसत नाहीं—क्रोलची उपपत्ति व भूस्तरशास्त्रज्ञ यांतील आणखी एक विरोध—प्रो. गीकीचें तिला अनुकूल मत—हडल्स्टनचें कडक विरुद्ध मत—एकंदर वादाचें तात्पर्य—पहिल्या व दुसऱ्या प्रकरणांत आलेल्या शास्त्रीय शोधांचा सारांश.

## हिमकाल अथवा बर्फाचा पूर.



पृथ्वीची कक्षा ऊर्फ क्रान्तिवृत्त व तिचें विषुववृत्त हीं एकाच पातळींत नाहींत. त्यांच्या पातळ्यांमध्यें थोडासा ( २३ अंश, १७ कला ) कोन आहे. यामुळे पृथ्वीवरील हवा सर्वदा सारखीच नसून तीमध्यें वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरद्, हेमंत व शिशिर असे ऋतुपर्याय होत असतात. पृथ्वीचा उत्तरध्रुव जेव्हां सूर्यापासून दूर असतो, तेव्हां उत्तर गोलार्धात हिंवाळा व दक्षिण गोलार्धांत उन्हाळा होतो; व पुढे जेव्हां पृथ्वी सूर्याभोवतीं प्रदक्षिणा करितां करितां तिचा दक्षिण ध्रुव सूर्यापासून लांब जातो व उत्तर ध्रुव जवळ येतो, तेव्हां वरच्या उलट स्थिति होते. या दोन गोलार्धात होणाऱ्या ऋतुपर्यायाचे हे कारण अगदी साधे आहे; व ते कायमचेंच असल्यामुळे अति प्राचीन काळच्या भूस्तरयुगांमध्येही असेच ऋतुपर्याय होत असतील, असें कोणास वाटण्याचा संभव आहे. परंतु ही कल्पना भूस्तरशास्त्राच्या शोधांशीं अगदींच विरुद्ध आहे. पृथ्वीच्या विषुववृत्तपातळीचा क्रान्तिवृत्तपातळीशी असलेला कोन हें एकच ऋतुपर्याय होण्याचें कारण नसून स्थानपरत्वे समुद्राच्या सपाटीपासून असलेली कमीजास्त उंची, विषुववृत्तावरची ऊष्णता इतर ठिकाणी वाहून नेणारे समुद्रांतील व वायूचे प्रवाह याच्या योगानेही एकाच अक्षांशावरील निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळे ऋतु होतात असे आढळून आलें आहे. या सामुद्रप्रवाहांपैकीं, मेक्सिकोच्या अखातांतून निघून क्यूबा बेट व अमेरिका यांच्यामधून ईशान्य दिशेनें यूरोपाकडे वाहत जाणारा कढत पाण्याचा प्रवाह विशेष संस्मरणीय* आहे. हा नसता तर यूरोपाच्या वायव्य भागांतील हवा हल्ली आहे याहून फारच निराळ्या प्रकारची असती. हल्लीं पृथ्वीवर पाणी व जमीन यांची जशी वांटणी आहे, त्याहून ती जर कांहीं निराळ्या प्रकारची झाली, तर त्यामुळेंही हवेची स्थिति निराळ्या प्रकारची होईल; कारण, त्यामुळें विषुववृत्तावरील ऊष्णता इतरत्र वाहून नेणारे

* हा प्रवाह इंग्रजींत गल्फ् स्ट्रीम ( Gulf Stream ) या नांवानें

समुद्रांतील, तसेच वायूचेही प्रवाह फिरतील. अति प्राचीन काळच्या भूस्तरयुगांमध्यें आल्पस् पर्वत अगदीं सखल असून हिमालय वर बरही येऊं लागला नव्हता, आणि आशिया व आफ्रिका खंडें म्हणजे नुसते लहान बेटांचे थवे होते. त्या वेळचे जमीनीच्या थरांत सांपडणारे जे प्राणी व वनस्पति यांचे अवशेष आहेत, त्यांचा विचार करतां, त्या काळच्या भूपृष्ठाच्या स्थितीमुळें तेव्हां सर्व पृथ्वीवर सारखी समशीतोष्ण हवा होती असें समजते; व वरील विवेचनावरून यांत आश्चर्य मानण्यासारखें कांही नाही हे उघड आहे. प्रथम प्रकरणांत सांगितलेल्या द्वितीय व तृतीय युगांमध्ये या हवामानांत थोडासा फरक झाला होता असें दिसते. पण या युगांमध्ये प्रथम युगाइतकी जरी सारखी हवा नसली, तरी तृतीय युगाच्या शेवटापर्यन्त पृथ्वीवर हवेसंबंधी कटिबंधाचा भेद झाला नसून थंडी व ऊष्णता यांच्यामध्यें आतांच्या इतके अतर पडत नव्हतें; हें मात्र भूस्तरशास्त्रांतील पुराव्यावरून स्पष्ट दिसते. परंतु तृतीय युगाचा अंतिम काल व चतुर्थ युगाचे प्रथमार्ध यांमध्ये हवेंत भयंकर फेरबदल होऊन त्या योगानें हिमकाल व हिमान्तरकाल उत्पन्न झाले. पण आतां असे निःसशय सिद्ध झाले आहे की, हल्ली ज्या वनस्पति फक्त ऊष्ण व समशीतोष्ण कटिबंधांतच वाढूं व जगूं शकतात, त्या वनस्पति तृतीय युगांत स्फिट्झ्बर्जनसारख्या ठिकाणीं म्हणजे जेथे सूर्य वर्षातून सुमारें पांच महिने क्षितिजाखाली असतो अशा अति उन्नत अक्षांशावर मोठ्या जोमानें वाढत असत. यावरून त्या वेळी ध्रुवप्रदेशांत चांगली ऊष्ण हवा होती हे उघड होते.

या प्रदेशांतील समधात हवेंत एकाएकी जे फेरफार होऊन त्यायोगे हिमकाल उत्पन्न झाला, ते चतुर्थ युगाच्या प्रथमार्धांत झाले. चतुर्थयुगाचे प्रथमार्ध व हिमकाल यांच्या मर्यादा जरी अगदीं एकच नसल्या, तरी हे दोन्ही काल स्थूलमानानें एकच ह्मणावयास कांही हरकत नाहीं. या कालामध्ये हिमकाल एकच झाला कीं अधिक झाले याचें विवेचन करणे येथें शक्य नाहीं. त्याचें सामान्यतः स्वरूप काय आहे व अशाप्रकारचे भयंकर फेरबदल होण्याची कारणें भूस्तरशास्त्रवेत्ते व सृष्टिशास्त्रवेत्ते यांच्या मतें काय आहेत एवढे मात्र आपल्यास थोडक्यांत सांगतां येईल. याच्या कारणांसंबंधानें जरी शास्त्रज्ञ लोकांमध्यें अद्यापि मतभेद आहे, तरी हिमकाल

हा होऊन गेल्याबद्दल कांहीं कोणाला संशय नाहीं. अजूनही बर्फाचे थर पृथ्वीवरून साफ नाहींसे झाले नाहींत, व आल्पस् पर्वताच्या दऱ्यांत व ध्रुवाजवळच्या प्रदेशांमध्यें आपल्याला आजही हिमनद्यांच्या रूपानें बर्फाचे खेळ पहातां येतील. ग्रीनलंडसारखे प्रदेश अजूनही इतक्या जाडीच्या हिमावरणानें आच्छादिलेले आहेत कीं, तेथे वनस्पतीची लागवड होणें व माणसें रहाणें शक्य नाहीं. या प्रदेशांतील हिमनद्यांच्या कार्याचें निरीक्षण केल्यावरून भूस्तरशास्त्रवेत्यांना, प्राचीन काळीं उत्तर यूरोप व उत्तर अमेरिका येथें सर्वत्र ठिकाणीं अशाच प्रकारचे बर्फाचे परिणाम झाल्याचें दिसून आलें आहे. या ठिकाणीं गरगरित व खरवडलेल्या मोठमोठ्या शिला, अद्यापि जिचे थर बनले नाहींत अशी एकाप्रकारची चिकण माती, वाटोळे झालेले खडक व टेंकड्या वगैरे ज्या गोष्टी आढळतात त्यांवरून असें स्पष्ट दिसतें कीं, उत्तर यूरोप व उत्तर अमेरिका यांतील प्रदेशांत एके काळीं कित्येक हजार हात जाडीचा बर्फाचा थर पसरलेला होता. या प्रदेशांनां व्यापून टाकणारें सर्वच बर्फ उत्तरध्रुवाकडून आलें होतें असें नाहीं. बर्फाच्या योगानें खडकांवर निघालेल्या रेषा किंवा पट्टे यांच्या दिशांवरून असें स्पष्ट दिसतें कीं, तें बर्फ सर्व ठिकाणावरून व पर्वतांवरून निरनिराळ्या दिशांनी खाली उतरलें होतें. या बर्फाच्या थरांनी स्कॅंडिनेव्हियाचा ( स्वीडन नार्वे ) सर्व भाग आच्छादून, उत्तर समुद्र भरून टाकून, ब्रिटनमध्ये ( इंग्लंड ) प्रवेश करून, टेम्सनदीची दरी, उत्तर जर्मनी, मास्कोपर्यन्त रशियाचा सर्व उत्तर भाग व पूर्वेस उरल पर्वतापर्यन्त बहुतेक प्रदेश व्यापून टाकिले होते. या हिमनद्यांनीं व हिमपाताच्या योगानें तुटलेल्या फुटलेल्या खडकांचा गदळ यूरोपांत निदान १० लक्ष चौरस मैलांवर व उत्तरअमेरिकेंत तर याहूनही जास्त प्रदेशावर पसरला होता असा अंदाज केलेला आहे; व या गोष्टीवरूनच हिमकाल होऊन गेल्याविषयीं भूस्तरशास्त्रज्ञ अनुमान करतात. या गदळामध्यें दोन प्रकारची चिकण माती आहे व त्यावरून दोन वेळां बर्फाचा पूर आला होता असें दिसतें. दुसऱ्या वेळच्या गदळानें पहिल्या गदळाचे थर पुष्कळ ठिकाणीं मोडले आहेत; तरी पण दोन निरनिराळ्या वेळीं चिकण माती व वाहून आलेला गदळ यांचे दोन निराळे थर झाले होते एवढें दाखविण्यापुरते त्यांचे भाग शिल्लक राहिलेले आहेत. प्रो. गीकीच्या मतें असे

एकामागून एक चार हिमकाल चतुर्थ युगाच्या पूर्वार्धांत यूरोपांत होऊन गेले; पण इतर भूस्तरशास्त्रज्ञ हें कबूल करीत नाहींत. तरी दोन हिमकाल व त्याच्या मधील हिमान्तरकाल एवढी तरी होऊन गेलीं याबद्दल सर्वांची खात्री आहे.

हे हिमकाल व त्यांमधील हिमान्तरकाल यांमध्यें हवा क्रमानें अतिथंड व अतिऊष्ण होत गेली असली पाहिजे; व त्याबरोबरच जमीनही ठिकठिकाणीं कोठे अति उंच तर कोठे अति सखल अशी झाली असली पाहिजे. जमीन सखल होणें ती एकाद्या ठिकाणी बर्फाचे फार ओझें पडल्यामुळे होत असे. हिमकाल सुरु झाला ह्मणजे जमीन उंच होऊं लागे, हवा भयंकर थंड होई आणि हल्लीं आपण ज्याला समशीतोष्ण कटिबंध ह्मणतों, त्या प्रदेशांत बर्फाचे मोठमोठे लोटच्यालोट येऊं लागत. ते बंद झाले ह्मणजे पुनः जमीन सखल होऊं लागे व हवा नेमस्त होऊन ध्रुवप्रदेशही वसतियोग्य होत. वर सांगितलेल्या दोन हिमकालांतील चिकण मातीच्या थरांच्यामध्यें पुरून गेलेले पूर्वपाषाणयुगीन माणसांचे अवशेष सांपडतात; व त्यांवरून चतुर्थ युगांत हिमान्तरकालामध्यें मनुष्यप्राणी होता असे निः-संशय ठरते. हिमकाल व हिमान्तरकाल यांतील हवेसंबधानें प्रो. गीकी ह्मणतो, 'हिमान्तरकालांत हिवाळे समधात असत व उन्हाळेही तसेच असत, त्यामुळें ऊष्ण कटिबंधांत आढळणाऱ्या वनस्पति व हत्ती, गेंडे आणि सरिदश्व यांसारखे मोठेमोठे प्राणी ध्रुवप्रदेशांत सर्वत्र संचार करीत व पूर्वपाषाणयुगीन माणसानांही तेथें सुखाचे स्थान नव्हते असे नाहीं.' यावरून हवेसंबंधानें पहातां चतुर्थ युगाच्या प्रथमार्धांतील स्थितीही त्या पूर्वीच्या युगातील म्हणजे सर्वत्र सारखी हवा असण्याची स्थिति व सांप्रतची म्हणजे एके ठिकाणी अति थंड, दुसरे ठिकाणीं समशीतोष्ण तर तिसरे ठिकाणी अति ऊष्ण अशी स्थिति, याच्या मधली होती. सारांश, हवेच्या स्थित्यन्तराचाच हा काल होय. हवामानाची आजची स्थिति हिमोत्तरकालाच्या आरंभीं स्थापित झाली. तरी यावर प्रो० गीकीचें असें म्हणणें आहे कीं, प्रस्तुतचें हवामान स्थापित होण्यापूर्वी हिमोत्तरकालांत सुद्धां यूरोपाच्या वायव्य भागांत एकदां समधात व पुन्हा फार थंड अशी हवा कांही कालपर्यंत होती.

हिमकाल व हिमान्तरकालांतील ध्रुवप्रदेशावरील सौम्य हवेचें अस्तित्व या गोष्टी जरी निःशंक ठरल्या, तरी या भयंकर उत्पाताच्या कारणांचा

कांहीं अजून शास्त्रज्ञांना चांगला तलास लागला नाही. सर्व उत्तर यूरोप व उत्तर अमेरिका यांनां व्यापून टाकणारे बर्फाचेलोट कांही आपोआप निर्माण झाले नाहीत; ' असत् ' म्हणजे शून्यापासून कांहीं होणार नाही हें उघड आहे. अशा प्रकारचे बर्फाचे लोट तयार व्हावयास म्हणजे पृथ्वीवर दुसऱ्या कोठें तरी अतिशय ऊष्णता असून तिच्या योगानें जमीनीवरील पाण्याची पुरेशी वाफ झाली पाहिजे व ही वाफ थंड प्रदेशांत नेऊन तेथें तिचे बर्फ बनविण्यासाठी तशा प्रकारचे वायुप्रवाह पाहिजेत. ज्या उपपत्तीवरून हिमकालाचें कारण ठरवावयाचें तीमध्ये जर सदर गोष्टीचा विचार केलेला नसेल तर ती अगदी अपुरी इतकेंच नव्हे, तर केवळ कुचकामाची होय. त्या उपपत्तीवरून एकामागून एक असे निदान दोन तरी हिमकाल झाले असें दाखवितां आलें पाहिजे. या कसाला प्रस्तुत पुढे आलेल्या उपपत्त्या लावल्या, म्हणजे त्यांपैकी बहुतेकांचा निकाल लागतो. यूरोपच्या वायव्य भागास ऊष्णता पुरविणारा अटलांटिक महासागरांतील जो कढत पाण्याचा प्रवाह वर सांगितला, त्याचा मार्ग पनामाची संयोगीभूमी समुद्रांत बुडाल्यामुळे बदलून त्या योगानें चतुर्थ-युगाच्या पूर्वार्धांत यूरोपाचा वायव्य भाग हिमाच्छादित झाला, असें एक कारण एकदा कोणी पुढे आणले होते. परंतु चतुर्थयुगाच्या पूर्वार्धांत पनामाची संयोगभूमि जलावृत होती या गोष्टीला भूस्तरशास्त्रांत कांहीं प्रमाण नाही. हिमकालोत्पत्तीसंबंधानें दुसरी एक उपपत्ति अशी काढिलेली होती कीं, पृथ्वी थंड व ऊष्ण अशा आकाशप्रदेशांतून अनुक्रमें गेली असेल व त्यामुळे हिमकाल व हिमान्तरकाल अनुक्रमें झाले असतील. पण या कल्पनेलाही काही प्रमाण नाही. तिसरी एक कल्पना सुचविली गेली होती कीं, पृथ्वीला सूर्यापासून मिळणाऱ्या ऊष्णतेच्या प्रमाणांत कांही कमजास्त फरक होऊन त्यामुळे तीवरील हवा थंड किंवा ऊष्ण झाली असेल. पण हा केवळ तर्क होय असें लवकरच समजलें. पृथ्वीचा आंस जर बदलला, तर मात्र अशा तऱ्हेचे आकस्मिक फेरबदल हवेंत होतील हें खरे आहे. परंतु ही गोष्ट संभवनीय नाहीं. कारण आंस बदलला ह्मणजे महत्तम मध्यवृत्त ऊर्फ विषुववृत्तही बदललें पाहिजे. पृथ्वीच्या चक्राकार भ्रमणाच्या योगानें ध्रुवापेक्षां विषुववृत्तावर जास्त फुगीरपणा आलेला आहे. ही चक्राकार गति अव्याहत चालू आहे. ह्मणजे आंस बदलून

त्यामुळें विषुववृत्तही बदललें असलें, तर या नवीन विषुववृत्तावरही फुगीरपणा आला असला पाहिजे. पण अशी गोष्ट झाली असल्यालाही कांहीं प्रमाण नाहीं. तेव्हां ही उपपत्तीसुद्धां निरुपयोगीच. पृथ्वी ऊष्ण वायूचा गोळा होती ती हळू हळू निवत येत असल्यामुळे ध्रुवप्रदेश इतर ठिकाणापेक्षां लवकर वसतियोग्य झाले असतील; पण यावरून हिमकाल एका मागून एक असे ठराविक कालानें कां व्हावे हे समजत नाही.

याप्रमाणे हिमकालोत्पत्तीच्या कारणाच्या उपपत्तीपैकी बहुतेकींची वाट लागून दोनच काय त्या शिल्लक रहातात. पहिली लियलची. तो ह्मणतो की जमीन व पाणी यांच्या वांटणीची भिन्नता व मोठे मोठे भूप्रदेश उच्च होणें व जलावृत होणे यामुळे हवेत फार फेरफार होऊन हिमकाल उत्पन्न होईल. दुसरी उपपत्ति डॉ. क्रोल याची आहे. त्याच्या मते संपातांचे चलन होत असल्यामुळें व पृथ्वीची कक्षा दीर्घवर्तुळाकृति असल्यामुळे कांही ठराविक कालाने हिमकाल उत्पन्न होतील. वालेस नावाच्या विद्वानांनं लियलच्या उपपत्तीचा विशेष विचार करून असे दाखविले आहे की, वर सांगतलेल्या प्रकारचे फरक जर भूपृष्ठावर झाले तर तेवढ्यावरूनच हिमकाल व हिमान्तरकाल उत्पन्न होण्यासारखी थंडी किंवा ऊष्णता उत्पन्न होईल. भूस्तरयुगांपैकीं पहिल्या पहिल्या युगांत सर्व पृथ्वीवर सारखी समशीत हवा होती व याचे कारण पृथ्वीवरील पाणी व जमीन यांची वांटणी आतांच्याहून निराळी होती असे प्रथम प्रकरणांत सांगितलेच आहे. लियलची हिमकालोत्पत्तीच्या कारणांची उपपत्ति कांहीं याहून निराळी नाहीं. हजारो वर्षे जातील तेव्हांच जमीन अतिशय उच्च किंवा नीच होणार; ह्मणून लियलचे अनुयायी ह्मणतात कीं, हिमकालाचे मुख्य कारण ज्या भूपृष्ठ व भूगर्भ यांतील आलटापालटी त्या सर्व जमेस धरल्या तर हिमकालाचा अवधि मुमारे दोन लक्ष वर्षांचा असला पाहिजे. परंतु याच मताच्या दुसऱ्या भूस्तरशास्त्रवेत्यांचे असें मत आहे की, हिमकालावधि फार तर २० किंवा २५ हजार वर्षांचा असेल. या दोन मानांमधला फरक कांहीं लहान सहान नाहीं. यासाठीं कोणते मत खरें याचा निर्णय करणें आजच्या ज्ञानाच्या स्थितींत कठीणच आहे. आपल्याला आज एवढेंच ह्मणतां येईल कीं, चतुर्थ युगाच्या पूर्वार्धात निदान दोन हिमकाल व एक हिमान्तरकाल होऊन गेले असल्यामुळें त्याचा अवधि

हिमोत्तरकालारंभापासून आतांपर्यंत लोटलेल्या काळापेक्षां बराच मोठा असला पाहिजे.

सर रॉबर्ट बॉल याच्या मताप्रमाणें हिमकालाचें कारण भूस्तरशास्त्रांत न शोधितां जर ज्योतिःशास्त्राच्या आधारानें शोधण्याचा प्रयत्न केला तर सर्व अडचण नाहीशी होते. आपल्या या पृथ्वीवर जे उत्पात अति भयंकर असे वाटतात तसे किती तरी उत्पात नित्यशः विश्वांत होत असतात. ज्योतिःशास्त्रांत ते प्रसिद्धच आहेत. असो. डॉ. क्रोल याच्या उपपत्तीमध्यें हा एक विशेष आहे कीं तीवरून चतुर्थ युगाच्या पूर्वार्धांत झालेले दोन हिमकाल व एक हिमान्तर काल यांचें चांगलें कारण सांगतां येतें. त्यानें आपल्या ग्रंथामध्यें मोठें गणित करून आपली उपपत्ति स्थापित करण्याचा प्रयत्न केला आहे; आणि त्यांत असें दाखविलें आहे कीं, सूर्याभोंवतालच्या पृथ्वीच्या प्रदक्षिणेंत जीं अस्थिरमानें आहेत त्यांत होणाऱ्या फेरफारांवरून, चतुर्थ युगाच्या पूर्वार्धांत झालेल्या हवेंतील फेरफारांची सकारण व्यवस्था लावतां येते. तरी आतां प्रथम डॉ. क्रोलची उपपत्ति काय आहे हें थोडक्यांत सांगून, नंतर तिच्या संभवनीयतेसंबंधानें तज्ज्ञ लोकांचीं मतें काय आहेत तीं पाहूं.

बाजूच्या आकृतींत न व उ श ही पृथ्वीची सूर्याभोंवती फिरण्याची कक्षा आहे. ही दीर्घवर्तुळाकार असून सूर्य तिच्या मध्यावर ह्मणजे म जवळ नसतो, तर के, क या केंद्रांपैकीं कोणत्या तरी केंद्रांत असतो. तो के जवळ आहे असें समजूं. आतां पृथ्वी जर न जवळ असेल तर तिजपासून सूर्याचें अंतर फारच कमी असेल, आणि उ जवळ असेल तर तें अतिशय असेल. या न आणि उ बिंदूंना नीच व उच्च अशीं अनुक्रमें नांवें आहेत. वर सांगितलेंच आहे कीं, ऋतु होतात ते पृथ्वीचो कक्षापातळी व विषुववृत्तपातळी यांच्यामध्यें



कांहीं तिर्कसपणा असल्यामुळें होतात; ह्मणजे, पृथ्वी **न** जवळ असून तिच
उत्तरध्रुव जर सूर्यापासून दूर असेल, तर उत्तर गोलार्धांत हिंवाळ
उत्पन्न होईल; पण पृथ्वी उ जवळ आली ह्मणजे तो ध्रुव सूर्याकडेस
वळेल, व ह्मणून त्या उत्तर गोलार्धामध्यें उन्हाळा होऊं लागेल. ये
एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे की, पृथ्वी सूर्याभोवती फिरत असतांन
तिच्या आसांची दिशा बदलत नाही. आतां या आंसाला जर कोण
त्याही प्रकारची गति नसेल तर हें ऋतुचक्र सारखे तसेच फिरत राहील
ह्मणजे पृथ्वी **न** जवळ आली की उत्तर गोलार्धांत हिवाळा व **उ** जवळ
आली की, उन्हाळा असे सारखे ऋतु होत जातील. परतु त्या आंसाल
गति आहे. तो क्रान्तिवृत्ताच्या ध्रुवाभोवतीं ह्मणजे कदंबाभोंवती २५८६८
वर्षांत एक फेरा करितो; आणि त्यामुळे अयनचलन ऊर्फ संपातचलन होते.
ह्मणून पृथ्वीचा आंस व तिची कक्षापातळी यांच्या मधला कोन कक्षेंतील
कोणत्याही एका बिंदूशी इतक्या वर्षाच्या अवधींत सारखा नसतो. त्यामुळे
या मोठ्या कालचक्रामध्ये वसंतादि ऋतु पृथ्वी आपल्या कक्षेंत निरनि-
राळ्या बिंदूशी आली असतां होतात. उदाहरणार्थः—पृथ्वी **न** जवळ
असतांना जर उत्तर गोलार्धांत एकदां हिंवाळा झाला, तर कांही काळानें
तो पृथ्वी **ना** जवळ आली असतांना होईल; व अशा रीतीने हा हिंवा-
ळ्याचा बिंदु मागे मागे येऊन वरील चक्र संपण्याच्या वेळेला पुनः
न जवळ येईल. अशीच गोष्ट उ जवळ होणाऱ्या उन्हाळ्याची
ोणार. तसेच **व** आणि **श** या संपातांचे होणार. आकृतींतील **शा वा**
ाणि **ना ऊ** या रेघा **श व** आणि **न** उ यांची पालटलेली स्थिति दाख-
ातात. पण येथें हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, जरी उन्हाळा, हिवाळा
गैरे कोणत्याही बिंदूशी झाले तरी पृथ्वीची कक्षा व तिची उच्चनीचें ही
ांहीं परस्परसंबंधाने पहातां बदलत नाहींत. ह्मणून, उत्तर गोलार्धांत
वाळा जर पृथ्वी **ना** जवळ असतांना झाला तर त्यावेळीं पृथ्वीचे सूर्या-
सूनचें अंतर **न** येथील अंतरापेक्षां जास्त असणार. असें होतां होतां वर
गितलेल्या कालचक्रांत हिंवाळा एकदां पृथ्वी उ जवळ आली असता
ईल व तेव्हां ती आपल्या उच्चीं असल्यामुळें तिचें सूर्यापासूनचें अंतर-
परम असेल. आतां **न** जवळ होणारा हिवाळा व उ जवळचा हिंवाळा
ध्यें महदंतर आहे हें उघड आहे. **न** जवळ असतांनां सूर्यापासूनचें

तिचें अंतर फार थोडें असल्यामुळे तेथला हिंवाळा सूर्यसान्निध्यामुळें जरा सौम्य होईल. पण ती उ जवळ येऊन तें अंतर परम झाले ह्मणजे तेथला हिंवाळा फारच कडक होईल. वर सांगितलेल्या चक्रामध्यें हिंवाळा एकदां उ पाशीं होईल. हे चक्र २५८६८ वर्षांचें असल्यामुळें न पाशीं हिंवाळा झाल्यापासून उ पाशीं तो व्हावयास साधारण पणे त्याच्या निम्मे ह्मणजे १२९३४ वर्षे लागतील. परंतु न आणि उ या बिदूंनां थोडीशी उलट दिशेने गति आहे असें आढळून आलें आहे; त्यामुळे २५८६८ वर्षांचे चक्र कमी होऊन ते २०९८४ इतक्या किंवा स्थूल मानानें २१००० वर्षांचे होतें. ह्मणजे पृथ्वी न पाशी असता एका गोलार्धात हिंवाळा झाल्यापासून पृथ्वी आपल्या उच्ची ह्मणजे उ शी आली असतां तेथ हिंवाळा व्हावयास १०५०० वर्षे लागतील. आतां इ. स. १२५० या वर्षी पृथ्वी आपल्या कक्षेत नीचीं म्हणजे न पाशी असतांना उत्तर गोलार्धात हिंवाळा झाला होता; आणि पुढे इ. स. ११७५० वर्षाच्या सुमारास पृथ्वी आपल्या कक्षेत उच्चीं म्हणजे उ पाशी असताना हिवाळा होईल; व तेव्हां ती सूर्यापासून परमान्तरावर असल्यामुळे तो फार कडक होईल. याप्रमाणे मागें हिशोब करीत गेल्यास इ. स. पूर्वी ९२५० वर्षांच्या सुमारास असा फार कडक हिंवाळा झाला होता असे आढळून येतें. एका गोलार्धात हिंवाळा असतांनां दुसऱ्यांत उन्हाळा असतो हे सांगावयास नकोच. उत्तर गोलार्धातील हिंवाळ्याची जी गोष्ट वर सांगितली तीच थोड्या बहुत फरकाने दक्षिण गोलार्धातील उन्हाळ्यालाही लागू आहे.

कोणत्याही गोलार्धात होणाऱ्या हिवाळ्याचा कडकपणा किंवा उन्हाळ्याचा सौम्यपणा यांचा विचार करतांना आणखी एक गोष्ट लक्षात घ्यावी लागते. एका संपातबिदूपासून ( व ) दुसऱ्या संपातबिंदूपर्यंत ( श ) जावयास पृथ्वीला लागणारा जो काळ तो उन्हाळा असे जर समजले, तर हा कालावधि सदा स्थिर नाही. पूर्वी सांगितलेंच आहे की न आणि उ हे उन्हाळ्या हिंवाळ्याचे बिंदु तसेच श आणि व हे संपातबिंदु हे अचल नाहींत; तर ते २१००० वर्षांच्या अवधींत क्रान्तिवृत्तांत एक फेरा करतात. हें क्रान्तिवृत्त जर वर्तुळाकार असतें तर श व आणि न उ या रेषांनीं त्याचें नेहमीं बरोबर दोन भाग झाले असते. परंतु तें

दीर्घवर्तुळाकार असल्यामुळें ते विभाग समान होत नाहींत. उदाहरणार्थ; कल्पना करूं कीं, पृथ्वी **न** जवळ आली असतां हिंवाळा झाला, तर तेव्हां उन्हाळ्याचा अवधि **व उ श** एवढा होईल; पण जेव्हां तो हिंवाळा पृथ्वी उ जवळ असतांना होईल तेव्हां उन्हाळ्याचा अवधि फक्त **श न व** एवढाच होईल. हा अवधि **व उ श** यापेक्षां फार लहान आहे हें त्या त्या वर्तुळ खंडावरून दिसतेंच आहे. हें अंतर भूकक्षा दीर्घवर्तुलाकार असल्यामुळेंच पडतें; आणि दीर्घवर्तुळाच्या दोन ह्मणजे लहान व मोठया व्यासांपैकीं मोठा व्यास लहानापेक्षां ज्याप्रमाणें मोठा असेल त्याप्रमाणें हें अंतरही मोठें होईल; ह्मणजे उन्हाळ्याच्या काळापेक्षां हिंवाळ्याचा काळ बराच मोठा होईल. भूकक्षेच्या दीर्घवर्तुळाचीं मानें तिचें सूर्यापासून जें मध्यम व परम अंतर त्यांवरून काढतात, व त्या दीर्घत्वाला ज्योतिःशास्त्रांत केंद्रच्युति* ह्मणतात. ही केन्द्रच्युति कायम नाहीं. ती हळूहळू वाढत जाऊत महत्तम मानाला पोंचल्यावर पुनः कमी व्हावयास लागते, व पूर्वीसारखी पुनः होते. ह्मणून प्रत्येक गोलार्धांत हिंवाळ्याच्या व उन्हाळयाच्या अवधींमधला फरकही त्याप्रमाणें मोठा किंवा लहान होत असतो. वर सांगितलेंच आहे कीं, हिंवाळा व उन्हाळा यांचे अवधि संपातरेषेच्या स्थितीवर ह्मणजे, क्रान्तिवृत्तांतील ज्या बिंदूंशीं पृथ्वी आली असतां हे ऋतु होतात, त्या बिंदूंच्या स्थानावरही अवलंबून असतात. या दोन बदलणाऱ्या मानांचा संयुक्त परिणाम असा होतो कीं, पृथ्वीची केंद्रच्युति महत्तम असून पृथ्वी आपल्या उच्चीं असतांना हिंवाळा व नीचीं असतांना उन्हाळा असें जर झालें, तर त्यांच्या अवधीमध्यें फार मोठा फरक पडतो. हा फरक महत्तम झाला ह्मणजे ३३ दिवस असतो असें आढळून आलें आहे. हल्लीं तो सुमारें ७½ दिवस आहे. ह्मणजे पृथ्वी **न** जवळ आली असतांना तिची केंद्रच्युति महत्तम असून उत्तर गोलार्धांत जर हिंवाळा झाला तर तेव्हांच्या उन्हाळ्यापेक्षां तो ३३ दिवसांनी लहान होईल. पण १०५०० वर्षांनीं ही स्थिति पालटून पृथ्वी उ जवळ आली असतां होणारा हिंवाळा उन्हाळ्यापेक्षां तितकाच ह्मणजे ३३ दिवसांनीं मोठा होईल.

---

$$\text{* केन्द्रच्युति} = \frac{\text{प–म}}{} = \frac{\text{मध्यबिंदूपासून केन्द्रापर्यंतचें अंतर}}{\text{मध्यम अंतर}}$$

पृथ्वी आपल्या कक्षेत फिरत असतांनां तिचा मंदकर्ण समान कालांत समान क्षेत्रें आक्रमितो. यावरून हर्शल यानें अशी कल्पना केली कीं, वर सांगितल्याप्रमाणें जरी उन्हाळा व हिंवाळा यांच्या अवधींत फरक असला तरी पृथ्वीला एका संपातापासून दुसऱ्या संपातापर्यंत जातांनां प्रत्येक वेळी सारखीच उष्णता सूर्यापासून मिळते; कारण प्रत्येक अवधींतील सूर्याच्या उष्णतेच्या अरीभवनाचें प्रमाण जरी कमजास्त असलें तरी तो कमजास्तपणा त्या अवधीच्या स्वतःच्या कमजास्तपणामुळे बरोबर भरून निघतो. हे ह्मणणें खरें मानले तर डॉ. क्रोलच्या ह्मणण्याला थोडासा कमीपणा येतो. पण सर राबर्ट बॉल या प्रसिद्ध ज्योतिर्विदानें गणिताने असे सिद्ध केले आहे की, हर्शलची वरील कल्पना अगदी चुकीची आहे; व उन्हाळा किंवा हिवाळा यांमध्ये एखाद्या गोलार्धाला सूर्यापासून मिळणाऱ्या उष्णतेचे प्रमाण हे पृथ्वीच्या तिर्यक्त्वावर अवलबून असून तिच्या कक्षेच्या केंद्रच्युतीशी त्याचा फारसा सबध नाही. प्रत्येक गोलार्धाला सबध वर्षामध्ये सूर्यापासून मिळणारी उष्णता ३६५ ह्मणजे दररोजची सरासरीनें एक धरून, व पृथ्वीचे तिर्यक्त्व २३° २७′ मानून बॉलनें असे दाखविले आहे की, पृथ्वीची कक्षाकेन्द्रच्युति कितीही असली तरी प्रत्येक गोलार्धाला उन्हाळ्यामध्ये २२९ उष्णता मिळेल व हिवाळ्यामध्ये फक्त १३६ मिळेल. आतां कक्षाकेंद्रच्युतीमुळे या आंकड्यांवर जरी कांहीं परिणाम झाला नाहीं, तरी तीमुळे उन्हाळा व हिवाळा यांच्या अवधीमध्ये फरक पडतो हे आपण वर पाहिलेंच आहे. यावरून उत्तर गोलार्धांत महत्तम अवधीचा हिवाळा जेव्हां होईल, तेव्हां तेथे २२९° उष्णता १६६ दिवसांवर ( उन्हाळ्याच्या ) वांटली जाऊन, १३६ उष्णता हिवाळ्याच्या १९९ दिवसांवर वांटली जाईल. ह्मणजे उन्हाळ्यांतील रोजच्या उष्णतेचे सरासरी मान ( $\frac{२२९}{१६६}$ ) व हिंवाळ्यांतील रोजच्या उष्णतेचे सरासरी मान ($\frac{१३६}{१९९}$) यां मधील अंतर फार होउन, उन्हाळे अल्पावधि पण अधिक ऊष्ण, आणि हिंवाळे दीर्घावधि पण फार थड असे होतील; त्यामुळे त्या दीर्घ हिवाळ्यांत सांठलेलें बर्फ वगैरे लहानशा उन्हाळ्यांत सर्व वितळून जाणार नाही, व ह्मणून तेथे हिमकाल उत्पन्न होईल. वरील विवेचनावरून हेंही लक्षांत येईल कीं त्यावेळीं दक्षिण गोलार्धांत सौम्य व अल्पावधि हिंवाळे होऊन उन्हाळे दीर्घावधि

पण थंड असे होतील, ह्मणजे तेथे उत्तर गोलार्धाच्या अगदीं उलट स्थिति होईल. सारांश या दोन्ही गोलार्धांत हिमकाल व हिमान्तरकाल असे एकामागून एक १०५०० वर्षांनीं येत जातील; मात्र भूकक्षेची केन्द्रच्युति हिवाळा व उन्हाळा यांच्या अवधींत एवढा फरक करण्याइतकी असली पाहिजे.

आतां डॉ. क्रोलचें एवढेंच ह्मणणें जर असतें तर तें खोडून काढणें दुरापास्तच झालें असतें; कारण वर सांगितलेलें कारण हिमकालाला योग्य असे फेर हवामानांत करण्याला पुरेसें आहे. निदान हिमकालोत्पत्तीचें एवढेंच एक कारण जरी नसेल, तरी त्याचा बराच मोठा परिणाम झाला असला पाहिजे यांत कांहीं शंका नाहीं. परतु लव्हरियर याच्या कोष्टकांतील भूकक्षेच्या केन्द्रच्युतीचें मान घेऊन त्यावरून डॉ. क्रोलनें असें गणित केलें आहे कीं, गेल्या तीस लक्ष वर्षांत पृथ्वीची केन्द्रच्युति तीन वेळां महत्तम झाली असून पहिल्या वेळी ती १७०००० वर्षें, दुसऱ्या वेळी २६०००० वर्षें व तिसऱ्या वेळी १६०००० वर्षें होती; हा शेवटला काळ येऊन गेल्यापासून ८०००० वर्षें झाली आहेत. या डॉ. क्रोलच्या ह्मणण्याप्रमाणे पहातां चतुर्थ युगाच्या पूर्वार्धांतील शेवटचा हिमकाल २४०००० वर्षांपूर्वी सुरू झाला असून ८०००० वर्षांपूर्वी तो संपून हिमोत्तरकाल सुरू झाला असला पाहिजे. या १६०००० वर्षांच्या दीर्घ अवधीत हिवाळा जसा पृथ्वी आपल्या कक्षेत नीची अथवा उच्चीं असतांना झाला असेल त्याप्रमाणे हवा सौम्य किंवा कडक अशी कित्येक वेळां झाली असेल. परंतु महत्तमकेंद्रच्युतिकालाच्या पहिल्या पहिल्या भागामध्येंच हवेचा कडकपणा महत्तम असल्यामुळे डॉ. क्रोलच्या मताप्रमाणे गेला मोठा हिमकाल २००००० वर्षांपूर्वी ह्मणजे गेल्या महत्तम केंद्रच्युतीच्या कालाच्या आरभापासून समारे ४०००० वर्षांनंतर झाला असें ह्मटलें पाहिजे.

परतु या गणिताच्या विश्वसनीयतेबद्दल ज्योतिर्विद व भूस्तरशास्त्रज्ञ यानां सारखीच शंका आहे. डॉ. क्रोलच्या बहुतेक ह्मणण्याला बॉलनें पाठबळ दिलें आहे. परतु त्याला भूकक्षेच्या केन्द्रच्युतीचें महत्तम मान, गेल्या हिमकालाचा आरंभ केव्हां झाला असावा याचा अदमास, तसाच पुढचा हिमकाल केव्हां होईल याचा अंदाज वगैरे गोष्टींचें गणित ज्योतिः-

शास्त्रावरून करण्याचें धाडस करूं नयेसें वाटलें. तो ह्मणतो ' मला या संबंधानें कांहीं सांगतां येत नाहीं व कोणताही सूक्ष्मगणितशास्त्रज्ञ सध्याच्या ज्ञानाच्या स्थितींत असल्या गोष्टींसंबंधानें भविष्यें करण्याला धजणार नाहीं.' लाखों वर्षांपूर्वीच्या कालांतील केंद्रच्युतीच्या मानावर भरंवसा ठेवणें अगदी वेडेपणाचें आहे, कारण ज्या मानांवरून केंद्रच्युति काढावयाची तीच मुळीं सध्या संशयित आहेत; व विशेषतः प्राचीन भूस्तर युगांतील कालासंबंधानें तर तसें करतांच येत नाहीं असें मत प्रसिद्ध अमेरिकन ज्योतिर्विद न्यूकोंब यानेंही दिलें आहे. डॉ. क्रोलने यावर एवढेंच ह्मटलें कीं ' माझें गणित अगदी नवीन काढलेल्या केन्द्रच्युतीच्या मानावरून बिनचुक केलेलें आहे.' पण हें उत्तर बरोबर नाहीं. कारण आक्षेप आहे तो गणिताच्या बिनचुकपणाबद्दल नसून जीं मानें गणित करावयास घेतलीं त्यांच्याच खात्रीलायकपणाबद्दल आहे.

एका वेळीं पंडितांची अशी समजूत झाली होती कीं डॉ. क्रोलने ठरविलेल्या निरनिराळ्या कालांचा भूस्तर शास्त्रांतील गोष्टींशीं चांगला मेळ पडतो; व ह्मणून हिमकाल व हिमान्तरकाल यामध्यें झालेल्या भूपृष्ठावरील आलटापालटी केव्हां झाल्या असाव्या या संबंधाच्या अंदाजांनां त्यावरून चांगली बळकटी येते. पण भूस्तरशास्त्रज्ञ आतां त्या अगडबंब आंकडयांचा व कालांचा जरा अधिक सूक्ष्म विचार करावयास लागले आहेत. वर सांगितलेंच आहे कीं, गेल्या तीस लक्ष वर्षांत भूकक्षेच्या केंद्रच्युतीचे महत्तम मान तीन वेळां झालें होतें, असें डॉ. क्रोलचें मत आहे. त्यावरून तीन हिमयुगेंही त्या त्या वेळीं झालीं असून प्रत्येक युगामध्यें कित्येक हिमकाल व हिमान्तर काल झाले असले पाहिजेत. परंतु पहिल्या पहिल्या भूस्तर युगांत असलीं हिमयुगें झालीं असल्याचे कांहीं प्रमाण नाहीं; कदाचित् झालीं असतील तर प्रथम युगांतील गोंडवन व आंगारिक कालामध्यें झालीं असतील. या आक्षेपावर असें उत्तर आलें कीं जरी त्यावेळीं भूकेंद्रच्युति महत्तम होती तरी भूपृष्ठावरील पाणी व जमीन यांची वाटणी चतुर्थ युगाहून तेव्हां फारच निराळी असल्यामुळें, केंद्रच्युति फार असूनही चतुर्थ युगाच्या पूर्वार्धांत झालेले हवेचे फेरबदल तेव्हां झाले नाहींत. ह्मणजे केन्द्रच्युति फार असूनही पृथ्वी आपल्या कक्षेंत उच्चीं असतांनां जरी हिंवाळे होत असले तरी एवढ्यावरून कांहीं हिमकाल

उत्पन्न होईल असें नाहीं असें कबूल केल्याप्रमाणे झालें. यावरून भूकेंद्रच्युति महत्तम नसतांनांही हिमकाल होईल असें ह्मणावयासही हरकत नाही. दुसऱ्याही एका बाबतींत डॉ. क्रोलची उपपत्ति व भूस्तरशास्त्र यांमध्यें विरोध आहे. अमेरिकन शास्त्रज्ञांनीं गेला हिमकाल संपल्यापासून झालेल्या दऱ्यांच्या क्षयावरून काढिलेल्या त्याच्या कालाशीं डॉ. क्रोलचें मत जमत नाहीं. हिमोत्तरकालाचा आरंभ १०००० वर्षांहून पलीकडचा नाहीं असें अमेरिकन शास्त्रज्ञांचे मत प्रथम प्रकरणांत दिलें आहे. पण डॉ. क्रोलच्या मताप्रमाणे पहातां तो काल सुमारे ८० किंवा १०० हजार वर्षांपूर्वींचा आहे. हे अंतर कांहीं लहान सहान नव्हे. प्रो. गीकी याला अमेरिकन शास्त्रज्ञांचे मत जरी सर्वस्वी कबूल नाही तरीही त्याने हें कबूल केलें आहे कीं, हिमकालाचे एकामागून एक येण्याचें सबळ कारण दाखवीत असल्यामुळे डॉ. क्रोलची उपपत्तीच कायती खरी आहे, तरी कदाचित् त्यानें भूकक्षेच्या केन्द्रच्युतीचीं मानें जीं घेतली त्यांत कांही चूक असल्यामुळें एवढा मोठा फरक त्याच्या हिशोबांत पडत असेल; भूस्तरशास्त्रांतील प्रत्यक्ष पुराव्यावरून निघालेलीं अनुमाने कांही खोटीं ह्मणतां येणार नाहींत, अर्थात् तीं अशीच ह्मणून सोडून देतां येणार नाहींत. या डॉ. क्रोलच्या उपपत्तीसंबधानें दुसऱ्या एका हडल्स्टन नांवाच्या विद्वानाने दिलेलें प्रतिकूल मत तर फारच कडक आहे. त्याचे ह्मणणे असे आहे की " डॉ. क्रोलच्या गोड गोड उपपत्तीवरून पूर्वीचे भूस्तशास्त्रज्ञ कसे फसले हें मोठे आश्चर्य आहे. हिमकाल कदाचित् कधीं झालेलाही नसेल, आणि आह्मीं आज त्याच्या कालाच्या संबंधाचीं अनुमाने खरीं कीं खोटीं याचा वाद चालविला आहे. एका अतिक्रमापासून दुसरा अतिक्रम उत्पन्न होतो आणि क्रोलसारख्याच्या अनियंत्रित तर्कांनी नवशिके शास्त्रज्ञ फसूनही जातात." पण या टीकेमध्येंही सौम्यपणाचा अतिक्रम झाला आहे. डॉ. क्रोलचे अंदाज अनियंत्रित असतील; तरी पृथ्वीवर एखाद्या गोलार्धांत बर्फाचा पूर येईल असे फेरफार ठराविक काळाने हवेत होण्याचें एक सयुक्तिक कारण सुचविल्याचा तरी मान त्यास दिलाच पाहिजे.

यासंबंधानें कांहींही मते असलीं, तरी ज्यांत निदान दोन हिमकाल व एक हिमान्तरकाल होऊन गेले त्या हिमयुगाचा अवधि हिमोत्तरकाला-

रंभापासून आतांपर्यन्त लोटलेल्या कालापेक्षां बराच मोठा असला पाहिजे यांत काही शंका नाही. एकदर स्थिति अनुकूल असल्यास, कक्षाकेन्द्र-च्युति फार नसूनही जर पृथ्वी आपल्या कक्षेत उच्ची असतांनां हिवाळा झाला, तर तेवढ्यानेही हिमकाल उत्पन्न होऊं शकेल. उच्चाजवळ लागो-पाठ होणाऱ्या दोन हिवाळ्यांच्या दरम्यान २१००० वर्षें जातील हे पूर्वी सांगितलेच आहे. ह्मणून भूकक्षेच्या केन्द्रच्युतीचा प्रश्न सोडून दिला तरी दोन हिमकाल व त्यांच्यामधला एक हिमान्तरकाल एवढ्याला २१००० वर्षांहून थोडा तरी अधिक काळ दिला पाहिजे; व प्रो. गीकीच्या ह्मणण्याप्रमाणे जर पांच हिमकाल व चार हिमान्तरकाल मानिले तर त्या हिमयुगाचा अवधि ८४००० वर्षांचा तरी होईल. असो.

या शास्त्रीय गोष्टींच्या वादांत याहून खोल जाण्याचें कांही कारण नाही. मागे सांगितलेच आहे की आपला मुख्य उद्देश ह्मणजे वेदांतील वाक्यांच्या आधारावरून वेदकालीन लोक व त्यांबरोबर इतरही आर्य लोक यूरोपांत, किंवा उक्षस् ( ऑक्सस् ), यक्षावर्त ( जक्सार्टिस ) किंवा सिंधु या नद्यांच्या तीरावर येऊन रहाण्यापूर्वी, त्यांचे वसतिस्थान कोठे होते ते शोधून काढणे हा होय. त्याला साहाय्यभूत अशा शास्त्रीय शोधांचा विचार आतांपर्यन्त केला, त्याचा सारांश असा:— ·

१ नवपाषाणयुगाच्या आरंभीं यूरोपांत जे लोक रहात होते, त्यांच्या-पासूनच हल्लींचे आर्यभाषा बोलणारे यूरोपीय लोक झाले आहेत, असें दिसतें.

२ परंतु नवपाषाणयुगाच्या आरंभी आर्य लोकांच्या एका शाखेचे लोक यूरोपांत रहात होते असे जरी सिद्ध झाले व ह्मणून आर्य लोक हिमोत्तरकालामध्ये आशियांतून यूरोपांत गेले हे म्हणणे जरी खोटें ठरलें, तरी त्यावरून ते आर्य लोक यूरोपांतले मूळचेच रहिवाशी होते असे सिद्ध होत नाहीं; म्हणजे आर्यांच्या मूलस्थानाच्या प्रश्नाचा त्यावरून शेवटचा निकाल होत नाहीं.

३. पुष्कळ कारणांवरून अशी अटकळ करावी लागते कीं यूरोपा-मध्ये धातुयुगाची सुधारणा परकीय लोकांनीं नेली.

४ पाषाण, कांस्य व लोह ही युगे सर्व देशांत एकाच काळी झाली असे नाही; ह्मणून एकाच काळी ईजिप्टची मोठी सुधारणा व यूरोपांत पाषाणयुगाचे अस्तित्व या गोष्टी परस्परविरुद्ध नाहींत.

५. भूस्तरशास्त्रांतील अगदीं नवीन शोधांच्या खात्रीलायक पुराव्यावरून हिमकाल संपल्याला व हिमोत्तरकाल सुरू झाल्याला सुमारे १०००० वर्षे झालीं असावी असे दिसते; व सैबीरियांत सांपडलेल्या जनावरांच्या मृत शरीरांच्या ताजेपणावरून या मतास पुष्टि येते.

६ मनुष्यप्राणी हा कांही वर्षांपूर्वी मानीत होते त्याप्रमाणें, केवळ हिमोत्तरकालीन नसून, तृतीय युगांत नाही तरी निदान चतुर्थ युगांत तरी त्याचे जिकडे तिकडे अस्तित्व होते असे दाखविण्यास भूस्तर शास्त्राजवळ भक्कम पुरावा आहे.

७ आजपर्यन्त निदान दोन हिमकाल व मध्ये एक हिमान्तरकाल असे होऊन गेले; या हिमान्तरकालामध्ये पृथ्वीवर जमीन व पाणी यांची वांटणी आतांच्याहून फार भिन्न होती.

८ चतुर्थ युगाच्या प्रथमार्धात हवेचीं मोठमोठीं स्थित्यन्तरे झाली. हिमकालांत ती फार थंड होती; आणि हिमान्तरकालामध्ये ध्रुवप्रदेशांत देखील ती सौम्य व समशीतोष्ण होती.

९ आशिया व युरोप या दोन्ही खंडांतील ध्रुवाजवळच्या प्रदेशांत हिमान्तरकालामध्ये थंड उन्हाळे व गरम हिवाळे असल्यामुळे तेव्हां तेथे अक्षय वसंत नांदत होता; आणि हल्लीं फक्त समशीतोष्ण व उष्ण कटिबंधांत आढळून येणाऱ्या वनस्पतीही पूर्वी स्पिट्झबर्जेन सारख्या, ह्मणजे जेथें कार्तिकापासून चैत्रापर्यंत सूर्य क्षितिजाखालीं असतो अशा ठिकाणीही मोठ्या जोमाने वाढत असत असे दाखविण्यास पुष्कळ आधार आहे.

१० या सौम्य हवेचा हिमकालावताराने बिघाड केला व ते प्रदेश त्यामुळे उष्ण कटिबंधांतील प्राणी व वनस्पती यानां रहावयास अयोग्य झाले.

११ या हिमकालाच्या अवधीविषयीं अनेक भिन्न भिन्न अंदाज केलेले आहेत. आपल्या सद्यःकालीन ज्ञानाच्या मानाने पहातां या बाबींत आपल्याला ज्योतिःशास्त्रापेक्षां भूस्तरशास्त्रावरच अधिक भिस्त ठेविली पाहिजे; तरी हिमकालोत्पत्तीच्या कारणासंबंधाने पहातां ज्योतिशास्त्राचेंच मत अधिक संभवनीय दिसते.

१२ प्रो. गीकीच्या मताप्रमाणें तर एकंदर पांच हिमकाल व चार हिमान्तरकाल होऊन गेले, व हिमोत्तरकालाच्या आरंभी सुद्धां कडक व सौम्य अशी हवा, निदान यूरोपच्या वायव्य भागांत तरी, दोनदां होऊन गेली, असें मानण्यासही पुरावा आहे.

१३ कित्येक प्रसिद्ध शास्त्रज्ञ लोकांनीं या पूर्वीच असें मत दिले आहे कीं मनुष्याचे आदिस्थान ध्रुवप्रदेशांत कोठे तरी असावें, आणि वनस्पति व प्राणि कोटी यांचा उद्गमही तेथेच कोठे तरी झाला असावा.

यावरून असें दिसेल कीं, जर वेदवाक्यांचा कल वैदिक वसतिस्थान ह्मणजे पूर्वकाळीं वैदिक ऋषी जेथें रहात असत तें स्थान ध्रुवाजवळ होते असें दाखविण्याचा असेल, तर त्याला दर्शनींच अपवाद आणील अशी नवीन शास्त्रीय शोधांत कोणतीही गोष्ट नाहीं. उलट ध्रुवप्रदेशोपपत्तीच सुचविणाऱ्या वेदांत कित्येक गोष्टी आहेत; इतकेंच नव्हे तर अलीकडे कित्येक शास्त्रज्ञांचें असें मत होत चालले आहे कीं मानवजातीचे आदिस्थान शोधणे ते ध्रुवप्रदेशांतच कोठें तरी शोधिले पाहिजे.



# प्रकरण ३ रें.

---

## ध्रुवप्रदेश.

चतुर्थ युगाच्या आरंभीं हवेंत विलक्षण फेरफार झाले–ध्रुवप्रदेशांत विशेष झाले–ध्रुवप्रदेशासंबंधीं डॉ. वारनचें मत–हिमकालापूर्वी ध्रुवाजवळील भूखंडाच्या अस्तित्वाबद्दल प्रमाणें–तेथें हिमान्तरकालांत थंड उन्हाळे व गरम हिवाळे, ह्मणजे जवळ जवळ अक्षय्य वसंतच होता–पण एवढ्यावरून आर्यांचें मूलस्थान तेथें होतें असें सिद्ध होत नाहीं–त्याची शक्यता मात्र दिसते–तें सिद्ध व्हावयास पुराणवस्तुशास्त्राची मदत पाहिजे–किंवा वेदादि प्राचीन ग्रंथांचा आधार पाहिजे–वैदिक कथांचा आजपर्यंत केलेला अर्थ समाधानकारक नाहीं–नवीन शोधांवरून त्यांत दुरुस्ती केली पाहिजे–वैदिक कथा आतांपर्यंत अबाधित आल्या आहेत–डॉ. वारनचे शोध–ध्रुवावरील मानव जातींचें आदिस्थान–ध्रुवावर दिसणारे ज्योतिःशास्त्र विषयक चमत्कार–ध्रुवबिन्दु व ध्रुवप्रदेश यांतील भेद–ध्रुवविशिष्ट गोष्टी–आकाशस्थ ज्योतींचें चक्राकार भ्रमण–तेथें तारा उगवत किंवा मावळत नाहींत–सूर्य दक्षिणेकडून उगवतो–सहा महिन्यांचीं दिवसरात्रें–उत्तरारुण–पंधरा दिवसांचा अखंड चंद्रप्रकाश–दीर्घावधि संध्याप्रकाश–दीड महिन्यापासून दोन महिन्यांपर्यंत अवधीची उषा–ध्रुवावरचें वर्ष–दीर्घरात्रींतील अस्सल काळोखाचा भाग दोन किंवा अडीच महिन्यांचा असतो–डॉ. वारननें केलेलें ध्रुवावरील चक्राकार फिरणाऱ्या उषेचें वर्णन–ध्रुवाच्या दक्षिणेकडील प्रदेशांत दिसणारे विशिष्ट चमत्कार–तारा तिरकस फिरतात–सूर्य नेहमीं दक्षिणेकडे असतो–सहा महिन्यांतून कमी अवधीचीं दीर्घ दिवसरात्रें–वर्षांतील उरलेल्या भागांतील साधीं अहोरात्रें–दीर्घावधि उषा–या चमत्कारांची उष्णकटिबंध प्रदेशांतील चमत्कारांशीं तुलना–ध्रुवबिंदुविशिष्ट आणि ध्रुवप्रदेशविशिष्ट चमत्कारांचा सारांश.



पूर्व प्रकरणांत सांगितलेंच आहे कीं चतुर्थ युगाच्या पूर्वार्धांत पृथ्वीवर जिकडे तिकडे जमीन फार उंच किंवा खोल होऊन त्यामुळे हवेमध्येंही विलक्षण आलटापालटी झाल्या. हिमकालाचा कडकपणा ध्रुवप्रदेशांत अर्थातच जास्त असणार, ह्मणून त्यावेळी भूपृष्ठावर झालेल्या मोठमोठ्या आलटापालटी इतर ठिकाणांपेक्षां ध्रुवप्रदेशावर फार मोठ्या प्रमाणावर झाल्या असल्या पाहिजेत, अशी कल्पना करण्यास कोणताही प्रत्यवाय नाही. यावरून आणखीही एक अनुमान करावे लागते, ते हे कीं, हिमान्तरकालांत ध्रुवाजवळ जमीन व पाणी यांची वांटणी आतांच्याहून फार निराळी असली पाहिजे. ‘ नंदनवनोपलब्धि ’ नांवाच्या पुस्तकामध्ये डॉ. वारन यानें पुष्कळ प्रमाणे देऊन असे दाखविले आहे कीं अगदीं अलिकडच्या भूस्तरयुगामध्ये नोव्हा झेम्ला व स्पिट्सबर्जन या बेटांजवळचा उत्तरध्रुवप्रदेशांतील बराच मोठा पट्टा समुद्रांत बुडाला आहे; व त्यावरून त्याने असे अनुमान केले आहे की, उत्तर महासागरांतील सध्याचीं बेटें ( नोव्हाझेम्ला, स्पिट्सबर्जन वगैरे ) ह्मणजे पूर्वी समुद्रांत बुडालेल्या पर्वतांचीं शिखरें असावीं. तृतीय युगाच्या शेवटच्या कालांत उत्तर ध्रुवाच्या आसमंतात् बरेंच विस्तृत असें एक भूखण्ड होते ही गोष्ट सर्व भूस्तरशास्त्रज्ञांनीं कबूल केली आहे, व तें सर्व तसेंच चतुर्थ युगाच्या पूर्वार्धांतही होतें असें जरी ह्मणतां आलें नाहीं तरी, हिमान्तरकालामध्ये जमीन व पृथ्वी यांची विभागणी आतांच्याहून कांहीं तरी निराळी होती, असें मानण्यास पुष्कळ सबळ कारणें आहेत; आणि प्रो. गीकी तर असे ह्मणतो कीं ‘ पूर्वपाषाणयुगीन मनुष्य, व चतुर्थ युगांत आढळणारे इतर प्राणी हे त्यावेळीं उत्तर ध्रुवप्रदेशांत जिकडे तिकडे रहात असत. ’ हल्लीही ध्रुवाजवळ अशिया खंडाच्या उत्तरेस सैबीरियासारखा बराच मोठा जमीनीचा भाग आहे; आणि त्या ठिकाणी पूर्वी वसतियोग्य सौम्य हवा होती असें दाखविण्यास आधार आहे. सैबीरियाच्या उत्तरेस महासागराची खोली अद्यापिही १०० वांवांहून कमीच आहे; आणि चतुर्थ युगाच्या पूर्वार्धांत भूपृष्ठावर झालेल्या मोठमोठ्या आलटा पालटी मनांत आणिल्यास हल्लीं पाण्यांत डालेला जमिनीचा भाग पूर्वी एकदां पाण्यावर होता हीं

गोष्ट असंभवनीय दिसत नाही. एकंदरीत गेल्या हिमकालापूर्वी उत्तर-ध्रुवाभोंवतीं असलेल्या एका भूखंडाच्या बऱ्याच खुणा अजून शिलक आहेत.

हवेसंबंधानें विचार करतां आपण पूर्वी पाहिलेच आहे की, हिमान्तर-कालांत उत्तरवृत्ताच्या आंतल्याही प्रदेशांत थंड उन्हाळे व गरम हिवाळे होते. सर रॉबर्ट बॉल याने तर त्यावेळीं हिवाळे व उन्हाळे यामध्ये पृथ्वीला मिळणारी उष्णता आंकड्यांनी दाखवून त्या वेळच्या हवेच्या सौम्यपणाची चांगली कल्पना आणून दिली आहे. दीर्घावधि उन्हाळ्या-मध्यें एकंदर २२९ भाग उष्णता व अल्पावधि हिवाळ्यामध्ये एकंदर १३६ भाग उष्णता, म्हणजे जवळ जवळ सारखा वसंतऋतूच झाला. म्हणून पूर्वपाषाणयुगीन माणसे हिमान्तरकालात जर त्या प्रदेशांत रहात असलीं तर सूर्य सारखा कित्येक दिवस ( निरनिराळ्या अक्षांशाच्या मा-नानें ) क्षितिजाखाली असूनही त्यांना तेथें मजा वाटली असेल. ध्रुवा-जवळची सध्यांची कडक हवा हिमोत्तरकालानतर झाली असल्यामुळे त्यापूर्वीच्या काळाविषयीं बोलतांना तिचा विचार करणे नलगे.

परतु अशा प्रकारच्या सौम्य व सुखकर हवेने युक्त असे एक उत्तरखंड हिमान्तरकालांत अस्तित्वांत होते, व पूर्वपाषाणयुगीन माणसेही तेथे रहात होती असे जरी मानले, तरी त्यावरून आर्य लोकांचे पूर्वज त्या ठिकाणीं तेव्हां रहात होते असे कांहीं निष्पन्न होत नाही; मात्र तसे असणे बरेंच संभवनीय आहे एवढे त्यावरून दिसते. तसे कायम करण्यास एक तर पुराणवस्तुशास्त्राच्या नवीन कांहीं शोधांनीं हिमान्तरकालांत आर्य लोक ध्रुवाजवळ रहात होते असे सिद्ध होईपर्यंत थांबले पाहिजे; नाहीं तर वेद आणि अवेस्ता यांच्यासारख्या सर्वांनी पुराणतम म्हणून कबूल केलेल्या आर्य-ग्रंथांमध्ये आढळणाऱ्या प्राचीन कथांचे व विचारांचे परीक्षण करून त्यांवरून तरी आर्य लोक हिमान्तरकालांत ध्रुवप्रदेशांत रहात होते असे मानावयास कांहीं आधार मिळतो कीं काय हे पाहिले पाहिजे. या कथां पैकीं पुष्कळांचा सध्यां लाविलेला अर्थ मुळींच समाधानकारक नाहीं हे सर्व कबूल करतात. म्हणून जसे जसें पुराण-वस्तुशास्त्र, भूस्तरशास्त्र, मानुष्य-कशास्त्र, यांतील नवीन शोधांनीं प्राचीन मनुष्यांसंबधाचे आपले ज्ञान वाढत जाईल अथवा निश्चित तरी होत जाईल, त्याप्रमाणें त्या कथेचे अर्थ वेळोवेळीं तपासून गैरसमजामुळें, मनोविकार प्राबल्यामुळें, किंवा तत्कालीन

मनुष्यांच्या आचारविचारादिकांसबंधीं आपल्या अपुऱ्या ज्ञानामुळे झालेल्या चुका दुरुस्त केल्या पाहिजेत. सर्व लोकांमध्यें प्राचीन दंतकथा वगैरे अजून राहिलेल्या आहेत यांत कांहीं शंका नाहीं; कदाचित् कालान्तराने त्यांमध्ये कांहीं ओढाताणही झाली असेल, नाही असें नाहीं. ह्मणून आधुनिक शास्त्रीय शोधांवरून आपल्याला प्राचीन माणसांविषयी जी माहिती मिळते ती प्राचीन कथांशी जमते की नाही हे पहाणे आपले काम आहे. वैदिक कथा व तत्कालीन लोकांचे समज यांसंबंधाने आणखी लक्षांत घेण्यासारखी गोष्ट अशी आहे की, त्या कथा व ते समज हजारो वर्षांपूर्वी गोळा केलेले असून आज आपल्याला जसेच्या तसेच मिळत आहेत. ह्मणून प्राचीन आर्य लोक एका काळीं जर खरोखर उत्तरध्रुवाजवळ रहात असतील तर त्यांच्या आदिग्रथांमध्ये त्या मूलस्थानासंबंधाने कांहीं उल्लेख सांपडणें अशक्य नाहीं. कारण त्यांमध्ये अद्यापि असे कांही भाग आहेत की, त्यांतील शब्द साधे व सरळ असूनही त्यांचा कोणत्याही आधुनिक मीमांसापद्धतीने योग्य अर्थ लागत नाही. ध्रुवप्रदेशांत मानवजातीचे आदिस्थान आहे असे आपले मत सिद्ध करण्यासाठी डॉ. वॉरेन याने इतर राष्ट्रांच्याबरोबर वैदिक लोकांच्याही कथांचा आधार दिला आहे. परतु वैदिक कथांसबंधानें पहातां हा प्रयत्न वरवरचा झाला आहे; आणि असे होणें साहजिकच आहे. कारण वैदिक कथांचा नवीन शास्त्रीय शोधांच्या मदतीने आजपर्यन्त कोणीही ऊहापोह केलेला नाहीं; शिवाय डॉ. वारनला केवळ वेदांच्या जुन्या भाषान्तरावरच भिस्त ठेवावी लागली होती. ह्मणून या दृष्टीनें आतां वैदिक कथांचे व वचनांचे परीक्षण करण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. परंतु तसे करण्यापूर्वी आपल्याला ध्रुवावर व त्याच्याजवळ आसपासच्या ठिकाणीच आढळणाऱ्या अशा विशेष गोष्टी, ज्यांना न्यायशास्त्रांत ‘ विशेष ’ ह्मणतात, त्या काय आहेत हे पाहिलें पाहिजे; व जर त्या गोष्टींचे वर्णन वेदामध्ये आपल्याला आढळले तर तत्कालीन लोकांचे आदिस्थान ध्रुवाजवळ होतें ही गोष्ट निःसंशय सिद्ध होईल. प्रस्तुत ध्रुवाजवळची हवा फार थंड आहे; परंतु पूर्वी ती तशी नव्हती. ह्मणजे थंड हवा ही कांहीं ध्रुवासंबंधी विशेष गोष्ट नव्हे हें आपण पूर्वी पाहिलेंच आहे. ह्मणून प्रस्तुत आपल्या उपयोगी अशा ध्रुवविशिष्ट गोष्टी काय आहेत हें ज्योतिःशास्त्राच्या मदतीनें आतां पाहूं.

ध्रुवावर सूर्य सारखा सहा महिने क्षितिजावर व पुढें एकसारखा सहा महिने क्षितिजाखाली असल्यामुळे तेथे सहा महिने सारखा दिवस व सूर्यप्रकाश आणि सहा महिने सारखी काळोखी रात्र असे असतें अशी सर्वत्र समजूत आढळून येते. परंतु त्यासंबंधाने थोडा अधिक विचार केल्यास ही समजूत केवळ स्थूलमानाने खरी आहे व शास्त्रीयदृष्ट्या तिचे ग्रहण करण्यापूर्वी तीत थोडाबहुत फरक केला पाहिजे असे दिसन येईल. प्रथमतः खुद्द ध्रुव व ध्रुवप्रदेश यांतील भेद समजून घेतला पाहिजे. ध्रुव म्हणजे केवळ एक बिन्दु असल्यामुळे त्याजवळ पूर्वी एकदां कोणा लोकांचे मूलस्थान खरोखर असले तरी ते सर्व लोक कांहीं त्या एकी बिंदूवरच रहात असणे शक्य नाही. ध्रुवप्रदेश म्हणजे उत्तर-ध्रुवबिंदु व उत्तरवृत्त ( ह्मणजे ध्रुवबिंदूपासून सुमारे २३॥ अशावर विषुववृत्ताला समान्तर असलेले वर्तुळ ) यांमधला प्रदेश होय. रात्र, दिवस व ऋतु यांचे मान ध्रुवबिंदूवर व ध्रुवप्रदेशांतील निरनिराळ्या ठिकाणीं एकच असणे कांहीं शक्य नाही व ते तसे नसतेही. ध्रुवबिंदुविशिष्ट गोष्टींवरून ध्रुवमंडळविशिष्ट गोष्टींचे अनुमान करतां येईल. तरी पण प्राचीन आर्यांच्या तेथील मूलस्थानासंबंधी पुरावा गोळा करतांनां त्यांतील भेद लक्षांत ठेवणे अवश्य आहे. ध्रुवप्रदेशांत रहाणाऱ्या लोकांना सहा सहा महिन्यांचीं दिवसरात्रें माहीत असलीं पाहिजेतच; परंतु ध्रुवबिंदुच्या कांहींसे दक्षिणेस ते रहात असल्यामुळे त्यांचा कालादर्श ( पंचांग ) खुद्द ध्रुवावर रहाणाऱ्या लोकांच्याहून कांहींसा निराळा असला पाहिजे. ह्मणून ध्रुवबिंदुविशिष्ट गोष्टी व ध्रुवप्रदेशविशिष्ट गोष्टी यांतील भेद स्पष्ट समजावा म्हणून त्यांचे पृथक विवेचन करणे जरूर आहे.

पृथ्वीचे ध्रुव म्हणजे पृथ्वी ज्या आंसावर फिरते त्या आंसाचीं अग्रे होत. या आंसाची स्थिति पृथ्वीच्या मानाने, अगदी प्राचीन भूस्तरयुगांतही बदलली असल्याचे कांहीं द्योतक नाहीं. म्हणजे ध्रुवबिंदु व ध्रुवप्रदेश हे पूर्वी जे होते तेच आजही आहेत. त्यांवरील पूर्वीची हवा व आतांची हवा यांमध्ये मात्र जमीन अस्मानांचे अंतर आहे. परंतु पृथ्वीच्या अक्षाला थोडीशी गति असल्यामुळे म्हणजे क्रांतिवृत्ताच्या कदंबाभोंवतीं तो फिरत असल्यामुळें संपातांचे चलन होऊन खगोलाचे ध्रुव नित्य पालटत असतात; तसे पृथ्वीचे कांहीं पालटत नाहींत. यामुळें सुमारे ७०००

वर्षांपूर्वी जी तारा ध्रुवस्थानी होती तीच कांहीं आज नाहीं; तरी पण पृथ्वीचे ध्रुव कायमच आहेत. संपातचलन उत्पन्न करणाऱ्या या पृथ्वीच्या अक्षाच्या गतीचे प्राचीनविद्यापंडितांस फार महत्व आहे, कारण त्यामुळे वेळोवेळीं ऋतूंचे आरंभकाल बदलत जातात. याच कालज्ञापकाच्या आधाराने " वेदकालनिर्णय " या ग्रंथामध्ये, वैदिक गोष्टींपैकीं कांहीं गोष्टी वसंतसंपात मृगशीर्षांत असतांनां रचण्यांत आल्या, व ही संपाताची स्थिति आतांपर्यन्त सारखी बदलत आल्याचे दाखले वैदिक ग्रंथांत व त्यानंतरच्या वाङ्मयांतही पुष्कळ आहेत, असे दाखविले आहे. त्यावरून असे दिसेल कीं, तैत्तिरीयसंहिता व ब्राह्मण याच्याकाळीं वसंतसंपात कृत्तिकांत होता. हें सिद्ध करण्यासाठी आधारास घेतलेल्या वाक्यांसंबंधाने असलेल्या सर्व शंका, कै० शंकर बाळकृष्ण दीक्षित यांनी दाखविलेल्या शतपथ ब्राह्मणांतील " एता ( कृत्तिकाः ) ह वै प्राच्यै दिशो न च्यवन्ते सर्वाणि ह वा अन्यानि नक्षत्राणि प्राच्यै दिशश्च्यवन्ते " म्हणजे कृत्तिका मात्र पूर्वदिशेहून चळत नाहींत इतर सर्व नक्षत्रे चळतात, या वचनावरून आता साफ नाहींशा झाल्या आहेत.* ईजिप्ट देशांतील मनोरे व जुनीं देवळें याचे पूर्वाभिमुखत्व ऐतिहासिकदृष्ट्या जितके महत्वाचे आहे तितकीच ही कृत्तिकांची प्राचीनकाळची स्थिति वेदकालानुक्रम ठरविण्यात महत्वाची आहे. परंतु प्रस्तुतचा कालज्ञापक याहून निराळा आहे. उत्तरध्रुव व उत्तर वृत्तांतर्गत प्रदेश यामध्येच आढळणाऱ्या अशा ज्या कांहीं ज्योतिःशास्त्रविषयक विशिष्ट गोष्टी आहेत, त्यांच्याविषयीं कांहीं उल्लेख जर वेदांत सापडले, तर आधुनिक शास्त्रीय शोधांवरून असें उघडच दिसेल कीं वैदिक ऋषींचे पूर्वज जेव्हा त्या ठिकाणीं रहात होते तेव्हां त्यांनां त्या विशिष्ट गोष्टींची माहिती झाली असलीच पाहिजे, आणि ही गोष्ट तर हिमान्तर कालांतच केवळ शक्य होती. म्हणून आता या वर सांगितलेल्या दोन्ही प्रकारच्या विशिष्ट गोष्टींचे पृथक् विवेचन करू.

उत्तरध्रुवावरून पहाणाराला प्रथम दर्शनीच दिसणारा चमत्कार म्हणजे खगोलाचे डोक्यावर होणारे छत्राकार भ्रमण हा होय. आपण उष्ण व समशीतोष्ण कटिबंधांत रहात असल्यामुळे आपल्याला सर्व आकाशस्थ ज्योति पूर्वेस उगवतात व पश्चिमेस मावळतात असें दिसते.

---

* भारतीय ज्योतिःशास्त्र पानें १२७—१२९.

त्यांपैकीं कांहीं आपल्या डोक्यावरून जातात व कांहीं तिरक्या जातात. परंतु ध्रुवावरच्या प्रेक्षकाला आपल्या डोक्यावरील सर्व खगोलार्ध डावी-कडून उजवीकडे डोक्यावर उंच धरलेल्या छत्रीप्रमाणें वाटोळें फिरते आहे असें दिसेल. तेथें तारा उगवणार नाहीत व मावळणारही नाहीत, तर कुभाराच्या चाकाप्रमाणे क्षितिजसमान्तर पातळ्यांमध्ये वाटोळ्या फिरतील; आणि एक प्रदक्षिणा झाली की दुसरी सुरू या प्रमाणें सहा महिन्यांच्या दीर्घरात्रभर चालू राहील. तेथे सूर्य सहा महिने क्षितिजा-वर असतो तेव्हां तोही असाच फिरत राहील. तेथून पहाणाराचें खस्वस्तिक ह्मणजे खगोलाचा उत्तरध्रुव, व त्याची उत्तर दिशा ह्मणजे ऊर्ध्व दिशा होय; अर्थात् क्षितिजाखाली असलेले अदृश्य प्रदेश हे त्याच्या दक्षिणेस असणार. पृथ्वीच्या दैनिक अक्षभ्रमणामुळे पूर्व व पश्चिम बिंदू पहाणाराच्या डावीकडून उजवीकडे फिरत रहातील व त्यामुळे पूर्वेकडील खस्थ ज्योतीही दररोज क्षितिजाबरोबर डावीकडून उजवीकडे फिरत रहातील. त्या आपल्या इकडील उष्ण किंवा समशीतोष्ण प्रदेशांतल्या प्रमाणे रोज पूर्वेस उगवून, डोक्यावरून जाऊन पश्चिमेस मावळतात असे दिसणार नाही. सूर्याभोंवतीं फिरतानां पृथ्वीच्या आंसाची दिशा फारशी बदलत नसल्यामुळे ध्रुवावरून पहाणाराला नेहमीं एकच खगोलार्ध दिसत राहून ते डोक्यावर छत्रीसारखे वाटोळे फिरत राहील, आणि दुसरें अर्ध व त्यांतील सर्व तारा त्यास नेहमीच अदृश्य असतील; व आकाशाचें विषुववृत्त हेच त्याचें क्षितिज होईल. अशा प्रेक्षकाला उत्तरगोलार्धात सूर्य प्रवेश करूं लागला ह्मणजे तो दक्षिणेकडून उगवतोसा वाटेल, व ह्मणून तो बेलाशक सूर्य दक्षिणेस उगवतो असें ह्मणेल; आणि हे आपल्याला कितीही चमत्कारिक वाटले, तरी तें त्यास अगदी खरेंच आहे. ध्रुवावर सूर्योदय वर्षांतून फक्त एकदांच होईल, आणि तो एकदा दक्षिणेस उगवल्यावर सहा महिने सारखा दिसत राहील. इतक्या अवधीत तो क्षितिजावर सुमारें २३$\frac{1}{2}$ अंश येईल, व नंतर पुन्हा खाली खाली जात क्षितिजाखाली दक्षिणेस मावळेल. हे सहा महिने सारखा दिवसच असेल आणि खगोल २४ तासांत डोक्यावर एक प्रदक्षिणा करीत असल्यामुळे सूर्यही आपली क्षितिजप्रदक्षिणा २४ तासांत पुरी करील. ध्रुवावरून पहाणाराला सहा महिन्याच्या दीर्घ रात्रीत किंवा

दिवसा तारांची किंवा सूर्याची दर चोवीस तासांनी होणारी एक प्रदक्षिणा ह्मणजे आपल्या दिवसाप्रमाणे काल मोजण्याचे एक साधन होईल. एखाद्या झाडाची किंवा दुसऱ्या कोणत्यातरी वस्तूची खूण धरून ध्रुवावर सूर्य, चंद्र तारा, व उषा यांच्या दर चोवीस तासांनी होणाऱ्या प्रदक्षिणा मोजतां येतील. अशा प्रकारे सूर्याच्या सुमारे १८० प्रदक्षिणा ( ही नक्की संख्या पूर्व प्रकरणांत सांगितलेल्या उन्हाळा व हिंवाळा यांच्या अवधीवर अवलंबून राहील. ) झाल्या ह्मणजे तो पुन्हा क्षितिजाखाली उतरेल व ज्या तारा आजपर्यंत सूर्यप्रकाशांत लोपून गेल्या होत्या त्या सर्व आतां एकदम दिसू लागतील; आपल्या इकडीलप्रमाणे एका मागून एक अशा उगवणार नाहीत. ज्या सूर्यप्रकाशाने त्यांस लोपून टाकिले होतें तो नाहीसा झाल्याबरोबर तारास्वचित असें सर्व उत्तर गोलार्ध एकदम दृश्यमान होऊन पहाणाराच्या डोक्यावर सारखे सहा महिने छत्राकार फिरत राहील. याप्रमाणे खगोलाचे क्षितिजसमान्तर असे सतत भ्रमण, वर्षातून एकच सकाळ व एकच संध्याकाळ, तसेच एकच सहा महिन्याचा दिवस व सहा महिन्यांची रात्र, या उत्तरध्रुवावरील कालादर्शातील मुख्य मुख्य विशिष्ट गोष्टी आहेत.

ध्रुवावर रहाणाराला एक रात्र सहा महिन्यांची असेल असे वर सांगितले, यावरून तेथे अर्धे वर्षभर सारखा काळोख असेल, असे वाटणे सहाजिक आहे. सहा महिन्याएवढ्या मोठ्या रात्रीत येणाऱ्या संकटांची व अडचणीची कल्पना मनात आल्याबरोबर काय हा भयंकर प्रसंग असे एखाद्यास सहज वाटेल. एवढ्या मोठ्या रात्रींत उजेड नाहीं तर नाहीच पण सूर्यापासून मिळणारी उष्णताही त्यावेळी नसल्यामुळे या दोन्ही गोष्टी कृत्रिम साधनांनी उत्पन्न करावयाच्या ह्मणजे केवढा खटाटोप केला पाहिजे ! पण खरोखर पाहिले असता ही कल्पना चुकीची आहे. या दीर्घ रात्री अंधकाराचा बराच परिहार करणारी पहिली गोष्ट ह्मणजे " उत्तरारुण " नांवाचा एक प्रकारचा रम्य विद्युत्प्रकाश हा आहे. चंद्रही तेथे महिन्यांतून पंधरा दिवस क्षितिजावर असून तेथून पहाणारास आपल्या बदलणाऱ्या निरनिराळ्या कला सारख्या दाखवीत राहील. परंतु ध्रुवावरील दीर्घ रात्रीच्या काळोखाचे भय नाहीसे करणारी याहूनही मोठी गोष्ट ह्मटली ह्मणजे सूर्य मावळल्यावर व उगवण्यापूर्वी पडणारा दोन वेळचा संधिप्रकाश होय.

आपल्यां इकडे ह्मणजे उष्ण व समशीतोष्ण कटिबंधांत, हा संधिप्रकाश मग तो सकाळचा असो वा सध्याकाळचा असो, फार तर तास दोन तास असतो. परंतु ध्रुवाजवळची स्थिति याहून फार निराळी आहे. तेथें वर्षांतून एकदांच येणारा दिवस व तशीच रात्र यांच्या मधला प्रत्येक वेळचा सधि प्रकाश पुष्कळ दिवस दिसत असतो. मात्र तो नक्की किती दिवस असतो हे अद्यापि निश्चितपणे माहीत झाले नाही. कांहींच्या मते तो ४५ दिवस दिसत असतो, पण दुसरे ह्मणतात तो पुरे दोन महिने रहातो. उष्ण कटिबंधामध्ये सूर्य सुमारे १६ अंश क्षितिजाच्या खालीं असतांनांच त्याचे किरण प्रथम दिसू लागतात. परतु उन्नत अक्षांशांच्या ठिकाणी सूर्य १८ किंवा २० अंशही क्षितिजाखाली असतांनां ते दिसू लागतात असें ह्मणतात. ही दुसरी मर्यादा बहुधा ध्रुवाजवळील प्रदेशाला लागू असावी; आणि तशी असेल तर तेथे संधिप्रकाशही दोन महिने सारखा राहील. डॉ. वॉरनने आपल्या ग्रथामध्ये कॅप्टन पिमने केलेले ध्रुवावरील वर्षाचे वर्णन दिले आहे ते असें:—

“ मार्चाच्या सोळाव्या तारखेला तेथे सूर्य उगवतो. त्याच्या पूर्वी ४७ दिवस ह्मणजे जानेवारीच्या २९ तारखेपासून अरुणप्रकाश दिसत असतो. पुढे सप्टंबरच्या २५ तारखेला सूर्य मावळतो व त्यानतर ४८ दिवस ह्मणजे नवबरच्या १३ तारखेपर्यंत सधिप्रकाश असतो. यापुढे मात्र सूर्य व अरुणप्रकाश हे दोन्ही नाहीसे झाल्यामुळे होणारा काळोख ७६ दिवस असतो; आणि मग पुनः अरुणप्रकाश होऊन सूर्य उगवतो तो १९४ दिवस क्षितिजावर असतो. ह्मणजे ध्रुवावरचे वर्ष ह्मणजे १९४ दिवस सूर्यप्रकाश, ४८ दिवस संध्याप्रकाश, पुढे ७६ दिवस काळोख आणि नंतर ४७ दिवस अरुणप्रकाश, असे असते. ”

परतु इतर कांहीं विद्वान या सध्याप्रकाशाचा किंवा अरुणप्रकाशाचा अवधि वाढवून पूर्ण काळोखाचा अवधि कमी करतात ह्मणजे ७६ दिवसांवरून ६० दिवसांवर ह्मणजे फक्त दोन महिन्यांवर तो आणतात. आतां यांपैकीं कोणती गोष्ट खरी हे ठरवावयाचें तर प्रत्यक्ष ध्रुवावर जाऊन अनुभव घेतला पाहिजे. संधिप्रकाशाचे अवधीचें मान किरणांचें वक्रीभवन व परावर्तन करण्याच्या वातावरणाच्या शक्तीवर अवलंबून आहे; व ही शक्ती हवामान इत्यादि कारणांमुळें निरनिराळी असते. ध्रुवावरची सध्याची

हवा फार थंड आहे. पण हिमान्तरकालामध्यें ती सौम्य होती; व या एकाही कारणामुळें हिमान्तरकालांतील तेथच्या संधिप्रकाशाच्या अवधीचे मान बदलेल. पण याचे कारण कांहीं असलें तरी एवढें खरे कीं, ध्रुवावर वर्षांतून दोनच वेळां दिसणारा हा संधिप्रकाश बरेच दिवस रहातो. कारण सूर्य क्षितिजाखालीं असतांनां दिसूं लागण्याची त्याची कमीत कमी मर्यादा जी १६ अंश ती धरिली तरीही एवढे अंतर तोडून क्षितिजावर यावयास त्यास एका महिन्याहून कांहीं तरी जास्त वेळ लागेल; आणि एवढा वेळ तेथे सारखा अरुणप्रकाश पडेल. म्हणजे हे मोठमोठे अरुणप्रकाश व संध्याप्रकाश ध्रुवावरील रात्रीच्या काळोखाचा बराच भाग कमी करून तिला जवळ जवळ दोन किंवा फार तर अडीच महिन्यांची करून टाकतील. ह्मणून ध्रुवावरील अर्धवार्षिक रात्र ह्मणजे त्या प्रदेशाला रहावयास अयोग्य करून टाकणारा असा सारख्या अंधकाराचा काळ असें मानणें केवळ चुकीचे होईल. इतकेंच नव्हे तर उलट तेथील ताऱ्यांप्रमाणेंच दिसत असे तोपर्यंत क्षितिजासभोंवार सारख्या प्रदक्षिणा करीत रहाणाऱ्या एवढ्या दीर्घ उषेचा अद्भुत मौजेचा देखावा पहाण्याचा अधिकार एकट्या ध्रुवस्थ लोकांनाच मिळालेला आहे; इतरांना तो मिळणे नाहीं.

उष्ण किंवा समशीतोष्ण कटिबंधांतील उषाप्रकाश थोडका वेळ टिकणारा असून तो दर चोवीस तासांनी पुनः पुनः येत असतो. तरी देखील कवींनां कविता करावयास तो एक विषय होऊन राहिला आहे. मग ज्या ठिकाणीं तो दोन महिन्यांच्या काळोखानंतर येऊन, आला ह्मणजे वर सांगितलेले मजेचे प्रकार करीत दीड महिना तरी रहातो, त्या ध्रुवनिवासी जनांनां त्याच्या आगमनापासून किती आनंद व मजा वाटत असेल व त्याची ते किती उत्सुकतेनें मार्गप्रतीक्षा करीत असतील याचे वर्णन करण्यापेक्षां कल्पनाच करणे बरें. हा दीर्घ उषःप्रकाश ह्मणजे ध्रुवविशिष्ट गोष्टीपैकीं एक मुख्य गोष्ट आहे. त्याचे फार मजेचे वर्णन डॉ. वॉरन याने आपल्या "नंदनवनोपलब्धि" नांवाच्या पुस्तकांत केले आहे. या अवर्णनीय शोभेच्या उषेसंबंधाने तो लिहितो:—

"प्रथमारंभीं ईषद्दृश्यमान असा एक तेजाचा पुंज रात्रौ खगोलाच्या अधोभागीं क्षितिजाजवळ दिसूं लागतो. आरंभीं अन्य तारकांच्या तेजास

अमळसें लोपवून व नंतर क्रमाक्रमाने वाढत जाऊन तो अद्यापि काळ्या कुट्ट असलेल्या क्षितिजाला जरा तिरकस अशा वर्तुळांमध्यें प्रदक्षिणा करूं लागतो. साठ घटिकांनी एक प्रदक्षिणा पुरी करून पुनरपि तो पूर्वस्थानी येतो आणि आणखीही कित्येक तारांनां अगदी निस्तेज करून सोडतो. थोडयाच वेळांत हा विस्तीर्यमाण तेजोगोल ‘प्राच्य मौक्तिका’च्या प्रभेने देदीप्यमान होत्साता आपल्या थाटाच्या प्रदक्षिणा करीत असतांनां त्याचा मौक्तिकश्वेतिमा अधिकाधिक उज्वल होत होत नील आणि पीत वर्णांनी खचित होऊन शेवटीं आरक्त होतो. दिवसे दिवस हा उज्वल तेजाचा पुंज प्रदक्षिणा करीत राहून वातावरण व अभ्रें यांची प्रकाश परावर्तनास अनुकूलता किंवा प्रतिकूलता असेल त्याप्रमाणे प्रज्ज्वलित किंवा निस्तेज होतो; आणि निस्तेज झाला तरी पुनरपि अधिकच प्रज्वलित होतो. हा त्याचा क्रम अद्यापि लुप्तप्राय असलेला सविता आपल्या उदयगिरीच्या शिखरावर येईपर्यंत चालतो. सरतेशेवटी जेव्हां दोन महिनेपर्यंत असल्या अद्भुत देखाव्यांनी अंतरिक्ष भरून गेले असते तेव्हां तेजोनिधि सविता दीर्घकालाने आपल्या विश्रामस्थानांतून वर येऊं लागून पुनरपि मनुष्यदृष्टीस गोचर होतो. आरंभीं अर्धवर्तुलांकित असलेलें त्याचें मंडळ एक दोन प्रदक्षिणांनन्तर पूर्ण होत्साते अति दूरच्या गिरि-शिखरांस देखील प्रसन्न करिते आणि मग सहा महिनेपर्यन्त आपल्या प्रिय अशा ध्रुवभूला रात्रीचें वारेही न लागू देतां तो विश्वाच्या अक्षाभोंवती पूर्णबिंब होत्साता चक्राकार भ्रमण करीत रहातो. सरतेशेवटीं दृष्टीआड झाल्यावर सुद्धां तो आपल्यामागे क्रमाने प्रज्वलित व निस्तेज होणारा संधिप्रकाश ठेऊन जातो, आणि अशा रीतीने वियोगदुःखित होणाऱ्या पृथ्वीला आपल्या शीघ्र पुनरागमनाविषयीं अभिवचन देतांना जणूं काय खुणाच करीत आहे असे दर्शवितो.”

असो. तर अशा प्रकारच्या अद्‌भुत देखाव्याचा परिणाम ध्रुवस्थ प्रेक्ष-काच्या स्मृतीवर कायमचा झाल्याशिवाय रहाणारच नाही; आणि पुढे आपणांस असें दिसून येईल कीं, आर्यलोकांच्या अति प्राचीन कथांमध्यें, त्यांच्या पूर्वजांनीं आपल्या मूलस्थानांमध्यें पाहिलेल्या या अद्‌भुत चमत्का-राची ह्मणजे क्षितिजावर कित्येक दिवसपर्यन्त सारख्या तिरकस प्रदक्षिणा करणाऱ्या दीर्घ उषेची स्मृति राहिलेली आहे.

उत्तरध्रुवावरील ह्मणजे भूगोलाच्या अक्षाच्या उत्तर टोंकावरील विशिष्ट गोष्टी या अशा आहेत. परंतु उत्तरध्रुव हा केवळ एक बिंदु असल्यामुळें ध्रौविक वसतिस्थान ह्मणजे एक बिंदु न मानितां ध्रुवाभोंवतालचाही बराच प्रदेश समजला पाहिजे; ह्मणून या बिंदूच्या कमीजास्त दक्षिणेस ज्याप्रमाणे प्रेक्षक असेल त्याप्रमाणें वर सांगितलेल्या विशिष्ट गोष्टींमध्यें काय काय फेरफार होतील हें आतां आपल्याला पाहिलें पाहिजे.

पूर्वी सांगितलेंच आहे कीं ध्रुवावर रहाणाराच्या डोक्यावर फक्त एकच खगोलार्ध छत्रीसारखे फिरते असे दिसतें, आणि त्यांतील सर्व ताराही कधी उगवत किंवा मावळत नसून, त्या सर्व बरोबरच क्षितिजसमान्तर पातळ्यांतून फिरत असतात. परंतु जसे जसे ध्रुवबिंदूच्या खालीं खाली यावे, तसे तसे पहाणाराचे खस्वस्तिक ध्रुवतारेशी न रहातां तिच्या दक्षिणेस येऊ लागेल; व मग त्याचे क्षितिजही खगोलविषुवापाशीं न रहातां त्याच्या दक्षिणेस जाऊं लागेल. उदाहरणार्थ, बाजूस दिलेल्या आकृतीत **ख** हे पहाणाराचे खस्वस्तिक आणि **ध** हा खगोलाचा उत्तरध्रुव आहे. पहाणारा, जेव्हां पृथ्वीच्या ध्रुवावर होता तेव्हां त्याचे खस्वस्तिक **ध** हे आणि क्षितिज म्हणजे खगोलाचे विषुव असे होते, व त्यामुळे **व ध वा** या खगोलार्धातील सर्व तारा त्याच्या डोक्याभोंवती क्षितिजसमान्तर वर्तुळांत फिरत




होत्या. परंतु आतां ते खस्वस्तिक **ख** जवळ आल्यामुळे ती स्थिति बदलली. कारण, आतांही खगोल पूर्वीप्रमाणेच **ध म धा** या आंसाभोंवती फिरणार, **ख म खा** याभोंवती नाहीं. पहाणारा उत्तरध्रुवावर असतांना या दोन्ही रेषा एकच होत्या म्हणून तारांनीं भूगोलाच्या ध्रुवाभोंवतीं प्रदक्षिणा केल्या कीं, त्या खस्वस्तिकरेषेभोंवतींही साहजिक होत. परंतु खस्वस्तिक आकृतीत

दाखविल्याप्रमाणें **ध** पासून **ख** जवळ आलें म्हणजे पहाणाराचें क्षितिजही **क्ष क्षा** हे होईल; आणि म्हणून तारा आतां क्षितिजाला तिरकस फिरूं लागतील. बाजूस दिलेल्या आकृतीत **अ आ, क का, च चा,** या जाड रेषांनी दर्शविल्याप्रमाणे त्या फिरतात असे दिसेल. **क ध क्षा** एवढ्या भागांतील तारा सर्व रात्रभर दिसतील; कारण त्यांचे प्रदक्षिणामार्ग **क्ष चा का क्षा** या क्षितिजावर असणार. परतु ज्या तारांची उत्तरक्रान्ति **क व** पेक्षां कमी आहे, त्या सर्व रोज कांही वेळ क्षितिजावर असून कांही वेळ खाली असतील. उदाहरणार्थ, **च** जवळच्या तारांच्या प्रदक्षिणेचा थोडासा भागच **क्ष क्षा** या क्षितिजावर असेल. तात्पर्य, ध्रुवावरून पहाणाऱ्याला दिसणाऱ्या आकाशाहून **ख** हे खस्वस्तिक असलेल्या मनुष्याला दिसणारे आकाश निराळ्या प्रकारचे असेल. तारा क्षितिजाला समान्तर अशा न फिरतां तिरक्या फिरतील. त्यांपैकीं ध्रुवापासून कांही एक अंतरावरील तारा नेहमीं क्षितिजावर ध्रुवाभोवती फिरतांनां दिसतील; परतु इतर आपल्या इकडीलप्रमाणेच उगवून मावळून तिरक्या फिरतांनां दिसतील. खस्वस्तिक अगदी बहुतेक **ध** जवळ असल्यास अशा उगवून मावळणाऱ्या तारा फार थोड्या असतील व त्यांमधला फरकही चटकन लक्षांत येण्यासारखा नसेल. परंतु जसा जसा **ख** बिंदु दक्षिणेस येईल तसा तसा हा फरक विशेष दिसूं लागेल.




ध्रुवबिंदूच्या खाली दक्षिणेस रहाणाऱ्या माणसांच्या दिनमानांत व रात्रिमानांतसुद्धां अशा प्रकारचे फेरबदल होतील. बाजूच्या आकृतीवरून ही गोष्ट स्पष्ट रीतीने कळेल. **ध** हा खगोलाचा उत्तरध्रुव आणि **व वा** हें हे त्याचे विषुववृत्त आहे. सूर्य **क का** या क्रान्तिवृत्तांतून फिरत असल्यामुळे व या वृत्ताचा विषुव-

वृत्ताशीं सुमारें २३$\frac{1}{2}^\circ$ [ बरोबर २३° २८′ ] कोन असल्यामुळें आ क आणि का अ ही वृत्तें पृथ्वीवरील अयनवृत्तांशीं समान होतील; आणि उ म हें वृत्त पृथ्वीच्या उत्तरवृत्ताशीं सदृश होईल. सूर्य क का या क्रान्तिवृत्तांतून फिरत असल्यामुळें तो दर वर्षी, अयनवृत्तांच्या आंत रहाणाऱ्या माणसांच्या डोक्यावर दोन वेळां येईल; एकदां का पासून क पर्यन्त येतांनां व पुनः क पासून का पर्यन्त येतांनां. तेथें कांहीं वेळ सूर्य पहाणाऱ्याच्या खस्वस्तिकाच्या उत्तरेसही असेल, व वर्षाच्या बाकीच्या वेळांत दक्षिणेस असेल. सूर्य विषुववृत्ताच्या उत्तरेस २३$\frac{1}{2}^\circ$ पेक्षां जास्त कधींही येत नसल्यामुळे आ क या वृत्ताच्या उत्तरेस खस्वस्तिक असलेल्या मनुष्याला तो नेहमीं खस्वस्तिकाच्या दक्षिणेस दिसेल; आणि जसें जसें ध्रुवाकडे जावे, तसे तसे हें सूर्याचे खस्वस्तिकापासून दक्षिण अंतर वाढत जाईल. तरीपण आ क आणि उ म या वृत्तांमध्ये खस्वस्तिक असलेल्या माणसांनां वर्षातील प्रत्येक दिवशीं निदान कांहीं तास तरी सूर्य क्षितिजाखालीं गेलेला दिसेल. उदाहरणार्थ म हें एकाचें खस्वस्तिक आहे असें समजूं. आकृतींत दाखविल्याप्रमाणे म हा समशीतोष्ण कटिबंधांतील उत्तरेकडचा शेवटचा अक्षांश आहे. आतां येथील क्षितिज मच्या दोन्ही बाजूंनां ९०° वर ह्मणजे आ म अ हें होईल; आणि सूर्य का क या क्रान्तिवृत्तांतून फिरतांनां रोज कांही वेळ तरी क्षितिजावर दिसेल. परंतु याहून उत्तरेकडे शीतकटिबंधांत गेलें असतां तेथें सूर्य वर्षांतून कित्येक दिवस सारखा क्षितिजाखाली राहिलेला दिसेल, आणि हा काल जसें जसें उत्तरेकडे जावें तसा तसा वाढत जाऊन शेवटी ध्रुवाजवळ सहा महिन्यांचा होईल. तात्पर्य रात्रिमान ध्रुवावर सहा महिन्यांचें असून जसें जसें दक्षिणेकडे जावें तसें तसें तें कमी होऊन, समशीतोष्ण कटिबंधांत आल्यावर सूर्य रोज कांहीं वेळ तरी क्षितिजावर असल्यामुळें तें चोवीस तासांहून कांहींतरी कमी होईल. आतां पहाणाराचें खस्वस्तिक ख हें शीतकटिबंधांत आहे असें समजूं; ह्मणजे त्याचें क्षितिज क्षा क्ष हें होईल; आणि सूर्य वर्षांतून कित्येक दिवस सारखा या क्षितिजाखालीं असेल. उदाहरणार्थ, सूर्य ग पाशी आहे अशी जर कल्पना केली, तर त्याच्या रोजच्या प्रदक्षिणेचा मार्ग ग क्ष हा होईल; हें सर्व वर्तुळ ख हें खस्वस्तिक असलेल्या ठिकाणाच्या क्षितिजाखाली आहे. अर्थातच ख हें खस्वस्तिक

असलेल्या प्रेक्षकाला सूर्य **ग** पासून **का** पर्यंत आणि पुनः **का** पासून **ग** पर्यंत येतांनां मुळीच दिसणार नाही. सूर्य सारखा क्षितिजाखालीं असणाऱ्या या दिवसांच्या जोडीला तो उत्तरेस आला असतां सारखा क्षितिजावर दिसण्याचे तितकेच दिवस असतात. उदाहरणार्थ सूर्य **द** जवळ आहे असें समजल्यास त्याचा दैनिक प्रदक्षिणेचा मार्ग द **क्षा** हा सर्व **क्ष क्षा** या क्षितिजाच्या वर असेल; आणि सूर्य **द** पासून **क** पर्यन्त आणि पुनः **क** पासून **द** पर्यन्त जातांना तो तसाच नेहमी वर असेल. या वेळामध्ये सूर्य उगवणार नाही आणि मावळणारही नाहीं, तर पहाणाराच्या डोक्यावर ध्रुवाभोंवतालच्या तारांप्रमाणे चक्राकार पण तिरक्या फेऱ्या करीत राहील. परंतु **ग** पासून **द** पर्यन्त आणि कांही दिवसांनी पुनरपि **द** पासून **ग** पर्यन्त सूर्य असतांनां तो रोज कांही वेळ तरी क्षितिजावर दिसेल व बाकी वेळ क्षितिजाखाली जाईल; ह्मणजे तेव्हां आपल्या इकडीलप्रमाणें चोवीस तासांचा अहोरात्रें होतील. मात्र उत्तर गोलार्धांत सूर्य असतांनां रात्रीपेक्षां दिवस मोठा असेल व सूर्य दक्षिण गोलार्धात असतांनां दिवसापेक्षां रात्र मोठी असेल. ह्मणजे उत्तरध्रुवापासून थोड्याशा अंतरावर शीतकटिबंधांत रहाणाऱ्या लोकांचे वर्ष, खुद्द ध्रुवस्थ लोकांप्रमाणे सहासहा महिन्यांच्या रात्रिदिवसांचे न होतां थोड्या निराळ्या प्रकारचे होऊन त्यांत, एक कांहीं महिन्यांचा मोठा दिवस, पुढे आपल्या इकडीलप्रमाणे कांही अहोरात्रे, नंतर मोठ्या दिवसाएवढीच एक मोठी रात्र आणि पुनः मागच्या इतकीच कांही अहोरात्रे अशी होतील. यांपैकी मोठा दिवस व मोठी रात्र ही सहा महिन्यांपेक्षां नेहमी कांही तरी कमी असतील. मोठा दिवस व मोठी रात्र ही वर्षाची दोन विरुद्ध दिशांची अग्रे असून, मोठ्या दिवसाचा मध्य सूर्य उदगयनाच्या शेवटच्या बिंदूशी असतांनां होईल व रात्रीचा मध्य तो दक्षिणायनाच्या शेवटच्या बिंदूशी असतांनां होईल. हा त्रिप्रकार संवत्सरविभाग आपल्याला विशेष महत्वाचा आहे. करितां एक उदाहरण घेऊन तो विशेष स्पष्ट करूं. कल्पना करा कीं, एक मनुष्य ध्रुवबिंदूच्या इतका दक्षिणेस आहे कीं त्याची दीर्घ रात्र फक्त दोन महिन्यांची आहे; ह्मणजे त्या ठिकाणीं सूर्य वर्षांतून सहा महिने क्षितिजाखालीं नसून फक्त दोनच महिने असतो. या रात्रीचा मध्यकाल ह्मणजे दक्षिणायनदिवस (ह्मणजे सायन मकरसंक्रमणदिवस) असल्यामुळें ही रात्र दिसेंबरच्या

२१ तारखेच्या ह्मणजे दक्षिणायनदिनाच्या पुढें व मागें एक एक महिना असते, असें ह्मणावयास हरकत नाहीं. या दीर्घरात्रीप्रमाणेंच दोन महि-न्यांचा एक दीर्घ दिवस, जून महिन्याच्या एकविसाव्या तारखेच्या ह्मणजे उत्तरायणदिनाच्या पुढे व मागें एक एक महिना असा असेल. आतां वर्षांतून हे चार महिने कमी केले ह्मणजे उरलेल्या आठ महिन्यांत समशीतोष्ण कटिबंधांतल्याप्रमाणें, चोवीस तासांनीं दिवस रात्र एकामागून एक येत जातील. जानेवारीच्या शेवटच्या आठवड्यांत दीर्घ रात्र सपली ह्मणजे हीं अशी चोवीस तासांची अहोरात्रें सुरू होतील; आणि आरंभीं दिवसापेक्षां रात्र बरीच मोठी असेल. परंतु सूर्य दक्षिणेकडून हळू हळू उत्तर गोलार्धांत गेला ह्मणजे रात्रीपेक्षां दिवस थोडा थोडा मोठा होऊं लागून शेवटीं मे महिन्याच्या सुमारास तो सारखा दोन महिन्यांचा होईल. पुढे जुलै मध्यें हा दीर्घ दिवस संपून पुनः पूर्वीप्रमाणें चोवीस तासांचीं अहोरात्रे सुरू होतील, व आरंभीं आरंभी दिवस रात्रीपेक्षां मोठा असून सूर्य पुनः दक्षिण गोलार्धांत आल्यावर रात्र दिवसापेक्षां मोठी व्हावयास लागून नोव्हेंबरच्या सुमारास पूर्वी सांगितल्याप्रमाणें ती दोन महिन्यांची होईल. हीच गोष्ट थोड्या बहुत फरकानें ज्या ठिकाणी दीर्घ रात्र व दीर्घ दिवस हीं तीन चार किंवा पांच महिन्यांचीं असतात, तेथेंही लागू पडेल; आणि अगदी ध्रुवावर गेले असतां ती दोन्ही सहा सहा महिन्यांची होऊन मधली चोवीस तासांची अहोरात्रें अजिबात नाहींशी होतील.*

---

* या विषयीं भास्कराचार्यकृत सिद्धांतशिरोमणि, गोलाध्याय, अध्याय ७ श्लोक ६—७ पहा. ते असे:—

सदा समत्वं द्युनिशोर्निरक्षे नोन्मंडलं तत्र कुजाद्यतोऽन्यत् ।
षट्षष्टिभागाभ्यधिकाः पलांशा यत्राथ तत्रास्त्यपरो विशेषः ॥ ६ ॥
लंबाधिका क्रान्ति रुदक्च यावत् तावद्दिनं संततमेव तत्र ।
यावच्च याम्या सततं तमिस्रा ततश्च मेरौ सततं समार्धम् ॥ ७ ॥

" विषुववृत्तस्थ प्रदेशांत क्षितिज व उन्मंडल हीं एकच असल्यामुळें तेथें रात्रि व दिवस हीं समान असतात. परंतु ज्या ठिकाणीं उत्तर अक्षांश ६६° हून जास्त असतात तेथें एक विशेष गोष्ट घडते; ती ही कीं, त्या स्थळाचे लंबांशाहून सूर्याची उत्तर क्रान्ति जोंपर्यंत अधिक असते तों

दोन महिन्यांची दीर्घ उषा ही ध्रुवावर दिसणारी विशेष महत्वाची गोष्ट आहे हें आपण पूर्वी पाहिलेंच आहे. ध्रुवापासून जसजसें खालीं दक्षिणेस यावें तशी तशी त्या उषेची शोभा व अवधि हीं कमी कमी होऊं लागतात. तरी पण तेथेंही दोन, तीन, किंवा त्याहूनही अधिक महिन्यांच्या दीर्घ रात्रीच्या अन्तीं येणारी उषा नेहमींच्या रात्रीच्या शेवटीं येणाऱ्या उषेहून किती तरी मोठी असते, ह्मणजे ती कित्येक दिवसांचीही असते. ही दीर्घ रात्र संपण्याच्या सुमारास पूर्वी सांगितल्याप्रमाणें प्रथमतः एक जरासें अस्पष्ट तेज दिसूं लागेल, आणि पहाणारा जर ध्रुवाच्या बराच जवळ असेल तर त्याला ती उषा क्षितिजावर कित्येक दिवस सारखी फिरतांनां दिसून, शेवटीं सूर्यबिंब वर येईल आणि मग रात्रिदिवसाचे ( चोवीस तासांच्या अहोरात्रांचे ) पर्याय सुरू होऊन पुन्हा कांही दिवसांनी दीर्घ दिवस येईल. उदीचीन अरुणाचेंही तेज खुद्द ध्रुवापेक्षां त्याच्या खालच्या दक्षिणेकडील प्रदेशांत कमी कमीच दिसेल.

आतांपर्यंत सांगितलेल्या उत्तर प्रदेशांतील विशिष्ट गोष्टी ध्रुवबिंदूवरील विशिष्ट गोष्टींहून जरी भिन्न आहेत, तरी आपल्याला प्रस्तुत उष्ण किंवा समशीतोष्ण कटिबंधांत दिसणाऱ्या गोष्टींहूनही त्या तितक्याच भिन्न आहेत. आपल्याला वर्षांतल्या प्रत्येक दिवशीं सूर्य कांहीं वेळ तरी क्षितिजावर दिसतोच. परंतु उत्तरवृत्तान्तर्गत माणसांनां तो कित्येक दिवस तरी

---

पर्यंत तेथें सतत दिवसच असतो, आणि लंबांशाहून दक्षिण क्रान्ति अधिक असते तोंपर्यंत तेथें सतत रात्र असते, व ह्मणूनच ध्रुवावर सारखी सहा महिने रात्र व सहा महिने दिवस अशीं असतात." आतां एखाद्या ठिकाणचे अक्षांश ७०° असतील, तर तेथचे लंबांश ९०°—७०° = २०° झाले. सूर्य विषुववृत्ताच्या उत्तरेस कधींही २३½° हून जास्त येत नसल्यामुळें त्याची उत्तरक्रान्ति २३½° हून कमी व २०° हून जास्त आहे तो पर्यंत तेथें सारखा दिवसच असेल, आणि सूर्य दक्षिण गोलार्धांत गेल्यावर त्या दिवसा एवढीच एक रात्र होईल. यूरोपाचें अगदीं उत्तर टोंक जें नार्डकिन किंवा उत्तर भूशिर त्या ठिकाणीं ( उत्तर अक्षांश ७१° ६′ ५०″ ) दीर्घ रात्र १८ नोव्हेंबरला सुरू होऊन २४ जानेवारीला संपते, ह्मणजे तेथें एकंदर ६७ दिवस सारखी रात्र असते असें ह्मणतात.

सारखा क्षितिजाखाली असल्यामुळें तितके दिवस मुळींच दिसत नाहीं. हा अखंड दीर्घ रात्रीचा वेळ जर आपण हिशेबांत घेतला नाहीं, तर ध्रुवप्रदेशांतील वर्ष ह्मणजे सूर्यप्रकाशयुक्त काल, सहापासून अकरा महिने- पर्यंत असतो असें ह्मणावयास हरकत नाहीं. शिवाय उष्ण व सम- शीतोष्ण कटिबंधांत उषा फार थोडा वेळ असते; कारण रात्र व दिवस मिळून चोवीस तासांहून कधीही अधिक होत नसल्यामुळें अर्थातच त्यांमध्यें येणारी उषा फार तर दोन तीन तासांची असते; याहून कधीं जास्त असत नाहीं. परंतु ध्रुवावरची वर्षांतून एकदांच येणारी उषा व ध्रुवाजवळच्या प्रदेशांतील दीर्घ रात्रीच्या शेवटी येणारी उषा या दोन्ही कित्येक दिवसपर्यन्त अखंड रहातात. आपल्या इकडे हिंवाळा उन्हाळा वगैरे ऋतु होतात; परतु ध्रुवप्रदेशांत हिंवाळ्यांत अखंड दीर्घ रात्र असते, आणि उन्हाळ्यामध्यें प्रथम दिवसापेक्षां रात्र मोठी असून चोवीस तासांपेक्षां कमी असते, आणि पुढें दिवस हळू हळू मोठा होत जाऊन शेवटीं त्याचा अखंड दीर्घ दिवस होतो. प्रस्तुत ध्रुवावरील हवा अतिशय थंड व कडक आहे. पण प्राचीन काळीं ती प्रस्तुतहून फार भिन्न होती याविषयीं मागील भागांत विवेचन झालेंच आहे. ह्मणून या भेदाभेदविवेचनांत हवेचा विचार करण्याचें कारण नाहीं.

येथपर्यन्त केलेल्या विवेचनावरून आपल्याला असें आढळून येईल की, या विशिष्ट गोष्टींचे दोन पृथक् जोड आहेत. एक खुद्द ध्रुवस्थ लोकांस दिसणारा व दुसरा ध्रुव व उत्तरवृत्त यांच्यामध्यें रहाणाऱ्या लोकांस दिसणारा. सोयीसाठीं या दोन जोडांस ध्रुवविशिष्ट गोष्टी व ध्रुवमं- डळविशिष्ट गोष्टी अशीं अनुक्रमें नावे देऊन त्यांचा थोडक्यांत सारांश देऊं.

## १ ध्रुवविशिष्ट गोष्टी.

(१). सूर्य दक्षिणेस उगवतो.

(२). तारा उगवत किंवा मावळत नाहींत; तर क्षितिजसमान्तर पातळ्यांत त्या वाटोळ्या फिरून चोवीस तासांत एक प्रदक्षिणा पुरी करतात. या ठिकाणीं उत्तर खगोलार्ध मात्र नेहमीं क्षितिजावर असून सबंद वर्षभर दिसत असतें, परंतु खालचें ह्मणजे दक्षिण खगोलार्ध कधींही दिसत नाहीं.

(३) सहा महिन्यांचा एक अखंड दिवस व तितकीच एक अखंड रात्र मिळून तेथलें एक वर्ष होतें.

(४). तेथें वर्षांतून एकच सकाळ व एकच संध्याकाळ असते, ह्मणजे सूर्य तेथें वर्षांतून एकदांच उगवतो व एकदांच मावळतो. परंतु तेथला संधिप्रकाश--मग तो सकाळचा असो की संध्याकाळचा असो—सारखा दोन महिने, ह्मणजे चोवीस तासांचा एक अवधि अशा ६० अवधीइतका असतो. हा रक्त संध्याप्रकाश आपल्या इकडीलप्रमाणें फक्त पूर्वेस ( सकाळी ) किंवा पश्चिमेस ( संध्याकाळीं ) असा एका ठिकाणीच न दिसतां, क्षितिजावर सारख्या वाटोळ्या प्रदक्षिणा करीत असतो. हा त्याच्या प्रदक्षिणेचा क्रम सूर्यबिंब क्षितिजावर येई तोपर्यंन्त चालू असतो; आणि नन्तर सूर्यही हा क्रम पुढें सहा महिने चालू ठेवतो; ह्मणजे तोही दर चोवीस तासांत एक याप्रमाणे पहाणाऱ्याच्या भोवती प्रदक्षिणा करीत रहातो; आपल्या इकडीलप्रमाणे चोवीस तासांनी उगवत किंवा मावळत नाही.

## १ ध्रुवमंडळविशिष्ट गोष्टी.

(१). सूर्य नेहमी पहाणाऱ्याच्या खस्वस्तिकाच्या दक्षिणेस असेल, परंतु समशीतोष्ण कटिबंधांतही ही गोष्ट प्रत्ययास येत असल्यामुळे तिला विशेष असे मानतां येत नाही.

(२). या ठिकाणीं बऱ्याच तारा नेहमी क्षितिजावर राहून ध्रुवतारे-भोवती प्रदक्षिणा करतात, ह्मणून त्या सतत दिसत असतात. बाकीच्या तारा समशीतोष्ण कटिबंधांतल्याप्रमाणें उगवतात व मावळतात; पण त्यांचे फिरण्याचे मार्ग जास्त तिरके असतात.

(३). येथे वर्षांचे तीन भाग असतातः—(१) एक अखंड दीर्घ रात्र; ही मकर संक्रमणाचे वेळी होऊन विवक्षित ठिकाणच्या अक्षांशाच्या मानाने ती चोवीस तासांहून मोठी व सहा महिन्यांहून लहान अशी असते; (२) या दीर्घ रात्रीचे जोडीला एक अखंड दीर्घ दिवस; हा कर्क संक्रमणाचे वेळी होतो; (३) आणि बाकीच्या वर्षाच्या भागांत साध्या रात्रिदिवसांचें एक चक्र; यांपैकीं रात्रदिवस मिळून होणारा काल चोवीस तासांहून जास्त नसतो. दीर्घ रात्रीच्या मागाहून येणारा दिवस तेव्हांपासून

होणाऱ्या अहोरात्रांतील रात्रीपेक्षां लहान असतो व पुढें तो मोठा होत होत त्याचा वर सांगितलेला दीर्घ दिवस होतो. या दीर्घ दिवसामागून येणारी रात्र, तेव्हांपासून पुनः सुरू होणाऱ्या अहोरात्रांतील दिवसापेक्षां लहान असते, व पुढें मोठी होत होत ती वर सांगितलेल्या दीर्घ रात्रीला मिळण्याच्या वेळी वर्ष संपते.

(४). या दीर्घ रात्रीच्या शेवटीं येणारी उषा कित्येक दिवसपर्यंत सारखी रहाते. परंतु हा तिचा अवधि तसेंच तिचा तेजस्वीपणा हे ठिकठिकाणच्या अक्षांशाच्या मानानें ध्रुवावरील उषेच्यापेक्षां कमी असतात. ध्रुवापासून थोड्याशा अंशापर्यंतच्या प्रदेशांत चक्राकार फिरणाऱ्या उषःकाळच्या तेजाचा देखावा त्याच्या एकदर अवधीपैकीं बराच वेळ दिसत रहातो. पण साध्या अहोरात्रांच्या दरम्यान येणाऱ्या उषा इतर ठिकाणांसारख्याच एक दोन तास मात्र रहातात. अखंड दीर्घ दिवसामध्यें सूर्य क्षितिजावर असतांनां ध्रुवावर फिरतो त्या प्रमाणेच पहाणाराच्या भोंवतीं फिरत असतो; परंतु तेथच्या प्रमाणे त्याच्या प्रदक्षिणा येथें क्षितिजसमान्तर न होतां बऱ्याच तिरक्या होतात. अखंड दीर्घ रात्री तो सारखा क्षितिजाखालीं असल्यामुळें मुळीच दिसत नाहीं; आणि राहिलेल्या संवत्सरभागांत उगवून मावळून चोवीस तासांपैकीं कांहीं वेळ तरी तो क्षितिजावर येतो; हा वेळ अर्थात् अक्षांशाच्या मानानें कमजास्त असतो.

येणेंप्रमाणें आपलेजवळ विशिष्ट गोष्टींचे दोन जोड झाले. एक ध्रुवसंबंधी व दुसरा ध्रुवप्रदेशसंबंधी. या गोष्टी पृथ्वीच्या दुसऱ्या कोणत्याही भागीं दिसावयाच्या नाहींत; शिवाय पृथ्वीचे ध्रुव खरोखरच ध्रुव ( अचल ) असल्यामुळे लाखो वर्षांपूर्वी ते जे होते तेच आजही आहेत, आणि ह्मणून या विशिष्ट गोष्टी सर्व काळांनां लागू पडणाऱ्या आहेत. चतुर्थ युगाच्या पूर्वार्धांत ध्रुवावरील हवेत केवढाले मोटे जरी फरक झाले असले तरी या गोष्टी आज आहेत तशाच तेव्हांही होत्या. थोडक्यांत सांगावयाचें ह्मटलें तर या गोष्टी प्रस्तुत विषयाला लागणाऱ्या वैदिक कथांच्या परीक्षणामध्यें इष्ट स्थानाची बिनचुक वाट दाखविण्याच्या कामीं आपल्या उपयोगी पडतील. या गोष्टींपैकी एखादी गोष्ट आपल्याला वेदांतील वर्णनांत किंवा कथेंत आढळली तर तें वर्णन अथवा

तीं कथा मूळची ध्रुवसंबंधी आहे व वैदिक ऋषींनी जरी ती प्रत्यक्ष पाहिलेली नसली तरी वंशपरंपरागत जशाच्या तशाच आलेल्या दंतकथां-वरून तरी ती त्यांनां माहीत होती असें आपण बेलाशक समजावें. सुदैवानें असल्या प्रकारचे उल्लेख व वाक्ये वैदिक वाङ्मयामध्ये भरपूर आहेत. सोयीसाठीं आपण त्यांचे दोन भाग करूं. पहिल्या भागांत दीर्घ रात्र व दीर्घ उषा यांचे प्रत्यक्ष वर्णन देणारी अथवा त्यांचा स्पष्ट उल्लेख करणारी वाक्ये येतील, आणि दुसऱ्यामध्ये पहिल्यांतील गोष्टीचा अप्रत्यक्ष उल्लेख करून त्यांना बळकटी आणणाऱ्या कथा वगैरे येतील. पहिल्या भागांतील पुरावा प्रत्यक्ष असल्यामुळे अधिक खात्रीलायक आहे, ह्मणून त्याचे प्रथम विवेचन करूं व मग वैदिक कथांच्या विचाराकडे वळूं.



# प्रकरण ४ थें.

## देवांची रात्र.

वैदिक याग--चांद्रसौर कालमानानें त्यांचें नियमन केलें होतें-तैत्तिरीय संहितेतील सहा ऋतूंचें आणि बारा महिन्यांचें वर्ष-अधिकमास-ऋग्वेदांतही हेंच कालमान आढळतें-वैदिक कथांच्या परीक्षणावरून काढिलेलीं सध्याचीं अनुमानें-त्या सर्वांत आर्यांचें मूलवसतिस्थान शीतोष्ण किंवा उष्ण कटिबंधांत होतें अशी पूर्वकल्पना आहे-आणखी शोधांची आवश्यकता-ऋग्वेदाच्या विशिष्ट स्वरूपाचें स्पष्टीकरण-ध्रुवविशिष्ट गोष्टी ऋग्वेदांत सांपडतात-इंद्र आकाशाला अक्षावर तोलून चक्राकार फिरवतो अशी कल्पना-सहा महिन्यांचा दिवस आणि सहा महिन्यांची रात्र-देवांची रात्र व देवांचा दिवस यांचा अवधि प्रत्येकीं अर्धवर्ष आहे-तत्संबंधीं सूर्यसिद्धान्त व इतर प्राचीन सिद्धांतग्रंथ यांत उल्लेख आढळतो-भास्कराचार्यांची चूक व तिचा उलगडा-देवांच्या दिवसारात्रीविषयीं मनूचें वाक्य-त्यांचा यास्कानें केलेला उल्लेख-मेरू ऊर्फ उत्तरध्रुवाचें महाभारतांतील वर्णन-मेरूचें तैत्तिरीय आरण्यकांतील वर्णन-तैत्तिरीय ब्राह्मणांतील देवांच्या दिवसासंबंधाचें वाक्य-तें प्रत्यक्षानुभवावरून लिहिलें असें मानिल्याशिवाय त्याचा उलगडा होत नाहीं-या वाक्याला समनार्थक असें पारशी वंदिदादांतील वाक्य-संदर्भावरून या वाक्यांचा संबंध ध्रुवाशींच असला पाहिजे असें स्पष्ट दिसतें-ऐर्यन वइजो मधील यिमाचा वर-तेथे सूर्य वर्षांतून फक्त एकदांच उगवतो व मावळतो-ऋग्वेदांतील देवयान आणि पितृयाण-त्यांचा संबंधही देवाच्या दिवसरात्रीप्रमाणें संवत्सराच्या प्राचीन विभागाशींच असावा-पारशी धर्मग्रंथांतील मज्दाचा मार्ग ( यान )--पितृयाणांत आलेल्या मरणाचा अशुभपणा-त्यासंबंधानें बादरायण व्यासांचें मत-त्याचा एक शक्य दिसणारा खुलासा-पारशी धर्मग्रंथांतील हिंवाळ्यांत ऊर्फ पितृयाणांत आलेल्या मरणासंबंधानें विचारणा-तीवरून अस्सल काळोखाच्या दीर्घावधि रात्रीचा बोध होतो-ग्रीक कथांतील साम्य-नॉर्स पुराणांतील देवांची उषा-त्यांवरून अर्धवर्षावधि अशा देवांच्या रात्रीदिवसाची कल्पना केवळ हिंदीपारसीक नसून हिंदीजर्मनीय आहे असें अनुमान होते-ही गोष्ट ध्रुवावरील वसतीची स्पष्ट द्योतक आहे.

# देवांची रात्र.



वैदिक वाङ्मयमंदिराच्या द्वारांत पाऊल ठेवतांच तेथें फार व्यवस्थित रीतीनें बसविलेली यज्ञपद्धति आपल्या दृष्टीस पडते. हे यज्ञ चांद्रसौर कालमानांनीं उत्तम रीतीनें नियमित केलेले होते, आणि त्यांवरून वैदिक ऋषींची ज्योतिश्शास्त्रामध्यें बरीच प्रगति झाली होती असें दिसतें. त्या वेळीं दैनिक, पाक्षिक, मासिक, त्रैमासिक, षाण्मासिक व वार्षिक यज्ञ होते व त्यांचा कालमान दाखविण्याकडेही तेव्हां उपयोग होत असे. तैत्तिरीय संहिता व ब्राह्मणें यांमध्यें तीस दिवसांचा चांद्रमास व अशा बारा महिन्यांचें वर्ष यांचा स्पष्ट उल्लेख आहे. चांद्रसौर मानांचा मेळ बसविण्यासाठी एक अधिक महिनाही तेव्हां धरीत असत. क्रान्तिवृत्ताचे ( राशिचक्राचे ) २७ किंवा २८ भाग करून त्यांना नक्षत्रें ह्मणत व सूर्याच्या वार्षिक प्रदक्षिणेच्या मार्गाची तसेंच चंद्राच्या दर महिन्याला पृथ्वीभोवती होणाऱ्या प्रदक्षिणेच्या मार्गाची खूण धरण्यासाठी या नक्षत्रांचा उपयोग करीत असत. वेदकालीन आर्यांस अयनबिन्दु, संपातबिन्दु, तसेंच उत्तरायण व दक्षिणायन यांची चांगली माहिती होती. वर्षाचे सहा ऋतु करून प्रत्येकांतील सणवारांचे दिवसही त्यांनी पक्के निश्चित केलेले होते. सूर्याबरोबर उगवणाऱ्या व मावळणाऱ्या तारांचे ते नीट निरीक्षण करीत. त्या काळाच्या मानाने शक्य तितक्या रीतीने पूर्वपश्चिम बिन्दूही त्यांनीं नक्की केले होते. त्या लोकांना संपताच्या चलनाचीही माहिती होती. संपातचलनाच्या त्यांच्या उल्लेखांवरून वेदांच्या निरनिराळ्या भागांचें वर्गीकरण करणें कसें शक्य आहे याचें विवेचन "वेदकालनिर्णयांत" आलेंच आहे. या वर्गीकरणाप्रमाणें पहातां तैत्तिरीय संहिता कृत्तिकाकालांत ( शकापूर्वी २५०० वर्षे ) घालावी लागते. यावरून कोणाला असें वाटेल की वर दिलेल्या गोष्टींचे ज्ञान वेदकालाच्या उत्तर भागांतील ग्रंथांतच कायतें दिसून येतें. परंतु ऋग्वेदाचें थोडें बहुत निरीक्षण करणारासही त्यामध्यें ३६० दिवसांचें वर्ष, त्यांत कधी कधीं

मिळविण्यांत येणारा अधिमास* किंवा बारा चांद्रमासांचें वर्ष व प्रतिवर्षाच्या शेवटी धरावयाचे बारा अधिक दिवस§ यांचे उल्लेख आढळून येतील. वसंतसंपातापासून शरत्संपातापर्यन्तचा सूर्याचा उत्तरेकडील मार्ग व शरत्संपातापासून वसंतसंपातापर्यन्तचा त्याचा दक्षिणेकडचा मार्ग यांचाही ऋग्वेदांत कित्येक ठिकाणी **देवयान** व **पितृयाण** या नांवांनी उल्लेख केलेला आहे.[1] यावरून ऋग्वेदकालीन कालमापनपद्धति ( पंचांग ) तैत्तिरीय संहिताकालांतील पद्धतीहून तर फारच थोडी भिन्न होती असे दिसून येते. आतां बारा महिन्यांचें वर्ष अथवा वर्षाचे सहा ऋतु अशी पद्धति समशीतोष्ण कटिबंधांत व उष्ण कटिबंधांतच कायती शक्य आहे. ह्मणून वर सांगितलेल्या गोष्टीवरूनच जर पहावयाचे असेल, तर ही पद्धति ज्या लोकांत चालू होती ते लोक समशीतोष्ण किंवा ऊष्ण कटिबंधांत ह्मणजे ज्या ठिकाणी सूर्य वर्षाच्या ३६० दिवसांपैकी प्रत्येक दिवशी थोडा वेळ तरी क्षितिजावर दिसतो अशा ठिकाणी रहात होते असे ह्मटलें पाहिजे. वैदिक कथांचा प्रस्तुत शास्त्रीयपद्धतीनें जो विचार आजपर्यन्त झाला आहे त्यावरूनही याच मताला आधार मिळतो. वृत्र ह्मणजे अवर्षणाची किंवा काळोखाची देवता असें हे गाथाशास्त्री मानितात, आणि कित्येक कथा, प्रकाश आणि काळोख, उन्हाळा व हिंवाळा, दिवस व रात्र यांच्या देवता अथवा इन्द्र व मेघ यामध्ये होणाऱ्या झटापटीच्या बोधक आहेत अशा कल्पनेवर त्यांचा अर्थ लावितात. बगळूरचे नारायण अय्यंगार यांनी असल्या कित्येक कथांचा नाक्षत्रोपपत्तिपर अर्थ लावून, त्या कथांचा कल वैदिक सुधारणेच्या अत्यन्त प्राचीनकाळी वसंतसंपात मृगशीर्ष पुंजांत होता

---

* **वेद मासो धृतव्रतो द्वादश प्रजावतः । वेदा य उपजायते । ऋ० १,२५,८.**

**अर्थः—व्रत धारण करणारा वरुण प्रजायुक्त बारा महिने जाणतो, आणि ( संवत्सरासमीप ) उत्पन्न होणारा मासही जाणतो.**

**§ द्वादश द्यूनगोह्यस्यातिथ्ये रणन्नृभवः ससंतः । ऋ, ४,३३,७,**

**१ वैदिक कालांतील लोकांचें ज्योतिःशास्त्रविषयक ज्ञान किती होतें हें सविस्तर पहावयाचें असेल तर कै. दीक्षितकृत ‘ भारतीय ज्योतिःशास्त्र ’ या पुस्तकाचें ‘ वैदिक काल ’ हें प्रकरण पहावें.**

असे दाखविण्याकडे आहे असें सिद्ध केले आहे. परंतु या सर्व कल्पनांत व अर्थ करण्याच्या पद्धतीत प्राचीन वैदिक आर्य लोक समशीतोष्ण किंवा उष्ण कटिबंधांतच कोठे तरी रहात होते आणि वेदांतील सर्व गोष्टींचा व दंतकथांचा जन्म व त्यांची वाढ अशाच ठिकाणी झाली, असें गृहीत धरलेले आहे.

वैदिक लोकांचें मूलस्थान व त्यांच्या पुराणकथांचें प्राचीनत्व यासंबंधानें, व्युत्पत्तिशास्त्र, गाथाशास्त्र, कालमापनपद्धति इत्यादिकांच्या साहाय्यानें केलेल्या वेदग्रंथांच्या परीक्षणावरून वरीलप्रमाणे माहिती मिळते. परंतु या दिशेनें विचार करणारापुढे साहजिकच असा प्रश्न उभा रहातो की वरील प्रकारच्या शोधांची मजल येथेंच थांबते की काय ? ऋग्वेदांतील सगळ्या देवता, गोष्टी, दंतकथा वगैरे एकाच काळीं उत्पन्न झाल्या असें मानणें चुकीचें आहे हे संपातचलनाच्या उल्लेखांवरून स्पष्ट दिसून येत आहे. ऋग्वेदाची रचना कालक्रमवार केलेली नसल्यामुळे त्यांतील एकामागची एक गोष्ट घेऊन तिचा स्वतंत्र विचार करतां येणे शक्य नाही. प्राचीनकाळाच्या निरनिराळ्या भागांतील गोष्टी त्यांत इतक्या विलक्षण रीतीने एकत्र मिसळून गेलेल्या आहेत की त्यांचा कालानुक्रम लावण्यास किती तरी काळ दीर्घ प्रयास केला पाहिजे. हे काम फार कठीण आहे इतकेंच नव्हे तर कित्येक बाबतींत अशक्यही आहे. तथापि प्रत्येक पिढीनें शक्य तितकी मेहनत करून पुढील पिढीचें ह्या संबंधाचे काम होईल तितके कमी करून ठेविले पाहिजे; व तसें केल्यास कालान्तरानें तरी शास्त्रीय ज्ञानाच्या वाढीबरोबर उत्तरोत्तरच्या पिढ्यांना हें काम अधिकाधिक सुलभ होत जाईल. असो. तर वैदिक कालमापनपद्धतीमध्ये आजपर्यंत जरी ध्रुवाजवळील वसतिस्थानाचा मागमूस आढळला नाही, तरी त्यांतल्याच आजपर्यंत क्षुल्लक ह्मणून टाकून दिलेल्या गोष्टींचे आधुनिक शास्त्रीय शोधांच्या अनुरोधाने परीक्षण केल्यास बऱ्याच महत्वाच्या गोष्टी कळून येण्यासारख्या आहेत. ह्मणून ऋग्वेदांतील चांद्रसौरमानाचे वर्ष पाहूनच केवळ आपण आपल्या शोधांपासून निवृत्त होतां कामा नये. ध्रुवप्रदेशाला विशिष्ट असलेल्या गोष्टी मागें सांगितल्याच आहेत. त्या आपल्यापुढे असलेल्या वेदवाक्यांनां व कथांनां कितपत लागू पडतात हेंच फक्त आतां पहावयाचें आहे.

" खगोलाचें ] छत्रीसारखें फिरणें ही गोष्ट ध्रुवबिन्दुविशिष्ट आहे; व जर वैदिक लोक किंवा त्यांचे पूर्वज कधींकाळी तेथें राहिलेले असतील, तर त्यांच्या दंतकथांत ती आढळली पाहिजे. त्याप्रमाणें पहातां अशा अर्थाचीं वाक्यें ऋग्वेदांत आढळतात. **यो अक्षेणेव चक्रिया शचीभिर्विष्वक्तस्तंभ पृथिवीमुतद्याम्** । ( ऋ. १०,८९,४. ) ' ज्याप्रमाणें आंस चक्रांना धरितो, त्या प्रमाणें जो आपल्या शक्तीनें पृथ्वीला आणि आकाशाला पृथक् धरून ठेवितो; **अवंशे द्यामस्ताभयत्** (ऋ. २,१५,२.) 'काठीशिवाय आकाशाला धरून ठेविलें;' **य इमे द्यावापृथिवी जजान उर्वी गभीरे रजसी सुमेके अवंशे धीरःशच्या समैरत्** । (४,५६,३.) 'जो या विस्तीर्ण द्यावापृथ्वीला उत्पन्न करून त्या सुंदर व विस्तीर्ण लोकांस स्तंभाशिवाय आपल्या शक्तीनेंच प्रेरिता झाला;' **स सूर्यः पर्युरू वरांस्येंद्रोववृत्याद्रथ्येव चक्रा** । (१०,८९,२.)'तो सूर्यरूपी इन्द्र विशाल विस्ताराला ( तारागण युक्त आकाशाला ) रथाच्या चाकांप्रमाणें वाटोळे फिरविता झाला. ' यातील शेवटच्या वाक्यातील तारगणयुक्त आकाशाची चक्राकार गति, व इतरांतील त्याचे स्तंभाशिवाय धरून ठेवणें, या गोष्टीचा एकत्र विचार केल्यास ही स्थिति ध्रुवावर रहाणाऱ्याच्याच कायती दृष्टीस पडणारी आहे असे स्पष्ट दिसून येईल; कारण शीतोष्ण व उष्ण कटिबंधांतही जरी नक्षत्रांची चक्राकार गति दिसून येत आहे तरी स्तंभाशिवाय आकाशाला या चक्राकारगत्यनुसार सांवरून धरण्याची कल्पना तेथे शक्य नव्हे; ती फक्त ध्रुवावरच उत्पन्न होणारी आहे. • **अमी य ऋक्षा निहितास उच्चा नक्तं ददृश्रे कुहचिद्दिवेयुः** । (ऋ. १, २४, १०.) यांत [आकाशाच्या] 'उच्च प्रदेशी ठेविलेले हे जे ऋक्ष (सप्तर्षि) ते रात्री दिसतात आणि दिवसास कोठें तरी जात असतात' असें ह्मटलें आहे. ह्यांत सप्तर्षींच्या उंचीन्चाच संबंध असल्यामुळें ' उच्च प्रदेशीं ठेविलेले ' या शब्दावरून ते त्यावेळीं पहाणाराच्या डोक्यावर असले पाहिजेत हें उघड दिसतें. ही सप्तर्षींची स्थितीही उष्ण व समशीतोष्ण कटिबंधांतील नसून ध्रुवमंडलांतीलच आहे. ऋग्वेदामध्यें नक्षत्रें किंवा आकाश यांच्या गतीचें वर्णन करणारीं इतर वाक्यें फारशीं नसल्यामुळें ध्रुवविशिष्ट दुसरी गोष्ट जी सहा महिन्यांचा दिवस व सहा महिन्यांची रात्र तिजकडे आतां वळूं.

देवांचा दिवस व रात्र हीं सहा सहा महिन्यांचीं असतात ही कल्पना आपल्या वाङ्मयामध्यें इतकी प्रसिद्ध आहे कीं तिचा उल्लेख पूर्वापर सर्व ग्रंथांत आलेला आहे. पुराणग्रंथ तसेच ज्योतिषग्रंथ यांत त्यांचें वर्णन आहे. ज्योतिष्यांचा उत्तरध्रुव ह्मणजेच पुराणांचा मेरु पर्वत. सूर्यसिद्धांतामध्यें मेरूवर देव सूर्याला मेषराशीपासूनच्या अर्ध्या प्रदक्षिणेंत एकदांच उगवलेला पहातात असें ह्मटलें आहे. पुराणांतील वर्णनाप्रमाणें देवांचें घर मेरूवर आहे; याकरितां त्यांच्या सहा महिन्यांच्या रात्रिदिवसांसंबंधाच्या वाक्यांचा उलगडा सहज होतो; व तो सर्वप्रकारच्या पंडितांनां मान्यही आहे. देवांचा दिवस (देवयान) ह्मणजे वसंतसंपातापासून शरत्संपातापर्यंतचा सूर्याचा मार्ग. याच काळांत सूर्य उत्तरध्रुवप्रदेशावर दिसत असतो. तसेंच शरत्संपातापासून पुनः वसंतसंपातापर्यंतचा सूर्याचा मार्ग ह्मणजे देवांची रात्र. कारण त्यावेळीं सूर्य उत्तरध्रुवावर दिसत नाहीं. परंतु हा अर्थ लक्षांत न आल्यामुळे सिद्धान्तशिरोमणिकार भास्कराचार्य यांनीं उत्तरायण ह्मणजे देवांचा दिवस कसा? असा प्रश्न* विचारिला आहे. कारण त्यांच्या वेळी उत्तरायणाचा अर्थ मकर संक्रमणापासून कर्कसंक्रमणाचा काळ असा होता; व या सर्व काळांत कांहीं मेरूवर ह्मणजे उत्तरध्रुवावर सूर्य दिसत नसतो. परंतु उत्तरायणाचा पूर्वीचा खरा अर्थ न समजल्यामुळेंच भास्करचार्याची ही चूक झालेली आहे. कारण उत्तरायणाचा खरा अर्थ पाहिल्यास उत्तरायण ह्मणजे देवांचा दिवस कसा हे सहज समजतें. देव ह्मणजे देवासारखे मानलेले मनुष्यांचे मृतपूर्वज असा कित्येक जण अर्थ समजतात. परंतु तसें करण्याचें कांहीं कारण नाही. कारण आपले पूर्वज जर कधीकाळी उत्तरध्रुवावर राहिलेले असतील, तर त्यांचे देवही अर्थात् तेथलेच असले पाहिजेत. पुढील एका भागामध्यें वैदिक देवतांच्या ध्रुवविशिष्ट लक्षणांविषयीं विशेष विवेचन यावयाचें आहे. सध्या प्रस्तुत प्रश्नांत देव ह्मणजे कांहींही समजलें तरी अडचण नाहीं. मुख्य मुद्दा त्यांत ध्रुवविशिष्टपणा आहे कीं नाहीं हे पहाण्याचा आहे. तेवढा साधला ह्मणजे आपलें काम झालें.

---

* या प्रश्नाचें सविस्तर विवेचन **वेदकालनिर्णय** पान ११–१९ यांत केलें आहे.

यासंबंधाचा दुसरा आधार मनुस्मृतीमध्यें अ० १ श्लो. ६७ यांत आहे. त्यांत **दैवे राज्यहनी वर्षं प्रविभागस्तयो पुनः । अहस्तत्रोदगयनं रात्रिःस्याद्दक्षिणायनम्** । ‘ वर्ष ह्मणजे देवांचें एक अहोरात्र, त्यांत दिवस म्हणजे उत्तरायण व रात्र म्हणजे दक्षिणायन ’ असें म्हटलें आहे. कालविभागप्रकरणांत हा मजकूर आला आहे. या देवांच्या अहोरात्राच्या मानावरच त्यांत पुढें कल्पादि कालगणना केलेली आहे. पुराणांतही या कल्पनेची चांगली वाढ झालेली दृष्टीस पडते. म्हणजे अगदीं वैदिककालापासून तो तहत पुराणांपर्यंत या गोष्टीचे उल्लेख आढळून येत आहेत, आणि म्हणून ती मूळ प्रत्यक्ष पाहिल्यावरूनच रूढ झाली असली पाहिजे असें म्हणणें भाग पडतें. असो; महाभारतामध्येंही वनपर्वांत मेरुपर्वताचे वर्णन इतके उत्तम दिलें आहे कीं त्यावरून मेरु व ध्रुव यांच्या एकत्वाविषयीं अगदी शंका रहात नाहीं. अर्जुन मेरुपर्वतावर गेला होता त्या वेळच्या सफरीचे तें वर्णन आहे. त्यांत म्हटलें आहे की, ‘ मेरूवर सूर्य, चंद्र व सर्व तारा प्रतिदिवशीं त्याच्या भोंवतीं प्रदक्षिणा करीत फिरतात. ’ *तसेंच पुढे आणखी वर्णन आहे, तें असे—‘ हा पर्वतराज आपल्या स्वतःच्या तेजानें व त्यावरील वनस्पतींच्या प्रभावानें काळोखाचा नाश करीत असल्यामुळे तेथें रात्र व दिवस यांमध्ये भेदच दिसत नाही. ’ तसेच आणखी पुढे ‘ तेथील लोकांचे अहोरात्र वर्षाशीं समान झाले ’ असे म्हटलें आहे. या वर्णनावरून एवढें दिसून येईल कीं, महाभारताची रचना झाली त्या वेळीं ग्रंथलेखकांनां उत्तरध्रुवविशिष्टगोष्टींचें सूक्ष्मज्ञान होतें. इतके ज्ञान त्यांस गणित व ज्योतिष यांच्याच केवळ साहाय्यानें झालेलें होतें असें संभवत नाही.

---

* एनं त्वहरहर्मेरुं सूर्याचंद्रमसौ ध्रुवम् । प्रदक्षिणमुपावृत्य कुरुतः कुरुनन्दन ॥ ज्योतींषि चाप्यशेषेण सर्वाण्यनघ सर्वतः । परियान्ति महाराज गिरिराजं प्रदक्षिणम् ॥ व० अ. १६३.

**स्वतेजसा तस्य नगोत्तमस्य महौषधीनां च तथा प्रभावात् ।**
**विभक्तभावो न बभूव कश्चिदहोनिशानां पुरुषप्रवीर ॥**
**बभूव रात्रिर्दिवसश्चतेषां संवत्सरेणैव समानरूपः ॥**

**व० अ० १६४.**

एकदां केव्हांतरी प्रत्यक्ष पाहिलेल्याच गोष्टी परपरागत त्या काळी ज्ञात होत्या. या वर्णनांत त्या पर्वताच्या तेजाचा जो उल्लेख आला आहे तो विशेष लक्षांत ठेवण्यासारखा आहे. कारण तें तेज म्हणजे ध्रुवप्रदेशावर दिसणारा " अरोरा बोरियालिस " ऊर्फ उदीचीन [ उत्तरे कडील ] उषाप्रकाशच होय. तर याप्रमाणे वेदकालानन्तरच्या ग्रंथांत सहा महिन्यांच्या रात्रीदिवसांचा उल्लेख आणि तसेच मेरुपर्वताचें सविस्तर वर्णन ही इतकी स्पष्ट आहेत कीं, ही गोष्ट फार प्राचीन काळापासून परंपरागत आलेली असून ती केव्हां तरी एकदां प्रत्यक्ष पाहिलेली असली पाहिजे असें मानणें भाग येतें, व वैदिकग्रंथांतही तिचा उल्लेख असल्यामुळे असे मानण्याला चांगलाच आधार मिळतो.

तैत्तिरीय आरण्यकामध्यें " मेरुपर्वत हा सप्त आदित्यांचे स्थान असून, आठवा आदित्य जो कश्यप तो महामेरूला सोडून कधींही जात नाहीं, व त्या सप्त आदित्यांना प्रकाश देऊन पर्वतालाही प्रकाशमान करितो " असें वर्णन आहे. तैत्तिरीय ब्राह्मणांत तर **एकं वा एतद्देवानामहः यत्संवत्सरः** । म्हणजे " ज्याला संवत्सर म्हणतात तो देवांचा एक दिवस " असें स्पष्टच म्हटलेले* आहे. [ टिळक म्हणतात ] अशा अगदी स्पष्ट वाक्यावरही एका काळीं कांही विशेष प्रकारचे अनुमान करण्याचे धाडस आमच्याने झाले नाही. ब्राह्मणांतील या वचनाच्या जोडीला संहिताग्रंथांत कांहीं आधार न मिळाल्यामुळे उत्तरायण व दक्षिणायन यांना अनुक्रमे देवांचा दिवस व देवांची रात्र असे बहुधा लक्षणेनें म्हटले असावे असे वाटत होते. परंतु त्यानंतर केलेल्या शोधांवरून या वचनांचा ध्रुवाशीं संबंध आहे असे अनुमान करणें अगदी भाग पडलें. या अनुमानांविषयी पुरावा पुढील विवेचनांत येणार आहे. या वर दिलेल्या तैत्तिरीय ब्राह्मणांतील वचनावर कित्येक शंका येण्यासारख्या आहेत. ते केवळ कल्पनेनेंच लिहिले असेल, किंवा अलंकारिक असेल अथवा ज्योतिष्यांनीं मागाहून आपल्या ज्योतिषशास्त्राच्या ज्ञानानें अंदाजाने त्याविषयी अनुमान करून पुढे त्याला प्रत्यक्ष पाहिलेल्या गोष्टीसारखें स्वरूप दिले असेल; पण या सर्व शंका व्यर्थ आहेत. ही गोष्ट जर केवळ ज्योतिष ग्रथांतच आढळली असती, तर कदाचित् वरील कल्पनांपैकी शेवटची कल्पना सयुक्तिक

---

* तै. ब्रा. ३, ९, २२.

ह्मणतां आली असती. सकृद्दर्शनीं असंभाव्य वाटणाऱ्या गोष्टींचा केवळ ज्योतिषज्ञानावरून सामान्य लोकांस विश्वास पटणें शक्य नाहीं. शिवाय ही गोष्ट वैदिकग्रंथांत आढळून येत असल्यामुळें, वरील कल्पना खरी मानावयास तत्कालीन लोकांस ज्योतिषगणिताचें बरेंच सूक्ष्मज्ञान होते असें मानावें लागतें. परंतु तें शक्य दिसत नाहीं. हेरोडोटस या ग्रीक इतिहासकाराच्या काळींही ( इ. पू. ४५० ) 'सहा महिने निजून रहाणारे लोक पृथ्वीवर आहेत ' हे ह्मणणे लोकांना खोटें वाटत असे. अर्थात् हेरोडोटसपूर्वी कित्येक शतकें ही गोष्ट वैदिक ऋषींनीं गणिताच्या आधारावर रचिलेली असणें शक्य नाहीं. ती त्यांनीं किंवा त्यांच्या पूर्वजांनी प्रत्यक्ष पाहिलेली अशीच असली पाहिजे. पण या सर्व शका पारशी लोकांच्या धर्मग्रंथांतील याच अर्थाच्या एका वाक्यावरून नाहीशा होण्यासारख्या आहेत. त्यांत **तएच अयर मइन्यएन्ते यत् यरे** म्हणजे ' जें वर्ष त्याला ते दिवस मानतात ' असें म्हटले आहे. हे वाक्य म्हणजे तै० ब्राह्मणांतील वाक्याचे केवळ रूपान्तर आहे.[1] हें वाक्य ज्या प्रकरणांत आलें आहे त्यांत **अहुरमझ्द** व **यिम** यांच्यामधील संवाद वर्णिला आहे. त्यांत **अहुरमझ्द** हा मनुष्यांचा आदिराजा जो **यिम** त्यास सूचना करितो कीं " भयंकर थंडीचा काल लवकरच येणार आहे; तो बर्फाच्या दाट आवरणाच्या योगाने संपूर्ण जीवसृष्टीचा नाश करणार आहे, तर हे **यिम** ! तूं वनस्पति व प्राणी यांची बीजे जतन करून ठेविण्याकरितां एक वर [ घर ] बांध. " हा सवाद **अइर्यन वइजो** [ इराणी लोकांचे नंदनवन ] मध्यें झाला असें म्हटलें आहे. या सूचनेप्रमाणें वर बांधल्यावर **यिमानें अहुरमझ्दास** विचारिलें " हे जगत्प्रभवा ! हे पवित्र पुरुषा ! त्या वरामध्ये प्रकाश पाडावयास दिवे कोठचे ? " त्यावर **अहुरमझ्द** उत्तर करितो " त्या ठिकाणीं सृष्ट आणि असृष्ट असे दीप आहेत. तेथें चंद्र, सूर्य आणि तारका वर्षांतून एकदांच उगवतात व एकदांच मावळतात, आणि सर्व वर्ष एकाच दिवसासारखें दिसतें. " या वाक्यांतील सर्वच गोष्टी मह-

---

१ हें वाक्य अगदीं संस्कृतासारखेंच आहे. **तेच अहर्मन्यन्ते यद्वर्ष ।** असे त्याचें संस्कृत रूपान्तर होईल. वर्ष वाचक **यर** शब्दाचें स्वरूप संस्कृतांत दिसत नाहीं. इंग्रजींतील इयर ( year ) शब्द त्याशीं सरूप दिसतो.

त्याच्या आहेत. पहिली **अइर्यन वइजो** ऊर्फ इराणी लोकांचें मूल-स्थान, हे हिमावतरणामुळें वसतीला अयोग्य झालें; दुसरी, त्या स्थानी चद्र सूर्य वर्षातून एकदां उगवत व एकदांच मावळत आणि तेथील वर्ष दिवसासारखे होते. आतां हा मजकूर व तै० ब्राह्मणांतील वर दिलेले वाक्य यांत किती निकटपणा आहे हे सांगावयास नकोच. वरील वर्णना-वरून **अइर्यन वइजो** व **यिमानें** बांधिलेला वर ही दोन्ही ध्रुवाजवळच होती हे अगदीं उघड दिसून येईल. अवेस्तिक व वैदिक अशा आर्य लोकांच्या दोन्ही वाङ्मयांमध्यें आढळून येणारी ही गोष्ट केवळ कविकल्पना किंवा ज्योतिष्यांनी अंदाजाने काढिलेली कल्पना असेल असे संभवत नाहीं तर ती गोष्ट केव्हांतरी प्रत्यक्ष पाहिलेलीच असली पाहिजे.

हा किंवा अशा प्रकारचा दुसरा कांहीं उल्लेख ऋग्वेदामध्यें नाहीं हें खरें; परंतु याला पुष्टी देणारीं दुसरी पुष्कळ वचने त्यांत आहेत. प्राचीन वैदिक वर्षाचे **देवयान** व **पितृयाण** असे जे दोन भाग केलेले आढळतात, ते व **उत्तरायण** आणि **दक्षिणायन** ही पूर्वी एकच होती. **देवयान** हा शब्द ' देवांचा मार्ग ' या अर्थी ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणीं आढळतो. ऋ० १,७२, ७ यांत अग्नीला ' देवयान जाणणारा ' असे ह्मटलें आहे. तसेच, १,१८३,६ व १,१८४,६, यांत ' हे अश्विन हो, आह्मीं तमाच्या पाराला येऊन पोहोंचलो, आतां देवयान मार्गानें तुह्मी आह्मांकडे या, ' असा मजकूर आला आहे. पुनः ७,७६,२ मध्ये ' देवयान मार्ग मला दिसूं लागला,—उषेचा केतु ( निशाण ) पूर्व दिशेकडे फडकूं लागलेला दिसत आहे ' असे ह्मटले आहे. या वाक्यांवरून देवयानाचा आरंभ उषेच्या उदयापासून ह्मणजे काळोख सपल्यावर होत होता, व

---

१. अंतर्विद्वाँ अध्वनो देवयानान् । ऋ. १,७२,७.
अतारिष्म तमसस्पारमस्य प्रति वां स्तोमो अश्विनावधायि ।
एह यातं पथिभि र्देवयानैः । ऋ. १, १८३,६.
प्रमे पंथा देवयाना अदृश्रन्......अभूदु केतुरुषसः पुरस्तात् ।
ऋ. ७, ७६,२.
परं मृत्यो अनु परेहि पंथां यस्ते स्व इतरो देवयानात् ।
ऋ. १०,१८.१.

ाच मार्गानें अग्नि, अश्विनौ, उषा, सूर्य वगैरे प्रातःकालिक देवता
ापल्या दिव्य भ्रमणामध्यें फिरत असत हें उघड दिसतें. दुसऱ्या पक्षी
ितृयाणाला देवयानाचा विरोधी किंवा मृत्यूचा मार्ग असें ऋग्वेदांत
टलें आहे. यावरून पितृयाणाचा आरंभ काळोख पडल्यावर होत असे
ासें दिसते. १०,८८,१५ मध्यें त्या सूक्ताचा ऋषि ह्मणतो[1] कीं " मी
क दोनच मार्गांविषयीं ऐकिलें आहे; एक देवांचा व दुसरा पितरांचा."
ातां ज्या अर्थी या प्रत्येक * यानाचे तीन तीन ऋतु असतात असें
० ब्राह्मणांत वर्णन आहे, त्या अर्थी ते नेहमीचे दिवसरात्र नसून
र्षाचे दोन भाग जे ध्रुवावरील सहा महिन्यांचा दिवस व सहा महिन्यांची
ात्र तेच होत. ही भाषा पुढें बदललेल्या स्थानाला जरी अनुरूप नव्हती,
री ती एकदां रूढ झालेली असल्यामुळे तशीच राहिली. तात्पर्य देवयान-
ितृयाणरूपी वर्षविभागाचा वरीलप्रमाणें अर्थ लाविल्यास, तै० ब्राह्म-
ांतील ' संवत्सर ह्मणजे देवांचा एक दिवस होय ' या वचनाला त्या-
रून चांगला पाठिंबा मिळतो. या देवयानाचा ऊर्फ देवांच्या मार्गाचा
ारशी धर्मग्रंथांतही उल्लेख आहे ही गोष्ट येथें सांगितली पाहिजे.
ामध्यें एके ठिकाणीं " फ्रवशी ( पितृ )नीं चंद्रसूर्यांनीं **मझ्दानें**
**लेला मार्ग, देवांनीं केलेला मार्ग** दाखविला " असें, व दुसऱ्या
का ठिकाणी " दएवांच्या ( असुरांच्या ) त्रासामुळे पुढें न चालतां
द्रसूर्य हे, फ्रवशी त्यांस मझ्दाचा ( देवाचा ) मार्ग दाखवीपर्यन्त
ाच वेळ थांबून राहिले " असें वर्णन आहे. यावरून मझ्दाचा मार्गही
वयानाप्रमाणे असुरांच्या त्रासांतून सूर्य मोकळा झाल्यावर सुरू होतो
सें झालें. ह्मणजे हा काळ सूर्य क्षितिजावर असे तोपर्यन्तचा होता हें
घड आहे. याप्रमाणें वैदिक व पारसीक वाङ्मयांची या गोष्टीसंबंधानें
कवाक्यता आहे.

भारतीय व पारसीक धर्मग्रंथांतील सादृश्य येथेंच संपलें असें नाहीं.
ापल्याप्रमाणेंच पारशी लोकांमध्येही पितृयाणासंबंधानें मोठा कटाक्ष

---

१. द्वे स्रुती अशृणवं पितॄणामहं देवानामुत मर्त्यानाम् ॥
ऋ १०,८८,१५.

* याविषयीं सविस्तर विवेचन वेदकालनिर्णय पान ११–१५ यांत
ालें आहे.

आहे. पितृयाणामध्ये ऊर्फ दक्षिणायनामध्यें मरण येणें अशुभ आहे असे आपण समजतो, आणि याच कारणास्तव भारतप्रसिद्ध भीष्माचार्य उदगयन येईपर्यन्त मरावयाचे थांबले [ इच्छामरणी असल्यामुळें थांबतां आले ] असे महाभारतांत वर्णन आहे. उपनिषद्ग्रंथांमध्येही उत्तरायणांत व दक्षिणायनांत मरण पावणाऱ्यांच्या आत्म्यांच्या गतीचें वर्णन करून उत्तरायण ऊर्फ देवयान मार्गाचे श्रेयस्करत्व सांगितले आहे. ही सर्व वाक्ये शंकराचार्यांनी ब्रह्मसूत्र अध्याय ४ पाद २ यांतील '**रश्म्यनुसारी । १८ । निशि नेति चेन्न, संबंधस्य यावद्देहभावित्वाद्दर्शयतिच । १९ । अतश्चायनेऽपि दक्षिणे । २० । योगिनः प्रति च स्मर्यते स्मार्ते चैते । २१ ।** या सूत्रांवरील आपल्या भाष्यांत दिली आहेत. त्यांत जरी सूत्रकारांनी 'दक्षिणायनांत मरणारास असुखदायक लोक प्राप्त होतो' असाच या वाक्यांचा अर्थ करण्याचे कारण नाहीं, कारण त्याचा उद्देश केवळ **योग्यांना** विशिष्ट कालीं मेल्यास कोणती गती प्राप्त होते हे सांगण्याचा* आहे, इतराविषयीं नव्हे, असे आपलें मत दिले आहे तरी त्यावरून लोकांमध्यें प्रचलित असलेला पितृयाणाविषयीं वरील प्रकारचा विश्वास दिसून येतोच. ह्मणून पितृयाणाचा मूळचा अर्थ जर दीर्घ काळोखाचा काळ असा असेल, तर या कल्पनेचा उलगडा समाधानकारक रीतीने करतां येईल. पितृयाण ह्मणजे काळोखी दीर्घ रात्र असल्यामुळें मृतमनुष्यांचे अंत्य विधि दिवस ह्मणजे देवयान येईपर्यन्त लांबणीवर पडत. अद्यापसुद्धां रात्रीं मरण येणें जास्त अशुभ समजतात व अशा प्रसंगीं दहनविधीही बहुधा दिवस येईपर्यन्त करीत नाहीत.

पारसी ग्रंथांतील यासबंधाचे वर्णन अधिक स्पष्ट आहे. त्यांत एके ठिकाणी 'उन्हाळा जाऊन हिवाळा आल्यावर जर कोणी मृत्यु पावला तर **मझ्दाच्या** भक्तानें काय करावें?' असा प्रश्न विचारतां **मझ्द** त्यास उत्तर करितो "अशा प्रसंगी घरांत **कट** (खांच) खणून त्यांत ते

---

* **भ. गी. अ० ८ श्लो. २४–२६ पहा.**

**अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम् ।**
**तत्र प्रयाता गच्छन्ति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ॥ २४ ॥**
**धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम् ।**
**तत्र चांद्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते ॥ २५ ॥**

शरीर दोन रात्री, तीन रात्री, किंवा महिनाभरही, ह्मणजे, पक्षी उडूं
ाव, वनस्पति वाढूं लागत, प्रवाह सुरु होत, आणि वायू पृथ्वीवरील
ी शोषूं लागत पर्यन्त, ठेवावे. " सूर्यदर्शन झाल्याखेरीज मृतशरीर
ादि पक्ष्यांच्या हवाली करण्याची पारशी लोकांत वहिवाट नाही
गोष्टीचा विचार करतां वरील वर्णनांतील महिना सबंद काळोखाचा
ला पाहिजे असें दिसून येईल. या वर्णनांतील पक्षी उडूं लागण्याचे
े वर्णन ऋग्वेदांतील उषेच्या वर्णनासारखेच आहे. यावरून भार-
व पारसीक या दोन्ही धर्मग्रंथांमध्ये या दीर्घ रात्रिदिवसांविषयी
लेलें ऐकमत्य स्पष्ट होतें.

या गोष्टी इतर आर्य राष्ट्रांच्याही पुराणवाङ्मयामध्यें दिसून येतात.
ागिझमिनिस नांवाच्या ग्रीक ग्रंथकाराने आकाशाच्या भ्रमणाला
नुष्याच्या डोकीवरील टोपीच्या फिरण्याची ' उपमा दिली आहे. तसेच
ऱ्या एका ग्रीक ग्रंथकाराने 'प्रथम ध्रुवतारा डोक्यावर दिसत असे '
ा लिहिलें आहे. इलियड आणि ऑडिसी या ग्रीक काव्यांतही
च्या अवधीचा व चोविस तासांच्या अवधीचा अशा दोन प्रकारच्या
सांचे उल्लेख आढळतात. नार्वे देशांतील पुराणकथांमध्येही ' देवांच्या
चा ' उल्लेख आहे. या पुराणकथा जर खऱ्या असतील तर सहा
महिन्यांच्या रात्रिदिवसाची कल्पना फार प्राचीन ह्मणजे भारतीय व
पीय आर्य वेगळे होण्याच्या पूर्वीची असली पाहिजे, व तिचा उगमही
ांच्या आदिस्थानांतच झाला असला पाहिजे. तुलनात्मकगाथाशा-
वरून आर्यांचें आदिस्थान ध्रुवावर होते ही गोष्ट चांगली दिसून येते;
ुनच षण्मासावधि रात्रिदिवसांचे उल्लेख वेद आणि अवेस्ता यांतच
, तर ग्रीक आणि नॉर्स वाङ्मयांतही आढळल्यास आश्चर्य नाही.
ांच्या सर्व शाखांना ही गोष्ट परंपरागत प्राप्त झालेली आहे, आणि
स्पष्टपणें ध्रुवविशिष्ट असल्यामुळे केवळ तिच्याच जोरावर आपली
त्ति सिद्ध होईल. परंतु सुदैवाने मागें सांगितलेल्या सर्व ध्रुवविशिष्ट
ींचे उल्लेख वेदांत सांपडत असल्यामुळें आपल्या उपपत्तीची इमारत
ाच आधारावर उभारण्याची गरज नाहीं. ध्रुवविशिष्ट दुसरी गोष्ट
लाकार भ्रमण करणारी उषा ही होय. पुढल्या भागांत ऋग्वेदांतील
चें वर्णन ध्रुवावरील उषेला लावल्यानेंच कसें सुगम होतें तें पाहूं.

# प्रकरण ५ वें.

## वैदिक उषा.

ऋग्वेदांतील मनोहर उषःसूक्तें—उषेचें साम्र व रूपकविरहित स्पष्ट वर्णन—उषेच्या दीर्घावधीच्या सूचक गोष्टी—उषा संपेपर्यंत हजार सूक्तांचा किंवा लागल्यास सर्व ऋग्वेदाचा पाठ करण्याची चाल—उषेचा त्रिप्रकार किंवा पंच-प्रकार भेद— दोहोंवरून दीर्घावधि उषेचें अनुमान होतें—उषस् व व्युष्टि या दोन निराळ्या शब्दांवरूनही तेंच अनुमान होतें—आजपर्यंत नीटपणें न समजलेल्या अशा दीर्घावधि उषेसंबंधाच्या ऋग्वेदांतील वाक्यांचें विवेचन—अरुणोदय आणि प्रत्यक्ष सूर्योदय यांच्या मध्यें जाणारा कित्येक दिवसांचा अवधि—त्याचा ऋग्वेदांतील ( ७,७६,३ ) स्पष्ट उल्लेख—यावरील सायणभाष्य ओढाताणीचें असून समाधानकारक नाहीं—सूर्योदयापूर्वी येणाऱ्या अनेक उषा—ऋग्वेदांत कित्येक ठिकाणीं उषेचा अनेकवचनीं प्रयोग केला असल्याचें कारण—अनेकवचनीं प्रयोग केवळ बहुमानार्थी नव्हे—तसाच तो अनेक दिवसांच्या अनेक उषांसंबंधानेंही नव्हे—त्यावरून एकामागून एक येणाऱ्या अनेक उषांच्या कलापाचाच बोध होतो—हें अनुमान तैत्तिरीय संहितेवरून दृढ होतें— तीस बहिणी असा उषांचा उल्लेख—या तीस उषा अखंड एकसारख्या होत्या असें दाखवावयास तैत्तिरीय ब्राह्मणांतील प्रत्यक्ष आधार— तीस उषासंबंधाच्या सायणाचार्यांच्या मतांचें परीक्षण—तीस उषा ह्मणजे एकाच उषेनें टाकलेलीं तीस पावलें असें वर्णन—उषेच्या चक्राकार भ्रमणाचा ऋग्वेदांतलि स्पष्ट उल्लेख—प्रतिदिनीं त्या एकाच ठरींव ठिकाणीं येतात असें वर्णन—या सर्वांवरून तीस उषांच्या अखंड कलापाचाच बोध होतो—एकंदर विवेचनाचें तात्पर्य—त्यावरून या उषा ध्रुवस्थानीय होत असें सिद्ध होतें—उषेच्या दीर्घावधींत होणारे फेर-बदल—उषेच्या रथाचा इन्द्रानें चुराडा केला या कथेचा अर्थ—उषेसंबंधाच्या या गोष्टी पूर्वयुगांतील होत असें सांगणारीं स्पष्ट वचनें—वैदिक उषांचें वर्णन ध्रुवालाच लागू पडणारें आहे.

## वैदिक उषा.



ग्वेदामध्यें षण्मासावधीच्या रात्रिदिवसांविषयीं स्पष्ट उल्लेख नाहींत; तरी हा उणेपणा पारसीक अवेस्त्यानें पूर्णपणे भरून काढला आहे. परंतु ध्रुवावरील चक्राकार फिरणाऱ्या तेजोयुक्त उषेसंबंधानें अशी अडचण सुदैवानें मुळींच नाहीं. उषा ही वेदांतील अति महत्वाची व सर्वांस अतिप्रिय अशी देवता असून तिचें ऋग्वेदांत सुमारें वीस सूक्तांत वर्णन केलें आहे; आणि एकवचनीं व अनेकवचनी मिळून एकंदर तीनशेपेक्षां अधिक वेळ तिचा नामनिर्देश झालेला आहे. तिची सूक्तें फारच मनोहर आणि काव्यगुणप्रचुर आहेत असें विद्वानांचें मत आहे. तिचें वर्णन फारच सविस्तर केलें असून त्यांत तिच्या वास्तव स्वरूपाचा अलंकारिक वर्णनानें मुळींच बिघाड केलेला नाही ही गोष्ट आपणांस विशेष महत्वाची आहे. ह्मणून आपल्या उपपत्तीची सत्यता पटविण्यास तिची फार चांगली मदत होईल. वरवरही विचार केला असतां वैदिक ऋषींनी उष्ण किंवा समशीतोष्ण कटिबंधांत दिसणाऱ्या तास दीड तासाच्या उषेच्या वर्णनांत आपली एवढी करामत खर्च केली असावी अथवा या वर्णनांत दिसून येणाऱ्या औत्सुक्याइतकें तिच्या आगमनाबद्दल औत्सुक्य व्यक्त करावें; व याचें कारण, फक्त त्यांच्याजवळ चोवीस तासापेक्षां कमी अवधीचा अंधकार नाहींसा करणारी विद्युद्दीपादि साधनें नव्हती, एवढेंच असावें, हें संभवनीय दिसत नाही. आजपर्यन्त उषेच्या सूक्तांचा या दृष्टीनें विचार कोणीही केलेला नाहीं. वैदिक उषा ह्मणजे आपली तास दोन तासांच्या अवधीची उष्ण व समशीतोष्ण कटिबंधांतील उषा असें आजपर्यन्त सर्व विद्वान समजत आले आहेत; कारण त्यांच्या मतें आर्य लोकांचें आदिस्थान मध्य आशियांतील डोंगर सपाटीचा प्रदेश हेंच होतें. परंतु या समजुतीवर सर्वस्वीं अवलंबून राहिल्यामुळें उषेच्या वर्णनांतील कित्येक वाक्यें बरोबर समजत नाहींत व ह्मणून आजपर्यन्त त्यांचा कांहींतरी अर्थ करून त्यांजकडे दुर्लक्षच केलेलें आहे. अशा वाक्यांचा अर्थ स्वाभाविक जसा होईल तसा केला असतां आपली उपपत्ति कशी उत्तम रीतीनें सिद्ध होते तें आतां पाहूं.

वैदिक उषेच्या दीर्घावधीविषयी प्रथम उल्लेख ऐतरेय ब्राह्मणामध्यें आला आहे. **गवाम् अयनम्** नांवाच्या सत्रास आरंभ करण्यापूर्वी **होत्यानें** सुमारे एक हजार मंत्रांचें पठण करावयाचें असतें. त्या मंत्रांना आश्विनशस्त्र ह्मणतात. तें **अग्नि, उषा** व **अश्विनौ** या प्रातःकालिक देवतांना अनुलक्षून केलेले आहे. तें पठन करावयाचा काल मध्यरात्रीनंतर ह्मणजे "रात्रीचा अंधकार उषःकालाच्या प्रकाशानें नाहीसा होऊं लागण्याच्या वेळी" आहे असें **तयोःकाल ऊर्ध्वमर्धरात्रात्प्रकाशीभावस्यानु विष्टंभम्** । या निरुक्तावरून दिसते. ऋग्वेदांतही (७,६७,२.३) हाच काल सांगितला आहे. 'हें शस्त्र पठण करण्यापूर्वी होत्याने घृत भक्षण करावे, कारण ज्याप्रमाणे चाकांना तेल लाविले ह्मणजे गाडी नीट चालते, तद्वत् होत्यालाही घृतभक्षणापासून पठण करणे सोईचें होईल,' असें सांगून ऐतरेय ब्राह्मणांत या शस्त्राचा लांबलचकपणा व्यक्त केला आहे. "सूर्योदयापूर्वी हें शस्त्र पुरे झाल्यास सूर्योदय होईपर्यन्त दुसरे मंत्र ह्मणून पठण चालू ठेवावे," असे आश्वलायन श्रौतसूत्रांत (६,५,८) सांगितले आहे. आपस्तंबाने तर "हे शस्त्र आटपल्यावर गरज पडल्यास ऋग्वेदाची दहाही मंडळे ह्मणावी" असे ह्मटले आहे. ज्या अर्थी या पठाणास उषेचा उदय झाल्याबरोबरच आरंभ करावयाचा असतो त्या अर्थी उषेचा उदय झाल्यापासून सूर्य उगवेपर्यन्त फारच वेळ वाट पहात बसावे लागत असे हे उघड दिसते; आणि तैत्तिरीय संहितेंत तर कित्येक ठिकाणीं "अपेक्षित काली सूर्योदय न झाल्यास देवांना प्रायश्चित करावे लागत असे" असे ह्मटलेले आढळतें.

उषेच्या दीर्घकालावधीची दुसरी सूचक गोष्ट तैत्तिरीयसंहितेंत आहे.

---

१. **नाश्विनं हैव तद्यदर्वाक्सहस्रांतस्मात्तत्सहस्रं वैव शंसेद्भूयोवा, प्राश्य घृतं शंसेद्यथा ह वा इदं मनो वा रथो वाक्तो वर्तत एवं हैवाक्तो वर्तते** । ऐ. ब्रा. ४,७.

२. **यस्याश्विने शस्यमाने सूर्यो नाविर्भवति सौर्यं बहुरूपमालभेत ॥ १ ॥ सर्वा अपि दाशतयीरनुब्रूयात्** । आपस्तंब १४, १-२.

३ असावादित्यो न व्यरोचत तस्मै देवाः प्रायश्चित्तिमैच्छन्. । तै. सं. २, १, २, ४.

४ **उषसे स्वाहा व्युष्टयै स्वाहोदिष्यते स्वाहोद्यते स्वाहोदिताय स्वाहा सुवर्गाय स्वाहा लोकाय स्वाहा । तै० सं० ७, २, २०.**

त्यांत **उषस्**, **व्युष्टि**, **उदेष्यत्**, **उद्यत्**, **उदित**, **सुवर्ग** आणि **लोक** अशा सात देवतांना द्यावयाचे हविर्भाग सांगितले आहेत. त्यांतील पहिले पांच वर उघडच उषोदेवतेच्या पांच स्वरूपांना आहेत. तैत्तिरीय ब्राह्मणामध्यें यांपैकीं पहिल्या दोघांचे स्पष्टीकरण, **उषस्** म्हणजे **रात्र** व **व्युष्टि** म्हणजे **दिवस** असें दिलें आहे; व ते जरी खरें मानिलें तरी बाकीच्या तीन भागांची व्यवस्था लावावयाची रहातेच. ध्रुवकटिबंधाखेरीज इतर ठिकाणची उषा इतकी लहान असते कीं, तिचा **उगवूं लागणारी** [ उदेष्यत् ], **उगवत असलेली** [ उद्यत् ], आणि **उगवलेली** [ उदित ] असा भेद म्हणजे भिन्नतारहित भेद होय. अर्थात्, असला भेद जिचा केलेला आहे अशी उषा ह्मणजे ध्रुवावरची दीर्घ उषाच समजली पाहिजे असे मानणे भाग येते.

ऋग्वेदांतही उषेचा हा त्रिप्रकार भेद माहीत नव्हता असे नाही. "त्याच्या [ अरुणाच्या ] आवडत्यांनी त्याच्यासाठीं तीन उषा वर्धमान केल्या" असें ऋ. ८,४१,३ यांत ह्मटले आहे. तसेच १,१७४,७ यांतील **तिस्रः दानुचित्राः** ह्मणजे "दानूने [ दवाने ] चित्रविचित्र झालेल्या तीन" या शब्दांनी तीन उषाच विवक्षित असाव्या असें दिसते. ऋ. [3]५,७९,९ यांत "हे उषोदेवते लवकर उदयास ये, थांबूं नको, नाहीं तर सूर्य तुला आपल्या तेजानें भाजून टाकील;" आणि २,१५,६ यांत उषेच्या घोड्यांना हळू चालणारे ( अजवसः ) असे ह्मटले आहे. त्यावरून क्षितिजावर फार वेळ रेंगाळत असल्यामुळें लोकांना तिचा कधीं कधी कंटाळाही येत असे असे दिसते. परंतु यापेक्षांही 'पूर्वी उषा देवी एकसारखी फार वेळ उदित असे[4]' [ ऋ. १,११३,१३ ] हें वाक्य व **शश्वत्तमा** ह्मणजे 'अतिशय वेळ रहाणारी' हा उषोदेवतावाचक शब्द [ १,११८,११ ] ही विशेष महत्वाची आहेत. **उषस्** आणि **व्युष्टि**

---

१ रात्रिर्वा उषाः । अहर्व्युष्टिः । तै० ब्रा० ३,८,१६,४.

२ स क्षपः परि षस्वजे...तस्य वेनीरनु व्रतमुषस्तिस्रो अवर्धयन् ।

ऋ. ८,४१,३.

३ व्युच्छा दुहितर्दिवो मा चिरं तनुथा अपः । नेत्त्वा स्तेनं यथा रिपुं तपाति सूरो अर्चिषा । ऋ. ५,७९,९.

४ शश्वत्पुरोषा व्युवास देवी । ऋ. १, ११३, १३.

हे दोन एकाच धातूपासून निघालेले शब्द उषेच्या दीर्घत्वाबद्दल साक्ष देतात. कारण, ती जर अगदी लहान असती तर तिच्याविषयी 'पूर्ण उदित', 'उगवणारी' वगैरे ह्मणण्याची मुळींच अवश्यकता नव्हती. पण या सर्व गोष्टी कितीही सूचक असल्या, तरी पूर्ण साधक नसल्यामुळें कांही दुसऱ्या पूर्ण साधक गोष्टींचा आतां विचार करूं. त्यांपैकीं पहिली ऋचा अशी:—

कियात्या यत्समया भवाति
या व्यूषुर्याश्च नूनं व्युच्छान्
अनु पूर्वाः कृपते वावशाना
प्रदीध्याना जोषमन्याभिरेति ॥ ऋ. १, ११३,१०.

या ऋचेत अडचण काय ती पहिल्या चरणांत आहे. त्यांत **समया** याचा अर्थ सायणाचार्यांनी 'समीप' [जवळ] असा दिला आहे. मॅक्समुल्लरनें [ग्रीक **ऑमॉस** व लॅटिन **सायमल** यांच्या साम्यावरून] त्याचा अर्थ 'सहवर्तमान' 'एकासमयी' असा केला आहे; तसेंच दुसरे कित्येक यूरोपीय पंडित **समयाभवाति** हे शब्द एकत्र घेऊन त्यांचा अर्थ 'दोहोंच्या मध्ये येणारी' असा करितात. परंतु यांपैकी कोणता जरी अर्थ घेतला तरी त्यावरून एकंदर ऋचेचा रोख कांहीं पालटत नाही. या ऋचेचा भावार्थ असा:—"उषा उदय पावून किती तरी काळ झाला बरें? आणखी किती वेळ तरी त्या उगवणार? (अथवा, पूर्वींच ज्या उगवल्या आहेत आणि ज्या आतां उगवणार त्या उषा **एकत्र** किती वेळ राहिल्या?) आमच्यासाठी प्रकाश करणारी [ही वर्तमान] उषा पूर्वींच्या उषांप्रमाणेच देदीप्यमान होत्साती इतरां [पुढें येणाऱ्या] बरोबर चालत आहे." यांत एवढी गोष्ट स्पष्ट आहे की, **या व्यूषुः** ह्मणजे ज्यांचा उदय झाला आहे आणि **या व्युच्छान्** ह्मणजे ज्याचा उदय व्हावयाचा आहे, अशा दोन प्रकारच्या उषांचे दोन कलाप या ऋचेत वर्णिले आहेत. सायणाचार्यांच्या अर्थाप्रमाणे पहातां या दोन्ही उषःकलापांमिळून एक मोठी थोरली उषा मानावी लागते. कारण, हे दोन्ही कलाप फारच मोठ्या अवधीपर्यन्त 'समीप' रहातात असे या ऋचेत ह्मटले आहे. या ऋचेचा अर्थ इतर यूरोपीय पंडितांच्या मताप्रमाणे जरी घेतला तरीही हें वर्णन ध्रुवाला लावल्याशिवाय गत्यंतर रहात नाहीं. कारण, त्यांच्या मतें

'या दोन उषःकलापांच्यामध्ये फारच दीर्घ काळ जातो' असा या ऋचे-तील पहिल्या चरणाचा भावार्थ आहे. तो घेतल्यास हा मधला दीर्घ काळ ह्मणजे ध्रुवावरील अखंड अशा दीर्घ रात्रीचाच काळ होय असें मानणे भाग येतें. एवंच कोणताही अर्थ घेतला तरी या ऋचेत ध्रुवावरील उषेचेच वर्णन आहे हे खास. तरी पण पुढे विवेचन केलेल्या कांही वेद-वाक्यांवरून पहातां वर दिलेला सायणाचार्यांचाच अर्थ बरोबर दिसतो. शिवाय, याच सूक्ताच्या पुढच्या एका ऋचेत (१३ व्या) 'उषा पूर्वी एकसारखी (शश्वत्) प्रकाशमान होत असे' असे ह्मटले आहे. त्या-वरूनही हा उषेचा अवधि फार मोठा असला पाहिजे हे उघड होतें.

ऋग्वेदाच्या सातव्या मंडळात उषेची सूक्तें बरीच आहेत. त्यांत एके-ठिकाणी 'मला देवयानमार्ग दिसू लागला, कारण, उषेचा केतु (ध्वज) पूर्वेकडे फडकू लागला' असे ह्मणून पुढच्या ऋचेत 'उषा प्रथम दिसू लागल्यापासून सूर्योदय होईपर्यन्त किती तरी दिवस होऊन गेले' असे स्पष्ट ह्मटलें आहे. ती ऋचा अशीः—

तानीदहानि बहुलान्यासन्
या प्राचीनमुदिता सूर्यस्य ।
यतःपरि जार इवाचरन्ती
उषो ददृक्षे न पुनर्यतीव ॥ ऋ. ७,७६,३.

या ऋचेचा अर्थ करतांना भाष्यकारांची फारच त्रेधा झालेली आहे. कारण, 'उषेचा उदय झाल्यापासून सूर्य उगवेपर्यंत किती तरी दिवस झाले' या वाक्याचा त्यांना उलगडा करितां येईना. उषेचा उदय झाल्यापासून सूर्योदयापर्यंत बरेच दिवस लोटणे अशक्य आहे असे त्यांस वाटत होते. म्हणून या अडचणींतून पार पडण्यासाठीं सायणा-चार्यांनी 'अहन्' (दिवस) याचा 'उषः—प्रकाशयुक्तकाल' असा अर्थ केला आहे. परतु आपल्याला तसें करण्याचें कारण नाहीं. दिवस म्हणजे जितका वेळ सूर्य क्षितिजावर असतो तितका वेळ असाच केवळ अर्थ नसून त्याचा अहोरात्र म्हणजे चोवीस तासांचा एक अवधि असाही सामान्य अर्थ आहे. म्हणून सूर्योदयापूर्वी बरेच दिवस कसे गेले हें जर आप-

---

१ उषःप्रकाशयुक्तस्यैव कालस्य अहःशब्दव्यवहारात् ।

त्याला ज्योतिषाच्या साहाय्यानें समजते आहे, तर द्राविडी प्राणायाम करून अहन् याचा ' उषःप्रकाशयुक्तकाल ' असा अर्थ न घेतां नेहमींचा व स्वाभाविक अर्थ जो ' दिवस ' तोच घेणे योग्य आहे. तसा अर्थ घेतला असतां वरील ऋचेचीं एकंदर तीन वाक्ये होतात. एक मुख्य आणि दोन गौण. मुख्य वाक्य **तानि इत् अहानि बहुलानि आसन्**— ' खरोखर ते पुष्कळ दिवस झाले ' हे. उरलेली गौण वाक्ये मुख्य वाक्यांतील **अहानि** शब्दाची विशेषणे आहेत. पहिले, **या प्राचीनम् उदिता सूर्यस्य**–' जे सूर्याच्या उदयापूर्वी होऊन गेले, ' आणि दुसरे, **यतः परि जार इवाचरन्ती ददृक्षे**–' ज्या ( दिवसा ) भोवती उषा आपल्या प्रियकराभोवती जशी फिरावी तशी फिरतांना दिसली. या ऋचेचा याहून दुसरा अर्थ होणे शक्य नाही. वैदिक ऋषीचे पूर्वज ध्रुवाजवळ रहात होते अशी कल्पनाच नसल्यामुळे सायणाचार्याप्रमाणे पाश्चात्य पंडितांचीही या ऋचेत गडबड उडाली आहे; आणि त्यानीही **अहन्** शब्दाचा ' तेज ' असा अर्थ घेतला आहे. पण वर सांगितल्याप्रमाणे **अहन्** ह्मणजे ' सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यन्तचा वेळ ' असेच समजण्याचे कारण नाहीं. ऋ. ६,९,१ यांत **अहश्च कृष्णम् अहः अर्जुनंच**–' काळोखाचा दिवस व प्रकाशयुक्त दिवस ' असे शब्द आहेत; तसेच तै. स. ३,३,४,१ यांत **एतद्वा अह्नो रूपं यद् रात्रिः**—' रात्र ही दिवसाचेच रूप होय ' असे ह्मटले आहे. **शम् अहोभ्याम्** या तै. संहितेतील ( १,२,९,१ ) **अहन्** शब्दाचा ' अहोरात्र ' असाच अर्थ दिलेला आहे ( शमहोभ्यामिति निनयत्यहोरात्राभ्यामेव ). तात्पर्य, या ऋचेंत उषा दिसू लागल्यापासून सूर्योदय होईपर्यन्त पुष्कळ दिवस होऊन गेले, आणि त्या दिवसांना उषा अगदीं धरून होती, [ पतीला ] सोडून जाणाऱ्या स्त्रीसारखी नव्हती ( न पुनः **यती** इव ), ह्मणजे इतक्या दिवसांच्या काळांत उषःप्रकाश सारखा होता असे स्पष्ट ह्मटलेलें आहे. हें वर्णन ध्रुवेतर स्थानाला लागू पडणारें नव्हे. आर्यांचें मूलस्थान ध्रुवावर होते, या कल्पनेवर आजपर्यन्त बिकट ह्मणून वाटलेल्या किती तरी वाक्यांचा सरळ व स्वाभाविकपणें होणारा अर्थच समाधानकारक कसा असतो याची अनेक उदाहरणें पुढील विवेचनांत यावयाची आहेत; त्यांपैकीं हें एक चांगलें उदाहरण आहे. या कल्पनेच्या अभावा टीकाकारांना वाक्यांतून कांहीं

तरी अर्थ निघावा ह्मणून वाटेल तशी शब्दांची ओढाताण करावी लागते; व ती करूनही पुनः त्यांतून समाधानकारक अर्थ निघत नाहीं तो नाहींच, हें दाखविण्याकरितां या ऋचेवर एवढें विवेचन करावें लागलें. असो.

या विवेचनावरून, ध्रुवावरील उषा क्षितिजावर वाटोळी फिरत असल्यामुळे तिच्या प्रत्येक प्रदक्षिणेचा ह्मणजे चोवीस तासांचा एक एक निराळा भाग मानावयाला कांहीं हरकत नाहीं असे दिसून येईल; व त्या अन्वयें प्रत्येक भागाला 'एक उषा' असे नांव देऊन अशा कांहीं उषा येऊन गेल्या व कांहीं यावयाच्या आहेत असेही ह्मणतां येईल. हें **कियात्या यत्समया भवाति** या ऋचेवरून स्पष्ट होतेच आहे. तसेंच आणखी " इतक्या दिनावधि उषा येऊन गेल्या तरी अजून सूर्योदय होत नाहीं " असेही ह्मणता येईल. ऋ. २,२८,९ यांत वरुणाची प्रार्थना केलेली आहे, ती अशी:—

पर ऋणा सावीरध मत्कृतानि
माहं राजन्नन्यकृतेन भोजम् ।
अव्युष्टा इन्नु भूयसीरुषास
आ नो जीवान्वरुण तासु शाधि ॥

या ऋचेचा सरळ पदशः अर्थ असा—'मी केलेलीं ऋणे दूर नाहींशीं कर. हे राजन् इतराच्या कृत्याचे फळ मला भोगावे न लागो. खरोखर बहुत उषा पूर्ण उदित झालेल्या नाहींत; हे वरुण त्यामध्ये आह्मी जिवंत रहावे असे कर.' या ऋचेच्या पहिल्या दोन व चवथ्या चरणांत नित्याप्रमाणे वरुणाची प्रार्थना केलेली आहे. विशेष भानगडीचा भाग ह्मणजे तिसऱ्या चरणातील **भूयसी उषासः अव्युष्टाः** हीं पदे. त्यांतही पहिलीं दोन सरळच आहेत; त्यांचा अर्थ 'बहुत उषा'. आतां उरलें **अव्युष्टा** हे पद. हे **व्युष्टा** या शब्दाला नकारार्थी **अ** मागे लागून झाले आहे. व्युष्ट शब्द **उष्ट** शब्दाला **वि** उपसर्ग लागून बनला आहे. वर एके ठिकाणी उषस् आणि व्युष्टि या शब्दांवरून दिसून येणाऱ्या उषेच्या त्रिप्रकार भेदाविषयीं सांगितले आहेच. तै० ब्राह्मणांत **अहः व्युष्टिः** या पदांनी व्युष्टि ह्मणजे वि–पूर्णपणे–**उष्टि**–उदित झालेली उषा ह्मणजे **उगवलेला दिवस** असा अर्थ दिला आहे. ध्रुवावरील दीर्घ उषेविषयीं

माहिती नसल्यामुळें सायणादि टीकाकारांनीं हा **उषस्** आणि **व्युष्टि** यांतीलं भेद मानिला नाहीं. त्यामुळे 'पुष्कळ उषा पूर्ण उदित झालेल्या नाहात.— त्यांचें पर्यवसान सूर्योदयांत झालें नाहीं ' या वाक्याचे त्यांना मोठें कोडें पडलें. सूर्योदयांत पर्यवसान होणारी उषाच कायती त्यांना माहीत होती. ह्मणून त्यांनीं त्या शब्दातून कांहीं तरी अर्थ निघावा ह्मणून **अव्युष्टाः** याचा अर्थ 'अद्यापि ज्या उगवलेल्या नाहींत त्या उषा, ह्मणजे पुढे येणारे दिवस ' असा भविष्यकालवाचक अर्थ केला. परंतु हा अर्थ क्लिष्ट आहे. **अव्युष्टाः उषासः** ह्मणजे सूर्यबिंब क्षितिजाखालीं असल्यामुळें पूर्णपणे उदित न झालेल्या दिनावधि उषा असा सरळ व स्वाभाविक अर्थ घेतल्यास सूर्य उगवण्यापूर्वी अशा बऱ्याच उषा कशा होऊन गेल्या याचा नीट उलगडा होतो.

या मताला पुष्टी देणारी दुसरीही वचनें ऋग्वेदांत आहेत. वरील ऋचेतील **भूयसीः** शब्दाप्रमाणें **पूर्वीः** असें अनेकवचनार्थी विशेषण उषांना ऋ. ४,१९,८ आणि ६,२८,१ यांत लाविलेले आहे. उषा शब्दाचा अनेकवचनी प्रयोग ऋग्वेदांत किती तरी वेळा आलेला आहे. ऋ. १,९२ या सूक्ताला " ह्या ( एताः ) त्या ( त्याः ) उषा (उषसः)" असा आरंभ केलेला आहे. ऋ. ७,७८,३ मध्ये असेच शब्द आहेत. निरुक्तांत ( १२,७ ) यास्काने हे बहुवचन बहुमानार्थी आहे असे ह्मटलें आहे. सायणाचार्यांनी प्रातःकालाला अधिष्ठित करणाऱ्या देवतांना अनुलक्षून हा अनेकवचनी प्रयोग आहे असे ह्मटले आहे. पाश्चात्य पंडितानीं वहुतेक त्यांचाच अनुवाद केला आहे. परतु हे ह्मणणे बरोबर दिसत नाहीं. बहुमानार्थी अनेकवचन असल्यास तें एकाच सूक्तांत तरी सर्वत्र पाहिजे. पण तसा प्रकार नाहीं. अनेकवचनी प्रयोगानतर लगेच पुढे उषेला एकवचनांतही संबोधिले आहे. यास्काच्या अर्थावर दुसरेही आक्षेप आहेत. उषेला ज्या नानाप्रकारच्या उपमा दिल्या आहेत त्यावरून त्या अनेक आहेत असें ह्मणण्याचा वैदिक ऋषींचा आशय स्पष्ट दिसतो. ऋ.१,९२,१ मध्यें त्यांना 'वीरांची' ( धृष्णवः ) व १,९२,३ मध्ये 'उद्योगव्यापृत नारींची ' उपमा दिली आहे. ६,६४,१ मध्ये 'पाण्याच्या लाटांप्रमाणें ( अपां न ऊर्मयः ) क्षितिजावर दिसतात असें, आणि ४,५१,२ मध्यें 'यज्ञस्तंभांप्रमाणें ( अध्वरेषु स्वरवः ) असें त्यांच्या

संबंधानें ह्मटलें आहे. त्या ‘ सज्ज झालेल्या पुरुषांप्रमाणें ’ ( विशो न युक्ताः ) काम करतात असें ७,७९,२ मध्यें आणि ‘ गाईच्या कळपाप्रमाणें चालतात ’ ( गवां न सर्गाः ) असे ४,५१,८ यांत सांगितले आहे. त्या सर्व ‘ सारख्या ’ ( सदृशीः ) आहेत व ‘ एक मताच्या आहेत ’ ( संजानते ) असे त्याचे अनुक्रमे ४,५१,६ आणि ७,७६,५ यांत वर्णन आहे. या शेवटल्या ऋचेंत तर ‘ त्या एकाच ठिकाणी रहात असूनही ( समाने उर्वे ) एकमेकींशी भांडत नाहीत ( मिथः न यतन्ते ) असे सांगितले आहे. तसेंच १०,८८,१८ मध्ये ‘ अग्नि एकंदर किती आहेत, सूर्य किती आहेत, तशाच उषा ( उषासः ) किती आहेत असा स्पष्ट प्रश्न विचारिलेला आहे. उषेला केवळ बहुमानार्थी अनेक वचन लाविले असल्यास या प्रकाराचा उलगडा कसा करावयाचा ? ही अडचण लक्षांत आणूनच बहुतकरून सायणाचार्यांनी त्या अनेक वचनांचा संबध प्रातःकालिक अनेक देवतांशी लाविला आहे. पण ही तोड समाधानकारक नाही. यावर आता या पक्षाचे एवढेच ह्मणणे उरले आहे कीं, या अनेकवचनांचा संबध निरनिराळ्या दिवसाच्या निरनिराळ्या उषांशी असेल. हें ह्मणणें सकृद्दर्शनीं खरेंही वाटेल. पण विचार केल्यास त्याचा फोलपणा लक्षात येईल. ३६० दिवसांच्या ३६० उषानां अनुलक्षून जर अनेकवचनी प्रयोग केला असेल, तर ‘ ह्या त्या उषा ज्या क्षितिजावर फिरकुंलागल्या’ असे जें प्रत्यक्ष पुढे घडत असलेल्या गोष्टीचे वर्णन ऋ. १,९२,१ यांत केलें आहे त्याचा अर्थ काय ? शिवाय वर्षाच्या ३६० उषांनां ‘ युद्धास सज्ज झालेल्या वीरांची ’ उपमा कशी जुळेल ? तसेंच ‘ एका ठिकाणीं रहात असूनही त्या एकमेकींशी भांडत नाहीत. ’ असें चोवीस तासांच्या अवधीने विभक्त असलेल्या वर्षाच्या ३६० उषांना कसे ह्मणतां येईल ? ह्मणजे एकंदरींत वरील सर्व वर्णने सूर्योदयाने अखंडित अशा उषःकलापाला ह्मणजे ध्रुवावरील दीर्घ उषेला लाविल्याशिवाय उपाय नाही. चोवीस तासांच्या एका उषःप्रदक्षिणेला एक उषा ह्मटल्यानें व अशा पुष्कळ उषा मिळून एकच मोठी थोरली उषा होत असल्यामुळेच तिच्यासंबधी एकवचनी किंवा अनेकवचनी असे प्रयोग आलेले आहेत.

---

१. कत्यग्नयः कतिसूर्यासः कत्युषासः कत्युस्विदापः ॥ ऋ. १०,८८,१८.

असें मानिल्याशिवाय उषेच्या निरनिराळया वर्णनांचा योग्य उलगडा करतां येणें शक्य नाहीं.

परंतु या मतासंबंधाने सर्व शंका दूर करणारीं अशीं अगदी स्पष्ट वचनें तै० संहितेंत आहेत. चौथ्या कांडाच्या तिसऱ्या प्रपाठकाच्या अकराव्या अनुवाकांत उषा ' तीस बहिणी ' ( त्रिंशत् स्वसारः ) असून त्या ' पांच कलापांनीं ' ( पचभिः ) वाटोळ्या फिरत ( परियन्ति ) एकाच ठिकाणी पोचतात ( समानं निष्कृत उपयन्ति ) आणि त्या सर्वांचा एकच ध्वज आहे ( समान केतुं प्रतिमुञ्चमानाः ) असें वर्णन आहे. या अनुवाकांत १५ मंत्र असून ते व्युष्टी नांवाच्या विटा वेदीवर ठेवण्याच्या वेळीं ह्मणावयाचे असतात. हा सर्व अनुवाक व त्यावरील ब्राह्मण ही याविषयीं फार महत्वाचीं आहेत. यांपैकीं कांहीं मंत्र अथर्ववेदांतही आले आहेत. पहिल्या मंत्रानें पहिली व्युष्टी ठेवावयाची असून त्यांत फक्त एकाच उषेविषयी सांगितलें आहे. दुसऱ्यांत एकाच ठिकाणी संचार करणाऱ्या दोन उषा आल्या आहेत. तिसऱ्यांत तिसरी आणि पुढे चवथी व पांचवी अशा आल्या आहेत. नतर लगेच या प्रत्येक उषेला आणखी पांच पांच बहिणी आहेत असें सांगून एकदर उषःसंख्या तीस केली आहे. पुढें या तीस बहिणी एकाच स्थानाला धरून सहा सहा जणींचा एक अशा पांच कलापांनीं वाटोळ्या फिरतात, असें सांगितलें आहे. पुढे या पांच मुख्य उषांपैकीं पहिली ऋतापासून उत्पन्न झालेली असून ( ऋतस्य गर्भः ) दुसरी " जलांचा महिमा वाढविणारी ( अपां महिमान बिभर्ति ) तिसरी सूर्याच्या प्रदेशांत फिरणारी ( सूर्यस्य निष्कृतेषु चरति ), व चवथी घर्माच्या प्रदेशांत फिरणारी असून पांचवीचें नियमन सविता करतो ( सविता एकां नियच्छति ) असें ह्मटलें आहे; यावरून या उषा उष्ण व समशीतोष्ण कटिबंधांत प्रतिसूर्योदयापूर्वी दिसणाऱ्या नव्हत हें उघड आहे. शेवटच्या मत्रांत सर्वांचें तात्पर्य ह्मणून ' ही उषा निरनिराळ्या रूपांनी प्रकाशित होत असली तरी खरोखर एकच आहे ' असें सांगितलें आहे. या सर्व अनुवाकांत सूर्योदयाचा सबध कोठेच आलेला नसून त्यावरील ब्राह्मणांत तर सांगितलें आहे की " हा काळ दिवसाचा किंवा रात्रीचा नसून अव्यावृत्त ( ओळखतां न येण्यासारखा ) होता. तेव्हां देवांनीं या व्युष्टी पाहिल्या, आणि त्यांचें उपाधान ( योग्य जागीं

योजना ) केले. तेव्हां प्रकाश झाला. ह्मणून ज्याच्यासाठीं त्यांचे उपाधान होते त्यांना प्रकाश होतो आणि त्यांचा तम नष्ट होतो.' वरील मंत्रानींच या व्युष्टी कां ठेवावयाच्या याचे कारण या ब्राह्मणांत सांगून दिवसही नाहीं आणि रात्रही नाहीं अशा संधीच्या वेळीं [ एका मागून येणाऱ्या दिवशी नव्हे ] तीस उषा देवांना दिसल्याबद्दलची पुराणकथा त्यांत दिली आहे. हे ब्राह्मण व या अनुवाकांतील 'खरोखर उषा एकच आहे' असे सांगणारा शेवटचा मंत्र यांवरून या तीस उषा अखंड असून आपल्या इकडीलप्रमाणे सूर्योदयाने खंडित नव्हत्या हे सिद्ध होते. पण याहूनही स्पष्ट पुरावा पाहिजे असल्यास तो तै. ब्रा. २,५,६,५ यांत आहे[1]. त्यांत 'ज्या प्रथम प्रकाशल्या त्याच ह्या उषा होत; या देवी पांच रूपे करितात. त्या कायम असून खंडित नसतात व त्यांचा अंतही होत नाहीं' असे वर्णन आहे. ही पांच रूपें ह्मणजे वरील अनुवाकांतील पांच उषःकलाप असून ते अखंड आहेत असे स्पष्ट ह्मटले आहे. ऋग्वेदांतील [१,१५२,४.] 'उषांच्या प्रियकराचे वस्त्र अखंडित [ अनवपृग्ण ] आणि विस्तृत [ वितत ] आहे' या वाक्याचा अर्थ वरील ब्राह्मणाच्या अनुरोधानें पहातां 'ही उषा अखंड व दीर्घ आहे' असाच केला पाहिजे. अथर्ववेदांत [ ७,२२,२. ] उषांना '**सचेतसः** आणि **समीचीः**' ह्मणजे 'एक-मताच्या' आणि 'एकत्र चालणाऱ्या' ह्मटले आहे[2]. यांतील पहिले पद ऋग्वेदांत आले आहे, व दुसऱ्याच्या समानार्थक वर्णन आहे. **समीचीः** ( एकत्र चालणाऱ्या ) या शब्दावरूनही ध्रुवावरील अखंड उषेचाच बोध होतो.

सायणाचार्यांनी तैत्तिरीय संहितेत सांगितलेल्या तीस उषांची व्यवस्था काय केली आहे हे पहाणे जरा मजेचे आहे. वर सांगितलेल्या तैत्तिरीय संहितेंतील अनुवाकावरील भाष्यांत त्यांनी ह्मटले आहे की, या अनुवा-

---

१ तै. ब्रा. २,५,६,५.–इमा एव ता उषसो या प्रथमा व्यौच्छन्। ता देव्यः कुर्वते पंचरूपा। शश्वतीर्नावपृज्यन्ति न गमंत्यन्तम्॥

२ अ. वे.–ब्रध्नः समीचीरुषसः समैरयन्। अरेपसः सचेतसः स्वसरे मन्युमत्तमाश्चिते गोः॥ भावार्थ–निकट संलग्न, एकमताच्या आणि तेजस्वी अशा उषा सूर्यानें पुढें पाठवून दिल्या आहेत.

काच्या पहिल्या मंत्रांत सांगितलेली पहिली उषा सृष्टीच्या आरंभीची आहे; व दुसरी नित्याची आहे. पण एवढ्यानेच कांहीं उषा संपल्या नाहीत. तेव्हां त्या सर्वांची नीट व्यवस्था न लावतां आल्यामुळे उषा आपल्या यौगिक शक्तीने अनेक रूपे धारण करते अशी त्यांनी वर मखलाशी केली. पण पुढे लगेच पांच उषांच्या तीस उषा झाल्या. त्याबरोबर पुनः त्या महिन्याच्या तीस दिवसांच्या तीस उषा असे त्यांनी ठरविले. पण त्यावर असा प्रश्न आहे की, या मंत्रांत वर्षाच्या ३६० उषांपैकी एकाच महिन्याच्या तीस उषा कां घेतल्या ? हे सर्व अर्थ परस्परविरुद्ध असून शेवटच्या मंत्रांत ' उषा अनेक नसून एकच आहे ' असे जे म्हटले आहे त्याच्या तर ते साफ उलट आहेत. परतु सायणाचार्यांना इतर वेदवेत्या पंडितांप्रमाणेच ध्रुवावरील उषा माहीत नसून फक्त इकडील मात्र उषा माहीत होती; यामुळे खरा अर्थ त्यांना समजला नाही तर त्यांत कांही आश्चर्य नाही. उलट त्यांनी वर वर तरी सयुक्तिक दिसणारे अनेक अर्थ सुचवून निरनिराळ्या मंत्रांचे अर्थ करण्यांत येणाऱ्या अडचणी दूर करण्याचा प्रयत्न केला हे त्यांच्या अगाध विद्वत्तेचे द्योतक आहे. आजच्या ज्ञानाच्या स्थितीत ते असते तर त्यांनी ही आपल्यासारखाच अर्थ केला असता. ज्योतिष हा वेदाचा डोळा आहे असे वेदांगशिक्षेत[1] सांगितले आहे. तर या डोळ्याची शक्ति व क्षेत्र जसजशी वाढत जातील तसतसा वेदातील अद्यापि दुर्ज्ञेय असलेल्या वाक्यांचा अर्थ लावण्याच्या कामी, या डोळ्यांच्या सहाय्याने मिळालेल्या ज्ञानाचा आपण उपयोग करून न घेणे हे मोठे दोषास्पद होईल.

" उषा तीस आहेत असे फक्त तैत्तिरीय संहितेतच सांगितले आहे. ह्मणून त्याचा ऋक्सूक्तांतील वर्णनाशीं जोड करून त्या दोहोंवरून कांही अनुमाने काढणे रास्त होणार नाही; कारण वरील अनुवाकांतील मंत्र मूळचे परस्परसंबद्ध नसून निरनिराळ्या ठिकाणांतून विशिष्ट यज्ञकर्मासाठीं घेतलेले असतील " असे कित्येकांचे ह्मणणे पडेल; व या मंत्रांपैकी थोडेसे मात्र अथर्ववेदांत आले आहेत या गोष्टीवरून तें खरेंही

---

१ शिक्षा–छंदः पादौ तु वेदस्य हस्तौ कल्पोऽथ पठ्यते । ' ज्योतिषामयनं ' चक्षुर्निरुक्तं श्रोत्रमुच्यते ॥ ४१ ॥ शिक्षा प्राणं तु वेदस्य मुखं व्याकरणं स्मृतम् । तस्मात्सांगमधीत्यैव ब्रह्मलोके महीयते ॥ ४२ ॥

भासेल. पण थोडें विचारपूर्वक पाहिल्यास ही शंका दूर होईल. कारण ६ व्या मंत्रांत ' त्या तीस बहिणी आहेत ' असें स्पष्टच म्हटलेलें आहे. शिवाय यास ऋग्वेदांतील पुरावा पाहिजे असल्यास तोही आहे. ऋ. ६,५९,६,[1] यांत ' उषा तीस पावलें चालली ' असें वर्णन आहे. या वाक्याचा खुलासा आजपर्यंत झालेला नाहीं. ' एकाच ठिकाणाला धरून तीस उषा वाटोळ्या फिरतात ' ही तैत्तिरीय संहितेंतील वर सांगितलेल्या अनुवाकांतील गोष्टच ' उषा तीस पावलें चालली ' अशा अन्य शब्दांनीं ऋग्वेदांत सांगितली आहे. ऋ. १,१२३,४[2] ही ऋचाही अशीच दुर्ज्ञेय राहिली आहे. तींत ' आजही समान आणि उद्यांही समान अशा उषा वरुणाच्या घरांत दीर्घ काळ रहातात. निरवद्य निर्दोष अशा त्या उषा आपापल्या मार्गानें तीस योजनें वाटोळ्या फिरतात ' असें म्हटलें आहे. यांत तीस योजनें याचा अर्थ काय ? क्षितिजाखालीं सूर्य तीस योजनें असतांना त्याचे किरण दिसूं लागतात ह्मणजे त्यावेळीं उषेचा उदय होतो; म्हणून उषा तीस योजनें चालते म्हणजे उषेचे किरण तीस योजनांइतका प्रदेश प्रकाशित करतात, अशा धर्तीचें सायणाचार्यांनीं या तीस योजनांचें स्पष्टीकरण केलें आहे. यांत त्यांची मोठी कल्पकता दिसून येते खरी, पण शास्त्रीयदृष्ट्या विचार केल्यास हें स्पष्टीकरण अगदीं फुकट ठरतें. सूर्य मेरुभोंवतीं म्हणजे अर्थात् पृथ्वीभोंवतीं २४ तासांत ५०५९ योजनें फिरतो, असें सायणाचार्य म्हणतात. म्हणजे त्यांच्या मतें पृथ्वीचा परीघ ५०५९ योजनें झाला. पृथ्वीचा परीघ २४८७७ मैल आहे हें आतां सर्व प्रसिद्ध आहे. त्यावरून एक योजन म्हणजे सुमारें ५ मैल झालें, व तीस योजनें म्हणजे १५० मैल अंतर झालें. पण सूर्याचे किरण वस्तुतः तो क्षितिजाखालीं १६ अंश असल्यापासूनच खास दिसूं लागतात. एक अंश म्हणजे ६० मैल धरिलें तरी १६ अंशाचे ९६० मैल झाले.

---

१ इंद्राग्नी अपादियं पूर्वागात्पद्वतीभ्यः । हित्वी शिरो जिव्हया वावदच्चरत् त्रिंशत्पदान्यक्रमीत् ॥ ऋ. ६,५९,६.

२. सदृशीरद्य सदृशीरिदु श्वो दीर्घं सचन्ते वरुणस्य धाम । अनवद्यास्त्रिंशतं योजनान्येकैका क्रतुं परि यन्ति सद्यः ॥ ऋ. १,१२३,४.

हें अंतर सायणाचार्यांच्या अंतराहून सहापटींपेक्षांही अधिक आहे. तसेंच आणखी ऋ० ६,५९,६ मधील तीस पावलांचाही या खुलाशाने उलगडा होत नाही. म्हणजे शेवटीं 'तीस योजनें,' ' तीस बहिणी, ' आणि ' तीस पावलें ' हे सर्व शब्द एकाच गोष्टीचे ह्मणजे ध्रुवावरील दिनावधि तीस उषःप्रदक्षिणांचे वाचक आहेत, असें म्हणावे लागते. या वर्णनांतील **परियन्ति** ' वाटोळ्या फिरतात ' हे शब्दही ध्रुवावरील उषेच्या प्रदक्षिणेलाच बरोबर लागू पडतात. **योजन** शब्दाचा मूळचा अर्थ ' रथ ' असा असून पुढे तो ' एका दमाने घोडे जितके अंतर जातात तितके अंतर ' ऊर्फ ' टप्पा ' असा झाला. हा टप्पा ह्मणजे एका दिवसाचा प्रवास ह्मणावयास हरकत नाहीं. मॅक्स मुल्लरने ऋ. ५,५४,९. यांतील ' योजन ' शब्दाचा असाच अर्थ केला आहे. हा अर्थ घेतला असतां **त्रिंशतं योजनानि परियन्ति** ( तीस योजने वाटोळ्या फिरतात ) याचा अर्थ उषा दिनावधि तीस प्रदक्षिणा करितात ( उत्तर ध्रुवावर करतात त्याप्रमाणे ) असा होईल. या वाक्यांत चक्राकार गतीच उद्दिष्ट आहे, यांत संशय नाहीं. कारण, ऋग्वेदांत दुसरे एके ठिकाणी [ ३,६१,३. ] ' एकाच अर्थाकडे जाणारी तूं चक्राकार फीर ' असें उषेला संबोधून स्पष्ट म्हटले[१] आहे. आतां, चक्राकारगति क्षितिजसमान्तर किंवा उभी ' गाडीच्या चाकांप्रमाणे ' वाटेल तशी कल्पितां येईल; पण उषेची उभी चक्राकार गति कोठेही असणे शक्य नाहीं. अर्थात् उरलेली कुंभाराच्या चाकासारखी आडवीच गति घेतली पाहिजे, आणि ती तर ध्रुवेतर ठिकाणीं संभवनीय नाहीं. म्हणजे वरील ऋचेतील वर्णन ध्रुवावरील उषेलाच केवळ लागू पडणारें आहे असे झालें. ' एकाच ठिकाणी पोंचणाऱ्या ' हें वर्णनही एका ठिकाणाहून निघून चोवीस तासांच्या अवधीने त्याच ठिकाणीं पुनः पुनः येणाऱ्या उषेलाच केवळ लागणारे आहे. तात्पर्य, ऋग्वेद आणि तैत्तिरीयसंहिता या दोहोंतही तीस दिनावधि उषा मिळून झालेल्या अखंड व दीर्घ अशा उषेचे म्हणजे ध्रुवविशिष्ट उषेचें वर्णन आहे असे सदरील सर्व विवेचनावरून एकच अनुमान निघतें.

---

१ उषः प्रतीची भुवनानि विश्वोर्ध्वा तिष्ठस्यमृतस्य केतुः ।
समानमर्थं चरणीयमाना चक्रमिव नव्यस्या ववृत्स्व ॥ ऋ. ३,६१,३.

ऋग्वेदांत उषेविषयीं अनेकवचनी प्रयोग दुसऱ्याही पुष्कळ ठिकाणीं आलेले आहेत; व त्यांत बऱ्याच ठिकाणी उषांच्या मागून प्रातःकालिक देवता येतात असें वर्णन* आहे. या अनेक उषा ह्मणजे ३६० दिवसांच्या ३६० उषा नसून ध्रुवावरील दीर्घ उषेचे दिनावधि भाग होत हें ऋग्वेद, तै. संहिता आणि अथर्ववेद यांतील वचनांविषयी वर केलेल्या विवेचनावरून दिसून येणार आहे. तथापि यावरून ऋग्वेदांत आपल्या-इकडील सारख्या अल्पकालावधि उषेचे मुळींच वर्णन नाही असें मात्र समजतां कामा नये. इतकेंच नव्हे तर त्यांतील एकंदर उषेच्या वर्णनापैकीं बराच भाग चोवीस तासांच्या दिवसांत दिसणाऱ्या लहानशा उषेला तसाच ध्रुवावरच्या दीर्घ उषेलाही लागू पडणारा आहे. उदाहरणार्थ, 'प्रत्येक प्राण्याला जागें करणारी' किंवा 'तमाने झाकलेले निधि प्रकाशांत आणणारी' अशाप्रकारचीं वर्णनें दोन्ही प्रकारच्या उषांनां लावतां येतील. तेव्हां ऋक्सूक्तांत आढळणाऱ्या विशेष गोष्टीवरून काढलेल्या अनुमानांना कांहीं अशा वाक्यांनी बाध येत नाहीं. ज्या उषेच्या आगमनाची वैदिक ऋषी इतक्या आतुरतेनें वाट पहात असत व जिचे त्यांनी आपल्या सूक्तात फार सुंदर असे याथातथ्यानें वर्णन केले आहे ती उषा इकडील सारखी अल्पावधि नसून ध्रुवावरील दीर्घ उषाच होय असे दाखविण्याचा या विवेचनाचा हेतु आहे. तो सिद्धीस गेला असल्यास मग ऋग्वेदांत अन्य कांही ठिकाणीं साध्या अल्पकालिक उषेचे वर्णन असल्यास त्याची नड नाहीं. चांद्रसौर मानांचा मेळ घालण्यासाठीं कधीं कधीं तेरावा महिना धरणाऱ्या ऋषीनां अल्पावधि उषा माहीत होती हे उघडच आहे. उषा ही वैदिक देवता ऋषींनाही प्राचीन असून तिचें वर्णन त्यांना परंपरागत माहीत होतें, व ते त्यांनीं जशाचें तसे आजही आपल्यासाठीं राखून ठेविले आहे. हें ज्ञान त्यांना हजारो वर्षे कसे ठेवितां आलें ह्याचा विचार पुढे करूं; सध्या इतकेंच सांगणे पुरे आहे कीं आज ब्राह्मण मंडळींनीं चार पांच हजार वर्षे जसे वेद शब्दशः राखून ठेविले आहेत तसेच पूर्वीही ते राहिले होते.

---

* १ ६,३;१,१८०,१;५,७६,१;७,९,१;७,६३,३ इ०.

वरील विवेचनावरून असें दिसून येईल कीं वैदिक वाङ्मयांतील उषेच्या वर्णनाचें आधुनिक शास्त्रीय शोधांच्या साहाय्याने सूक्ष्म निरीक्षण केल्यास त्यावरून खालील अनुमाने स्पष्ट निघतात.

(१) ऋग्वेदांत वर्णिलेली उषा इतकी दीर्घ होती कीं तिच्या प्रथमदर्शनापासून सूर्योदयापर्यन्त **कित्येक दिवस** ( चोवीस तासांचे अवधि ) जात असत; अथवा पुष्कळ उषा एकामागून एक येऊन त्यांचें सूर्योदयांत पर्यवसान होई. ( ऋ. ७,७६,३;२,२८,९. ).

(२) ऋग्वेदांत उषेविषयीं जे अनेकवचनी प्रयोग आहेत, ते केवळ बहुमानार्थक किंवा वर्षाच्या ३६० उषांचे दर्शक नसून ध्रुवावरील दीर्घ उषेच्या दिवसावधि **तीस भागांचे** द्योतक आहेत. ( १,२३,८;६,५९,६; तै. सं. ४,३,११,६. ).

(३) पुष्कळ उषा **एकाच ठिकाणीं** राहून **एकमतानें** वागत आणि कधीही एकमेकींशी **भांडत नसत** (४,५१,७–९; ७,७६,५; अ. वे. ७,२२,२).

(४) उषेचे **तीस भाग** पृथक् पृथक् नसून **एकाला एक लागून** असे **अखंडित** होते. ( १.१५२,४; तै. ब्रा. २,५,६,५; अ. वे. ७,२२,२ )

(५) या तीस उषा किंवा एकाच उषेचे तीस भाग **चक्राप्रमाणें वाटोळे फिरत** व पुनः त्याच ठिकाणीं येत.

या सर्व गोष्टी ध्रुवावर किंवा त्याच्या जवळच्या प्रदेशांत दिसणाऱ्याच आहेत हे सांगावयास नकोच. त्यांत शेवटची तर खुद्द ध्रुवावरच शक्य आहे. तर आतां उषा ही वैदिक देवता मूळ ध्रुवोत्पन्न आहे असें अनुमान करावयास कोणतीही हरकत नाहीं. यावर एक शंका येण्यासारखी आहे; ती अशी कीं ध्रुवावरची उषा ४५ पासून ६० दिवसांची असतां ती फक्त तीसच दिवसांची वरील वर्णनांत सांगितली आहे हें कसें ? पण ही अडचण फारशी महत्वाची नाहीं. तेजाचें वक्रीभवन किंवा परावर्तन करण्याच्या वातावरणाच्या शक्तीवर उषेचा अवधि अवलंबून असतो; व ही शक्ति कमीजास्त उष्णतामानावर अथवा दुसऱ्या कांहीं परिस्थितीवर अवलंबून असते. शिवाय खुद्द ध्रुवबिन्दूच्या थोडेसें खालीं आल्यासही उषेचा अवधि कमी होईल. ह्मणजे उषेच्या

वर दिलेल्या वर्णनात ज्योतिःशास्त्राच्या विरुद्ध असे कांही नाही. आणखी हेंही लक्षांत ठेविलें पाहिजे कीं ही उषा कधीं कधी ठराविक वेळापेक्षां अधिक वेळ क्षितिजावर राहिल्यामुळें कंटाळून लवकर जाण्याविषयींही तिची ऋग्वेदांत प्रार्थना केली आहे* [ ५,७९,९ ]. अशा वेळीं म्हणजे उषा वाजवीपेक्षां जास्त काळ क्षितिजावर राहिल्यास कधी कधी इंद्राला तिचा रथ मोडून टाकून सूर्याला वर आणावा लागे (ऋ.[1] २,१५,६). हीच गोष्ट इतर ठिकाणींही अन्यरूपानें आली आहे. ( ऋ. ४,३०, ) यासूक्ता मध्यें इंद्राच्या पराक्रमाचे वर्णन करतांना त्यानें उषेच्या रथाचा चकाचूर करून तिचे हनन केले असे म्हटले[2] आहे. या गोष्टीचा संबंध मेघडंबरा-मुळे लुप्त झालेल्या उषेकडे आजपर्यंत लावीत आले आहेत. पण हें करणे तितके सयुक्तिक दिसत नाहीं. एकदांच घडलेली गोष्ट कांहीं अशा कथेचा मूलाधार असेल असे संभवत नाहीं; तसेच प्रतिदिनीं नेमक्या उषेच्या वेळेला मेघ येऊन ती लुप्त होत असे असेही संभवत नाही. शिवाय ' ती फार वेळ थांबल्यामुळें तिचा रथ मोडून टाकला ' या शब्दांची फोड वरील खुलाशानें होत नाही. आपल्या उपपत्तीनेंच म्हणजे साधारण मानानें तीस दिवस दिसणारी उषा स्थानपरत्वे व हवामानपरत्वें अधिक दिवस दिसण्याच्या वेळचे हे वर्णन आहे असे मानिल्यानेंच त्यांचा नीट उलगडा होतो. उषा आणि इतर प्रातःकालिक देवता याविषयींच्या दुस-ऱ्याही अनेक कथा ध्रुवोपपत्तीवरून नीट समजण्यासारख्या आहेत; परंतु या उपपत्तीच्या सिध्यर्थ प्रत्यक्ष प्रमाणे सर्व देऊन झाल्यावर त्यांचा स्वतंत्रपणें विचार करूं.

आतां उषा ही वैदिक देवता मूळची ध्रुवोत्पन्न आहे असें मानिल्यास असा प्रश्न उत्पन्न होतो कीं ' वैदिक ऋषींच्या पूर्वजांनीं तिला हिमोत्तर-कालांत न पहातां हिमपूर्वकालांतच पाहिली असली पाहिजे; मग या

---

* व्युच्छा दुहितर्दिवो माचिरंतनुथा अपः । नेत्वास्तेनं यथा रिपुं तपाति सूरो अर्चिषा ॥ ऋ. ५,७९,९.

१ वज्रेणान उषसः सं पिपेष । ऋ. २,१५,६.

२ एतद् घेदुत वीर्यमिंद्र चकर्थ पौंस्यम् । स्त्रियं यद्दुर्हणायुवं वधीर्दुहितरं दिवः ॥ ऋ. ४, ३०, ८.

प्राचीन काळाचे उल्लेख ऋक्सूक्तांत कां आढळूं नयेत ? ' असे उल्लेख सुदैवानें ऋग्वेदांत कित्येक ठिकाणी आहेत. ' शश्वत्पुरोषा व्युवास देवी ' म्हणजे ' पूर्वी उषा देवी एकसारखी प्रकाशत असे ' ( ऋ० १, ११३, १३ ) असे जे म्हटलें आहे त्यांत **पुरा** याचा अर्थ याच कल्पांतील प्राचीनकाळीं असा नसून मागच्या कल्पांतील ( पुरा कल्प ) असा आहे. इंद्राचे **पहिले पराक्रम** (इद्रस्य नु वीर्याणि प्रवोचं यानि चकार **प्रथमानि** वज्री ऋ० १,३२,१ ) किंवा ' हे पहिले धर्म होते ' ( तानि धर्माणि **प्रथमान्यासन्** १०,९०,१६ ) अशा वाक्यांतील **पहिला** याचा अर्थ अतिप्राचीन असाच केला पाहिजे. याच कारणास्तव बहुधा सायणाचार्यांनीं ' प्रथमा उषा ' म्हणजे सृष्टीच्या आरंभीची उषा असा अर्थ केला असावा. तै० संहितेत तर देवांनी तीस उषा पाहिल्याची गोष्ट प्राचीन ह्मणून ह्मटलेंच आहे. असे असतांनां उषेच्या प्राचीनत्वाविषयी ऋग्वेदांत कांहीं सांगितलेले नाहीं असें कसें ह्मणतां येईल ! या विषयाचें विशेष विवेचन आपल्या उपपत्तीला आधारभूत असलेला इतर सर्व प्रत्यक्ष पुरावा देऊन झाल्यावर करूं. ऋग्वेदांतील कित्येक मनोरम सूक्तांचा विषय होऊन बसलेली जी उषा तिच्या अवधीचा विचार करून, ती देवता ध्रुवविशिष्ट आहे असे दाखविण्यासाठीं येथवर पुरावा देऊन त्याचें विवरण केलें. आतां त्याच्या पुढच्या ध्रुवविशिष्ट गोष्टी घेऊन त्यांच्यावरून आपल्या उपपत्तीला बळकटी आणणारा आणखी कांहीं पुरावा ऋग्वेदांत मिळतो की नाही ते पाहूं.

---

## पांचव्या प्रकरणाची पुरवणी.

## तीस उषा.

८७ आणि ८८ या पानांवर सांगितलेलीं तैत्तिरीय संहितेतील वचनें.

तै. सं. कांड ४ थें, प्रपाठक ३, अनुवाक ११.

**इयमेव सा या प्रथमा व्यौच्छदन्तरस्यां चरति प्रविष्टा ।**
**वधूर्जजान नवगज्जनित्री त्रय एनां महिमानः सचन्ते ॥ १ ॥**
**छन्दस्वती उषसा पेपिशाने समानं योनिमनु सञ्चरन्ती ।**
**सूर्यपत्नी वि चरतः प्रजानती केतुं कृण्वाने अजरे भूरि रेतसा॥२॥**
**ऋतस्य पंथामनु तिस्र आगुस्त्रयो घर्मासो अनु ज्योतिषाऽऽगुः ।**
**प्रजामेकारक्षत्यूर्जमेका व्रतमेका रक्षति देवयूनाम् ॥ ३ ॥**
**चतुष्टोमो अभवद्या तुरीया यज्ञस्य पक्षावृषयो भवन्ती ।**
**गायत्रीं त्रिष्टुभं जगतीमनुष्टुभं बृहदर्कं युञ्जानाः सुवराभरन्निदम् ॥४॥**

---

टीप.—या अनुवाकातील १, २, ३, ४ हे मंत्र अथर्ववेदांतही थोड्याबहुत फरकानें आले आहेत. ते असे.

इयमेव सा या प्रथमा व्यौच्छदास्वितरासु चरति प्रविष्टा ।
महान्तो अस्यां महिमानो अन्तर्वधूर्जिगाय नवगज्जनित्री ॥
(अ. वे. ३, १०,४ व ८, ९, ११).
छन्दःपक्षे उषसा पेपिशाने समानं योनिमनु सं चरेते ।
सूर्यपत्नी सं चरतः प्रजानती केतुमती अजरे भूरि-रेतसा ॥
ऋतस्य पन्थामनु तिस्र आगुस्त्रयो घर्मा अनु रेत आगुः ।
प्रजामेका जिन्वत्यूर्जमेका राष्ट्रमेका रक्षति देवयूनाम् ॥ अ.वे.८,९,१२,१४.

पंचभिर्धाता विदधाविदं यत्तासां स्वसॄरजनयत् पंचपंच ।
तासामु यन्ति प्रयवेण पंच नाना रूपाणि क्रतवो वसानाः ॥ ५ ॥
त्रिंशत्स्वसार उप यन्ति निष्कृतं समानं केतुं प्रतिमुञ्चमानाः ।
ऋतूंस्तन्वते कवयः प्रजानतीर्मध्ये छन्दसः परि यन्ति भास्वतीः ६
ज्योतिष्मती प्रति मुञ्चते नभो रात्री देवी सूर्यस्य व्रतानि ।
वि पश्यन्ति पशवो जायमाना नानारूपा मातुरस्या उपस्थे ॥ ७ ॥
एकाष्टका तपसा तप्यमाना जजान गर्भं महिमानमिन्द्रम् ।
तेन दस्यून् व्यसहन्त देवा हन्ताऽसुराणामभवच्छचीभिः ॥ ८ ॥
अनानुजामनुजां मामकर्त सत्यं वदन्त्यन्विच्छ एतत् ।
भूयासमस्य सुमतौ यथा यूयमन्या वो अन्यामति मा प्र युक्त ॥९॥
अभून्मम सुमतौ विश्ववेदा आष्ट प्रतिष्ठामविदाद्धि गाधम् ।
भूयासमस्य सुमतौ यथा यूयमन्या वो अन्यामति मा प्र युक्त॥१०॥

---

अग्नीषोमावदधुर्या तुरीयासीद्यज्ञस्य पक्षावृषयः कल्पयन्तः ।
गायत्रीं त्रिष्टुभं जगतीमनुष्टुभं बृहदर्की यजमानाय स्वराभरन्तीम् ॥
(अ. वे. ८, ९, १४).

८.—हा मंत्र अथर्ववेदांतही आला आहे (३, १०, १२). त्यांत दुसऱ्या चरणांत थोडा फरक आहे. तो असा.

तेन देवा व्यषहन्त शत्रून् हन्ता दस्यूनाभवच्छचीपतिः ।

११. अ. वे. ८, ९, १५, "समानमूर्ध्नीः"च्या ऐवजीं त्यांत 'ता एक-मूर्ध्नीः' असें आहे.

पंच व्युष्टीरनु पंच दोहा गां पञ्चनाम्नीमृतवोऽनु पंच ।
पञ्च दिशः पञ्चदशेन क्लृप्ताः समानमूर्ध्नीरभि लोकमेकम् ॥११॥

ऋतस्य गर्भः प्रथमा व्यूषुष्यपामेका महिमानं बिभर्ति ।
सूर्यस्यैका चरति निष्कृतेषु घर्मस्यैका सवितैकां नि यच्छति॥१२॥

या प्रथमा व्यौच्छत् सा धेनुरभवद्यमे ।
सा नः पयस्वती धुक्ष्वोत्तरामुत्तरा ऽ समाम् ॥ १३ ॥

शुक्रर्षभा नभसा ज्योतिषाऽऽगाद् विश्वरूपा शबलीरग्निकेतुः ।
समानमर्थं ऽ स्वपस्यमाना बिभ्रती जरामजर उष आगाः ॥१४॥

ऋतूनां पत्नी प्रथमेयमागादन्हां नेत्री जनित्री प्रजानाम् ।
एका सती बहुधोषा व्युच्छस्यजीर्णा त्वं जरयसि सर्वमन्यत् ॥१५॥

तै. सं. का. ५, प्र. ३, अनु. ४, वर्ग ७.

न वा इदं दिवा न नक्तमासीदव्यावृत्तं ते देवा एता
व्युष्टीरपश्यन् ता उपादधत ततो वा इदं व्यौच्छद्यस्यैता
उपधीयन्ते व्येवास्मा उच्छत्यथो तम एवाप हते ।

---

१३. अ. वे. ३, १०, १. 'या प्रथमा व्यौच्छत्' बद्दल त्यांत 'प्रथमा ह व्युवास ।' आणि 'धुक्ष्व' बद्दल 'दुहाम्' असें आहे. ऋ. ४, ५७,४ यांतही दुसरें अर्ध अथर्ववेदाप्रमाणेंच आहे.

# भावार्थ.

## तै. सं ४,३,११.

१ जी प्रथम प्रकाशमान झाली तीच ही (उषा). हिच्यांत (पृथ्वींत) प्रविष्ट होत्साती ती भ्रमण करिते. नूतन विवाहवती प्रजोत्पादिका वधू उत्पन्न झाली. महिमायुक्त असे तिघे तिच्या मागोमाग येतात.

२ छंदांनीं युक्त प्रकाशमान होणाऱ्या व एकाच स्थानांत संचार करणाऱ्या अशा दोन उषा सूर्याच्या पत्न्या जराविरहित व प्रचुर रेतानें युक्त होत्सात्या (आपला मार्ग) बरोबर जाणत व पताका प्रकट करीत भ्रमण करितात.

---

टीपः—**१ या प्रथमा व्यौच्छद्**—जी प्रथम प्रकाशमान झालीः—अर्थात् पुढें सांगितलेल्या तीस उषांपैकीं पहिली. उषेपासून नूतन वर्षाचा आरंभ होतो असें पुढें तेराव्या मंत्रांत सांगितले आहे. अर्थात् या तीस उषा वर्षारंभीच्या असून त्यांतील पहिली पहिल्या मंत्रांत सांगितली आहे. ही उषा सृष्ट्यारंभ-कालीन होय असें सायणाचार्यांचे मत आहे (आदिसृष्टिकाले प्रथमो यः प्रभात-कालस्तद्रूपेयमिष्टकेत्यर्थः). परंतु संदर्भावरून तसे दिसत नाहीं.

**हिच्यांत प्रविष्ट होत्साती**:—हिच्यांत ह्मणजे पृथ्वींत (**पृथिव्यां**—सायण) अथर्ववेदांतील पाठाप्रमाणे 'इतरां (उषांत) मध्ये प्रविष्ट होत्साती' असा अर्थ होईल. या अर्थाप्रमाणें पहातां अनेक उषांच्या कलापापैकीं ही एक होय असें स्पष्ट होतें.

**महिमायुक्त असे तिघे**—अग्निसूर्यचंद्ररूपाः देवताः (सायण). यास्कानें अग्नि, वायु किंवा इंद्र आणि सूर्य अशा तीन मुख्य देवता सांगितल्या आहेत (नि. ७, ५,). 'तीन अग्नी (घर्म) उषेबरोबर येतात' (त्रयो घर्मासा उषसं सचन्ते) असें ऋग्वेदांत सांगितलें आहे (३, ३१, ७). तसेंच ७, ७८, ३ यांत उषांनीं सूर्य, यज्ञ आणि अग्नि यांना उत्पन्न केलें असे ह्मटलें आहे. या तीन देवता निरनिराळ्या प्रकारांनी सांगितल्या असल्या तरी प्रस्तुत मंत्रां-तील उल्लेखाचा संबंध प्रथम उषेच्या उदयानंतर होणाऱ्या सूर्योदयाशीं व यज्ञाग्निप्रज्वलनाशीं आहे हें उघड आहे.

**२ छंदांनीं युक्त**—छंदोयुक्त मंत्रांनीं स्तुति केलेल्या (सायण). सूक्तपठणानें

३ तिघी ( उषा ) ऋताच्या मार्गानें येत्या झाल्या. प्रकाशासह तीन अग्नी (घर्म) तिच्या मागून येते झाले. त्या उषां पैकी एक (यजमानाच्या) प्रजेचे रक्षण करिते, दुसरी बलाचें रक्षण करिते आणि तिसरी ईश्वर-प्राप्तीची इच्छा करणाऱ्यांच्या कर्माचे रक्षण करिते.

४ जी चवथी उषा ती यज्ञाचे पक्ष जे ऋषी त्यांप्रमाणे आचरण करणारी होत्साती चतुष्टोम झाली. गायत्री, त्रिष्टुभ्, जगती आणि अनुष्टुभ् व मोठे स्तोत्र याच्या योजनेने त्यांनी हा प्रकाश आणिला.

---

प्रभात काल दुमदुमून गेल्याचे ऋ, ३, ६१, १ आणि ६ यावरून दिसून येईल. पुढे ६ व्या मंत्रांतील ' मध्ये छंदसः ' यां शब्दांतही हीच कल्पना आहे.

या मंत्रांतील उषेला दिलेलीं विशेषणे ऋग्वेदांतही तिला अनेक ठिकाणीं दिलेली आहेत. ( पहा, ऋ. १,९२,४,७,७६,५,४,५,१३;१,११३,१३ )

**दोन उषा**–सायणाचार्यांच्या मते पहिली उषा सृष्ट्यारंभकालीन व दुसरी दररोजची होय ( द्वे ह्युषसौ, एका सृष्टिकालीना ' प्रथमा ' इति पूर्वमंत्रोक्ता अपरा प्रतिदिनसंचारिणी). पण यापुढे आचार्यांनी हा अर्थ सोडून दिलेला दिसतो. पहिल्या उषेनंतर आणखी एक आल्याने आता त्या दोन झाल्या हे उघड आहे. दोन, तीन, पांच किंवा तीस उषांचे कलाप एकत्र संचार करतात असे सांगितलें असल्यामुळे त्या उषा प्रतिदिनीं येणाऱ्यांपैकीं नव्हत यांत शंका नाही. या उषा सूर्य प्रकाशान्तरित नसून अखंड एकी मागून एक येणाऱ्या होत.

**३ तिघी उषा**–मागच्या दोन व ही एक मिळून आतां तीन झाल्या. या संख्यावृद्धीचे कारण आचार्यांनी सांगितलेलें नाही.

**४ चवथी उषा**--आतां आणखी एक मिळून चार उषा झाल्या. उषा वास्तविक एकच असून योग सामर्थ्यानें अनेक रूपे धारण करिते असे सायणाचार्य ह्मणतात! ( यद्यपि एकैव उषा तथापि जगद्रक्षणाय योगैश्वर्यादनेक शरीरस्वीकारे सति बहव उषसो भवन्ति ).

**ऋषींप्रमाणें आचरण करणारी** इ.—चार ऊषांना चतुष्टोमाची उपमा दिली आहे. ऐ. ब्रा. ३,४२ यांत चतुष्टोमाचें वर्णन दिले आहे. गायत्री इ. त्यांतील छंद होत. या स्तोमाचें फल प्रकाश. **सुवः** याचा स्वर्गलोक असा अर्थ सायणाचार्यांनी केला आहे

५ विधात्यानें या पांचांसह प्रत्येकीला पांच पांच याप्रमाणें स्वसा (बहिणी) निर्माण केल्या. त्यांचे पांच मार्ग (क्रतु) नाना रूपे धारण करीत समूहानें गमन करतात.

६ समान पताका धारण करणाऱ्या तीस स्वसा नियमित स्थानाकडे गमन करतात. ज्ञानयुक्त होत्सात्या त्या क्रतु उत्पन्न करतात. तेजस्वी अशा त्या ( आपला मार्ग ) जाणत, छदांच्या गजरांस चक्राकार भ्रमण करतात ( परियन्ति ).

---

५ **पांचांसह**—उषांची संख्या पांच झाल्यावर पांचा पांचानी पुढील सृष्टि झाली.

**पांच मार्ग**—' तासां पंच क्रतवः प्रवयेन यन्ति ' असा अन्वय. क्रतवः म्हणजे यज्ञ असा अर्थ सायणाचार्यांनी केला आहे. पण ' अनवद्या त्रिंशतं योजनान्येकैका क्रतुं परियन्ति सद्यः" यांत क्रतु याचा अर्थ 'नियत स्थान' असा उघड आहे (१,१२३,८. पान ९० पहा) तोच अर्थ येथेही घेतला पाहिजे.

**समूहानें**—सहा उषांचा एक कलाप असे तीस उषांचे पांच कलाप झाले. " ता देव्य कुर्वते पंच रूपा " हे तै. ब्राह्मणांतील ( २,५,६,५ ) मागे सांगितलेले वाक्य पहा (पान ८८). आपापल्या नियत स्थानांत व्यक्तिशः फिरणाऱ्या अशा तीस उषांचे पांच कलाप यांत वर्णिले आहेत. प्रत्येक कलापांत सहा सहा उषा असून त्यांचे प्रत्येकी नियत मार्ग असल्यामुळे हे पांच क्रतु विविध रूपे धारण करतात असें म्हटले आहे.

६. **तीस स्वसा**—महिन्याच्या तीस दिवसांच्या मिळून तीस उषा होत असे आचार्यांनी ५ व्या मंत्राच्या भाष्यांत सांगितले आहे. परंतु ३६० दिवसांपैकी फक्त एकाच महिन्याच्या तीस उषा कां सांगितल्या याचा खुलासा त्यांनी केलेला नाही. शिवाय हा त्यांचा अर्थ संदर्भाविरुद्ध आहे ( पान ८९ पहा ). उषांना स्वसा असे ऋग्वेदांतही म्हटले आहे. ( १, १२४,८–९ )

**नियतस्थान—निष्कृतम्**-हा शब्द उषांच्या मार्गांचा वाचक असा ऋग्वेदांतही आला आहे ( १,१२३, ९ अहरहर्निष्कृतमाचरन्ती ). दैनंदिन परिभ्रमणामध्ये उषा एकाच स्थानी येत असतील तरच हा शब्द यथार्थ होईल.

७ नभामध्यें प्रकाशमान होणारी रात्री देवी सूर्याच्या व्रतांचा स्वीकार करते. या मातेच्या ( पृथ्वीच्या ) उत्संगावर ( मांडीवर ) उत्पन्न होणारे नानाविध पशू विविध व्यवहार पाहूं लागतात.

८ तपाच्या योगानें तेजस्वी होणारी एकाष्टका महिमायुक्त अशा इन्द्र-रूप गर्भाला जन्म देती झाली. त्याच्या साहाय्यानें देवांनीं शत्रूंना हत-वीर्य केले. आपल्या सामर्थ्यानें तो असुरांचा वधकर्ता झाला.

---

**मध्येच्छंदसः परियन्ति—मध्येछंदाः** हें विशेषण सूर्याचे समजून उषा सूर्याभोंवती फिरतात असें सायणाचार्यांनी ह्मटलें आहे. परंतु इतका दूरचा अर्थ घेण्याचे कारण नाहीं. उषःकालीही छंदोगायन चाललेलें असतेंच.

**७ नभामध्यें—नभः** ह्मणजे 'नभस्थस्य' असें समजून आचार्यांनी त्याचा संबंध सूर्याकडे लाविला आहे. कसेंही केले तरी मुख्यार्थ बदलत नाहीं.

**पशवः**—प्रातःकालिक तेजाचाच वाचक हा शब्द आहे. त्याला बहुधा गाई ( गावः ) या पदानें उल्लेखिले असते. ऋ. १,९२,१२ यांत उषेला ' पशून् प्रथाना '–' पशूंना पसरणारी ' असें म्हटले आहे.

**८. एकाष्टका**—इन्द्राचा जन्म म्हणजे अर्थात् या तीस अखंड उषानंतर होणारा सूर्योदय होय. एकाष्टका म्हणजे माघ वद्य अष्टमी असा अर्थ आप-स्तंब सूत्राला ( ८,२१,१० ) अनुसरून सायणाचार्यांनीं केला आहे. वेद-कालनिर्णयांतील कृत्तिकाप्रकरणांत सांगितलेल्या संवत्सरसत्राचे अनुवाकांत ( तै. सं. ७,४,८ ) एकाष्टकेचा हाच अर्थ असावा; याविषयीं विवेचन तेथें आलेंच आहे. एकाष्टका हा संवत्सराचा प्रथम दिवस ऊर्फ त्याची पत्नी असे म्हटलें आहे- म्हणजे त्या सुमारास सूर्य दक्षिणायन संपवून उत्तरेकडे वळे, आणि ह्मणून संवत्सराचा आरंभ एकाष्टकेला करावा असे सांगितलें. पण ही स्थिति वसंत-संपात कृत्तिकांत असतांच्या वेळची आहे. या काळाच्या पूर्वी एकाष्टका ह्मणजे सूर्योदयापूर्वी येणाऱ्या अनेक उषांपैकी शेवटची उषा असा अर्थ असावासा वाटतो. एकाष्टका शब्दांतील **एक** शब्दाचा अर्थ कदाचित् वर्षाचा पहिला महिना असा असून शेवटची उषा पहिल्या चांद्र महिन्याच्या अष्टमीला पडत असावी.

९ अनुज ( मागाहून जन्मलेला सोबती ) विरहित असलेल्या मला तुम्ही सानुज केलेंत. सत्य भाषण करणारी तूं आहेस, तर मीं मागतों कीं ज्या प्रमाणें तुमच्यांपैकीं कोणीही दुसरीचें अतिक्रमण करीत नाहीं त्याप्रमाणें मीं त्या ( अनुजा ) च्या कृपेंत असावें.

१० सर्व जाणणाऱ्या ( इंद्रा ) विषयीं माझी बुद्धि चांगली आहे. त्यानें तिला स्थिर केली आहे, आणि त्याला तींत स्थानही मिळालें आहे. ( तर ) ज्याप्रमाणें तुह्मी एकमेकींचें अतिक्रमण करीत नाहीं याप्रमाणें मीही त्याच्या कृपेंत असावें.

११ पांच उषांना अनुसरून पांच दोह आहेत; पांच नांवाच्या गाईला अनुसरून पांच ऋतु आहेत. पंधरा जणांनीं संपादन केलेल्या पांच दिशांमिळून एका लोकाला अभिमुख असे एकच शीर्ष आहे.

---

९. **मला सानुज केलेंत**—हा अनुज ह्मणजे मागील मंत्रांत सांगितलेला इंद्र किंवा सूर्य होय. याची आपल्यावर कृपा असावी अशी ऋषीची प्रार्थना आहे. हा इंद्राचा ह्मणजे सूर्याचा जन्म तीस उषा होऊन गेल्यावर झालेला आहे हें लक्षांत ठेवण्यासारखे आहे.

**सत्य भाषण करणारी—सत्यं वदन्ती** हे पद संबोधनाचे अनेकवचन ह्मणून आचार्यांनी मानिलें आहे–पण तसे मानणें व्याकरणाच्याविरुद्ध आहे. पदपाठांत ‘ वदंती ’ असेंच प्रथमेचे एकवचनाचें रूप स्पष्ट दिलें आहे. पण त्यांत भाषांतरास अडचण पडते. ‘ सत्यं वदंती ’ याच अर्थाचे ‘ सूनृता ईरयन्ती ’ असें विशेषण ऋग्वेदांत ( ३,६१,२ ) उषेला लाविलेले आहे.

**तुह्मीं एकमेकींचे** इ०–ऋ. ७, ७६, ५ पहा. अनेक उषा एकत्र असूनही एकमेकींचे विरुद्ध खटपट करीत नाहींत (न यतन्ते मिथस्ते) असे ह्मटलें आहे.

**१० सर्व जाणणारा–विश्ववेदाः** ह्मणजे उषा असें सायणाचार्यांनीं घेतलें आहे. पण या पदाचा संबंध उघड उघड ‘ अनुजाशी ’ आहे. ऋषीला परस्परांची बुद्धि परस्परांविषयीं चांगली असावी असें वाटत आहे. आपली बुद्धि इंद्राविषयीं चांगली आहे असें सांगून त्याचीही आपल्या विषयीं तशीच असावी असें तो ह्मणतो. विश्ववेदाः हें विशेषण इंद्राला व अग्नीला ऋग्वेदांत अनेक ठिकाणीं लाविलेलें आहे, ( ६,४७,१२;१,१४७,३ इ० ).

**११ पांच दोह**—पांच दोह म्हणजे तामिस्रा ( काळोख ), ज्योत्स्ना ( चंद्र-

१२ पहिली उषा ऋताचें अपत्य होय. एक जलांचा महिमा वृद्धिंगत करते. एक सूर्याच्या प्रदेशांत संचार करते. एक घर्माच्या प्रदेशात सचार करते; आणि एकीचे सविता नियमन करतो.

१३ जी प्रथम उदयास आली ती यमलोकांत धेनु झाली; पयानें युक्त अशी ती आह्मांला प्रतिवर्षी दुग्ध देवो.

१४ प्रकाशयुक्त नक्षत्रांत ( शुक्र ) श्रेष्ठ, अनंत रूपे धारण करणारी, शबल वर्णाची, अग्निरूप ध्वज असलेली ही उषा प्रकाशासह आकाशांत आली. समान अर्थाचे सपादन करण्यासाठी नीट झटणारी, जरा (वृद्धपण) धारण करणारी पण जरायुक्त न होणारी अशी जी तूं ती, हे उषे, तूं आलीस.

---

प्रकाश ) दोन संध्या आणि दिवस असे होत असे आचार्यांनी तै ब्राह्मणाला ( २,२,९,६,९ ) अनुसरून म्हटले आहे हे प्रजापतीचे दोह होत. ( एते वै प्रजापतेर्दोहा ) यांत पांच उष कलापांपासून पुढील सर्व पंचविध सृष्टि उत्पन्न झाली, असे म्हणण्याचा आशय दिसतो.

**पांच नांवांची गाय**—म्हणजे पृथ्वी ( सायणाचार्य ) पांच ऋतूंत पृथ्वीला पांच निराळी नावे आहेत वसंतात **पुष्पवती**, ग्रीष्मांत **तापवती**, वर्षाऋतूंत **वृष्टिवती**, शरदांत **जलप्रसादवती**, आणि हेमंतशिशिरांत **शैत्यवती**. हेमंतशिशिरांना एक समजून एकंदर ऋतु पांच म्हटले आहेत.

**पंधरा**—ऐतरेय ब्राम्हणांत ( ३,४२ ) सागितलेला हा पंचदश स्तोम होय.

१३ **प्रतिवर्षी**—या शब्दावरून ही पहिली उषा संवत्सरारंभाची होय असें स्पष्ट दिसते. ऋ. १,३३,१० यांत तमापासून गाईचे ( प्रकाशाचे ) दोहन केल्याचें सांगितले आहे ( तमसो गा अधुक्षत् ).

१४ **समान अर्थ**—ऋ ३,६१,३ पहा यांत समान अर्थाकडे गमन करणाऱ्या उषेला चक्राकार फिरावयास सागितले आहे.

**जरा धारण करणारी**—' समानमर्थं स्वपस्यमाना जरां बिभ्रती ' असा अन्वय येथे घेतला आहे. सायणाचार्यांनी ' स्वपस्यमाना समानमर्थं बिभ्रती जरामागाः' असा घेतला आहे. कसाही अन्वय घेतला तरी एकंदर मंत्राच्या तात्पर्यांत विशेषसा फरक होत नाही.

# वैदिक उषा.




मूर्य क्षितिजाखालीं १६ अंशांवर आहे; तेव्हां त्याचे किरण उषेच्या रूपानें क्षिति-जावर दिसूं लागून दर चोवीस नासांत एक एक प्रदक्षिणा करीत, सूर्यबिंब क्षितिज-पातळीच्या वर येईपर्यंत शरांच्या दिशेनें वाटोळे चक्राकार फिरत रहातील.

१५ ऋतूंची पत्नी, दिवसांची नेत्री, प्रजांनां उत्पन्न करणारी अशी ही पहिली उषा आली. हे उषे, स्वतः जरारहित असून इतर सर्वाला तूं जीर्ण करतेस. तूं एक असून अनेक प्रकारांनी प्रकाशित होतेस.

## तैत्तिरीय संहिता ५, ३, ४, ७.

ते ( कालस्वरूप ) दिवसही नव्हे आणि रात्रही नव्हे, असे अनिश्चित होते. ( तेव्हां ) देवांनां ( त्याचा निश्चय करणाऱ्या ) व्युष्टी दिसल्या ( त्यांचे आधान करतांनां म्हणावयाचे हे वर दिलेले पधरा मत्र होत ). त्यानीं त्यांचे ( व्युष्टि–इष्टकाचे ) आधान केले. तेव्हां ते ( कालस्वरूप ) स्पष्ट झाले. तस्मात् ज्याच्यासाठी त्याचे आधान होते त्याला प्रकाश मिळतो, त्याचा तम ( भ्रांतिरूप ) नाहींसा होतो.

या वर दिलेल्या पंधरा मंत्रानीं व्युष्टि नामक इष्टकांचे आधान करावयाचे असते. यज्ञकर्मासाठी लागणारे मत्र पुष्कळ वेळां निरनिराळ्या सूक्तांतून किंवा अनुवाकांतून घेत असतात. त्यामुळे या पधरा मत्रांचा परस्पर संबंध कांहीं नाहीं असे कदाचित् कोणास वाटेल. पण त्यांत दिलेल्या तीस उषांच्या वर्णनावरून हे सर्व मत्र मूळचे संबद्ध आहेत हे उघड होते. शिवाय जर हे मत्र निरनिराळ्या सूक्तांतून घेतलेले असते तर ते सोळा पाहिजे होते कारण सोळा व्युष्टि–इष्टकांचे आधान करावयाचे असते. म्हणून या अनुवाकात पधराच मत्र आहेत ही एकच गोष्ट त्यांचा परस्पर

---

१५ **एक असून अनेक इ**—या वर्णनावरून अनेक भागांमिळून झालेली एक अखंड उषाच या अनुवाकात विवक्षित आहे असे दिसते.

**दिवसांची नेत्री इ**—ही विशेषणे ऋग्वेदांतही ( ७,७७,२ ) उषेला लाविलेली आहेत.

१ हा वर्ग वरील अनुवाकानंतर पंचम काडांत आला आहे यांत व्युष्टिनामक इष्टकांचे आधान सदरील पंधरा मंत्रानीं कां करावयाचे ते सांगितले आहे तैत्तिरीय संहितेंत असे स्पष्टीकरण ज्यांत दिलेलें असतें त्या भागाला ब्राह्मण अशी संज्ञा आहे.

२ **तेव्हां इ०–तेव्हां** शब्दावरून सूर्योदयापूर्वी तीसही उषा येऊन गेल्या होत्या असें म्हणण्याचा आशय दिसतो पूर्वी पान ८८ येथे उषा अखंड एकसारखा होत्या असें सांगणारें ते. संहितावचन दिलेलें आहेच (शश्वत्तानांवपृज्यंति).

संबंध सिद्ध करण्यास पुरेशी आहे. आतां यांतील कांहीं मंत्र अथर्ववेदांत तुटक तुटक किंवा अन्य संदर्भांत आले आहेत हें खरें. पण तेवढ्यावरून तैतिरीय संहितेंतील हा अनुवाक तीस उषांचें सुसंबद्ध वर्णन करणारा नसून फुटकळ मंत्रांनीं झालेला आहे असें म्हणतां येत नाहीं. खरें पाहिलें असतां हा प्रश्नच मुळीं फारसा महत्वाचा नाहीं; कारण त्यांपैकीं पांचवा व सहावा हे दोनच मंत्र प्रस्तुत मुद्दा म्हणजे वैदिक उषा ह्या तीस उषांचा कलाप होत्या ही गोष्ट शाबीत करवयास पुरेसे आहेत. उषा तीस पावले चालली (ऋ.६,५९,६) किंवा त्या तीस योजनें वाटोळ्या फिरतात ( १,१२३,८ ) असें जें ऋग्वेदांत ह्मटलें आहे त्याचें आजपर्यंत पौरस्त्य पाश्चात्य अशा दोन्ही विद्वानांनां गूढ पडलें होते. पण उषांची संख्या तीस होती असें समजल्यावर या वाक्यांचा उलगडा सहज होतो. प्रस्तुत विषयासबंधाने आतां एकच महत्वाचा प्रश्न उरला. तो असा की या उषा तीस दिवसांच्या तीस उषा कीं सर्वां मिळून झालेली तीस दिवसाच्या अवधीची एकच उषा? पांचव्या प्रकरणांत दिलेल्या पुराव्यावरून यांपैकीं दुसरीच कल्पना खरी होय असें दिसून येईल. वैदिक ऋषींना साध्या उषा माहीत होत्या. पण जिला त्यांनीं प्रातर्देवता ह्मणून मानिली ती दीर्घरात्रीनंतर येणारी दीर्घ उषाच होय; ही चक्राकार भ्रमण करणारी तीस दिवसांच्या अवधीची उषा ध्रुवापासून थोड्याशा अंशांबाहेर दिसावयाची नाहीं.



# प्रकरण ६ वें.

## दीर्घ रात्र आणि दीर्घ दिवस.

दीर्घावधि उषेवरून दीर्घ दिवसरात्रींचें अनुमान होतेंच–तरी त्यांसंबंधीं स्वतंत्र प्रमाणेंही मिळतात–वृत्राचें दीर्घ तमांत शयन–तमाच्या पाराला पोंचण्याविषयींची उत्कंठा–दीर्घाः तमिस्राः–रात्रीच्या दुसऱ्या पाराला सुखरूप पोंचविण्याकरितां केलेल्या प्रार्थना–जिचे पर तीर माहीत नाहीं अशी अथर्ववेदांतील रात्र–रात्र संपून जाणार नाहीं अशा भीतीनें प्राचीन ऋषींनीं या प्रार्थना केल्या असा खुलासा तैत्तिरीय संहितेत केला आहे–सायणाचार्यांचा अर्थ–त्याचें खंडन–पुराकल्पाचें उदाहरण म्हणून हें वचन सायणाचार्यांनीं दिलें आहे–तें ध्रुवालाच लागू पडणारें आहे–ऋग्वेदांतील रात्रिदिवसाचे वर्णन–दिवसरात्रीच्या दोन निराळ्या प्रकारच्या जोड्या–पहिली तेजस्वी, कृष्ण आणि 'विरूपे' अशी आहे–'विरूपे' शब्दाचा अर्थ विविध अवधीची असा आहे, विविध वर्णाची असा नव्हे–दुसरी 'अहनी' नांवाची जोडी पहिलीहून भिन्न आहे–पृथ्वीवरील निरनिराळ्या ठिकाणच्या दिवसरात्रींच्या मानाचे परीक्षण–'अहनी' म्हणजे ध्रुवप्रदेशांतील दीर्घ दिवसरात्रींची जोडी असाच अर्थ केला पाहिजे–तैत्तिरीय संहितेंतील संवत्सराचे वर्णन–दीर्घ दिवस व दीर्घ रात्र हीं त्याच्या डाव्या उजव्या बाजूंना आहेत–ऋग्वेदांतील दीर्घ दिवसाचे स्पष्ट उल्लेख–सूर्यानें आपला रथ आकाशाच्या मध्येंच थांबवून दासांचा प्रतिकार केल्याचे वर्णन–या वर्णनावरून दीर्घ दिवसाचा बोध होतो–दीर्घ दिवस व दीर्घ रात्र यांच्या सिद्ध्यर्थ दिलेल्या प्रमाणांचा सारांश–उषा आणि सूर्य यांना अनुक्रमें दक्षिणा व दक्षिणेचा पुत्र असें म्हटलें आहे, त्याचा संबंध सूर्य ध्रुवावर दक्षिणेस उगवतो या गोष्टीशीं असावा–फिनिशन नाविकांची गोष्ट.

## दीर्घ रात्र आणि दीर्घ दिवस.



तीस दिवसांच्या अवधीची अखंड उषा ऊर्फ निकटसंबद्ध अशा दिनावधि तीस उषा यांचा उल्लेख ऋग्वेदांत दाखवून दिल्यावर, असल्या दीर्घ उषेच्या पूर्वी येणारी दीर्घ रात्र आणि त्या दीर्घ रात्रीच्या जोडीला तेवढाच दीर्घ दिवस ही तिच्या मागोमाग आलीच. या दीर्घ रात्रिदिवसांखेरीज उरलेल्या वर्षाच्या भागात चोवीस तासांच्या अवधीची कांहीं अहोरात्रे असून त्यांत कित्येकवेळां रात्रीपेक्षां दिवस मोठा व केव्हां दिवसापेक्षां रात्र मोठी असा प्रकार असणार. या गोष्टी एकमेकींशी इतक्या संबद्ध आहेत कीं त्यांतल्या एखादीचा कोठें उल्लेख आढळल्यास बाकीच्यांचा निराळा उल्लेख केलेला पहाण्याचें कारण नाहीं. परंतु हजारों वर्षांपूर्वी अस्तित्वांत असलेल्या गोष्टींचा आपल्याला विचार करावयाचा असल्यामुळें व तो ज्या प्रमाणांवरून करावयाचा तीं प्रमाणे परंपरागत आलेलीं असूनही त्यांचा अर्थ आह्मी करतों तसा आजपर्यंत कोणी केलेला नसल्यामुळे सदर ज्योतिःशास्त्रविषयक गोष्टी जणूं काय परस्पर संबद्ध नाहींतच असें समजून त्यांतील प्रत्येकीविषयीं स्वतंत्र प्रमाणें मिळविण्याचा प्रयत्न करणें इष्ट आहे. असा प्रयत्न केला ह्मणून या गोष्टींच्या अन्योन्यसापेक्षत्वासंबंधानें ह्मणजे कांहीं संशय दाखविला असे मात्र नाहीं. या गोष्टींहून अधिक अन्योन्यसंबद्ध अशा गोष्टीच नाहींत. तथापि कोणतीही गोष्ट सिद्ध करण्यासाठीं जीं प्रमाणें दाखवावयाचीं, तीं जितकीं निरनिराळ्या बाजूंनीं दाखवितां येतील तितकीं दाखविणें बरें. ह्मणून आतां दीर्घ दिवस दीर्घ रात्र, सूर्यप्रकाशाच्या किंवा काळोखाच्या महिन्यांची संख्या आणि संवत्सराचें स्वरूप यांविषयीं वैदिक वाङ्मयांत आढळणाऱ्या प्रमाणांचा या व पुढच्या प्रकरणांत स्वतंत्रपणे विचार करूं.

प्रथम दीर्घ रात्र घेऊं. ही रात्र कित्येक दिवसांच्या अवधीची असल्यामुळे आजमितीस उत्तरध्रुवप्रदेश फार थंड व गैरसोयीचे होऊन मनुष्यांना वसती करावयास सर्वथा अयोग्य झाले आहेत. परंतु हिमान्तरकालांत ह्या दीर्घ रात्रीमुळे कित्येक दिवसपर्यंत टिकणाऱ्या अखंड काळोखा-

शिवाय ध्रुवप्रदेशांत दुसरी कांही गैरसोय होण्यासारखी होतीसें दिसत नाही. हा काळोख ह्मणजे मोठा सुखकर होता असे नाहीं. अर्थात् त्याचा अनुभव घेणारी मनुष्ये तो केव्हां एकदां संपतो असे मोठ्या उत्कंठेने ह्मणत असलीं पाहिजेत. या दीर्घावधि भयंकर काळोखाचे वर्णन ऋग्वेदांत अनेक ठिकाणीं आले आहे. इंद्राच्या शत्रूंची आश्रयस्थाने या काळोखांत असत आणि तो नष्ट करण्यासाठीं इन्द्राला दासांशी युद्ध करावे लागत असे उदाहरणार्थ १,३२,१०,यांत **दीर्घं तम आशयदिंद्रशत्रुः** 'इन्द्राचा शत्रु वृत्र हा दीर्घ अंधारामध्ये पडला' असे म्हटले आहे; तसेच ५,३२,५ यात **युयुत्सन्तं तमसि हर्म्ये धाः** 'युद्धासाठी उत्सुक झालेल्याला ( शुष्णाला ) इन्द्राने अंधारमय खाचेत लोटिले' असे सांगून, पुढच्या ऋचेत **असूर्य तमाचा** ( भयंकर काळोख ) उल्लेख केला आहे. या सर्व ठिकाणीं इन्द्र व त्याचा शत्रु ( वृत्र व शुष्ण वगैरे ) यांच्यांतील युद्धाचे वर्णन केलें आहे. हे युद्ध प्रतिदिनीं होणारे काळोख व प्रकाश यांचे युद्ध असे आजपर्यंत समजत आले आहेत; परंतु तसे मानिल्यास वर उल्लेख केलेल्या शब्दांची सार्थकता मुळींच होत नाही. ज्या दीर्घ व भयंकर काळोखाशी झगडण्याला इन्द्राला आपल्या सर्व साहाय्यकार्‍यांसह इतकी मेहनत पडत असे व ज्याचा शेवट कधी होतो ह्मणून वैदिक ऋषी मोठ्या उत्कठेने वाट पहात असत तो काळोख कांही २४ तासांच्या अहोरात्रातील खास नसून ध्रुवप्रदेशाजवळील दीर्घ रात्रीचाच असला पाहिजे.

परंतु ही इन्द्रवृत्रांच्या युद्धाची कथा सोडून दिली तरी देखील आपल्या इकडील रात्रीपेक्षां किती तरी पट मोठ्या अशा रात्रीचा स्पष्ट उल्लेख करणारी वाक्यें ऋग्वेदांत आहेत. काळोखांतून सोडविण्यासाठी वैदिक ऋषींनीं आपल्या देवतांची किती तरी वेळां प्रार्थना केली आहे. २, २७, १४ यांत " आह्मी तुमचा कांही अपराध केला असेल तर त्याची क्षमा करा, निर्भय असा प्रकाश आह्मांला मिळो आणि दीर्घ काळोख आमच्यावर न येवो " अशी गृत्समदानें अदिति, मित्र आणि वरुण या देवतांची प्रार्थना केली आहे. यांत **दीर्घाः तामिस्राः** या पदांचा अर्थ अखंड काळोखाची दीर्घ रात्र असा करणें बरें. पण कसाही अर्थ धरिला

---

१ अदिते मित्र वरुणोत मृळ यद्वो वयं चकृमा कच्चिदागः । उर्वश्यामभयं ज्योतिरिंद्र मा नो दीर्घा अभि नशन्तामिस्राः ॥ ऋ. २. २७. १४.

तरी या ऋचेंत दाखविलेली एवढी चिंता जर चोवीस तासांपेक्षां कमी अवधीच्या काळोखाबद्दलच केवळ असेल, तर ती योग्य दिसत नाहीं. १, ४६, ६ यांत "जी आह्माला काळोखांतून तारील अशी शक्ति आह्माला दे" अशी अश्विनांची प्रार्थना कण्व ऋषीनें केली आहे. ७, ६७, २ यांमध्यें वसिष्ठ ऋषि ह्मणतो, "अग्नि प्रदीप्त होऊं लागला, आह्मांला **तमाचा अन्त** दिसला आणि उषेचा केतु पूर्वेकडे फडकूं लागला." या सर्व वाक्यांतील काळोख शब्दाचा अर्थ हिंवाळ्यांतील ( दिवसापेक्षां ) मोठ्या असलेल्या रात्रीचा काळोख एवढाच घेणें सयुक्तिक नाहीं. असल्या यःकश्चित् गोष्टीविषयीं वैदिक ऋषींनीं इतक्या आतुरतेनें देवांनां विनवावें हें शक्य दिसत नाहीं. विसाव्या शतकांतील सुधारलेल्या माणसांसारखीं विद्युद्दीपादि तमोनाशक साधनें वैदिक ऋषींजवळ नव्हतीं, ह्मणून त्यांना रात्र ही मृत्यूप्रमाणें अगदीं भयप्रद वाटत असे असें मानून वरील वाक्यांचा अर्थ कोणी लावतील. पण आजच्या काळांतील पूर्णपणें रानटी स्थितींत असलेलीं माणसेंही वैदिक ऋषींप्रमाणें प्रकाशाविषयीं आतुरता दाखवीत असल्याचें ऐकण्यांत येत नाहीं; शिवाय माणसेंच नव्हेत तर देवही दीर्घ तमांत असल्याचें वर्णन ऋग्वेदांत आहे. १०,१२४,१ यांत अग्नीसंबंधानें '**ज्योगेव दीर्घं तम आशयिष्ठाः**' ह्मणजे 'दीर्घ तमामध्यें अति दीर्घ काळ रहाता झाला' असें ह्मटलें आहे. यांत **ज्योग्** आणि **दीर्घ** ही दीर्घत्ववाचक शब्दांची जोडी हिंवाळ्यांतील साधी रात्र कितीही मोठी असली तरी तीस लावणें योग्य होणार नाहीं. ऋ. २,२,२ यांत **क्षपः** हा रात्रिवाचक शब्द अनेकवचनीं आलेला असून मॅक्समुल्लरनें त्याचें भाषान्तर 'निरंतरच्या रात्री' असें केलेलें आहे. परंतु 'निरंतरच्या रात्रीं' ह्मणजे काय याचा खुलासा त्यानें केलेला नाहीं. सूर्यप्रकाशाच्या योगानें ज्यांत खंड पडत नाहीं अशा रात्री असा 'निरंतर' शब्दावरून अर्थ समजावयाचा की नेहमींच्या रात्री

---

१ या नः पीपरदश्विना ज्योतिष्मती तमस्तिरः । तामस्मे रासाथामिषम् ॥ ऋ. १, ४६, ६.

२ अशोच्यग्निः समिधानो अस्मे उपो अदृश्रन्तमसश्चिदन्ताः । अचेति केतुरुषसः पुरस्ताच्छ्रिये दिवो दुहितुर्जायमानः ॥ ऋ. ७, ६७, २.

एवढाच समजावयाचा ? मॅक्समुल्लरनें भाषान्तरांत शब्द बरोबर घातला असूनही त्याच्या खऱ्या अर्थाकडे त्याचें लक्ष गेलें नाहीं असें दिसतें.

ध्रुवाजवळील दीर्घ रात्र प्राचीनकाळी वैदिक लोकांस माहीत होती हें सिद्ध करावयास वर दिलेल्या वचनांसारख्या तुरळक वचनांवरच कांहीं सर्वस्वीं अवलंबून रहावयास नको आहे. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडळांतील १२७ वें सूक्त रात्रिदेवतेचें असून त्याच्या ६ व्या ऋचेत **अथा नः सुतरा भव** ह्मणजे 'आह्माला तरून जावयाला सुलभ हो' अशी तिची प्रार्थना केली आहे; व त्याच्या परिशिष्टाच्या रात्रिसूक्तांतेंही 'आह्मांला परतीराला सुखरूप पोंहोंचूं दे' असें तिला विनविलें आहे. अथर्ववेदांतही या परिशिष्टाचा अनुवाद करून 'जिचें परतीर दिसत नाहीं अशा रात्रीच्या ठिकाणीं प्रत्येक गतिमान् वस्तु विश्राम पावते. हे प्रशस्त तमोमय रात्रि, आह्माला निर्विघ्नपणें तुझ्या तीराला पोंहोंचूं दे' असें ह्मटलें आहे. त्यांतच दुसरे एके ठिकाणीं 'प्रत्येक रात्र (रात्रिं रात्रिं) आमच्या शरीराला इजा झाल्याशिवाय आमची जावो' असें ह्मटलें आहे. आतां येथें असा प्रश्न उत्पन्न होतो की, या वाक्यांत दिसून येणाऱ्या रात्रीच्या पर तीराला पोंचण्याबद्दलच्या एवढ्या आतुरतेचें कारण काय ? तसेच तिचें पर तीर दिसत नाहीं असें कां ह्मटले ? ही रात्र ह्मणजे आपल्या इकडील हिंवाळ्यांतील मोठी रात्र होती कीं ध्रुवाजवळची कित्येक महिन्यांच्या अवधीची दीर्घ रात्र होती. ? या सर्व प्रश्नांची उत्तरें तैत्तिरीय संहितेंत सुदैवानें देऊन ठेविलेलीं असल्यामुळें त्यांविषयीं अर्वाचीन टीकाकारांच्या तर्कांवरच कांहीं भिस्त टाकायाला नको आहे. त्या संहितेच्या*

---

१ प्रपन्नोऽहं शिवां रात्री भद्रे पारमशीमहि भद्रे पारमशीमहि ॥

२ न यस्याः पारं ददृशे न योयुवद्विश्वमस्यां नि विशते यदेजति ।
अरिष्टासस्त उर्वि तमस्वति रात्रि पारमशीमहि भद्रे पारमशीमहि ॥
अ. वे. १९,४७,२.

रात्रिं रात्रिमरिष्यन्तस्तरेम तन्वा वयम् ।
अ. वे. १९,५०,३.

* चित्रावसो स्वस्ति ते पारमशीय ॥ तै. सं. १,५,५,४. चित्रावसो स्वति ते पारमशीयेत्याह । रात्रिर्वै चित्रावसुरव्युष्टयै वा एतस्यै पुरा ब्राह्मणा अभैषुः ।

पहिल्याच कांडाच्या पांचव्या प्रपाठकाच्या पांचव्या अनुवाकांत 'हे चित्रा-वसो, आह्मांला सुखानें तुझ्या तीराला जाऊं दे' असें ह्मणून पुढें सातव्या अनुवाकांत 'चित्रावसु ह्मणजे रात्र, पूर्वकाळीं ही संपून उषा येणार नाही ह्मणून ब्राह्मण भीत असत' असे त्याचें स्पष्टीकरण केलें आहे. ह्मणजे यांत रात्र संपणार नाही अशी भीति पूर्वकाळीं लोकांना वाटत होती असे स्पष्टपणें सांगणारें वचन आपल्याला मिळालें. आतां याचा अर्थ काय ? रात्र साधी असल्यावर, ती संपणार नाही अशी शंका येण्याचे कारण काय ? ही रात्र म्हणजे हिवाळ्यांतीलच थोडीशी मोठी असलेली रात्र असा अर्थ नित्याप्रमाणे सायणाचार्यांनी केला आहे. पण असे करण्यांत आचार्यांनी खोलपणा दाखविलेला मुळींच दिसत नाही. कारण हा अर्थ त्यांनींच दुसऱ्या एका प्रकरणांत दिलेल्या एका गोष्टीवरून खोडून काढतां येण्यासारखा आहे. तैत्तिरीय संहितेच्या ज्या भागांत मंत्राचे स्पष्टीकरण असते त्यांना ब्राम्हण म्हणतात. 'रात्र संपून उषःकाल येईल की नाही अशा शंकेने पूर्वी ब्राह्मण भीत असत' हें संहितावचन अर्थातच ब्राह्मण या सदराखाली येईल. ब्राह्मणांतील मज-कुराचे आपल्या ब्रह्मवाद्यांनी दहा वर्ग केले आहेत; ते असेः—हेतु, निर्व-चन (व्युत्पत्ति), निन्दा, प्रशंसा, संशय, विधि (नियम), परक्रिया, पुराकल्प ( जुनी चाल किंवा गोष्ट ), व्यवधारणकल्पना ( व्याप्ति निश्चित करणे ), आणि उपमान. आतां सायणाचार्यांनी ऋग्वेदावरील आपल्या भाष्याच्या प्रस्तावनेंत यांपैकीं पहिल्या नवांचा उल्लेख केला आहे. व त्यांत आठ-व्याचे ( पुराकल्पाचें ) उदाहरण म्हणून हे वर सांगितलेले तैत्तिरीय

---

तै. सं. १,५,७,५. यावरील सायणाचार्यांची टीका—हेमंततौ रात्रेर्दीर्घत्वेन प्रभातं न भविष्यति एव इति कदाचिद् ब्राह्मणाः भीता अत पारमशीयेति प्रार्थनया प्रभातं लभते। भावार्थ—हेमंत ऋतूंत रात्र दीर्घ असल्यामुळें पहाट होणार नाहीं असें वाटून पूर्वी ब्राह्मण भीत असत. ह्मणून 'पाराला पोहोंचूं दे' अशी प्रार्थना केल्यावर पहाट होई.

१ हेतुर्निवचनं निन्दा प्रशंसा संशयो विधिः । परक्रिया पुराकल्पो व्यव-धारणकल्पना ॥ उपमानं दशैवेते विधयो ब्राह्मणस्य तु । एतद्वै सर्ववेदेषु नियतं

संहितेंतील वाक्य दिलें आहे. म्हणजे आचार्यांच्या मतानेंच ‘ पूर्वकालीं रात्र संपणार नाही अशी ब्राह्मणांना भीति वाटत असे’ हें तै. संहितावाक्य पुराकल्प म्हणजे प्राचीन दंतकथा या सदरांत येतें. तें केवळ अर्थवादात्मक नव्हे, हें त्यांतल्या **पुरा** या शब्दावरून उघड दिसून येत आहे. आतां पुढे असा प्रश्न आहे की ही रात्र जर आपल्या इकडच्यासारखी साधी असती तर ती सदा सर्वकाळ तशीच असल्यामुळें तिच्या संबंधाने पूर्वी मात्र ब्राह्मण भीत असत असें म्हणून, हल्लीं भीत नाहीत असे कां दर्शविले ? वैदिक ऋषींना सूर्यास्तानंतर कांही तासांनी उषेचा उदय होतो हे माहीत नव्हतें असें यावर कोणी म्हणतील; परंतु चांद्रसौर मानांचा मिलाफ करण्यापर्यन्त ज्यांची मजल गेली होती त्या वैदिक ऋषींना एवढी साधी गोष्ट समजलेली नसावी हे म्हणणें अगदी वेडगळपणाचे होईल. यास्तव सायणाचार्यांचें या रात्रीसंबंधाचे मत त्याज्य होय. वैदिक ऋषी भीत असत तें कांहीं हिवाळ्यांतील साध्या मोठ्या रात्रीला नव्हे. ती रात्र ध्रुवावरचीच असून, **पुरा** या शब्दावरून ती प्राचीन काळापासून वैदिक ऋषींना परंपरागत माहीत होती असे उघड होते. ‘ वेदकालनिर्णयांत ’ सांगितल्याप्रमाणें तैत्तिरीयसंहिता श. पूर्वी २५०० वर्षांच्या सुमारास झाली. तर त्या काळाच्या सुमारास ‘ जिचे पर तीर दिसत नाही अशी रात्र केव्हां एकदां संपते अशी मोठ्या उत्सुकतेने वाट पहात प्राचीन वैदिक ऋषी आपण तिच्या तीराला सुखरूप जावें म्हणून देवांची प्रार्थना करीत असत ’ अशी गोष्ट परंपरागत तत्कालीन लोकांस माहीत होती असें म्हणावयास कांहीं एक हरकत नाहीं. हे रात्रीचें वर्णन ध्रुवावरील दीर्घरात्रीसंबंधाचे आहे असें न मानिल्यास अगदींच अयुक्त दिसते.

आतां दीर्घ तमाच्या उल्लेखाशिवाय दीर्घ दिवस व दीर्घ रात्र यांच्याविषयीं ऋग्वेदांत कांही प्रत्यक्ष वचनें आहेत की नाही हें पाहूं. ऋग्वेदकालीन पंचागांतील वर्ष ३६० दिवसांचे होतें हें मागें सांगितलेच आहे. अर्थात् तें ध्रुवमंडलस्थ नव्हे हें उघड आहे. पण या ३६० साध्या दिवसांच्या वर्णनाबरोबरच ध्रुवमंडलाच्या अलिकडच्या प्रदेशांतील रात्रिदिवसांना लागू न पडणारें असें रात्रिदिवसांचें वर्णन ऋग्वेदांत आहे. वैदिक वाङ्मयांत दिवसरात्रीची जोडी कल्पून तिचा द्विवचनी नांवानें उल्लेख केलेला आहे, **उषासानक्ता (१,१२२,२), नक्तोषासा (१,१४२,**

७) किंवा उषसौ ( १,१९८,६ ) असे शब्दप्रयोग ऋग्वेदांत असून त्या सर्वांचा अर्थ दिवस व रात्र यांची जोडी असा आहे. या जोडीला अहोरात्रे असेंही नांव ऐतरेय ब्राह्मणांत आहे. कधीं या जोडीला जुळीं भावंडें तर कधीं बहिणी असेंही ह्मटलें आहे. ऋग्वेद ३, ५५, ११ यांत अहोरात्रे या देवतेचें वर्णन आहे. ती ऋचा अशी:—

नाना चक्राते यम्या वपूंषि
तयोरन्यद्रोचते कृष्णमन्यत्।
श्यावी च यदरुषी च स्वसारौ
महद्देवानामसुरत्वमेकम् ॥

यांपैकीं पहिल्या तीन चरणांत मुख्य गोष्ट सांगितली असून चवथा चरण सर्व सूक्तामध्यें ध्रुवपदासारखा आहे. तिचा सरळ अर्थ असा:-"या जुळ्या अनेक रूपे ( शरीरें ) करितात; त्यांतील एक तेजस्वी आहे व दुसरी कृष्ण ( काळी ) आहे. त्या दोन बहिणी असून एक श्यावी ( काळी ) व दुसरी प्रकाशमान ( अरुषी ) आहे. देवांचे मोठें देवत्व अद्वितीय आहे." या ऋचेंतील शब्द साधे असूनही तिचा दोन महत्वाच्या गोष्टीसंबंधाने आजपर्यन्त अर्थविपर्यास केलेला आहे. पहिल्या अर्धांत 'या जुळ्या विविध रूपें करतात, व त्यांतील एक प्रकाशते व दुसरी काळी आहे' असें म्हटलें आहे. हे सर्व वर्णन वाटेल त्या दिवस रात्रीच्या जोडीला कांही साजेसें नाही. त्यांतील दुसरा भाग मात्र सर्वांना लागू पडेल. पहिल्या भागांतील मूळांतील शब्द नाना चक्राते वपूंषि असे असून त्यांचा शब्दशः अर्थ 'अनेक रूपे किंवा शरीरें करितात,' असा आहे. या ऋचेत दिवस रात्रीच्या जोडीचे दोन प्रकारचे वर्णन आहे; तिला तेजस्वी व कृष्ण असें ह्मणून नानारूपे करणारी असेंही ह्मटले आहे. ऋ. १, १२३, ७ यांत अहोरात्राला विषुरूपे अहनी ह्मटलें असून इतर ठिकाणीं विरूपे हे विशेषण दिले आहे. असें असल्यामुळें नाना वपूंषि, विषुरूपे अथवा, विरूपे या शब्दांचा संबंध प्रकाश व काळोख यांशीं नसून दुसऱ्या कशाशी तरी असला पाहिजे. नाहीं तर या दुहेरी वर्णनाला केवळ द्विरुक्ति म्हणावें लागेल. रूप व वपु यांचा अर्थ वर्ण, रंग असा सायणाचार्यांनीं या प्रकरणांत केला आहे; आणि पाश्चात्य पंडितांनीं त्याचाच अनुवाद केला

१ अहोरात्रे वा उषासानक्ता। ऐ. ब्रा. २, ४.

आहे. पण दिवस रात्रीचे रंग म्हणजे काय? शिवाय **रूप** याचा 'रंग' असा अर्थ होऊं शकेल, पण **वपूंषि** शब्दाची वाट काय? या प्रश्नाकडे आजपर्यन्त कोणीच खोल लक्ष पुरविलेलें दिसत नाहीं. तथापि ऋ. १, ११३, ३ या ऋचेसंबंधानें सायणाहून प्राचीन अशा एका टीकाकाराचें मत समजल्यामुळें या प्रश्नाचा थोडासा उलगडा होणार आहे. हीच ऋचा सामवेदाच्या उत्तरार्चिकेत आली असून **माधव** नांवाच्या भाष्यकारानें विवरण नामक सामवेदावरील आपल्या भाष्यांत **विरूपे** याची व्याख्या केली आहे ती अशी:—सुमेके–संवत्सरे, दक्षिणायने रात्रेर्वै वृद्धिः, उत्तरायणे त्वह्नः, नक्तं रात्रिः, उषाकालप्रभृत्यहः।"—संवत्सरांत दक्षिणायनामध्यें रात्र मोठी होते, व उत्तरायणामध्यें दिवस मोठा होतो. म्हणजे त्याच्या मते **रूप** शब्दावरून दिवसरात्रीच्या अवधीचा बोध होतो असें झाले. अर्थात् **विरूपे** याचा अर्थ 'कमीजास्त अवधीचे' असा केला पाहिजे. अशा रीतीने माधवाच्या विवरणावरून **नाना चक्राते** या ऋचेच्या पहिल्या अर्धाचा—"त्या जुळ्या कमीजास्त दीर्घ असे अवधि घेतात; त्यां पैकीं एक प्रकाशते व दुसरी काळी आहे," असा अर्थ करावयाला हरकत नाही.

पण एवढ्यानेंच कांहीं भागत नाही. तिसऱ्या चरणांत आणखी अडचण आहेच. 'त्या दोन बहिणी असून एक काळी व दुसरी प्रकाशित आहे' असें त्यांत म्हटले आहे. आतां प्रश्न असा आहे कीं या तिसऱ्या चरणांतील बहिणी पहिल्या चरणांत सांगितलेल्या जुळ्यांहून भिन्न आहेत कीं एकच आहेत? त्या एकच आहेत असें मानिल्यास तिसरा चरण निरुपयोगी ठरतो; भिन्न मानिल्यास कशा ते सांगितलें पाहिजे. टीकाकारांनां याचा उलगडा करतां न आल्यामुळे द्विरुक्तीचा दोप पत्करून त्यांनीं त्यांनां एकच ह्मणून ठरविलें आहे. पण हा मार्ग प्रशस्त नसून शक्य असेल तर याहून अधिक समाधानकारक असें या प्रश्नाचे उत्तर मिळविले पाहिजे. रात्रिदिवसांच्या अगदी पृथक् अशा जोड्यांचें वर्णन हें एवढेच आहे असे नाही. ऋग्वेदांत अहोरात्राचा

१ समानो अध्वा स्वस्रोरनन्तस्तमन्यान्या चरतो देवशिष्टे । न मेथेते न तस्थतुः सुमेके नक्तोषासा समनसा विरूपे ॥ ऋ. १, ११३, ३.

वाचक असा **अह्नी** हा शब्द आला आहे. **अह्नी** याचा अर्थ दोन दिवस असा नसून अहोरात्र असा आहे. हें ऋ. ६, ९, १ यांत **अहश्च कृष्णमहर्‌र्जुनंच** ( काळोखाचा दिवस आणि प्रकाशाचा दिवस ) असें जे ह्मटले आहे त्यावरून उघड होतें. आतां ही **अह्नी** व **अहोरात्रे** अथवा **उषासानक्ता** एकच आहेत कीं भिन्न आहेत? ऋ. ४, ५५, ३ यावरून या प्रश्नाचा उलगडा करतां येतो; कारण यांत **अह्नी** आणि **उषासानक्ता** यांची संरक्षण करण्याविषयीं पृथक प्रार्थना केली आहे त्यावरून त्या दोन निराळ्या प्रकारच्या जोड्या आहेत हें स्पष्ट होतें. आतां वर्षाचे सर्व ३६० दिवस व ३६० रात्री जर आपल्या इकडच्या सारख्याच असत्या तर त्यांचे **उषासानक्ता** आणि **अह्नी** असे वर्ग करण्याचें प्रयोजनच नव्हतें; 'काळोखाच्या, प्रकाशाच्या आणि कमीजास्त अवधीच्या' एवढ्या साध्या वर्णनाने काम भागलें असतें. पण **उभे यथा नो** या[1] ऋचेंत दिसून येणारा **अह्नी** आणि **उषासानक्ता** यांतील भेद जर खोटा मानावयाचा नसेल तर त्या भेदाचे कारण शोधून काढिलें पाहिजे. आतां पृथ्वीच्या पाठीवरील निरनिराळ्या ठिकाणी आढळून येणाऱ्या रात्रिदिवसांचा विचार केल्यास, वरील वाक्यांत आलेले वर्ष ध्रुवप्रदेशांतील असून तें एक दीर्घ दिवस व त्याच्या एवढीच एक दीर्घ रात्र यांची एक जोडी आणि बाकी निरानिराळ्या अवधींच्या साध्या रात्रिदिवसांच्या कित्येक जोड्या मिळून झालेले होतें असे मानणे हाच काय तो वरील प्रश्न सोडविण्याचा मार्ग दिसतो. हें वर्णन पृथ्वीच्या दुसऱ्या कोणत्याही भागाला लावतां येणें शक्य नाही. कारण विषुववृत्तावर नेहमीं दिवसरात्र सारखींच असतात, व त्यांना 'काळोखाचीं, प्रकाशाचीं आणि सारख्या अवधीचीं ( सरूपे )' असे ह्मणतां येईल; विषुववृत्तापासून ध्रुववृत्तापर्यंतच्या प्रदेशांत दिवस आणि रात्र मिळून कधींही २४ तासांपेक्षां जास्त अवधी नसतो; मात्र त्यांत दिवसरात्रींच्या अवधीमध्यें स्थानपरत्वें पुष्कळच फरक पडण्यासारखा असतो. उदाहरण, ध्रुवमंडळाच्या अगदीं जवळच्या प्रदेशांत कधी २३ तासांची रात्र व एकतासाचा दिवस व कधीं याच्या उलट ह्मणजे २३ तासांचा दिवस आणि एक तासाची रात्र असा प्रकार असतो. अशा रात्रिदिवसांनां 'काळोखाचे, प्रकाशाचे,

---

१ उभे यथा नो अह्नी निपात उषासानक्ता करतामदब्धे । ऋ. ४,५५,३.

आणि निरनिराळ्या अवधींचे (विरूपे) असें ह्मणतां येईल. पण ध्रुव-मंडल उलटून दीर्घ रात्रीच्या प्रदेशांत गेल्याबरोबर वरील वर्णनांत बदल करून त्यांत साध्या दिवसरात्रींच्या जोडीला निरनिराळ्या अक्षांशाप्रमाणें बदलणाऱ्या अशा दीर्घ रात्रिदिवसांची एक जोडी घालावी लागेल. हीं दीर्घ दिवस आणि दीर्घ रात्र कोणत्याही एका ठिकाणीं पाहिल्यास सारख्याच अवधीची असून अक्षांशपरत्वें मात्र भिन्न असल्यामुळे त्यानांही **विरूपे** असे विशेषण लावतां येईल. अशा रीतीनें, वर्षाचे दिवस व रात्रि दर्शविण्यासाठीं दिवसरात्रीच्या जोडीचे प्रमाण धरल्यास पृथ्वीवर निरनिराळ्या ठिकाणीं दिसणाऱ्या दिवसासंबंधी भेदांचे तीन वर्ग होतातः—

१ **ला.**—विषुववृत्तावरील—एकच जोडी—कृष्ण व प्रकाशणारी असून नेहमीं एकाच स्वरूपाची ( **सरूपे** ).

२ **रा.**—विषुववृत्तापासून ध्रुववृत्तापर्यंतच्या प्रदेशांतील—एकच जोडी—कृष्ण व प्रकाशणारी—पण कमीजास्त अवधीची ( **विरूपे** ).

३ **रा.**—ध्रुववृत्ताच्या आंतील—दोन जोड्या—प्रत्येक कृष्ण व प्रकाशणारी—पण कमीजास्त अवधीची ( **विरूपे** ).

ध्रुवावर सहा सहा महिन्याचा एकच दिवस व एकच रात्र असते. आतां **उभे यथा नो** या ऋचेत **उषासानक्ता** आणि **अह्नी** अशा दोन निराळ्या दिवसरात्रींच्या जोड्या जर स्पष्ट दिसत आहेत, तर त्या उघडच ध्रुवप्रदेशांतल्या असल्या पाहिजेत; ह्मणून या ऋचेच्या आधारानें **नाना चक्राते** या ऋचेचा अर्थ लावून एक जुळी जोडी आणि दुसरी बहिणींची जोडी अशा दोन निराळ्या जोड्यांचे वर्णनच त्यांत आहे असें मानिलें पाहिजे. अशा रीतीने या ऋचेचा अर्थ होईल तो असाः—"त्या जुळ्या ( पहिली जोडी ) नाना रूपें ( अवधि ) करितात; त्यांतली एक प्रकाशते आणि दुसरी काळी आहे. त्या दोन बहिणी ( दुसरी जोडी ) एक **श्यावी** ( काळी ) आणि दुसरी **अरुषा** ( प्रकाशमान ) अशा आहेत." असा अर्थ केल्यास द्विरुक्तीचा दोष टळून सर्व गोष्टींचा समाधानकारक उलगडा करितां येतो.

**अह्नी** हा रात्रिदिवसवाचक शब्द जेथे जेथें आला आहे तेथें प्रत्येक ठिकाणीं त्याचा अर्थ **उषासानक्ताहून** भिन्न आहेच असें

खात ह्मणतां येणार नाहीं; पण कित्येक ठिकाणीं तरी त्यांत भेद आहे हें **उभे यथा नो** या ऋचेवरून उघड होत आहे. आतां हा भेद जर खरा असेल तर साध्या रात्रिदिवसांची जोडी आणि **अह्नी** या शब्दानें दर्शविलेली जोडी यांत आणखीही एक फरक दिसून येईल. साध्या दिवस-रात्री एकामागून एक सारख्या येत असतात, म्हणजे दिवस व रात्र किंवा रात्र व दिवस यांत कधीं खंड पडत नाहीं. पण ध्रुवप्रदेशांतील दीर्घ रात्र व दीर्घ दिवस जरी सारख्याच अवधीचीं असली तरी तीं एक संपल्याबरोबर लगेच दुसरें अशीं येत नाहींत. सूर्य मकरांत जातो त्यावेळीं दीर्घ रात्र असते व कर्कांत येतो त्यावेळीं दीर्घ दिवस होतो, व या दोन बिन्दूंत १८० अंशांचें अंतर आहे. **अह्नी**संबंधाची ही गोष्ट आरण्यककालीं माहीत होती असें दिसतें. तैत्तिरीय आरंण्यकांत संवत्सर-रूपी पुरुषाचें वर्णन करितांनां त्याला एकच डोकें, पण दोन निराळीं मुखें असून हें सर्व ऋतुलक्षण आहे असें ह्मटले आहे. हीं दोन मुखें ह्मणजे संवत्सराचीं दोन अयनें असा टीकाकारानीं अर्थ केला आहे. पण याच्या पुढें आलेलें वर्णन आपल्याला अधिक महत्वाचें आहे. "संवत्सराच्या उजव्या व डाव्या बाजूला प्रकाशयुक्त व कृष्ण असे ( दिवस ) आहेत; त्याला अनुलक्षून हा पुढचा मंत्र ( **शुक्रं ते** इत्यादि ) आहे—'तुझें एक ( रूप ) प्रकाशमान असून दुसरें यजत ( कृष्ण ) आहे; हे दोन निर-निराळ्या रूपांचे अहन् ( दिवस ) होत, तूं द्यौप्रमाणें आहेस. हे स्वतंत्र पूषन् तूं सर्व मायांचें रक्षण करितोस; तुझी देणगी शुभकारक होवो.' यांत काळोखाचा व प्रकाशाचा दिवस ह्मणजे दीर्घ रात्र आणि दीर्घ दिवस हे संवत्सर देवतेचे डावे उजवे हात ह्मणजे दोन टोंकाकडचे दोन भाग आहेत असें ह्मटलें आहे. ह्मणजे अन्य शब्दांनीं सांगावयाचें तर **अह्नी**चे शुक्र व कृष्ण असे भाग एकामागून एक येणारे नसून संव-त्सराच्या दूरच्या दोन टोंकाशीं असतात असा याचा स्पष्ट अर्थ

---

१ एक हि शिरो । नाना मुखे । कृत्स्नं तदृतुलक्षणम् ॥ ३ ॥ शुक्लकृष्णे संव-त्सरस्य दक्षिण वामयोः पार्श्वयोः । तस्यैषा भवति । शुक्रं ते अन्यद्यजतं ते अन्यद्विषुरूपे अहनी द्यौरिवासि । विश्वाहि माया अवसि स्वधावो भद्रा ते पूष-न्निहरातिरस्तु । नात्र भुवनं । न पूषा न पशवः । नादित्यः । संवत्सर एव प्रत्यक्षेण प्रियतमं विद्यात् ॥ ४ ॥ तै. आ. १. २.

होतो. ही गोष्ट **अह्नी** शब्दानें दर्शविलेले दिवसरात्र ह्मणजे ध्रुवप्रदेशांतील दीर्घ दिवसरात्र असें मानिल्याखेरीज संभवत नाहीं. ध्रुवाजवळ ही दीर्घ रात्र व दीर्घ दिवस बरोबरीचे असून एक मकरसंक्रमणाच्या सुमारास व दुसरा कर्कसंक्रमणाच्या सुमारास अशीं होत असल्यामुळें **अह्नीचे** हे दोन भाग संवत्सरदेवतेचे डावे उजवे हात असें आरण्यकांत अगदीं यथार्थ ह्मटले असून त्यावरून **अह्नीसंबं**-धाच्या वरील विवेचनाला चांगला जोर मिळतो.

दीर्घ दिवसाचें स्पष्ट वर्णन करणारीं वाक्येंही ऋग्वेदांत आहेत. ५, ५४, ५. यांत सूर्याच्या वाढलेल्या गतीचें ( **दीर्घ योजनम्** ) वर्णन आहे. पण याच्याहून स्पष्ट वर्णन १०, १३८, ३ यांत आहे. या सूक्तांत इंद्राच्या अंतरिक्षांतील पराक्रमाचें वर्णन असून पहिल्या ऋचेंत इन्द्रानें वृत्राला मारून उषा आणि पाणी यांनां मोकळें केल्याचें सांगितले आहे. दुसरींत सूर्याला याच रीतीनें प्रकाश पाडण्यासाठीं मोकळा केल्याबद्दल सांगितलें आहे. तिसरी ऋचा अशीः—

> **वि सूर्यो मध्ये अमुचद्रथं दिवो**
> **विदद्दासाय प्रतिमानमार्यः ।**
> **दृव्ळ्हानि पिप्रोरसुरस्य मायिन**
> **इंद्रो व्यास्यच्चकृवाँ ऋजिश्वना ॥**

ही ऋचा प्रस्तुत विषयासंबंधानें बरीच महत्वाची आहे. तिचा सरळ भावार्थ असाः— ' सूर्यानें आकाशाच्या मध्येच रथ सोडला. आर्याला दासाचें प्रतिमान ( तोडीस तोड ) मिळालें. ऋजिश्वाबरोबर पराक्रम करून इंद्रानें मायावी असुर जो पिप्रु त्याचे दृढ दुर्ग फोडून टाकिले. " यांत पहिल्या चरणांत सूर्यानें आकाशाच्या मध्यभागीं ( क्षितिजाजवळ नव्हे) आपला रथ तेथें थांबविण्यासाठीं सोडला असे स्पष्ट शब्दांनीं सांगि-तलें आहे; व या सूर्याच्या विलक्षण वर्तनाचा खुलासा टीकाकारांनां करितां आलेला नाहीं. या गोष्टीचा संबंध ग्रहणाशीं असेल असें कित्येकांचें मत आहे, पण त्यांत अर्थ नाहीं; कारण ग्रहणाच्या वेळी सूर्य कांहीं थांबत नाहीं.

---

१ तद्वीर्यं वो मरुतो महित्वनं दीर्घं ततान सूर्यो न योजनम् ।

सायणाचार्यांनी **रथं व्यमुचद्** याचा अर्थ " ' रथ चालावयाला मोकळा केला' असा करून **मध्ये दिवः** याचा 'आकाशाच्या मध्यभागाकडे' असा केला आहे. पण या अर्थांत शब्दांची फार ओढाताण केलेली आहे. **विमुच्** हा शब्द ऋग्वेदांत दुसऱ्या दहाबारा ठिकाणीं आला असून त्या प्रत्येक ठिकाणीं त्याचा अर्थ, रथाचे घोडे सोडणे असाच आहे; व सायणाचार्यांनींही तो तसाच घेतला आहे. ह्मणून वरील ऋचेंत ' सूर्यानें आपल्या रथाचे घोडे सोडिले ' असा स्वाभाविक होणारा अर्थच घेतला पाहिजे. शिवाय **दिवो मध्ये** याचा अर्थ आकाशाच्या मध्याकडे असा होणे शक्य नाहीं. पुनः सायणाचार्यांचा अर्थ मान्य केल्यास **प्रतिमान** शब्दाचें महत्व दिसत नाहीं. कारण या शब्दावरून दासाच्या दुष्ट कृत्याला उलट तोड इन्द्रानें केली असा अर्थ निघत आहे. हे दासाचें दुष्ट कृत्य आणि त्याला इंद्रानें केलेली उलट तोड ह्मणजे काय? **दास** आणि **आर्य** या शब्दांमुळे यूरोपीयन पंडितांत गोधळ उडून गेलेला आहे. या शब्दांचा **अनार्य** आणि **आर्य** असा अर्थ घेऊन आर्यांनीं अनार्यांवर मिळविलेल्या विजयाचें यांत वर्णन आहे असें ते मानतात. परंतु अनार्यांनीं केलेल्या आर्यांच्या पराभवाचें आधीं वर्णन आल्या-खेरीज, त्यांचा सूड आर्यांना घेतला असें ह्मणतां येणार नाहीं. शिवाय दास याचा अर्थ अनार्य असा जरी होतो, तरी प्रत्येक ठिकाणीं तसाच तो घेतला पाहिजे असें नाहीं; कारण इंद्राच्या शंबर, पिप्रु नमुचि वगैरे शत्रूंना दास शब्द पुष्कळ वेळां लाविलेला आहे. **वि सूर्यो मध्ये** यावरील ऋचेंतही इन्द्रानें केलेल्या पिप्रूच्या पराभवाचेंच वर्णन आहे; आणि अन्य ठिकाणीं पिप्रूला दास ह्मटलेलें आहे. ह्मणून

---

१ उत **दासं** कौलितरं बृहतः पर्वतादधि । अवाहन्निंद्र **शंबरं** । ऋ.४,३०, १४। यः सृबिंदमनर्शनिं **पिप्रुं दास**महीशुवं । वधीदुग्रो रिणन्नपः ! ८,३२,२। अत्रा **दासस्य नमुचेः** शिरो यदवर्तयः । ५,३०,७.। **दासाय** भियसं दधाति । १०,१२०,२ ( इन्द्रानें दासाच्या मनांत भीति उत्पन्न केली )। अमर्त्यं चिद्दासं मन्यमानमवाभिनद् । २,११,२. ( आपल्याला अमर मान-णाऱ्या दासाला इंद्रानें छिन्नभिन्न केलें ). याप्रमाणें कित्येक ठिकाणीं इन्द्राच्या शत्रूंना मोघमपणेंहीं दास ह्मटलें आहे.

या ठिकाणीं **आर्य** व **दास** हे शब्द इंद्र व पिप्रु यांचेच वाचक घेतले पाहिजेत. शिवाय या सूक्तांत वर्णिलेले इंद्राचे सर्व पराक्रम आकाशांतील असल्यामुळें एवढा मधलाच एक आर्य व अनार्य यांच्या मधील युद्धाला लावणें बरोबर नाहीं. सूर्याने भर आकाशांत मध्येच मुक्काम केल्याचें वर्णन ऋग्वेदांत इतर ठिकाणींही आहे. ७,८७,५ यांत ' वरुण आकाशांत या सुवर्णमयाला ( सूर्याला ) हिंदोळ्याप्रमाणे करिता झाला ' असें ह्मटलें आहे; त्यावरूनही सूर्य आकाशांत पुढें मागें झुलत असून क्षितिजावर दिसत असल्याचेंच स्पष्ट दिसत आहे. या सर्व विवेचनावरून प्रस्तुत ऋचेचा अर्थ ' सूर्यानें आकाशांत मध्येच मुक्काम केला, ( ह्मणजे दिवस पुष्कळ लांबला ) व अशा रीतीने इन्द्राला दासाच्या कृत्याला उलट तोंड मिळाली ' असाच उघड दिसतो. दासाचें कृत्य ह्मणजे काळोख उत्पन्न करून रात्री दीर्घ करणें हे होय. अर्थातच त्याच्या उलट करून त्याचा सूड उगविणे म्हणजे त्या रात्री एवढाच एक दीर्घ दिवस करणे होय. हाच मतलब **प्रतिमान** शब्दांत आहे. यूरोपीय पंडितांची इतिहासाची कल्पना सायणाचार्यांजवळ नसल्यामुळें त्यांनीं त्या पंडिताप्रमाणे न फसतां, **आर्य** आणि **दास** या शब्दांचा इन्द्र व त्याचा शत्रु असाच योग्य अर्थ केला आहे; पण त्यांनाही सूर्य भर आकाशांत मध्येंच थांबला कसा हे समजलें नाहीं. शब्द सरळ आणि साधे असूनही अर्थ लावण्याची खरी गुरुकिल्ली माहित नसल्यामुळें प्रचलित कल्पनांतच लोक कसे वाहत जातात हें या विवेचनावरून दिसून येईल.

येणेप्रमाणे रात्रिदिवसांच्या दोन निराळ्या जोड्यांचे उल्लेख ऋग्वेदांत आहेत असें आपल्याला आढळून आले. पहिली जोडी साध्या रात्रिदिवसांची व दुसरी ध्रुवमंडलांतील **अह्नी** नांवाची दीर्घ रात्रिदिवसांची. हिलाच तैतिरीय आरण्यकांत संवत्सरदेवतेच्या डाव्याउजव्या बाजू म्हटलें आहे. रात्र फार मोठी असल्यामुळें ती कदाचित् संपणार नाहीं अशी भीति पूर्वी ब्राह्मणांना वाटत असे, असे तै. संहितेंत स्पष्ट म्हटलें आहे. ऋग्वेदामध्येंही ' दीर्घं तमः ' ' दीर्घास्तमिस्राः ' ' असूर्यं तमः ' ' सूर्याचें दीर्घ योजन ' असे शब्द अनेक ठिकाणीं आलेले आहेत. जिचें परतीर दिसत नाहीं, अशा रात्रींतून पार पडावें ह्मणून

१ गृत्सो राजा वरुणश्चक्र एतं दिवि प्रेंखं हिरण्मयं शुभे कं ॥ ऋ.७,८७,५.

वेदांत देवांची प्रार्थना केलेली आहे; आणि अखेर तर सूर्य आकाशांत मध्येंच थांबला व अशा रीतीनें दासानें केलेल्या दीर्घ रात्रीबद्दल त्याचा सूड उगविण्यांत आला असें स्पष्ट वचन ऋग्वेदांत आहे. याप्रमाणें ऋग्वेदांत दीर्घ दिवस व दीर्घ रात्र यांबद्दलच केवळ उल्लेख नसून त्यांच्या जोडगोळीची कल्पनाही त्यांत स्पष्ट आहे; व ह्मणूनच त्यांना संवत्सराच्या डाव्या उजव्या बाजू असें तै. आरण्यकांत ह्मटलें आहे. अशा रीतीनें दीर्घ उषेचें अस्तित्व सिद्ध करणाऱ्या वचनांखेरीजही ध्रुवप्रदेशांतील दीर्घ दिवस व दीर्घ रात्र यांची माहिती वैदिक ऋषींना होती असें दाखविण्याला पुरेसा स्वतंत्र पुरावा आपल्याला मिळाला आहे; व तैत्तिरीय संहितेंत या गोष्टी पूर्वीच्या कल्पांतील ( पुरा ) आहेत असें स्पष्ट सांगितलें आहे.

आतां दुसऱ्या एका ध्रुवप्रदेशांतील विशेष गोष्टीचें थोडें विवेचन करून हें प्रकरण पुरे करूं. ही गोष्ट ह्मणजे सूर्याचा दक्षिणेकडून येण्याचा मार्ग होय. मागील एका प्रकरणांत सांगितलेंच आहे की, समशीतोष्ण किंवा शीत कटिबंधांत रहाणाऱ्या मनुष्याला सूर्य अगदीं डोक्यावर आलेला कधींही दिसणार नाही आणि उत्तर गोलार्धांतील या कटिबंधांत रहाणाऱ्यांना तो दक्षिणेस दिसून उत्तर ध्रुवावर तर तो दक्षिणेस उगवतांना दिसेल. **दक्षिणा** याचा अर्थ वैदिक संस्कृतांत तसाच इतरही आर्यभाषांत 'उजवी बाजू' किंवा 'दक्षिण दिशा' असा दोन्ही प्रकारचा होतो. 'दान' किंवा 'देणगी' असा तिसराही या शब्दाचा अर्थ आहे; व त्यावर फारच भर देण्यांत येत असतो. सूर्याला "दक्षिणेचा पुत्र" असें ऋ. ३,५८,१ यांत म्हटलें आहे. यांत **दक्षिणा** म्हणजे उषा असें जरी म्हटलें, तरी पुनः उषेला **दक्षिणा** कां म्हटले हा प्रश्न येतोच. **दक्षिणा** म्हणजे कुशल असा अर्थ घेऊन तिचा उषेशीं संबंध जोडण्याचा प्रयत्न करण्यांत येतो, पण त्यापेक्षां तिचा दक्षिण दिशेशीं संबंध लावणे अधिक बरें असे वरील विवेचनावरून ह्मणावयास हरकत नाहीं. वैदिक ऋचांचें विवेचन करतांनां बारीक सारिक गोष्टींचाही सूक्ष्म विचार करणें अवश्य आहे हें खरें; पण **दक्षिण** किंवा त्यावरून निघणारे इतर शब्द यांचा ऋग्वेदांत कोठेंही दक्षिण दिशेशीं संबंध नाहीं असें ह्मणणें धाडसाचेंच होईल. हेरोडोटस नांवाच्या ग्रीक इतिहासकारानें लिहिलें आहे कीं,

'ईजिप्त देशाच्या राजानें कांहीं फिनीशियन दर्यावर्दी लोकांना गलबतांतून आफ्रिकेला (लिबिया) प्रदक्षिणा करून जिब्राल्टरच्या सामुद्रधुनीच्या बाजूनें परत यावयास सांगितलें. त्याप्रमाणें आपली सफर पुरी करून ते नावाडी तिसऱ्या वर्षी परत आले, व त्यांनी राजाला सांगितलें की लिबियाला प्रदक्षिणा करतांना सूर्य आपल्या उजवीकडे दिसत असे.' परंतु ह्या नांवाड्यांनी लिबियाला प्रदक्षिणा केलीच नाही, कारण खरोखर त्यांनीं तशी प्रदक्षिणा केली असती तर, सूर्य आपल्याला उजवीकडे दिसला अशा खोट्या खोट्या गोष्टी त्यांनी सांगितल्या नसत्या अशी टीका करून हेरोडोटसनें त्या नावाड्यांना खोटे ठरविलें आहे. हेरोडोटस हा उत्तर समशीतोष्ण कटिबंधातच काय तो ( विषुववृत्तापासून २३$\frac{1}{2}$ अंशांच्या वर उत्तरेस ) फिरलेला असल्यामुळें सूर्य उत्तरेस दिसणें शक्यच नाहीं असें त्याला वाटत होतें. परंतु जी गोष्ट त्यानें अगदीं अविश्वसनीय म्हणून मानिली तीच गोष्ट आम्हाला त्या नांवाड्यांच्या खरेपणाबद्दल प्रत्यक्ष प्रमाण म्हणून वाटते.* पण हेरोडोटसला हें पुढचें भविष्य काय माहीत? असो. तर हेरोडोटसच्या या गोष्टीवरून धडा घेऊन, ऋग्वेदांत जेथें जेथें ह्मणून दक्षिणा शब्द आढळेल तेथें तेथें त्याचा 'उजवी बाजू' किंवा 'देणगी' असाच केवळ अर्थ करण्याचा हट्ट सोडून दिला पाहिजे. दक्षिण अथवा त्या स्वरूपाचे इतर शब्द यांचा ऋग्वेदांत कोठेही दाक्षिण दिशेशीं सबध नाही असें म्हणणें धाडसाचेंच होईल. सूर्य दक्षिणेकडून येतो असे स्पष्ट सांगणारी वचनें वेदांत नसतील, पण उषेला दक्षिणा ह्मणणे ( ऋ. १, १२३, १–१०, १०७, १ ) किवा सूर्याला 'दक्षिणेचा पुत्र' म्हणणे या गोष्टी बऱ्याच सूचक असून वैदिक काळीं हे शब्द रूढ असल्यामुळेच ऋषींनी त्यांचा प्रयोग केला असावा. भूगर्भशास्त्रांत ज्या प्रमाणे अस्थिशेष, त्याप्रमाणें भाषाशास्त्रांत जुने शब्द इतिहासपूर्ण असतात. या शब्दांचा मूळ इतिहास ऋषींच्या स्मरणांतून कदाचित् गेला असेल, पण त्यापासून स्वाभाविकपणें निघणारी अनुमाने काढावयाला आपल्याला

---

* आफ्रिकेचें दक्षिण टोंक दक्षिण गोलार्धांतील समशीतोष्ण कटिबंधांत असल्यामुळें उत्तर गोलार्धांतील समशीतोष्ण कटिबंधांत जसा सूर्य दक्षिणेस दिसतो, तसा तेथें तो उत्तरेस दिसेल हें उघड आहे.

काय हरकत आहे? उत्तर दिशावाचक **उत्तर** हा शब्द 'वरची' अशा अर्थाचा, व दक्षिण दिशा वाचक **अधर** शब्द 'खालची' या अर्थाचा आहे, या गोष्टीवरूनही वरील अनुमानालाच बळकटी येते. ध्रुवाखेरीज इतर ठिकाणी उत्तर दिशेला 'वरची' असे म्हणतां येणार नाही. मध्य-कालीन संस्कृत वाङ्मयांत सूर्य सप्तर्षिपुंजाच्या **खालीं** असतो अशी कल्पना आढळते. सूर्याचा मार्ग उर्फ क्रान्तिवृत्त सप्तर्षींच्या दक्षिणेस आहे; पण त्यांच्या **खालीं** सूर्य असावयाला म्हटले तर पहाणारा ध्रुवमंडलस्थच असला पाहिजे. सप्तर्षि उंचावर बसविलेले आहेत अशा अर्थाचे एक वाक्य मागें दिलेच आहे. समशीतोष्ण कटिबधांतही सूर्य नेहमीं दक्षिणे-सच असल्यामुळें त्याचा दक्षिण मार्ग स्थापित झाला, तरी तो आपल्या उपपत्तीला कांहीं विशेष साधक होत नाहीं. म्हणून त्यावर फार जोर देण्याची गरज नाही. असो. दीर्घ रात्र व दीर्घ दिवस यांच्यासंबंधानें पुष्कळ पुरावा या प्रकरणांत दिला. आतां पुढच्या प्रकरणांत मास व ऋतु यांविषयी विवेचन करून तत्संबंधीं वेदग्रथांतील वर्णन येथपर्यन्त दिलेल्या पुराव्यावरून स्थापित होणाऱ्या उपपत्तीशी अगदी बरोबर कसें जुळतें ते पाहूं.



१ अधःप्रस्थापिताश्वेन समावर्जितकेतुना । सहस्ररश्मिना साक्षात् सप्रणाम-मुदीक्षिताः । कालिदास. कु. सं. ६, ७.

सप्तर्षिहस्तावचितावशेषानधो विवस्वान् परिवर्तमानः ॥

कु. सं. १, १६.

# प्रकरण ७ वें.

## मास आणि ऋतु.

सोडून दिलेल्या कालमापनपद्धतीविषयीं प्रमाणें-पुराणमताभिमानी धर्माचार्य जुनी पद्धति बहुधा यज्ञकर्मांत राखून ठेवितात-ध्रुवप्रदेशांतील सूर्यप्रकाशयुक्त महिन्यांची कमीजास्त संख्या-यज्ञसत्रांवर त्यामुळे होणाऱ्या परिणामाचें विवेचन-सूर्याच्या सप्तविध स्वरूपाचें वेदांतील वर्णन-अदितीची कथा-अदितीनें आपले सात पुत्र देवांनां दिले आणि आठव्याला टाकून दिलें-या कथेचे ब्राह्मणांत व तैत्तिरीय आरण्यकांत आढळणारे निरनिराळे अर्थ-द्वादश आदित्य म्हणजे बारा महिन्यांचे बारा सूर्य असा वेदोत्तरकालीन वाङ्मयांत समज आहे-त्यावरून सात आदित्य म्हणजेही सूर्यप्रकाश युक्त अशा सात महिन्यांच्या सात देवता होत असें अनुमान होतें-निरनिराळे ऋतु होण्यास निरनिराळे सूर्य पाहिजेत असा समज-अदितीची कथा चालू युगांतील नसून पूर्वीच्या युगांतील ( पूर्व्यं युगम् ) आहे-याज्ञिक ग्रंथांतील या गोष्टीविषयी प्रमाणें-आदिकालांतील यजमानांना ऋग्वेदांत 'आमचे प्राचीन पितर' असे म्हटले आहे-त्यांपैकीं अथर्वण आणि अंगिरस हे हिंदीयूरोपीयकालीन होत असे दाखवितां येते-अंगिरसांतील मुख्य कुलें, नवग्व आणि दशग्व-वलाशीं होणाऱ्या युद्धांत हे अंगिरस इंद्राला साहाय्य करीत-ते आपलें सत्रें दहा महिन्यांत आटोपीत-सूर्य तमांत रहातो असें वर्णन-दहा महिन्यांच्या सत्रावरून सूर्यप्रकाशयुक्त दहा महिन्यांच्या वर्षाचा बोध होतो-नवग्व आणि दशग्व शब्दांची व्युत्पत्ति-या शब्दांवरून नऊ किंवा दहा महिन्यांत सत्र संपविणाऱ्या ऋत्विजांचा बोध होतो असें सायणाचार्यांचें मत आहे-अंगिरसांना **विरूपे** हें विशेषण लाविलेलें आहे-त्यावरून अंगिरसांच्या दुसऱ्या जातीचा बोध होतो-सप्तगु ऊर्फ सात होते ( होतृचें-अनेकवचन ) किंवा विप्र-दीर्घतम्याची कथा-तिचें महाभारतांतील स्वरूप-ऋग्वेदांत दीर्घतमा हा अश्विनांचा आश्रित आहे-तो दहाव्या **युगांत** जरायुक्त होतो-**युग** शब्दाच्या अर्थाबद्दल विवेचन-**मानुषा युगा** म्हणजे मनुष्यांचीं **युगें** ( कालपर्याय ) असा अर्थ ऋग्वेदांत आहे; मनुष्यांच्या **पिढ्या** किंवा **जाति** असाच नेहमीं नाहीं-या मताच्या सिध्यर्थ

दोन वैदिक वाक्यांचें विवेचन–पाश्चात्य विद्वानांनीं केलेल्या या वाक्यांच्या अर्थांचें परीक्षण–त्यांचा अर्थ त्याज्य होय–**मानुषा युगा** म्हणजे दीर्घ उषा व दीर्घ रात्र यांच्यामध्यें येणारे महिने असा अर्थ दिसतो–दीर्घतमा म्हणजे दहाव्या महिन्यांत क्षितिजाखालीं जाणारा सूर्य–**मानुषा युगा** आणि **क्षपः**–प्राचीन काळचे पांच ऋतु–पांच ऋतुदर्शक अशा एका ऋचेचें विवरण–पंचऋ- [illegible] रहातो असें वर्णन–त्यावरून दीर्घ रात्रीच्या काळोखाचा बोध होतो–हे पांच ऋतु म्हणजे सहांपैकीं कोणते तरी दोन एकत्र करून झालेले नव्हत–त्यासंबंधानें ब्राम्हणांत केलेला खुलासा समाधानकारक नाहीं–एकंदर विवेचनाचा गोषवारा.

## मास आणि ऋतु.

देवांच्या षाण्मासिक रात्रिसंबंधी संस्कृत व अवेस्तिक वाङ्मयामध्ये आढळणाऱ्या उल्लेखांच्या अनुरोधानें पहातां तीस दिवसांच्या अखंड उषेचें तसेच सहा महिन्याहून कमी परंतु २४ तासांहून अधिक अशा अक्षांशापरत्वे कमी-जास्त असणाऱ्या अखंड अशा दीर्घ रात्रिदिवसांचे वर्णन करणारी वाक्ये ऋग्वेदांत आढळतात व या गोष्टी त्यांत प्राचीन काळच्या ( पुरा ) ह्मणून वर्णिल्या आहेत, हे पूर्व प्रकरणांत दाखविलें. आतां पुढे प्रश्न असा आहे की, वेदांत मास, ऋतु किंवा वर्ष यांच्याविषयींही अशाच प्रकारचे उल्लेख आहेत की नाहीं? ध्रुवप्रदेशांतील कालमापनपद्धति ( पचांग ) संहिताकालांतील पद्धतीपेक्षां निराळी आहे हें पूर्वी सांगितलेच आहे. पण ऋषिवर्गाचे पूर्वज जर पूर्वी कधीं ध्रुवाजवळ रहात असतील तर त्यांच्या वेळीं चालत असलेल्या कालमानाची पद्धति त्यांच्या पुराणमताभिमानी वंशजानीं कशीतरी जपून ठेविली असलीच पाहिजे. बदललेल्या परिस्थितीमुळे नवीन पद्धत व्यवहारासाठी स्वीकारून व जुनी धार्मिक विधींसाठी राखून ठेवून जुन्या गोष्टींविषयी आदर दाखविलेला ईजिप्ट देशांतही दृष्टीस पडतो. मग वैदिक आर्यांनी तसा आदर दाखविला नसेल असे कसे होईल? ध्रुवप्रदेशांतील कालमान व त्याच्या अलीकडील प्रदेशांतील कालमान यांच्यांत इतका मोठा भेद आहे कीं,

ध्रुवप्रदेशांतून बाहेर पडल्याबरोबर नवीन मान स्वीकारणें अगदीं अवश्य आहे. वैदिक आर्योनीं असा प्रकार केला असला तरी त्यांनी पुराणमता-भिमानित्वामुळें ही परंपरागत गोष्ट कोणत्याना कोणत्या तरी रूपानें आपल्या याज्ञिक विधींत ग्रथित करून ठेविली असली पाहिजे. निरनिराळ्या आर्य भाषांतील शब्दांच्या परस्परसाम्यावरून यज्ञ करण्याची चाल अगदीं आदिकालपासून चालू आहे ही गोष्ट सिद्ध झाली आहे. तसें असल्यास आर्य लोक ध्रुवाकडून खाली खाली येत असतां त्यांच्या यज्ञपद्धतीत बरेच मोठे फेरफार झाले असले पाहिजेत. कालमापन-पद्धति आणि यज्ञपद्धति व विशेषतः संवत्सरसत्रें यांच्यांत निकट संबंध असून, तीं सूर्याच्या वार्षिक गतीवर बसविलेलीं होती हें वेदकालनिर्णयांत दाखविलेंच आहे. अग्नि जागृत ठेवून वार्षिक यागपर्याय योग्य ऋतूंवरच होत आहेत कीं नाही हें पहाणें ऋत्विजांचे कर्तव्य होतें. ध्रुवाजवळ रहात असतांची पद्धति व मागाहून स्वीकारलेली पद्धति ह्या जरी निराळ्या होत्या तरी, या नवीन पद्धतीत जुन्या पद्धतीच्या पुष्कळ खुणा सांपडत असल्यामुळे आपल्या वैदिक ऋषींचे पूर्वज ध्रुवप्रदेशांत रहात होते हें सिद्ध होते. परंतु ही प्रमाणे दाखविण्यापूर्वी अगदी आद्य यज्ञपद्धति व ऋषि-कालीन पद्धति यांच्यांत फरक असण्याचा संभव कोठे कोठें आहे तें पाहूं.

संहिता व ब्राह्मणें यांत वार्षिक सत्रें बारा महिनेपर्यंत चालावयाचीं असें ह्मटलें असतें. पण ही गोष्ट ध्रुवप्रदेशाच्या आंत शक्य नव्हती; कारण तेथें सूर्य कित्येक दिवस अथवा महिनेही सारखा क्षितिजाखालीं असून त्यामुळे तेथे दीर्घ रात्र होत असते. ह्मणून अगदी प्राचीन वार्षिक सत्रांचा काल बारा महिन्यांहून कांही तरी कमी असलाच पाहिजे. ह्मणजे बारांपेक्षां कमी महिन्यांचें वार्षिक सत्र हे एक जुन्या पद्धतीचे विशिष्ट लक्षण झालें. आतां ध्रुवप्रदेशांत सर्व ठिकाणी दीर्घ रात्रिदिवसांचा काल कांहीं सारखाच नसतो. खुद्द ध्रुवावर रात्र व दिवस सहा सहा महिन्यांचीं असतात. पण सगळे लोक ध्रुवावर रहात असणे संभवनीय नाहीं. ह्मणून ध्रुवप्रदेशांत सूर्य जाऊन येऊन क्षितिजावर दिसण्याचा काळ स्थानपरत्वें सातपासून अकरा महिनेपर्यंत असावयाचा. ह्या सूर्य प्रकाशाचा काल एक दीर्घ दिवस व त्यांच्या मागून एकामागोमाग एक येणारीं कांहीं साधीं २४ तासांचीं अहोरात्रें मिळून झालेला असावयाचा. यज्ञयाग, व्या-

पारधंदे, धार्मिक व इतर महत्वाचे विधि हे सर्व याच काळांत व्हावयाचे. ह्या काळ संपला ह्मणजे दीर्घ रात्र होऊन ती संपण्याच्या सुमारास उषः-प्रकाश पडला कीं पुनः कर्मकालाचा प्रारंभ झाला. असें असल्यामुळें ध्रुवाजवळच्या वार्षिक सत्राचा काल ह्मणजे वस्तुतः सूर्य प्रकाशाचा कालच असावयाचा. ह्मणून प्रकाशयुक्त महिन्यांची कमीजास्त संख्या हें एक ध्रुवाजवळील याज्ञिक कालमानाचें विशिष्ट लक्षण असणार. ऋग्वेद आणि इतर संहिता यांतील अति प्राचीन काळच्या कालमानाचा विचार करितांना ही गोष्ट आपल्याला नीट लक्षांत ठेविली पाहिजे.

आपण पहातों असल्या तीस दिवसांची उषा जेथें आहे तो प्रदेश इतका ध्रुवाजवळ पाहिजे की तेथे सूर्य प्रकाशाचा काळ, चार पांच महिन्यांचा दीर्घ दिवस व नंतर साध्या रात्रिदिवसांच्या कांही जोड्या मिळून सात महिन्यांहून जास्त असतां कामा नये. ऋग्वेदांत असल्या कालमानाच्या खुणा राहिलेल्या दिसून येतात. अदिति व तिचे सात पुत्र यांच्या कथेंत या काळाचा संबंध असून ती कथा कोणत्या तरी सृष्ट चमत्कारावर रचिलेली आहे. या गोष्टीत आदित्यांची संख्या अगदी प्राचीनकाळीं सात होती असें सांगितले असून ऋग्वेदांत इतर पुष्कळ ठिकांणीही ही कल्पना स्वतंत्र रूपानें आढळते. ऋ. ९, ११४, ३ यांत सात आदित्य व सात ऋत्विज् एकाच ठिकाणी सांगितले आहेत. २, २७, १ यांत मित्र, अर्यमा, भग, वरुण, दक्ष आणि अंश अशी सहा आदित्यांची नांवें दिली आहेत, पण सातव्याचे दिले नाही. तरी सूर्याचे सप्तविशिष्टत्व अनेक गोष्टींवरून उघड सिद्ध होत आहे. ऋ.५,४५,९ यांत त्याला **सप्ताश्व** (सात घोडे असलेला) म्हटलें आहे; १, ५०, ८ यांत त्याचा रथ सात हरित् अश्व ओढतात असे सांगितले आहे; तसेच, १, १६४, २ यांत एकचाकी रथ सात नांवांचा अश्व ओढतो असे वर्णन केलें आहे. अथर्ववेदांतही ( ७, १०७, १ ) सूर्याचे सात तेजस्वी रश्मी सांगून ऋग्वेदांत आलेला आदित्य शब्द **अदितेः पुत्राः** असे शब्द घालून अधिक स्पष्ट केला आहे ( अ. वे. १३, २, ९. ). आतां सूर्याचे सातच रश्मि कां हें कांही टीकाकारांनी कोठे सांगितलेलें नाही. लोलकांतून दिसणारे सात प्रकारचे किरण वैदिक ऋषींना माहीत होते असें मानिल्यास गोष्ट निराळी. पण यास्क किंवा सायणाचार्य यांना कांहीं

१ सप्त युंजन्ति रथमेकचक्रमेको अश्वो वहति सप्तनामा ।

त्याची माहिती होती असें दिसत नाही. पण हे सात रश्मि गृहित धरून त्यावरून सात आदित्याचा जरी उलगडा केला तरी आठव्या मृत आदित्याची व्यवस्था त्यावरून लावतां येत नाही ती नाहींच. अदितीच्या गोष्टीत सांगितले आहे की "अदितीला आपल्या शरीरापासून जे आठ पुत्र झाले त्यापैकी सातांसह ती देवांकडे गेली; आणि (आठव्या) मार्तांडाला टाकून देती झाली. पूर्व युगामध्यें अदिति सात पुत्रांसह (देवांकडे) गेली. तेथे तिने मार्तांडाला जन्मण्यासाठी व मरण्यासाठी पुनः आणिले." ही गोष्ट वैदिक ग्रथात पुष्कळ ठिकाणी आली असून तिचा अर्थ लावण्याचा प्रयत्नही पुष्कळ ठिकाणी केलेला आहे. तै. * संहितेंत साध्यां साठी (देवासाठी) ब्रह्मौदन शिजविणाऱ्या अदितीची कथा दिली आहे. "या ब्रह्मौदनाचा भाग देवांनी तिला दिला व त्यापासून तिला चार आदित्य झाले. पुनः तिने दुसऱ्याने ब्रह्मौदन शिजवून तो आपणच खाल्ला, तेव्हा तिला त्यापासून कच्चे अंडे झाले. तिसऱ्याने तिने तो शिजविला, तेव्हा मनुष्यजातीचा आदिजनक विवस्वत् आदित्य उत्पन्न झाला." या कथेत आदित्यांची एकदर संख्या व नावे दिलेली नाहीत. तरी ही उणीव तै.। ब्राह्मणाने भरून काढली आहे. त्यात सांगितले आहे की 'अदितीने चार वेळा ओदन शिजविला व प्रत्येक वेळी देवांनी तिला त्याचा शेषभाग दिला. अशा रीतीने तिला पुत्राच्या चार जोड्या झाल्या. पहिली जोडी धातृ व अर्यमा यांची, दुसरी मित्र व वरुण यांची, तिसरी अंश व भग यांची. आणि चवथी इन्द्र व विवस्वत् यांची. पण या ब्राह्मणांतही आठव्या आदित्याला मार्तांड का म्हटले व त्याला टाकून कां दिले याचा उलगडा केलेला नाही. तैत्तिरीय आरण्यकांत ही गोष्ट देऊन आठ आदित्यांची नांवेही दिली आहेत. पण त्यांत सुद्धां त्या आदित्यापैकी मार्तांड कोणता हे सांगितलेले नाही. तरी या आरण्यकांत दुसऱ्या एका

---

१ अष्टौ पुत्रासो अदितेर्ये जातास्तन्वस्परि । देवाँ उप प्रैत्सप्तभिः परा मार्तांडमास्यत् ॥ सप्तभिः पुत्रैरदितिरुप प्रैत्पूर्व्यं युगं । प्रजायै मृत्यवे त्वत्पुनः मार्तांडमाभरत् ॥ ऋ. १०, ७२, ८-९.

* तै. सं. ६, ५, ६, १.

। तै. ब्रा. १, १, ९, १.

ठिकाणीं दिलेल्या वर्णनावरून या प्रश्नाचा थोडासा उलगडा करतां येतो. या वर्णनांतील आदित्यांचीं नांवें निराळीं आहेत; व त्यांपैकीं आठवा कश्यप हा महामेरूला सोडून कधीं जात नाहीं असें म्हटलें आहे. हे सप्त आदित्य म्हणजे सप्त प्राण असें कित्येक आचार्यांचें मत देऊन दुसरे आचार्य ते सप्त ऋत्विज होत असें म्हणतात असें या आरण्यकांत सांगितलें आहे. पुढें तिसरा अर्थ दिला आहे तो असा:—निरनिराळ्या ऋतूंत सूर्य किरणांचा निरनिराळा परिणाम होत असल्यामुळें सूर्य निराळे मान आहेत असें म्हटलें असावें. या अर्थाच्या पुष्ट्यर्थ त्या आरण्यकांत ' दिग्भ्राज ऋतून्करोति ' ( अनेक दिशांत प्रकाशून ते ऋतु उत्पन्न करतात ) हा वैदिक मंत्र दिला आहे. हा मंत्र प्रस्तुत उपलब्ध असलेल्या वेदसंहितांत कोठें आढळलेला नाहीं. सायणाचार्यांनींही या आरण्यकावरील भाष्यांत ' निरनिराळे सूर्य ऋतु करितात असें मानिल्याशिवाय निरनिराळे ऋतुधर्म संभवत नाहींत. म्हणून निरनिराळ्या दिशांत निरनिराळे सूर्य असलेच

---

१ तै. आ. १, ७. आरोजो भ्राज. पटर. पतंग । स्वर्णरो ज्योतिषीमान् विभासः ।..... । कश्यपोऽष्टम. । स महामेरुं न जहाति ।...... ते अस्मै सर्वे कश्यपाज्ज्योतिर्लभन्ते ।.. ..। सप्त शीर्षण्याः प्राणा. सूर्या इत्याचार्याः । तेषामेषा भवति । " सप्त दिशो नाना सूर्याः सप्त होतार ऋत्विजः । देवा आदित्या ये सप्त तेभि सोमाभि रक्ष न " इति ( ऋ. ९, ११४, ३ ) । सप्तर्त्विजः सूर्या इत्याचार्या. ।....। तदप्याम्नायः । दिग्भ्राज ऋतून् करोति । एतयैवावृता सहस्रसूर्यतायाः इति वैशंपायन. ।.....। नानालिंगत्वादृतूनां नानासूर्यत्वं । अष्टौ तु व्यवसिता इति ।

यावर सायणाचार्य ह्मणतात:—' दिग्भ्राज. ' तां तां दिशं प्राप्यावस्थिताः सूर्याः ' ऋतून ' वसंतादिसूचितानृतुधर्मान ' करोति ' तस्यां तस्यां दिशि कुर्वन्ति । नहि ऋतूत्पादकसूर्यव्यतिरेकेण तत्तदृतुधर्माः संभवन्ति । तस्मात्संत्येव दिक्षुः विभिन्नाः सूर्या. ।............।नानालिंगत्वादिति । यदि एक एव सूर्यः स्यात् तदानीं वसंताद्यृतूनां नानालिंगत्वं न स्यात् । न हि कारणभेदमन्तरेण कार्यभेदः संभवति । तस्मादृतुधर्मवैलक्षण्यसिद्धये बहुसूर्यत्वमभ्युपेयम् ।......। ' अष्टौ तु व्यवसिता ' इति । बाढम् । संत्येव तत्तल्लिंगकल्पा अनन्ताः सूर्याः । किन्तु तत्रास्ति कश्चिद् विशेषः । ' व्यवसिताः ' निश्चिताः ।

पाहिजत ' एवढेंच म्हटलें आहे. पण हा अर्थ मान्य केल्यास ऋतु लक्षणें हजारों असल्यामुळे सूर्यही हजारो मानावे लागतील. ही शंका त्या आरण्यकांतच वैशंपायनानें काढिलेली म्हणून दिली आहे. पण शेवटीं अनेक सूर्य असले तरी आठच श्रतिप्रमाण असल्यामुळे तेवढेच मानावे असा[1] त्यांत शेरा मारिला आहे. शतपथ ब्राह्मणात ( ३,१,३,३ ) या अदितीच्या गोष्टीसंबंधानें सागतांनां असें म्हटलें आहे कीं, तिच्या फक्त सातच पुत्रांना **देवाः आदित्याः** असें म्हणतात, आणि आठवा मार्तांड हा पुरा वाढलेला नसल्यामुळे देव आदित्यांनी त्याच्यापासून मनुष्यें व इतर प्राणी निर्माण केले.' या ब्राह्मणांत दुसऱ्या एक दोन ठिकाणीं ( ६,१,२,८ व ९,६,३,८ ) आदित्य बारा म्हणून सांगितले आहेत. प्रजापतीच्या बारा बिन्दूंपासून बारा आदित्य उत्पन्न झाले व त्यानां निरनिराळ्या दिशात प्रजापतीने ठेविलें, असें एके ठिकाणीं सांगून, दुसरे ठिकाणीं, आदित्य किती असा प्रश्न करून 'संवत्सराचे बारा मास हेच आदित्य' असें त्याचें उत्तर दिलें आहे. उपनिषदांमध्येंही बाराच आदित्य सांगितले आहेत. अदितीच्या स्वरूपाविषयीं अनेकांचे अनेक तर्क आहेत, पण त्यांपैकीं कोणीही आदित्याच्या संख्येसंबंधानें योग्य खुलासा केलेला नाहीं. उलट आदित्यांच्या सात किंवा आठ या संख्येचा सूर्याच्या गतीशीं कांहीं संबंधच नाहीं असें मानण्याकडे बऱ्याच जणाचा कल आहे. आठ आदित्य आठ मुख्य दिशाचे दर्शक होत असें कोणाचें मत आहे; पण टाकून दिलेल्या आठव्या आदित्याची त्यांत व्यवस्था लागत नसल्यामुळे त्या मार्तांडाप्रमाणे हे मतही टाकून देण्यासारखेंच आहे.

अर्थ लावण्याच्या खऱ्या गुरुकिल्लीच्या अभावीं एखाद्या साध्या गोष्टीविषयींही कसे तर्क वितर्क सुरू होतात ते दाखविण्यासाठीं अदितीच्या कथेविषयीं एवढा ऊहापोह करावा लागला. असो. बारा आदित्य म्हणजे वर्षाच्या बारा महिन्यांच्या बारा देवता होत असें शतपथ ब्राम्हणांतील वर दिलेल्या वाक्यावरून उघड होत आहे. आदित्यांच्या संख्येचा हा स्पष्ट खुलासा, आणि ऋतूंचीं नानाविध लक्षणे अनेक सूर्य असल्यामुळेंच

---

२ स मनसैव वाचं मिथुनं समभवत् । स द्वादश द्रप्सान् गर्भ्यभवत् । ते द्वादशादित्या असृज्यन्त तान् दिक्षूपादधात् ( श. ब्रा. ६, १, २, ८ ) । कतम आदित्या इति । द्वादश मासाः संवत्सरस्यैत आदित्याः ( श. ब्रा. ९,६,३,८ ) ।

उत्पन्न होतात अशी श्रद्धा, या दोन गोष्टी पुढे असल्यावर, आज बारा आदित्य म्हणजे जसे वर्षाच्या बारा महिन्यांचे दर्शक आहेत, तसे पूर्वी (पूर्व्यं युग) सात आदित्य हे वर्षाच्या सात महिन्यांचे दर्शक होते, असें मानावयाला कल्पनेची फार ओढाताण करावयाला नको आहे. परंतु आर्य लोकांचे मूलस्थान मध्यआशियांत कोठें तरी होते अशा पूर्व कल्पनेने बद्ध झालेल्या पंडितांना हे मत रुचलें नाहीं किंवा कदाचित् सुचलेंही नसेल. म्हणून, तैत्तिरीय आरण्यकांत निरनिराळे महिने निरनिराळ्या सूर्यांमुळें होतात असें सांगून त्याला आधार म्हणून सध्या अनुपलब्ध असा एक वेदमंत्रही दिला आहे, व शेवटीं सात आदित्य सात प्रदेशांत राहून ऋतू उत्पन्न करीत असतात या मतालाच पुष्टि दिली आहे, ही गोष्ट फार समाधान मानण्यासारखी आहे. सात सूर्य व सात दिक्प्रांत यांचा परस्परसंबंध ऋग्वेदांतही सांगितला आहे *( ९, ११४,३). असो. तर आतां अदितीच्या गोष्टीचें सरळ तात्पर्य असें कीं, तिनें आपले सात पुत्र जे सात आदित्य ते प्रकाशयुक्त सात मास करण्याकरितां देवांना दिले; तिला आठवाही पुत्र झाला पण तो अपूर्ण वाढीचा होता; म्हणजे हा आठवा महिना प्रकाशाचा नसून तेथपासून काळोख सुरू झाला. ही गोष्ट पूर्वयुगांत घडली म्हणून जें सांगितलें आहे तें फार महत्वाचें आहे. या सूक्तांत पहिल्या दोन ऋचांत युग शब्द कालविभागवाचक म्हणून योजलेला आहे हे **देवानां पूर्व्ये युगे** व **उत्तरे युगे** या प्रयोगावरून उघड दिसत आहे. यूरोपीय पंडित युग याचा अर्थ प्रत्येक ठिकाणीं 'पिढी' असा करतात. परंतु प्रस्तुत ऋचेंत तो तसा घेतां येत नाहीं. सूर्याचे सात रश्मी, किंवा सात घोडे, किंवा सात नांवाचा एकच घोडा या सर्वांतील सात संख्येचा संबंध सूर्यप्रकाशयुक्त अशा वर्षाच्या सात महिन्यांशींच आहे. तीस दिवसांची दीर्घ उषा जेथें आहे तेथें सूर्य प्रकाशाचे सात महिने असले पाहिजेत. सात आदित्य म्हणजे प्रकाशयुक्त सात महिने आणि आठवा मार्तांड म्हणजे काळोखाचा काळ असें मानिल्यास

* ही ऋचा वर १३० पानांत टीपेंतील तै. आरण्यकांतील उताऱ्यांत आली आहे. तिचा भावार्थः—सात दिक्प्रांत असून त्यांचे सात सूर्य आहेत; सात ऋत्विज होते आहेत; हे सोम, जे सात आदित्य देव आहेत त्यांसह तूं आमचें रक्षण कर.

अदितीच्या गोष्टीचा चांगला उलगडा होतो.[1] मार्तांड शब्द **मार्त** म्हणजे मृत ( मृ—मरणे या पासून ) आणि **अंड** म्हणजे अंडे किंवा पक्षी यांपासून झाला आहे; व त्याचा अर्थ मृत सूर्य म्हणजे क्षितिजाखाली असलेला सूर्य असा होतो; कारण ऋ. १०,५५,५ यात **ममार** (मृत झाला ) हा शब्द सूर्याच्या प्रात्याहिक अस्ताला लाविलेला आहे. सूर्याला पक्षी असेही ऋग्वेदांत कित्येक ठिकाणी म्हटले आहे. (५,४७,३ सुपर्ण—१०,५५,६ सुपर्ण—१०,११९,३ कुवित्—१०,१७७,१८ पतंग). तर मग टाकून दिलेला मार्तांड म्हणजे क्षितिजाखाली बुडालेला सूर्य असून ही गोष्ट ज्या ठिकाणी सूर्य सात महिने क्षितिजावर असून आठव्या महिन्यांत तो खाली जातो त्या ठिकाणची होय. हे सूर्याचे विशिष्ट स्वरूप स्मृतिपटलावर एकदां बिंबल्यावर नुसत्या स्थानांतराने त्याची आठवण कोणाच्याही मनातून जाणें शक्य नाही. वैदिक ऋषी द्वादशादित्याच्या प्रदेशात रहात होते तरी त्याना हे सूर्याचे स्वरूप परंपरागत जुन्या कथेच्या रूपाने माहीत होते.

अक्षांशापरत्वे कमी जास्त होणारी महिन्यांची संख्या हे ध्रुवप्रदेशाचें विशिष्ट लक्षण असल्यामुळे केवळ सात महिन्याच्या सूर्यप्रकाशयुक्त कालाचाच उल्लेख काय तो ऋग्वेदात सांपडतो असे म्हणून भागणार नाही. कारण प्रस्तुत उपपत्ति खरी असल्यास सात महिन्याबरोबर आठ, नऊ किंवा दहा महिन्यांचाही संबंध कोणत्याना कोणत्या तरी रूपाने सांपडला पाहिजे. असा संबंधही वेदात आढळतो; पण तो कोठे व कसा पहावयाचा हे मात्र समजले पाहिजे. सूर्याचे सात घोडे किंवा दुसऱ्याही सप्तकविशिष्ट गोष्टी याचा संबंध सात महिन्याशी आहे. पण सूर्याचे घोडे दहा आहेत असेही ऋ. ९,६३,९ यांत म्हटले आहे. अर्थात् त्याचाही अर्थ दहा महिने असाच घेतला पाहिजे. पण या संबधाने अदितीच्या कथेवरच सर्व भिस्त टाकावयास नको आहे. याज्ञिक प्रक्रियेत या विषयी स्वतंत्र पुरावा मिळत आहे. ऋग्वेदात ‘ आमचे पूर्व पितर ’ या नावाने काही प्राचीन ऋत्विजाविषयीं सांगितले आहे. या ऋत्विजांनी प्राचीन काळी यज्ञांची स्थापना करून पुढच्या लोकांना मार्ग करून ठेविला (ऋ. २, ३३, १३—६, २२, २). ऋ. १, ७६, ५ यांत मनूने दिलेल्या हवीबरोबर इतरांची तुलना केली आहे. पण प्राचीन काळी एकट्या मनूनेच देवांना हविर्भाग दिला

---

१ उत त्या **हरितो दश** सूरो अयुक्त यातवे। इंदुरिंद्र इति ब्रुवन्॥ ऋ. ९,६३,९.

**असें नाहीं.** त्यानें सात होतृंसहवर्तमान आदित्यांना पहिली होत्रा दिली असें १०, ६३, ७ यांत सांगितलें आहे; १, ३१, १७ यांत **अंगिरस्** आणि **ययाति** असे मनूबरोबरीचे ऋत्विज् सांगितले आहेत. दुसऱ्या ठिकाणी ( ८, ४३, १३ ) **भृगु** व **अंगिरस**, ( १, ८०, १६ ) **अथर्वण** आणि **दध्यच्**, (१, १३९, ९) दध्यंच, **अंगिरस्** , **कण्व**, आणि **अत्रि** अशींही नांवें पूर्व ऋत्विजांची म्हणून मनूबरोबरच दिलीं आहेत. अथर्व्यानें यज्ञ करून प्रथम पथ करून दिला, तेव्हां सूर्य जन्मास आला ( १, ८३, ५ ). या अथर्वणांना बहुवचनांत **अंगिरस**, **नवग्व** आणि **भृगु** यांच्या सह ' आमचे पूर्वज ' ( नः पितरः ) असें म्हटलें आहे. ( १०, १४, ६ ). २, ३४, १२ यांत **दशग्वांनीं** प्रथम यज्ञ केला असें सांगून ( ते दशग्वाः प्रथमा यज्ञमूहिरे ) १०, ९२, १० यांत जेव्हां भृगूंनीं आपल्या दक्षपणानें आपल्याला देवपण आणलें तेव्हां प्रथमच अथर्व्यानें यज्ञांच्या योगानें धारणा ( सुव्यवस्था ) केली. ( यज्ञै रथर्वा प्रथमो विधारयद्देवा दक्षैर्भृगवः स चिकित्रिरे ) असें सांगितलें आहे. व्युत्पत्तिशास्त्राप्रमाणें वैदिक **अथर्वन्** शब्द **अथवन्** ( अग्नीचा उपासक) रूपानें अवेस्ता ग्रंथांत आढळतो; व **अंगिरस** शब्दाचा, व्युत्पत्ति-नियमांवरून ग्रीक **आग्गिलॉस** ( Aggilos )—दूत—आणि पर्शियन **अगर**—घोडेस्वार या शब्दाशीं संबंध दिसतो. ऐतरेय ब्राह्मणात ( ३, ३४ ) **अंगिरस** हे अंगारच (जळते कोळसे) होत असें ह्मटलें आहे ( ये अंगारा आसन् ते अंगिरसोऽभवन् ). ऋ. १०, ६२, ५ यांतही 'अंगिरस अग्नी पासून उत्पन्न झाले ' ( ते अंगिरसः सूनवस्ते अग्नेः परि जज्ञिरे ) असें सांगितलें आहे. आतां या सर्व व्युत्पत्त्या जरी खऱ्या मानिल्या नाहींत, तरी त्या शब्दांतील सादृश्यावरून **अथर्वन्** आणि **अंगिरस्** हे केवळ वैदिक ऋषींचेच पूर्व ऋत्विज् नसून सर्व आर्य शाखांचे होते असें म्हणावयास हरकत नाहीं. हीं नावें विशेष व्यक्तींचीं नसून पूर्वकालीं यज्ञ चालविणाऱ्या ऋत्विजांच्या कुलांचीं जरी असलीं तरी त्यावरून आर्य लोकांची फाटाफूट होण्यापूर्वी त्यांना देवांची योग्यता आलेली होती हें उघड दिसत आहे. त्यां सर्वांचा ऋ. १०,१४,३—६ यांत यमाशीं संबंध जोडला आहे. पण एवढ्यावरून त्यांचें मनुष्यत्व कांहीं नाहींसें होत नाहीं. कारण त्यांना 'पूर्व यज्ञिय' असें अनेक ठिकाणी म्हटलें

आहे. तेव्हां हे आमचे पूर्व पितर आर्य लोकांची फाटाफूट होण्यापूर्वी जे यज्ञ करीत त्यांचे अवधि कसे होते हे दाखविण्यासारख्या कांहीं **गोष्टी** यज्ञिय वाङ्मयांत आहेत की नाहीत ते पहाणे फार महत्वाचे आहे; **कारण** त्यावरून आपल्या ध्रुवोपपत्तीला विशेष आधार मिळण्याचा संभव **आहे.**

अंगिरसांखेरीज इतरांच्या यज्ञांचे काल निश्चित करणारी वचनें **वैदिक** ग्रंथांत आढळलेलीं नाहीत. श्रौतसूत्रांत '**अंगिरसां अयनम्**' नांवाच्या वार्षिक सत्रांचे वर्णन देऊन ते सर्व वार्षिक सत्रांचे आदर्शरूप जे '**गवां अयनम्**' त्याचेंच एक रूप आहे असे सांगितले आहे. पण त्यांत 'गवाम् अयनाचा' अवधि कांहीं दिलेला नाहीं. तै. संहितेत **गवां अयनाचा** अवधि दिला आहे, त्याचे वर्णन पुढच्या स्वतंत्र प्रकरणांत करूं. **प्रस्तुत** अंगिरसांच्या अयनाचा कालावधि ठरवितां येतो कीं नाहीं ते पाहू. **तो** ठरविण्याचे साधन सुदैवानें ऋग्वेदांतच आहे. **ऋ. १०, ६२, ५–६ यांत नवग्व** आणि **दशग्व** अशा अंगिरसांच्या जाति दिल्या आहेत; **आणि** बहुतेक ठिकाणीं त्यांचा एकत्र उल्लेख करून अंगिरसांनां लाविलेल्या गोष्टी व विशेषणे त्यांनांही लाविलेलीं आहेत. त्याना अंगिरस् **व** भृगूंप्रमाणेंच 'आमचे पूर्व पितर' असें म्हटलें आहे (६,२२,२; व **१०,** १४,६ ). **वल सरमा** आणि **पणी** यांचा इन्द्रानें पाडाव केल्याच्या कथेतही अंगिरसांप्रमाणेंच नवग्वांचाही संबंध आलेला आहे (१, ६२, ३ व ४; ५, २९, १२; ५, ४५, ७; १०, १०८, ८). **त्यांत** एका ठिकाणीं ( १, ६२, ४ ) इन्द्रानें बल व त्याचा अद्रि हे **फोडतांना** त्यांची मदत घेतल्याचे सांगितलें[1] आहे. ५, २९, १२ यांत[2] **नवग्वांनीं** इन्द्राची स्तुति करून घट्ट झांकलेला गाईचा गोठा फोडला असें **म्हटलें** आहे. पण यांपैकी दोन ठिकाणींच त्यांच्या सत्राच्या अवधीचा **संबंध** आला आहे. ५, ४५, ७ यांत "ज्या अद्रीने ( दगडाने ) **नवग्वांनीं दहा महिने अर्चन केलें** तो हातांनी ताडण केल्यामुळे वाजत होता" **असें** सांगून पुढें ११ व्या ऋचेत "जिनें **नवग्व दहा मास तरले** ती प्रकाशाचा वर्षाव करणारी तुमची स्तुति मी अपांनां (जलांना) अर्पण **करितों**"

१ शक्र वलं रवेण दरयो दशग्वैः । १,६२,४.

२ नवग्वासः सुतसोमास इंद्रं दशग्वासो अभ्यर्चंत्यर्कैः ।
गव्यं चिदूर्वमपिधानवंतं तं चिन्नरः शशमाना अप व्रन् ॥ ऋ. ५.२९,१२

असे म्हटलें[1] आहे. पुनः २, ३४, १२ यांत "ज्या दशग्वांनी पहिला यज्ञ केला, ते उषेच्या उदयीं आह्मांवर कृपा करोत," असे म्हणून, ४,५१,४ मध्ये "उषा नवग्व अंगिरसांवर आणि सप्तास्य दशग्वावर पुष्कळ प्रकाशली" असे सांगितले[2] आहे. याचा अर्थ उघडच असा होतो की त्यांचे सत्र फक्त दहा महिन्यांचे असून त्याचा उषेच्या उदयाशीं संबंध आहे. या नवग्व व दशग्वांनी यज्ञाच्या साहाय्यानें काय काय केलें त्याचें आणखी, ५,२९,१२ यांत वर्णन केले आहे, ते असें:—'सोमाचा हवि देऊन नवग्व व दशग्व यांनीं इन्द्राची स्तुति केली. नरांनी मेहनत करून गाईंचा गोटा बळकट आच्छादिलेला होता तरी फोडला. ३, ३९, ५ यांत "आपले मित्र जे शक्तिमान् नवग्व त्याच्याबरोबर इन्द्र जेथें गेला तेथें त्या दहा दशग्वासह इन्द्राला सूर्य तमांत रहात असलेला असा आढळला" असें वर्णन केलें आहे.* १०,६२,२–३ यांत दशग्व व नवग्व अंगिरसांनी स्वतःच वलाला मारण्याचें व सूर्याला आणि गाईंना सोडविण्याचें काम वर्षाच्या शेवटीं केल्याचें सांगितलें आहे;‡ पण त्याचा अर्थ त्यांनीं तसें करावयास इन्द्राला मदत केली असाच घेतला पाहिजे. असो. या सर्व वचनाचा एकत्र विचार करता त्यावरून अनुमानें निघतात ती अशीं:—

१. नवग्व आणि दशग्व यांचें सत्र दहा महिन्यांनीं संपत असे.

२. या सत्राचा संबंध उषेच्या प्रथम प्रकाशाशीं होता.

३. हे याज्ञिक वलापासून गाईंची मुक्तता करण्याकरिता इन्द्राला वर्षाच्या शेवटीं ( परिवत्सरे ) मदत करीत; व

---

१ अनूनोदत्र हस्तयतो अद्रिरार्चन येन दशमासो नवग्वा । ५,४५,७
धियं वो अप्सु दधिषे स्वर्षां यया तरन दश मासो नवग्वा । ५,४५,११.

२ ते दशग्वा प्रथमा यज्ञमूहिरे ते नो हिन्वं तूषसो व्युष्टिषु । २,३४,१२
येना नवग्वे अंगिरे दशग्वे सप्तास्ये रेवती रेवदूष ।४,५१,४.

* सखा ह यत्र सखिभि नेवग्वैरभिज्ञ्वा सत्वभि र्गा अनुग्मन् । सत्यं तदिन्द्रो दशभिर्दशग्वैः सूर्यं विवेद तमसि क्षियन्तम् ॥ ऋ. ३,३९,५.

‡ य उदाजन्पितरो गोमयं वस्वृतेनाभिदन्परिवत्सरे वलं । १०,६२,२.
य ऋतेन सूर्यमारोहयन् दिव्यप्रथयन्पृथिवीं मातरं वि । १०,६२,३.

४. ज्या ठिकाणीं इन्द्र गाईंना शोधावयास गेला तेथें सूर्य काळोखांत असलेला ( तमसि क्षियन्तम् ) त्याला आढळला.

आतां नवग्व व दशग्व यांच्याविषयींच्या या चार विधानांचा जरा बारीक विचार करूं. यासंबधानें पहिला प्रश्न असा येतो कीं, त्यांची सत्रें दहाच महिन्यांत कां आटपत, व वर्षाचे बाराही महिने तीं कां चालत नसत ? वलाचा वध करून इन्द्रानें नवग्वाच्या साहाय्यानें गाईंना व सूर्याला वर्षाच्या शेवटीं सोडविलें असें जें त्याच्या पराक्रमाचें वर्णन करणाऱ्या वर दिलेल्या वाक्यांत म्हटलें आहे, त्याचा संबंध सूर्याच्या व प्रकाशकिरणरूपी गाईंच्या वार्षिक मुक्ततेशीं आहे हें उघड आहे; व 'इंद्राला सूर्य काळोखांत असलेला आढळला'' या शब्दांनीं तर असें म्हणावयास विशेष आधार मिळतो. ''अश्विनांनीं निर्ऋतीच्या उपस्थावर ( मृत्यूच्या मांडीवर ) निजलेल्याप्रमाणें किंवा अंधकारांत पडून राहिलेल्या सूर्याप्रमाणें किंवा पुरलेल्या तेजस्वी सुवर्णाप्रमाणें असलेल्या वंदनाला मुक्त केलें'' असें ऋ. १,११७,५* यांत म्हटलें आहे. यावरून तमसि क्षियन्तम् या शब्दांनीं क्षितिजाखालीं जाऊन दृष्टीआड झालेल्या सूर्याचाच बोध होतो असें दिसून येईल. म्हणून इन्द्रानें वलाला संवत्सराच्या शेवटीं ज्या ठिकाणीं मारिलें तें ठिकाण काळोखाचें असून नवग्व त्या वेळीं त्याला आपल्या सूक्तांनीं मदत करीत असत असें मानिलें पाहिजे. यावरून नवग्वाचे व दशग्वांचे सोमाचे हविर्भाग वलाशीं युद्ध चाललें असतां दिले जात असत असें सकृद्दर्शनीं वाटेल. पण वैदिक कल्पना अगदीं निराळी आहे. उदाहरणार्थ, सकाळची सूर्योपासना (संध्या) सूर्य उगवण्यापूर्वीं करावयाची असते; तसेंच इंद्राला मदत करण्यासाठीं केलेले यज्ञही युद्धाच्या पूर्वीच करावे लागत. शिवाय दहा महिन्यांचा काळोखाचा काल पृथ्वीच्या पाठीवर कोठेंही शक्य नाहीं. ह्मणजे अर्थातच नवग्वांचीं व दशग्वांचीं सत्रें प्रकाशयुक्त दहा महिन्यांत होत असत असेंच मानावें लागतें. हा प्रकाशाचा काळ जर बारा महिन्यांचा असता तर त्या दशग्वांना आपलें सत्र दहाच महिन्यांत पुरें करण्याचें कारण नव्हतें. म्हणून नवग्वांचें सत्र दहा महिने चालल्यावर सूर्य क्षितिजाखालीं गेल्या-

---

* सुषुप्वांसं न निर्ऋतेरुपस्थे सूर्यं न दस्रा तमसि क्षियन्तम् । शुभे रुक्मं न दर्शतं निखातमुदूपथुरश्विना वंदनाय ॥ १,११७,५.

मुळें काळोख पडून तें बंद होत असे असें मानल्याशिवाय गत्यंतर नाहीं. या काळोखाच्या दीर्घ रात्रीत सोम पिऊन पुष्ट झालेला इन्द्र वलाचे किल्ले फोडून प्रकाशरूपी गाई व सूर्य यांना जुन्या वर्षाच्या अखेरीस व नव्याच्या आरंभीं मुक्त करीत असे; व मग पुनः हे अंगिरस् उषःकालीं नवीन सत्राला आरंभ करीत. तात्पर्य, नवग्व दशग्वादि सर्व आद्य यज्ञिय दहा महिन्यांचें वर्ष असलेल्या ठिकाणीं रहात असत. या दशग्वांच्या कथेशिवाय इतर यज्ञिय वाङ्मयांतील स्पष्ट उल्लेखावरूनही दशमासिक वर्षाची सिद्धता होत आहे; त्याचा विचार पुढील प्रकरणांत करूं.

नवग्व आणि दशग्व या शब्दांची व्युत्पत्ति पाहिली तरी तेच अनुमान निघते. नव आणि दश यानां ग्व जोडून हे शब्द झाले आहेत. पण नव याचा अर्थ 'नऊ' असा न घेतां 'नवीन' असा निरुक्तकारांनीं घेतला आहे ( ११,१९ ). परंतु नवग्व आणि दशग्व हे ऋग्वेदांत बहुधा एकत्र आलेले असल्यामुळें दशग्वांचा दश शब्दाशीं जो संबंध आहे तोच नवग्वाचा नव शब्दाशीं असला पाहिजे. म्हणून दश याचा दहा खेरीज दुसरा कोणताही अर्थ नसल्यामुळें नव याचाही नऊ असाच अर्थ घेणें भाग आहे. आतां ग्वचा अर्थ ठरवावयाचा. कित्येक हा शब्द गो ( गाय ) पासून साधतात, तर दुसरे गम् ( जाणें ) पासून तो झाला आहे असें म्हणतात. पण ऋ. ३,३९,५ यांत दशग्व दहा आहेत असें म्हटलें आहे, त्यावरून नऊ गाईंचे अथवा दहा गाईंचे असा अर्थ न घेतां दहांनीं किंवा नवांनीं गमन करणारे असाच घेणें रास्त दिसतें. पण दशग्व व नवग्व या शब्दांचा एक वचनी प्रयोगही आलेला असल्यामुळें ( ऋ. ६,६,३,; ८, १२, २; ९, १०८, ४ ) नवांचा किंवा दहांचा गण असा त्याचा नेहमीच अर्थ असेलसें दिसत नाहीं. अर्थात् नऊ व दहा या सख्यांचा अर्थ दुसरा कांहीं तरी असला पाहिजे. सायणाचार्य ऋ. १,६२,४ या वरील आपल्या भाष्यांत * म्हणतात

---

* अंगिरसो द्विविधाः । सत्रयागमनुतिष्ठन्तो ये नवभिर्मासैः समाप्य गतास्ते नवग्वाः ।...' नवग्वा नवनीतगतय ' इति यास्को व्याचख्यौ । ये तु दशभिर्मासैः समाप्य जग्मुस्ते दशग्वाः ॥ ऋ. १०,६२,४ वरील भाष्य.

सत्रमासीनानामंगिरसां मध्ये केचन नवसु मास्सु कर्म कृत्वोदतिष्ठन् केचन

" अंगिरसांच्या दोन जाति आहेत, नऊ महिन्यांनी सत्र संपवून उठले ते नवग्व, आणि दहा महिन्यांनी सत्र संपवून उठले ते दशग्व." नवग्व व दशग्व यांची सत्रे दहा महिन्यांत सपत हें ऋ. ५,४५,७-११ यांत सांगितलेंच आहे. अर्थात् सायणाचार्यांचा अर्थ अगदी सयुक्तिक असून कांहीं परंपरेनेंच तो आलेला असला पाहिजे. आतां एवढे आहे कीं, ऋग्वेदांत नवग्वांसंबंधानेंही दहा महिन्यांचेंच सत्र सांगितले असून नऊ महिन्यांचें मुळींच सांगितलेलें नाहीं. परंतु दशग्वांना दशमासिक सत्रावरून नांव मिळालें असल्यास नवग्वांना नवमासिक सत्रावरून मिळालें असलें पाहिजे हे व्युत्पत्तिसादृश्यावरून अगदीं उघड आहे; कारण त्या दोन शब्दांत फक्त संख्येचाच कायतो फरक आहे. म्हणून दशग्वांनीं जे दहांनी केलें तेंच नवग्वांनीं नवांनीं केलें असें उघड होतें.

या अनुमानाला बळकटी आणण्यासारखी **अंगिरसांची** आणखीही एक गोष्ट आहे. ऋ ३,५३,७ यांत त्यांना '**विरूपा** दिवस्पुत्रासः' (विविध रूपांचे द्यौचे पुत्र) म्हणून, ८,६४,६. यांत 'विरूप' हा एकवचनी शब्द **अंगिरस** शब्दाशीं समानार्थक म्हणून योजलेला आहे. पण या गोष्टीचा अगदीं स्पष्ट उल्लेख १०,६२,६ यांत आढळतो. पांचव्या ऋचेत 'अंगिरस **विरूप** असून ते अग्नीपासून उत्पन्न झाले असें सांगून पुढें त्यांत म्हटलें आहे[1] कीं, 'जे विरूप अग्नीपासून व द्यौपासून उत्पन्न झाले, (त्यांत) नवग्व व दशग्व हे श्रेष्ठ अंगिरस देवांच्यामध्यें उत्कर्ष पावते झाले.' **विरूप** याचा सरळ अर्थ विविध रूपांचे असा आहे; व वरील वाक्यांत अंगिरसांच्या नाना जाति दाखविण्यासाठीं त्याचा उपयोग केलेला आहे असें वाटतें. दिवस व रात्र यांच्या संबंधांत आलेल्या **विरूप** शब्दाचें मागें विवेचन केलें आहे, व त्यांत **रूप** याचा अर्थ अवधि असा होतो असें माधव नामक टीकाकाराच्या आधारावरून दाखविलें आहे (पान ११५). प्रस्तुत प्रकरणांतही विरूप शब्दाचा तोच अर्थ आहेसें दिसतें. नवग्व व दशग्व हे अंगिरसांत मुख्य होते खरे, पण त्यांच्या या दोनच

---

दशसु मास्स्वित्ति । एवमंगिरसामयनमुक्तं । तेषामग्निर्नवग्वश्च दशग्वश्चोक्तः ॥ ऋ. १०,६२,६ वरील भाष्य.

१ ये अग्नेः परि जज्ञिरे विरूपासो दिवस्परि । नवग्वो नु दशग्वो अंगिरस्तमः सचा देवेषु मंहते ॥ ऋ. १०,६२,६.

जाति होत्या असें नाहीं; हेंच दुसऱ्या शब्दांनी सांगावयाचें तर ते केवळ **नवां** नन्तर की **दहां** नन्तर उठणारे नसून **विविध अवधीं** नंतर उठणारे ( विरूप ) होते, म्हणजे त्यांच्या सत्राचा अवधि कधीं नऊ महिन्यांहून कमी तर कधी दहांहून अधिक असे. ऋ. १०, ४७, ६ यांत अंगिरसाचा पुत्र बृहस्पति याला **सप्तगु** असे विशेषण लाविलें आहे. बृहस्पतीला ४,५०,४ यांत **सप्तास्य** म्हटले असून अथर्व वेदात ( ४, ५, १ ) प्रथम ब्राम्हण जो बृहस्पति त्याला दशास्य म्हटले आहे. दशग्वालाही ऋ. ४, ५१, ४ यांत सप्तास्य म्हटलेलें पूर्वी सांगितलेंच आहे. या सर्वांचा अर्थ नीट लावावयाचा तर अंगिरस हे केवळ नऊ किंवा दहा महिन्यांनीच केवळ सत्रयाग सपवून उठणारे नसून दुसऱ्या अवधीनतरही उठणारे होते आणि त्यांची सत्रे सूर्य क्षितिजावर जितके महिने स्थानपरत्वें असे, तितक्या महिन्यांत आटपत असे मानिलें पाहिजे. म्हणजे यावरून असे झालें की, अगदी **प्राचीन** सत्रे सात पासून दहा महिने पर्यंत चालत असून त्यांतील होतृ-संख्याही महिन्यांच्या प्रमाणेंच सात पासून दहा पर्यंत असे. दीर्घ रात्र सुरु झाली म्हणजे ही सत्रें बंद होऊन वर्ष संपण्याच्या सुमारास इन्द्र वलाशी युद्ध करून त्याला जीत करीत असे. यात **परिवत्सरे** ( वर्षांच्या शेवटी ) हे शब्द फार सूचक असून वर्षाचा शेवट दीर्घरात्रीबरोबरच होत असे असें त्यावरून दिसत आहे.

दहा महिन्यांच्या सूर्यप्रकाशयुक्त कालाचा संबंध **दीर्घतमस्** याच्याही कथेत आला आहे. वैदिक कथांचे परीक्षण पुढील एका स्वतंत्र प्रकरणांतच करावयाचें आहे. पण **दीर्घतमस्च्या** गोष्टीत त्याच्या आयुष्या विषयी केलेल्या स्पष्ट उल्लेखावरून दशग्वासंबंधानें वर केलेल्या अनुमानाला चांगली बळकटी येत असल्यामुळें, त्याच्या कथेचा येथेच विचार करू. महाभारत आदिपर्व अध्याय १०४ यात दीर्घतम्याची गोष्ट दिली आहे. तो **उतथ्य** व **ममता** यांचा पुत्र असून बृहस्पतीच्या शापामुळें जन्मान्ध झालेला होता. पुढे **प्रद्वेषीशीं** त्याचें लग्न होऊन त्याना काही मुलही झाली. कालान्तरानें त्या मुलांना आपल्या अंध बापाला पोसण्याचा कंटाळा आल्यामुळे त्यांनी त्याला एका तराफ्यावर बसवून गंगेत सोडून दिलें. बराच काल तो तसाच वहात होता. शेवटी पुष्कळ अंतर गेल्यावर बलि राजानें

त्याला बाहेर काढिल. ऋग्वेदामधील कथेत त्याची मुक्तता **अश्विनांनीं** केली आहे. तो **ममता** आणि **उचथ्य** यांचा पुत्र असून ( १, १५२, ६; १, १५८, ४ ) त्यानें **त्रैतनापासून** सोडविण्यासाठी **अश्विनांची** प्रार्थना केली आहे. पण ऋ. १, १४७, ३ आणि ४, ४, १३ यांत त्याला अग्नीनें दृष्टि दिली असें [1]सांगितलें आहे. ऋग्वेदांत एका देवतेची कृत्यें दुसरीला पुष्कळदां लाविलेलीं लाविलेलीं असल्यामुळें अग्नीचें हें कृत्य अश्विनाकडे लावण्यास हरकत नाहीं. दोन्ही देवता प्रातःकालिक असल्यामुळें त्यांच्या पराक्रमाची भेसळ होणें सहाजिक आहे. असो. अश्विनांनीं एकट्या दीर्घतम्याचीच मुक्तता केली आहे असें नाही. त्यांनीं **च्यवनाला** वृद्धाचा तरुण केलें ( ऋ. १,११६, १० ). **भुज्यूला** समुद्रांतून बाहेर काढिलें ( ऋ. १,११६,४ ) इत्यादि अनेक प्रकारचीं त्यांचीं परोपकाराचीं कृत्यें १, ११६ यांत वर्णन केलीं आहेत. या सर्व पराक्रमाचा संबंध हिवाळ्यांत कमजोर झालेल्या सूर्याला पुनः शक्तिमान् करण्याशीं आहे असें पुष्कळांचें मत आहे. पण 'तमसि क्षियन्त सूर्य न' ( काळोख्यांत पडलेल्या सूर्याप्रमाणें ) हे वंदनाच्या कथेंतील शब्द स्पष्ट पुढें असतांना केवळ हिवाळ्यांतील कमजोर सूर्याशींच या पराक्रमाचा संबंध जोडून भागणार नाहीं; क्षितिजाखालीं बुडालेल्या सूर्यालाच ते लावले पाहिजेत. ही गोष्ट लक्षांत ठेऊन दीर्घतम्याच्या कथेवरून प्रस्तुत विषयाला अनुकूल असें कांहीं अनुमान काढतां येईल कीं नाहीं ते पाहू.

या कथेंतील विशेष महत्वाचें वाक्य ऋ. १,१५८,६ यांत आलें आहे. त्याचा भावार्थ असा:---"ममतेचा पुत्र दीर्घतमा **दहाव्या युगांत** जराजीर्ण झाल्यामुळें तो आपल्या अर्थाकडे (उद्दिष्ट स्थानाकडे) जाणाऱ्या अपाचा ब्राम्हण सारथी झाला."[2] यांत **दहाव्या युगांत** आणि आपल्या **अर्थाकडे जाणाऱ्या आप:** या पदांचाच अर्थ जरा गूढ आहे. बाकीचा भाग अगदीं सरळ आहे. दीर्घतमा दहाव्या युगांत म्हातारा होऊन व महाभारतांत सांगितल्याप्रमाणें

---

१ ये पायवो मामतेयं ते अग्ने पश्यन्तो अंधं दुरितादरक्षन् । ऋ. १,१४७,३ व ४,४,१३.

२ दीर्घतमा मामतेयो जुजुर्वान् दशमे युगे । अपामर्थं यतीनां ब्रह्मा भवति सारथिः । ऋ. १, १५८, ६.

पाण्यावर स्वार होऊन (सारथी होऊन) पाण्याच्या अर्थाकडे (उद्दिष्ट स्थानाकडे) चालू होतो. पण यांतील **युग** शब्दाच्या अर्थाविषयीं पंडितांमध्यें मतैक्य नाहीं. कित्येक त्याचा अर्थ वेदांगज्योतिषांतल्यासारखें पंचसंवत्सरमय कालचक्र असा घेतात, व दीर्घतमा पन्नासाव्या वर्षी म्हातारा झाला असें म्हणतात. कित्येक यूरोपियन पंडितांचा तर ऋग्वेदांत युग शब्दाचा प्रत्येक ठिकाणीं ' पिढी ' असा अर्थ घेण्याचा आग्रहच आहे. तेव्हां त्याचा जरा विशेष विचार केला पाहिजे. **युग** शब्दाचा ' कालभाग ' असा अर्थ होतो, निदान त्याच्या अनेक अर्थांपैकीं हा एक आहे याबद्दल शंकाच नाहीं. पण युग शब्द व विशेषेकरून **मानुषा युगा** असा प्रयोग जेथें जेथें ऋग्वेदांत येतो, तेथें तेथें त्याचा अर्थ 'पिढी' असा पाश्चात्य पंडित करतात, व सायणादि आपलेकडील वैदिक टीकाकार बहुतेक ठिकाणीं ' मर्त्यांचीं युगें ' असा त्याचा अर्थ घेतात. पण कित्येक ठिकाणीं विकल्पानें 'जोडी' 'युग्म' असाही त्याचा अर्थ त्यांनीं केला आहे. व्युत्पत्तिदृष्ट्या पहातां युग शब्द युज् ( जोडणें ) धातूपासून झाला असल्यामुळें त्याचा ' रात्रि-दिवसाची जोडी, ' ' महिन्यांची जोडी ' ( ऋतु ) ' पक्षांची जोडी ' ऊर्फ 'सूर्यचंद्रांचा संयोगकाल म्हणजे महिना' असा कोणताही अर्थ होऊं शकेल. कलियुगाच्या आरंभीं सर्व ग्रह एकत्र झाले होते अशी कल्पना आहे, व म्हणूनच त्याला युग नांव दिल्याचें सांगतात. मनुष्यांकडे लाविल्यास, ' जोडी ' किंवा ' पिढी ' असाही **युग** शब्दाचा अर्थ होईल. म्हणजे **मानुषा युगा** या ऋग्वेदांतील प्रयोगांतील **युगा** शब्दाचा अर्थ निश्चित करण्यांत व्युत्पत्तीचा फारसा उपयोग होणार नाहीं. पुराणांतील युगपद्धति वेदांना लावतां येणार नाहीं अशा मतामुळेंच पाश्चात्य पंडित युग शब्दाचा अर्थ 'पिढी' शिवाय दुसरा कांहीं करीत नाहींत. पण हा त्यांचा केवळ आग्रह आहे.

**युगे युगे** हा प्रयोग ऋग्वेदांत निदान पांच सहा ठिकाणीं तरी आलेला आहे ( ३, २६, ३—६, १५, ८—१०, ९४, १२ इ० ). त्या सर्वांचा ' कालभाग ' असाच अर्थ सायणाचार्यांनीं केला आहे. ३, ३३, ८ व १०, १०, १० यांत **उत्तरा युगा** असे शब्द आहेत, व १०, ७२, १ यांत **उत्तरे युगे** असा प्रयोग आहे. याच्या पुढच्या ऋचेंत ' देवानां पूर्व्ये युगे ' आणि ' देवानां उत्तरे युगे ' असे प्रयोग आहेत. या सर्व ठिकाणीं ' युग ' शब्दाचा अर्थ 'कालभाग' याशिवाय दुसरा होणें शक्य

नाहीं, हें संदर्भावरून उघड दिसत आहे; कारण युगशब्दाचा त्या ठिकाणीं कालाशीं संबंध आहे. आतां 'देवानां युगं' याचा जर 'देवांचे युग' (काल) असा अर्थ करावयाचा तर 'मानुषा युगा' याचा ही 'मनुष्यांचे काल' असा करावयास काय हरकत आहे? पण ऋग्वेदात कित्येक स्थळें तर अशीं आहेत कीं, त्यात 'युग' याचा अर्थ 'पिढी' असा घेताच येत नाहीं. उदाहरणार्थ, ५, ५२, ४ यात मरुतां-संबधानें **विश्वे ये मानुषा युगा पान्ति मर्त्यं रिषः** असें म्हटलें आहे. यात **पान्ति** हें क्रियापद असून त्याचा **ये विश्वे** (जे सर्व) हा कर्ता व **मर्त्यं** हें कर्म आहे; व **रिषः** (त्रासापासून) हा पंचम्यन्त शब्द ज्यापासून रक्षण करावयाचें (पान्ति—रक्षण करतात) त्याचा वाचक आहे. आता एवढ्या शब्दाचा 'जे सर्व त्रासापासून मनुष्याचें रक्षण करतात' असा अर्थ झाला. उरता उरलें **मानुषा युगा** हें पद, त्याचा अर्थ काय? हें पद द्विती-यान्त समजून त्याचा अर्थ 'मनुष्याच्या पिढ्याना' असा केल्यास **मर्त्यं** हें द्वितीयान्त पद निरर्थक होतें. अर्थात् युग शब्दाचा दुसरा प्रसिद्ध अर्थ जो 'काल' तोच घेणें अवश्य आहे. असा अर्थ घेतल्यास एकंदर वाक्याचा 'जे सर्व मनुष्याच्या कालांत त्याचें त्रासापासून रक्षण करतात' असा सरळ स्वाभाविकपणे अर्थ होतो. पण द्विरुक्तीचा दोष घेऊनही मॅक्स मुल्लरनें 'जे सर्व मनुष्यांच्या पिढ्याचें, माणसाचें त्रासापासून रक्षण करतात' असा अर्थ केला आहे. **युग** शब्दाचा अर्थ निश्चित करणारें आणखी वचन ऋ. १०, १४०, ६ हें आहे. ही ऋचा अग्नीची असून तींत 'अग्नीपासून आशीर्वाद घेण्यासाठीं जनांनीं त्याला पुढेंच ठेविलें' असें सांगितलें आहे. ती ऋचा अशी.

ऋतावानं महिषं विश्वदर्शतम्
अग्निं सुम्नाय दधिरे पुरो जनाः ।
श्रुत्कर्णं सप्रथस्तमं
त्वा गिरा दैव्यं मानुषा युगा ॥

या ऋचेंत ऋतावानं, महिषं, विश्वदर्शतं, श्रुत्कर्णं, **सप्रथस्तमं**, **त्वा**, दैव्यं हे सर्व शब्द द्वितीयान्त असून अग्नीचीं विशेषणें आहेत. '**अग्निं**' हें द्वितीयान्त पद '**दधिरे**' क्रियापदाचें कर्म आहे. '**जनाः**' हा कर्ता

असून ' दधिरे ' ( ठेविते झाले ) हे सर्व ऋचेंत एकच क्रियापद आहे. 'सुम्नाय' हा चतुर्थ्यन्त शब्द 'दधिरे' या क्रियेचा उद्देश व 'पुरः' हा शब्द स्थान दाखवीत आहे. आतां यांतील विशेषणात्मक शब्द काढून टाकिल्यास एकंदर ऋचेचा अर्थ ' जनांनी आपलें कल्याण व्हावें म्हणून अग्नीला पुरो भागीं ठेविलें ' असा होतो. आता राहिलें ' मानुषा युगा ' हे पद. त्याचा स्वाभाविकपणे इतर शब्दांशीं दिसणारा संबंध म्हणजे कालवाचक द्वितीया हाच होय. असा संबंध घेऊन या ऋचेचा अर्थ 'जन आपले कल्याणास्तव (यथा-वर्णित ) अग्नीला मनुष्यांच्या कालांत स्तुतिपूर्वक पुरोभागीं ठेविते झाले ' असा होतो. पण ग्रिफिथ या पाश्चात्य पंडिताने युग याचा आपला ठराविक ' पिढी ' असा अर्थ घेऊन व पदरचें एक क्रियापद मगीला घालून ' मनुष्याच्या पिढ्या सूक्तांनी अग्नीस [ मोठेपणा देते झाले ]' असा या ऋचेच्या शेवटच्या चरणाचा अर्थ केला आहे. एकदा युग शब्दाचा अर्थ काही झाले तरी ' पिढ्या ' असाच करावयाचा दुसरा करावयाचाच नाही, असे कायमचें ठरवून टाकिल्यामुळे शब्दांची कोण ओढाताण करावी लागते हे ग्रिफिथच्या या अर्थावरून दिसून येईल. वाजसनेयी संहितेत हा मंत्र आला असून त्यांत महीधराने ' मानुषा युगा ' याचा मनुष्यांची युगे ' काल ' असाच अर्थ केला आहे. अशा रीतीने सर्वमान्य अर्थपद्धतीचा अवलंब करावयाचा असल्यास " मानुषा युगा " याचा 'मनुष्यांचे काल' याशिवाय दुसरा कोणताही अर्थ होणे ज्यांत शक्यच नाहीं अशीं दोन स्थळें आपल्याला आढळलीं. ' मानुषा युगा ' हे शब्द 'मर्त्याः, जनाः ' अशा मनुष्यवाचक शब्दांबरोबर ऋग्वेदांत अन्य ठिकाणीं आलेले आढळत नाहीत. पण एकदा एखाद्या शब्दाचा अर्थ फक्त एकाच ठिकाणावरून कां होईना, पण पूर्णपणे निश्चित करता आला, तर तोच इतर ठिकाणीही संदर्भाला विरुद्ध नसल्यास घेतला पाहिजे. यास्काने पुष्कळ वैदिक शब्दांचा अर्थ याच पद्धतीने निश्चित केला आहे, व म्हणून प्रस्तुत प्रसंगीं त्या पद्धतीचा अवलंब करण्यांत वहिवाटीविरुद्ध वर्तन मुळींच होत नाही.

**मानुषा युगा** याचा ' मनुष्यांचे काल ' असा अर्थ ठरला. पण या कालाचा अवधि किती ते पाहिलें पाहिजे. अथर्ववेदांत ( ८, २, २१ ) युग याचा अर्थ दहा हजार वर्षांहून कमी नाहीं इतका

काळ असा घ्यावा लागतो. पण ऋग्वेदांत **युग** शब्दानें याहून फारच कमी अशा काळाचा बोध होतो असे मानावयास सबळ आधार आहे. ऋग्वेदांत अनेक ठिकाणी **प्रथमा उषा, आयतीनां प्रथमा** ( येणाऱ्या उषांत पहिली ) असें पुष्कळ वेळां आलें आहे, ( १, ११३, ८; २३, २; ७, ७६, ६ इ. ) व ७, ७१, ३ यांत ' अवमा ' ( शेवटची ) उषा सांगितली आहे. १, १२३, ९ यांत ' उषा पहिल्या दिवसाला जाणते ' असे म्हटले आहे, ( जानत्यह्नः प्रथमस्य ). पूर्वी एका प्रकरणांत केलेलें वैदिक उषेचें विवेचन बाजूला ठेविलें, तरी 'पहिली' या क्रमवाचक विशेषणावरून ही उषा वर्षाची पहिली उषा म्हणजे वर्षाच्या पहिल्या दिवसाची उषा होय हे दिसून येईल. ही **प्रथमा** आणि **अवमा** उषा म्हणजे वर्षाच्या पहिल्या व शेवटच्या दिवसाची उषा होय. तसेच वैदिक उषासंबंधानें मागील विवेचन विचारांत घेतल्यास ही पहिली उषा म्हणजे दीर्घ रात्रीच्या अखेरीस येणाऱ्या व वर्षारंभ करणाऱ्या उषःकालापैकीं पहिली उषा असेही अनुमान करावयास हरकत नाही. ही पहिली उषा " मनुष्यांच्या युगांना हळुहळु कमी करते " ( प्रमिनती मनुष्या युगानि ) असे १, १२४, २ व १, ९२, ११ यांत म्हटले असून उषेचा उदय झाल्यावर " देवभक्त लोक **युगें** पसरतात " ( नरो देवयंतो युगानि वितन्वते ) असें १, ११५, २ यांत सांगितलें आहे. यूरोपीय पंडित येथें युगाचा अर्थ ' पिढी ' असाच करतात. पण सद्भावावरून वर ठरविलेला ' कालविभाग ' असाच त्याचा अर्थ घेतला पाहिजे. ही पहिली उषा दैवी यज्ञ सुरु *करते व मानुष युगे पसरते असे जे म्हटले आहे त्यावरून पहिली उषा आली कीं यज्ञ व मानुष युगे सुरु होत; म्हणजे ' मानुषा युगा ' या पदाने बोधित होणारा काळ पहिल्या उषेपासून मोजित असत असें दिसते. ' मानुषा युगा ' व ' प्रथमा उषा ' यांच्या या साहचर्यावरून मानुष युगांचा अवधि ठरविण्याचें एक साधन मिळालें आहे. कारण ही मानुष युगे जर पहिल्या उषेबरोबर सुरू होत तर ती शेवटच्या उषेबरोबर संपत असत हे उघड झालें. म्हणजे मानुष युगांचा हा समुच्चय पहिल्या व शेवटच्या उषांमधील प्रकाशयुक्त कालाचा द्योतक असून असें एक युग म्हणजे या कालाच्या कोणत्या तरी भागाचें दर्शक होतें. येथें

---

* प्रमिनती दैव्यानि व्रतानि । ऋ.

प्रमाणें युग शब्दाचा अर्थ ऋग्वेदांत 'वर्षाहून काही तरी कमी काल' असा होतो हें दाखविण्याला दीर्घतम्याच्या गोष्टीखेरीज इतरही स्वतंत्र पुरावा आहे. असे असल्यामुळे 'दीर्घतमा दहाव्या युगांत जराजीर्ण झाला' या वाक्याचा उलगडा करणें आतां सोपे झाले आहे इतकेंच नव्हे तर त्यावरून युग शब्दाचा नक्की अर्थ काय आहे हेही समजण्याला मार्ग झाला आहे. 'मानुषा युगांचा' काल वर्षाहून कमी म्हणजे पहिली व शेवटली उषा ऊर्फ संवत्सरांची दोने अग्रें यांच्या मधला असून दीर्घतम्याची गोष्ट म्हणजे जर सूर्यावरील रूपक असेल तर 'तो दहाव्या युगांत म्हातारा झाला' याचा अर्थ 'तो **दहाव्या महिन्यांत** क्षितिजाखाली गेला' असाच केला पाहिजे. वर्षाची पहिली उषा व शेवटची उषा यांच्या मधला काळ, दहा दिवस किंवा दहा पक्ष हा फारच थोडा—नव्हे अशक्य—असल्यामुळे तो दहा महिन्यांचाच मानिला पाहिजे. म्हणजे युग शब्दाचा अर्थ **महिना** असा केला पाहिजे. तात्पर्य दीर्घतमा म्हणजे दहाव्या महिन्यांत म्हातारा होणारा सूर्य होय; आणि तो पाण्यावर स्वार होऊन त्यांच्याबरोबर त्याच्या इष्टस्थानाकडे गेला म्हणजे क्षितिजाखालील समुद्राकडे गेला. यांत आलेलें पाणी म्हणजे ज्यांचा वरुण राजा, (७, ४९,२) ज्यांना त्याने ऋत नांवाचा मार्ग खणून देऊन (२,२८,४) सूर्याला वाट पाडून दिली (७,८७,१) व ज्या इन्द्राने त्याना वलाच्या तडाख्यांतून सोडविल्यावर सूर्याला वर आणतात (१,५१,४) त्याच प्रसिद्ध आपः होत. दीर्घतम्याची कथा, ध्रुवाजवळील प्रदेशांतल्या 'शुक्र अर्णावर (७,६०,४) ह्मणजे तेजोमय समुद्रावर (क्षितिजावर) आल्यावर तेथे मानुषा युगा म्हणजे दहा महिने राहून पुनः समुद्रांत जाणाऱ्या' सूर्यावरील रूपक आहे. आपांसबंधाने सविस्तर विवेचन पुढील एका प्रकरणांत यावयाचे आहे. येथे एवढेंच सांगावयाचे आहे की, दीर्घतम्याच्या कथेचा वर सांगितल्याप्रमाणें अर्थ केल्यास त्याचा दहा महिन्यांनी सत्र संपविणाऱ्या दशग्वांच्या कथेशी मुळीच विरोध येत नाही.

**युग** आणि **मानुषा युगा** यांवर एवढें व्याख्यान करावयाचे कारण एवढेंच की 'कालभाग' असा त्यांचा स्पष्ट अर्थ दाखवणारी वचनें ऋग्वेदांत असतांही आग्रहाने त्यांचा चुकीचा अर्थ पाश्चात्य पंडित करीत असतात. **विश्वे ये मानुषा युगा** इ० (५,५२,४) आणि **ऋतावानं विश्वदर्शतं**—

**दैव्यं मानुषा युगा ।** ( १०,१४०,६ ) या दोन वचनांवरून मानुषा युगा म्हणजे मनुष्यांची युगें ( काल ) असा अर्थ दिसून आला. पहिल्या उषेशी असलेल्या त्याच्या संबंधावरून ( प्रमिनती मनुष्या युगानि...आयतीना प्रथमोषा व्यद्यौत् १,१२४,२ ) मानुषा युगा म्हणजे वर्षाहून कांहीं कमी असलेला काळ असा अर्थ ठरला; व दीर्घतमा दहाव्या युगांत जरा जीर्ण होतो यावरून युग शब्दाचा महिना असा अर्थ निश्चित करतां आला. मद्रासचे प्रोफेसर रंगाचार्य यांनी आपल्या ' युगा 'वरील निबंधांत स्वतंत्र आधारावरून हीच अनुमाने काढिलीं आहेत. युग शब्दाच्या व्युत्पत्तीवरून त्याचा **युति** असा अर्थ घेऊन विशिष्ट आकाशस्थ ज्योतींच्या युतीवरून युगांचा कालावधि ठरविण्याची कल्पना प्रथम चंद्राच्या कलांवरून निघाली असावी असे त्यांनी अनुमान केलें आहे. षड्विंश ब्राम्हणांत ( ४,६ ) चार युगांची अगदीं प्राचीन नांवें दिलीं असून तेथें त्यांचा चंद्राच्या कलांशीं संबंध आहे. प्रो. रंगाचार्यांनी अमावास्येचें प्राचीन नांव जे दर्श त्याचा विचार करून युगाची प्राथमिक कल्पना म्हणजे दर्शापासून दर्शापर्यंतचा काळ ऊर्फ महिना अशी असावी असा तर्क केला आहे. मानुषा युगाचा आरंभ पहिल्या उषेपासून होतो असे जे ऋग्वेदांत म्हटलें आहे, त्याशीं ' इन्द्राने वृत्राला मारून आणि उषा व सूर्य यांना उत्पन्न करून **आकाशांत मासांचें विधान** केलें ( मासां विधानमदधा अधि द्यवि १०, १३८, ६ ) हें वाक्य जोडल्यास, प्रथम उषेपासून सुरू होणारें कालचक्र म्हणजे मासचक्रच होय हें आणखी स्पष्ट होईल. तर आतां मानुषा युगा याचा अर्थ प्राचीन काळीं मासचक्र असा असून, ज्या काळांत सूर्य क्षितिजावर असून आर्य लोकांचे आदिपूर्वज यज्ञयागादि धार्मिक व सामाजिक विधि करीत असत त्या काळाचा दर्शक असा हा शब्द होता असे अनुमान करावयास कांहींच हरकत नाहीं.

या म्हणण्याला जोर आणणारीं आणखीही वचनें ऋग्वेदांत आहेत. **मानुषा युगा** हा प्रयोग वर दिलेल्या शिवाय इतर ठिकाणींही आलेला आहे. पण तेथेही पाश्चात्य पंडितांचा ' मनुष्यांच्या पिढ्या किंवा जाति '

---

१ पुष्ये ( कलौ ) चानुमतिर्ज्ञेया सिनीवालीति द्वापरे । खार्वायां ( त्रेतायां ) तु भवेद्राका कृतपर्वे कुहर्भवेत ॥

असा अर्थ जरी कसाबसा जुळतो, तरी तो समाधानकारक लागत नाहीं. याचें उत्तम उदाहरण ऋ. २, २, २ हें आहे. या ऋचेंत 'अग्नि **मानुषा युगा** आणि **क्षपः** इतका काळ पर्यन्त प्रकाशतो' असें म्हटले आहे. **क्षपः** म्हणजे 'रात्री' असा अर्थ असल्यामुळे मानुषा **युगा** आणि क्षपः हे शब्द जोडीचे असून त्या दोहोंचाही अर्थ कालवाचकच समजणे युक्त आहे. मानुषा युगा या शब्दांनी दीर्घ दिवस व त्याच्या मागाहून येणारीं साधारण अहोरात्रे मिळून झालेल्या प्रकाशयुक्त कालाचा जरी बोध होत असला, तरी त्यांत त्या कालानन्तर येणाऱ्या दीर्घ रात्रीचा कांहीं समावेश होत नाही. तेव्हा सर्व वर्षाविषयी बोलावयाचे असल्यास मानुषा **युगा** आणि **क्षपः** असा जोड शब्द घालणे अवश्यच होते व हाच अर्थ २,२,२ या ऋचेत **मानुषा युगा** आणि **क्षपः** या शब्दांनी व्यक्त केला आहे. ऋ. ४,१६,१२ या ऋचेसंबधानेंही अशीच चूक झालेली आहे. त्यांत **क्षपो मदेम शरदश्च पूर्वीः** असे शब्द आले आहेत. 'बहुत शरद (ऋतु) आणि रात्रीपर्यन्त आम्हांला आनंदित असू दे' अशा तऱ्हेचें सायणाचार्यांनी त्यांचे भाषान्तर केले आहे व ते बरोबरही आहे. पण 'शरद् आणि रात्री' या शब्दाचा मतलब काय? **च** हे समुच्चयबोधक उभयान्वयी अव्यय असल्यामुळे हे दोन शब्द फोडून त्याचा निरनिराळ्या क्रियापदांशी संबंध जोडणे योग्य होणार नाहीं. ध्रुवाजवळील वसतिगृहाची कल्पना माहीत नव्हती तेव्हां या शब्दांचा अर्थ न लागणे शक्य होतें. पण ती माहीत झाल्यावर 'शरद् व रात्रि' हे शब्द एकत्र घेऊन त्याचा अर्थ 'दीर्घ दिवस' थोडीशी साधी अहोरात्रे (ऋतु) आणि दीर्घ रात्र (क्षपः) मिळून होणारा वर्षाचा अवधि असा करणेंच सयुक्तिक आहे.

**दशग्व** आणि **दीर्घतमा** यांच्या कथांवरून निघणाऱ्या अनुमानांना बळकटी आणणारा स्वतंत्र पुरावाही वेदांत आलेल्या ऋतुसंख्येच्या उल्लेखांवरून मिळतो. ऋ. १,१६४,१२ या ऋचेंत, पांच पादांचा, बारा आकृतींचा पिता सांगितला आहे. ही ऋचा थोड्याबहुत फरकानें अथर्ववेद आणि प्रश्नोपनिषद् यांतही आली आहे. तिचा भावार्थ असा— 'असें म्हणतात की पांच पादांचा व बारा आकृतींचा पिता आकाशाच्या

---

१ दिव इवेदरतिर्मानुषा युगा क्षपो भासि पुरुवार संयतः। ऋ.२,२,२

२ पुढील पानावरील टीप पहा.

दुसऱ्या अर्धांत धूमाने व्याप्त असा आहे. दुसरे हे म्हणतात कीं सर्वत्र पहाणारा असा तो सात चाकांच्या व सहा आरांच्या रथांत बसलेला आकाशाच्या वरच्या भागांत आहे.' यांत संवत्सराचें वर्णन असल्यामुळे पांच पाद म्हणजे पांच ऋतु समजलें पाहिजे. दहा महिन्यांच्या वर्षांत ऋतु पांचच असणार हे उघड आहे. या पूर्वीच्या ऋचेत 'बारा आरांचें चक्र आकाशांत असून त्यांत अग्नीचीं ७२० मुले रहातात असे [1]म्हटले आहे.' बारा महिन्याचे वर्ष व त्यांतील ७२० दिवसरात्री यांच्या विषयीं हा अगदी स्पष्ट उल्लेख आहे. अर्थात् त्यापुढच्या ऋचेतील वर्णनही संवत्सराचेच आहे यांत शंका नाही. या ऋचेच्या दोन भागांत बारा आकृतीच्या पित्याविषयीं दोन मते सांगितली आहेत. पहिल्यांत त्याला पांच पाद ऊर्फ ऋतु आहेत असे कांहींचे मत देऊन पुढे त्याचा रथ सहा आरांचा आहे ह्मणजे तो सहा ऋतूचा आहे असे कित्येक ह्मणतात असें सांगितले आहे. असा फरक कां व्हावा? ऐतरेय ब्राह्मणांत ( १,१ ) 'पंचर्तवो हेमंतशिशिरयोः समासेन' ह्मणजे हेमंत व शिशिर हे एकत्र घेऊन पांचच ऋतु होतात असे सांगितले आहे. शतपथ ब्राह्मणांत ( १३,२,१,१० ) वर्षा आणि शरद् हे एकत्र घेतले आहेत. यावरून सहांचे पांच ऋतु करण्यासाठी कोणते दोन निश्चित घ्यावयाचे या संबंधानें मतैक्य नाही. अर्थात् दोन ऋतु एकत्र घेऊन ऋतुसंख्या कमी करण्याची कल्पना मागाहून आलेली दिसते. ऋग्वेदांत पांच ऋतु सांगितले आहेत त्यांचा कसा तरी उलगडा केला पाहिजे एवढ्याचसाठी दुसऱ्या सयुक्तिक कारणांच्या अभावीं दोन ऋतु एकत्र करण्याची कल्पना निघाली असावी. परतु तींत कांहीं अर्थ नसल्यामुळें

---

[1] **द्वादशारं** नहि तज्जराय वर्वर्ति **चक्रं** परि द्यामृतस्य । आ पुत्रा अग्ने मिथुनासो अत्र **सप्तशतानि विंशतिश्च** तस्थुः ॥ ११ ॥ **पंचपादं** पितरं **द्वादशाकृतिं** दिव आहुः परे अर्धे पुरीषिणम् । अथेमे अन्य उपरे विचक्षणं **सप्तचक्रे** षळर आहुरर्पितम् ॥ १२ ॥ प्रश्नोपनिषदावरील भाष्यांत शंकराचार्योनीं 'परे अर्धे' याचा अर्थ 'तृतीयस्यां दिवि' ह्मणजे तिसऱ्या लोकांत असा केला आहे. हा तिसरा लोक विष्णूच्या तिसऱ्या अदृश्य पावलाचें स्थान असल्यामुळे संवत्सरदेवता त्या वेळीं अति दूरच्या ठिकाणीं अदृश्य असते असा अर्थ होतो.

प्रमाणें युग शब्दाचा अर्थ ऋग्वेदांत 'वर्षाहून काही तरी कमी काल' असा होतो हे दाखविण्याला दीर्घतम्याच्या गोष्टीखेरीज इतरही स्वतंत्र पुरावा आहे. असे असल्यामुळे 'दीर्घतमा दहाव्या युगांत जराजीर्ण झाला' या वाक्याचा उलगडा करणें आतां सोपे झालें आहे इतकेंच नव्हे तर त्यावरून **युग** शब्दाचा नक्की अर्थ काय आहे हेंही समजण्याला मार्ग झाला आहे. 'मानुषा युगांचा' काल वर्षाहून कमी म्हणजे पहिली व शेवटली उषा ऊर्फ संवत्सरांची दोने अग्रे यांच्या मधला असून दीर्घतम्याची गोष्ट म्हणजे जर सूर्यावरील रूपक असेल तर 'तो दहाव्या युगांत म्हातारा झाला' याचा अर्थ 'तो **दहाव्या महिन्यांत** क्षितिजाखाली गेला' असाच केला पाहिजे. वर्षाची पहिली उषा व शेवटची उषा यांच्या मधला काळ, दहा दिवस किंवा दहा पक्ष हा फारच थोडा—नव्हे अशक्य—असल्यामुळे तो दहा महिन्यांचाच मानिला पाहिजे. म्हणजे युग शब्दाचा अर्थ **महिना** असा केला पाहिजे. तात्पर्य दीर्घतमा म्हणजे दहाव्या महिन्यांत म्हातारा होणारा सूर्य होय; आणि तो पाण्यावर स्वार होऊन त्यांच्याबरोबर त्याच्या इष्टस्थानाकडे गेला म्हणजे क्षितिजाखालील समुद्राकडे गेला. यांत आलेलें पाणी म्हणजे ज्यांचा वरुण राजा, (७, ४९,२) ज्यांना त्याने ऋत नांवाचा मार्ग खणून देऊन (२,२८,४) सूर्याला वाट पाडून दिली (७,८७,१) व ज्या इन्द्राने त्यांना वलाच्या तडाख्यांतून सोडविल्यावर सूर्याला वर आणतात (१,५१,४) त्याच प्रसिद्ध आपः होत. दीर्घतम्याची कथा, ध्रुवाजवळील प्रदेशांतल्या 'शुक्र अर्णावर (७,६०,४) ह्मणजे तेजोमय समुद्रावर (क्षितिजावर) आल्यावर तेथे मानुषा युगा म्हणजे दहा महिने राहून पुनः समुद्रांत जाणाऱ्या' सूर्यावरील रूपक आहे. **आपांसंबंधाने** सविस्तर विवेचन पुढील एका प्रकरणांत यावयाचे आहे. येथे एवढेंच सांगावयाचे आहे की, दीर्घतम्याच्या कथेचा वर सांगितल्याप्रमाणें अर्थ केल्यास त्याचा दहा महिन्यांनी सत्र संपविणाऱ्या दशग्वांच्या कथेशी मुळीच विरोध येत नाही.

**युग** आणि **मानुषा युगा** यांवर एवढे व्याख्यान करावयाचे कारण एवढेंच की 'कालभाग' असा त्यांचा स्पष्ट अर्थ दाखवणारी वचनें ऋग्वेदांत असताही आग्रहानें त्यांचा चुकीचा अर्थ पाश्चात्य पंडित करीत असतात. **विश्वे ये मानुषा युगा** इ० (५,५२,४) आणि **ऋतावानं विश्वदर्शतं**—

**दैव्यं मानुषा युगा।** ( १०,१४०,६ ) या दोन वचनांवरून मानुषा युगा म्हणजे मनुष्यांची युगे ( काल ) असा अर्थ दिसून आला. पहिल्या उषेशी असलेल्या त्याच्या संबंधावरून ( प्रमिनती मनुष्या युगानि...आयतीना प्रथमोषा व्यद्यौत् १,१२४,२ ) मानुषा युगा म्हणजे वर्षाहून कांही कमी असलेला काळ असा अर्थ ठरला; व दीर्घतमा दहाव्या युगांत जरा जीर्ण होतो यावरून युग शब्दाचा महिना असा अर्थ निश्चित करतां आला. मद्रासचे प्रोफेसर रंगाचार्य यांनी आपल्या ' युगा 'वरील निबंधांत स्वतंत्र आधारावरून हीच अनुमाने काढिली आहेत. युग शब्दाच्या व्युत्पत्तीवरून त्याचा **युति** असा अर्थ घेऊन विशिष्ट आकाशस्थ ज्योतींच्या युतीवरून युगांचा कालावधि ठरविण्याची कल्पना प्रथम चंद्राच्या कलांवरून निघाली असावी असे त्यांनी अनुमान केले आहे. षड्विंश ब्राम्हणांत ( ४,६ ) चार युगांची अगदी प्राचीन नांवे दिली असून तेथे त्यांचा चंद्राच्या कलांशी संबंध आहे. प्रो. रंगाचार्यांनी अमावास्येचे प्राचीन नांव जे दर्श त्याचा विचार करून युगाची प्राथमिक कल्पना म्हणजे दर्शापासून दर्शापर्यंतचा काळ ऊर्फ महिना अशी असावी असा तर्क केला आहे. मानुषा युगाचा आरंभ पहिल्या उषेपासून होतो असे जे ऋग्वेदांत म्हटले आहे, त्याशी ' इन्द्राने वृत्राला मारून आणि उषा व सूर्य यांना उत्पन्न करून **आकाशांत मासांचे विधान केलें** ( मासां विधानमदधा अधि द्यवि १०, १३८, ६ ) हें वाक्य जोडल्यास, प्रथम उषेपासून सुरू होणारे कालचक्र ह्मणजे मासचक्रच होय हे आणखी स्पष्ट होईल. तर आतां मानुषा युगा याचा अर्थ प्राचीन काळी मासचक्र असा असून, ज्या काळांत सूर्य क्षितिजावर असून आर्य लोकांचे आदिपूर्वज यज्ञयागादि धार्मिक व सामाजिक विधि करीत असत त्या काळाचा दर्शक असा हा शब्द होता असे अनुमान करावयास कांहींच हरकत नाहीं.

या म्हणण्याला जोर आणणारीं आणखीही वचनें ऋग्वेदांत आहेत. **मानुषा युगा** हा प्रयोग वर दिलेल्या शिवाय इतर ठिकाणींही आलेला आहे. पण तेथेही पाश्चात्य पंडितांचा ' मनुष्यांच्या पिढ्या किंवा जाति '

---

१ पुष्ये ( कलौ ) चानुमतिर्ज्ञेया सिनीवालीति द्वापरे । खार्वायां ( त्रेतायां ) तु भवेद्राका कृतपर्वे कुहुर्भवेत् ॥

'पंचपादं पितरं' या ऋचेवरून ऋतुसंख्येचा उलगडा होतो कीं नाहीं हें पाहिले पाहिजे. तिच्या पहिल्या अर्धांत 'पांच पादांचा पिता आकाशाच्या दूरच्या भागांत धूमानें व्याप्त असतो' असें सांगून दुसऱ्यांत 'सहा आरांच्या रथांत बसलेला संवत्सर सर्वत्र पहाणारा (विचक्षण) आहे' असें सांगितले आहे. पुढच्या ह्मणजे १३ व्या ऋचेत 'पांच आरांचें चक्र प्राचीन असूनही शीर्ण होत नाहीं' असे सांगून, १४ वीत 'जराविरहित चक्र आपल्या नेमीसह (धांव) फिरते, त्याला जोडलेले दहा ओढतात, सूर्याचे चक्षु रजाने आच्छादिलेले असे चालते, त्यावर सर्व विश्वें अवलंबून आहेत.' असे ह्मटले[1] आहे. वर अकराव्या ऋचेतील **पुरीषिणम्** (पाण्याच्या धूमाने व्याप्त) शब्द आणि १४ वीतील **रजानें अवृत** हे शब्द समानार्थक आहेत हे दोनी ऋचांची तुलना केल्यास दिसून येईल. यावरून एवढेच अनुमान निघतें की 'हा पंचपाद संवत्सर वर्षाच्या कांही भागांत धूमाने किंवा काळोखाने व्याप्त होऊन जात असे.' 'त्याला दहा घोडे ओढतात' यावरूनही असे दिसून येईल की सहा ऋतूंचे पांच केले ते कांही दोन कोणते तरी एकत्र केलेले नसून खरोखर पांच ऋतूंचें किंवा दहा महिन्यांचेच वर्ष सांगण्याचा वरील वर्णनाचा उद्देश आहे. पांच ऋतूंचे सहा झाले तेव्हां 'धूमानें व्याप्त असलेला' (पुरीषिणम्) संवत्सर, 'सर्वत्र पहाणारा' (विचक्षण) झाला. अशा रीतीनें पांच ऋतूंच्या व सहा ऋतूंच्या वर्षाचे वर्णन यांत जोडीने केले आहे. **परे अर्धे, पंचपाद्** (किंवा **पंचारे**) आणि **पुरीषिणम्** या शब्दांच्या जोडीला अनुक्रमे **उपरे (अर्धे) षळ(ड)रे** आणि **विचक्षणं** हे शब्द घातलेले आहेत. हीं दोन विरुद्ध वर्णने एकाच काळीं एकाच ठिकाणाला लागू पडणें शक्य नाहीं. १२ व्या ऋचेंत पांच ऋतूंच्या व दहा महिन्यांच्या वर्षाचें वर्णन स्पष्ट असून त्यांत पुढे सूर्याच्या तमोमय आवरणाचा ह्मणजे अखंड दीर्घ रात्रीचाही संबंध आहे. हें वर्णन केवळ ध्रुवप्रदेशांतील वर्षालाच लागू पडणारें आहे, हें मागील सर्व विवेचनावरून दिसून येईल. आतां

---

१ पंचारे चक्रे परिवर्तमाने तस्मिन्ना तस्थुर्भुवनानि विश्वा। तस्य नाक्षस्तप्यते भूरिभारः सनादेव न शीर्यते सनाभिः॥ सनेमि चक्रमजरं वि वावृत उत्तानायां दश युक्ता वहंति। सूर्यस्य चक्षू रजसैत्यावृतं तस्मिन्नर्पिता भुवनानि विश्वा ॥ १३–१४ ॥

यांत सहा ऋतंच्या वर्षाचें वर्णन करतांना 'सप्तचक्र' ह्मणजे सात चक्रांचा ऊर्फ सात महिन्यांचा असा शब्द घातला आहे, व पंचपाद पित्याला ह्मणजे पांच ऋतूंच्या वर्षाला द्वादशाकृति उर्फ बारा महिन्यांचा असें म्हटले आहे. सकृद्दर्शनीं हा विरोध दिसतो. पण भाषेतील शब्दांच्या इतिहासाचा थोडासा विचार केल्यास हा विरोध महत्वाचा वाटणार नाहीं. कारण प्रथम एखादी विशिष्ट कल्पना दर्शविणारा शब्द ती कल्पना नष्ट झाल्यावरही भाषेत तसाच राहून जातो. सायंकाळीं सूर्य समुद्रांत बुडून सकाळीं पुनः वर येतो अशी जेव्हां कल्पना होती तेव्हां 'उदय' शब्द प्रचारांत आला; पण आतां ती कल्पना जरी नाहींशी झालेली आहे तरी अजूनही आपण सूर्य दिसूं लागला असें न ह्मणतां उगवला किंवा वर आला असेंच ह्मणतों. त्याचप्रमाणें **सप्ताश्व** किंवा **सप्तचक्र** हे शब्द भाषेंत एकदां रूढ झाल्यावर पुष्कळ काळानें त्यांतील मूळ कल्पना नाहींशी झाली, तरी केवळ गतानुगतिकत्वामुळे परिस्थिति बदलल्यावरही वैदिक ऋषींनीं त्यांचा उपयोग केलेला आहे. ब्राह्मणग्रंथांत जुन्या वैदिक कल्पनांची वर्तमान स्थितीशी संगति लावण्याचा नाना तऱ्हेने व युक्तिप्रयुक्तींनें प्रयत्न केलेला आहे, व असें करणें धर्मदृष्ट्या अवश्यही होतें. पण त्या गोष्टींचें ऐतिहासिकदृष्ट्या परीक्षण करतांना जुन्या नव्या गोष्टी पृथक् पृथक् केल्या पाहिजेत. पांच ऋतूंचे व दहा महिन्यांचे जुने वर्ष सांगतांना वर्तमान वर्षाचेंही थोडें वर्णन त्यांत येऊन गेलें आहे. परंपरागत वेदाचें प्रस्तुत स्वरूपांत रूपान्तर करणाऱ्या ऋषींनी चालू गोष्टीही त्यांत सांगितल्या असल्याच पाहिजेत. वास्तविक पहातां एवढ्या जुन्या गोष्टी त्यांनीं राखून ठेविल्या हेंच आश्चर्य होय. वैदिक ग्रंथाचें धर्मदृष्ट्या आणि ऐतिहासिकदृष्ट्या जे महत्व आहे तें यामुळेंच होय.

असो. तर येणे प्रमाणें पूर्वी एकदां वर्षाचे सात किंवा दहा महिने होते असें दाखविण्याला अदितीच्या किंवा दशग्व व दीर्घतमा यांच्या कथेसारख्या गोष्टी ऋग्वेदांत स्पष्टपणे आढळत आहे. त्यांचा ध्रुवोपपत्तीशिवाय नीट उलगडा होत नाहीं. प्राचीन आर्य यज्ञियांचें सत्र या दहा महिन्यांतच होत असे. या काळाला **मानुषा युगा** अशी संज्ञा होती. त्यांत दहाव्या युगांत सूर्य क्षितिजाखाली बुडत असे. तेथे काळोखांत रहाणाऱ्या त्या सूर्याला इन्द्र वर्षाच्या अखेरीस **वलाला** मारून, वर काढीत असे. एकं-

दर वर्षं मानुषा युगा व अखंड काळोखाची दीर्घ रात्र मिळून होत असे. या सर्व गोष्टी दंतकथात्मक असल्या तरी त्यामुळें त्यांचे प्रामाण्य कमी होत नाही. कारण यांपैकी कांहीं गोष्टी आर्यांची फाटाफूट होण्या-पूर्वीच्या आहेत हें निरनिराळ्या आर्य शाखांतील पुराणकथांवरून दिसून येत. याविषयी विशेष विवेचन पुढे एका प्रकरणांत यावयाचेच आहे. पाच ऋतूंचे वर्ष होते, व सूर्याच्या रथाला दहा घोडे जोडलेले असत या कल्पनाही वरील कथांशी सुसंगत आहेत. आतां पुढच्या प्रकरणांत असे दाखवावयाचे आहे की वैदिक वाङ्मयांत दहा महिन्यांच्या सत्राचे स्पष्ट उल्लेख असून त्यांचा वर सांगितलेल्या कथांशी कांही संबंध नसल्यामुळे प्रस्तुत प्रकरणांत सांगितलेल्या कथांवरून जी अनुमाने निघतात त्यांची त्यांवरून स्वतंत्र रीतीनेही सिद्धि होते.



# प्रकरण ८ वें.

## गवां अयनम्.

**प्रवर्ग्य विधि**—त्याचा सोमयागाशी संबंध—वार्षिक सत्राचे प्रजनन ( पुनरुज्जीवन ) त्यांत लाक्षणिक रूपाने सांगितले आहे–घर्म किंवा महावीर नावाच्या पात्रांत कढविलेले दूध हे रेतस् ( बीज ) होय–हे दूध घर्मपात्रांत ओततांना ह्मणावयाचे मंत्र–पांचांना निर्माण करणारे दोन–विवस्वताचे दहा–यावरून पांच ऋतूंनंतर ह्मणजे दहा महिन्यानंतर संवत्सर संपतो असा अर्थ दिसतो–सूर्य आकाशाच्या पलीकडे पडतो अशी दंतकथा–सांवत्सर सत्रें–**गवां अयनम्** हे त्या सर्वांची प्रतिमा होय–हे सत्र दहा किंवा बारा महिन्यांनी संपतें असे ऐतरेय ब्राह्मणांत ह्मटले आहे.–'गवां अयना' विषयीं तैत्तिरीय संहितेंतील दोन उतारे–त्यांत या सत्राचा अवधि दहा महिन्यांचा सांगितला आहे, पण असे असण्याला पुरातन वहिवाटीशिवाय दुसरे कांहीं कारण त्यांत दिलेले नाहीं–यावरून प्राचीन काळचे यज्ञ दहा महिन्यांच्या वर्षांत होत असत असे उघड होते–प्राचीन रोमन लोकांचेही वर्ष दहा महिन्यांचे ह्मणजे ३०४ दिवसांचे होते–वर्षाच्या ३६० दिवसांपैकीं बाकीच्या दिवसाची काय वाट हें अद्यापिही कोणास माहीत नाहीं–दशग्वांच्या कथेवरून पहाता हे बाकीचे दिवस ह्मणजे अखंड काळोखाचा अवधि होय–ह्मणजे त्यावरून ध्रुवोपपत्ति सिद्ध होते–वेदांतील गाईंच्या त्रिप्रकार स्वरूपांविषयीं मॅक्स मुल्लरचे मत–ऋग्वेदांत 'गाई' शब्द या नांवाचे पशु, जलें, उषःप्रकाश किंवा दिवस यांनां लाविलेला आहे–दहा महिन्यांत संपणारे 'गवां अयनम्' ह्मणजे साध्या दिवस रात्रींचा दहा महिन्यांचा अवधि–हेलिऑसचे ३५० बैल–त्यांवरून दहा दिवसांच्या अखंड रात्रीचा बोध होतो–हर्मिस याने अपालानच्या गाई चोरणे ह्मणजे काय?—वृत्राने चोरलेल्या गाईचे ऋग्वेदांतील वर्णन–यावरून दिवस-रूपी गाई चोरल्यामुळें दीर्घ रात्र उत्पन्न होते असा भावार्थ निघतो–याविषयीं वेदांतील याज्ञिक गोष्टीवरून आणखी प्रमाणें-सोमयागांचें वर्गीकरण-एकाह

आणि अहीन यांतील भेद–शंभर रात्रिसत्रें–गवां अयनांसारखीं दुसरीं वार्षिक सत्रें–त्यांतील विधींचा साधारण आदर्श–त्याची रूपान्तरें–त्या सर्वांची रचना प्रस्तुत व्यावहारिक वर्षमानावर केलेली आहे–परंतु पुरातनकाळीं हीं सत्रें दहाच महिन्यांत संपत असत–रात्रिक्रतूंचा समावेश सध्या दिवससत्रांतच होतो–रात्रिसत्रें शंभर रात्रीहून अधिक काळ कां लांबत नाहींत याचा उलगडा आजपर्यंत झालेला नाही–ध्रुवोपपत्तीवर त्यांचा योग्य उलगडा होतो–अतिरात्र–यागांत आजही सोमरस रात्रीसच काढतात–दुसऱ्याही रात्रिसत्रांना हीच गोष्ट लागू केली पाहिजे–रात्रिसत्रे हीं पुरातन काळीं दीर्घ रात्रींत करावयाचीं सत्रे होतीं–त्यांचा उद्देश–सोमाच्या आहुति वलार्शी होणाऱ्या युद्धांत मदत म्हणून एकट्या इंद्रालाच देत असत–शतरात्रावरून दीर्घ रात्रीचा महत्तम अवधि दिसून येतो–या अनुमानाला अदितीच्या कथानकावरून बळकटी येते–इंद्राला शतक्रतु असे पुराणांत कां म्हटले याचा उलगडा–पाश्चात्य पंडितांना ह्या विशेषणाचा खरा अर्थ समजला नाहीं–सोमयाग आणि अश्वमेध यांतील साम्य–इतर विशेषणांप्रमाणे शतक्रतु या विशेषणाचें रूपान्तर ऋग्वेदांत कोठेंही केलेलें नाहीं–यावरून तें केवळ इन्द्रालाच लावीत असत असें दिसतें—'क्रतु' शब्दाचा अर्थ वेदांत यज्ञ असा आहे याविषयीं डा० हौचें मत–वृत्राचीं शंभर पुरे ऊर्फ किल्ले–ह्मणजे शंभर तमोयुक्त स्थानें ऊर्फ रात्री–अवेस्त्यांतील तिश्र्य आणि **अपौश** यांच्यामधील युद्धाची कथा–इंद्रवृत्र युद्धाचे हे केवळ रूपान्तर होय–शंभर रात्रिक्रतू हे रात्रीसच करावयाचे असत याला त्यावरून स्वतंत्र प्रमाण मिळतें–**सतोकरटु** हे विशेषण अवेस्त्यांत आढळते–अतिरात्र यागाच्या अर्थाविषयीं व स्वरूपाविषयी विवेचन-दीर्घ रात्रीच्या आयन्ती करावयाचा याग–संवत्सरसत्राच्या आरंभीं तो योग्यच आहे–तो दीर्घ रात्रीचा अंत व सूर्य-प्रकाशाच्या कालाचा आरंभ दाखवितो–सत्र, अतिरात्र, रात्रिक्रतु आणि पुनः अतिरात्र मिळून पुरातन काळचा संवत्सर सत्राचा पर्याय होत असे–त्यावरून तत्कालीन वर्षांतील शतदिनावधि दीर्घ रात्रीचा स्पष्ट बोध होतो–प्राचीन यज्ञपद्धति तत्कालीन वर्षमानावर बसविली होती–नवीन परिस्थितीला अनुरूप असें वर्ष ब्राह्मणांनीं सुरु केलें–यज्ञग्रंथांतील प्रमाणावरून निघणाऱ्या अनुमानांचें महत्व.



हा महिन्यांत सत्र संपविणाऱ्या दशग्वांची गोष्ट एवढाच कांही यज्ञिक वाङ्मयांत उरलेला प्राचीन वर्षाचा अवशेष नाही. ऐतरेय ब्राह्मणांत वर्णिलेल्या **प्रवर्ग्य** नांवाच्या विधीतही या प्राचीन वर्षांची खूण दिसून येते. हा विधि केल्याशिवाय पशुयज्ञ किंवा सोमयाग करितां येत नाहीं. या सर्व विधींत बीजरूपानें ठेविलेल्या सूर्याचें किंवा यज्ञाचें प्रजनन (पुनरुज्जीवन) लाक्षणिक रूपानें सांगितलें आहे.* **घर्म** किंवा **महावीर** नांवाचें एक मृत्तिकापात्र, वेदीवर **खर** नांवाचे मातीचें एक वर्तुळ करून त्यावर अध्वर्यु ठेवितो व ते चांगले कढत होईपर्यन्त तापवितो. मग ते वर उचलून त्यांत गाईचें दूध घालून त्याशी मृतवत्स अशा बकरीचें दूध मिसळतात. पुढें तें मिश्रण आहवनीय अग्नींत ओततात, व उरलेला त्यांतला भाग **होता** (होतृ) पितो. "या पात्रांतील दूध म्हणजे रेतस् (बीज) अग्निरूपी देवयोनींत पुनर्जननासाठी सिंचन करतात, कारण अग्नि हा देवाची योनि आहे," असें ऐतरेय† ब्राम्हणांत वरील विधीचें कारण दिलें आहे. त्यावरून या अग्नींत यज्ञाचें बीज, त्याचें कांहीं दिवसांनीं पुनर्जनन व्हावें म्हणून, ओतितात असें झालें. हें दूध महावीर पात्रांत ओततेवेळीं म्हणावयाचा मंत्र 'दुहन्ति सप्तैकामुप' (ऋ. ८, ६१, ८) हा आहे.‡ हा मंत्र केवळ शब्दसाम्यावरून घेतला असेल असें दिसत नाहीं. ज्या सूक्तांत हा मंत्र आलेला आहे तें सूक्तच जरा गूढ आहे. पण हा व याच्या मागचे दोन मंत्र सरळ आहेत. त्यांचा भावार्थ असा:—

"आतां त्याचा मोठा व भक्कम रथ, घोडे, व रथाची ओळ दिसूं लागली ॥ ६ ॥

"सात एकाचें दोहन करतात; गर्जणाऱ्या समुद्राच्या तीरावर दोन पांचांना निर्माण करतात" ॥ ७ ॥

---

* ऐ. ब्रा. १, १८.

† यत्पयस्तद्रेतस्तदिमग्नौ देवयोन्यां प्रजनने रेतः सिच्यतेऽग्निर्वै देवयोनिः। ऐ. ब्रा. १, २२.

‡ वालखिल्य सूक्तें धरिल्यास हें सूक्त ७२ वें होतें.

" विवस्वताच्या दहानंतर इन्द्र आपल्या तिहेरी खेदीनें ( हातोड्यानें ) आकाशाचा कोश खाली पाडता झाला." ॥ ८ ॥

आतां यांत सूर्याचा रथ दिसूं लागला ह्मणजे उषा क्षितिजावर दिसूं लागली हे उघडच आहे. सात ह्मणजे सात होते उषेचें दोहन करून दोन ह्मणजे दिवस रात्र ही उत्पन्न करतात. हा दोह विधि ऋग्वेदांत पुष्कळ वेळां आलेला आहे. १,३३,१० यांत इन्द्रानें तमाचे दोहन करून गाई ( उषा ) निर्मिल्या ( तमसो गा अधुक्षत् ) असे सांगितले आहे. पुढे या दोहोच्या दोहनाने पांच ह्मणजे पांच ऋतु उत्पन्न होतात. दिवस रात्रीला सूर्याच्या माता असें ३,५५,६ यांत ह्मटले, तसें येथे त्यांना ऋतूंच्या माता ह्मटलेले आहे. पुढें हे ऋतु संपल्यावर काय होते हें सांगतांना इन्द्राने विवस्वताच्या दहानंतर म्हणजे दहा महिन्यानतर आपल्या तिहेरी हातोड्याने आकाशकटाह फोडून कोश खालीं पाडला असें ह्मटले आहे. याचा अर्थ असा की दिव्य जलांचे तीन कोश ( ७,१०१,४ ) फोडून समुद्रांत सोडून दिले व त्यांबरोबर सूर्यही खाली गेला. ७,१०१,२ यांत सूर्याचा प्रकाश ( ज्योति ) तीनप्रकारचा सांगितला आहे व तै. संहितेतही* ( २,१,२,५ ) सूर्याच्या वसंत, ग्रीष्म, शरद् रूपी तीन ज्योति आहेत असे ह्मटलें आहे; अर्थात् प्रस्तुत ऋचेतही हा त्रिप्रकार मार्ग सूर्याच्या त्रिप्रकार प्रकाशाचा द्योतक असून, हा सर्व प्रकार विवस्वताच्या दहानंतर सपतो असे ह्मटले आहे. हा गुप्त झालेला सूर्य किंवा यज्ञ पुनः त्याचे जनन व्हावे ह्मणून बीजरूपानें ठेविलेला असतो. ही स्थिति प्रवर्ग्यांत लाक्षणिक रूपानें सांगितली आहे. यज्ञिय वाङ्मयांत सूर्याच्या आकाशांतून खाली गळण्याचा उल्लेख पुष्कळ वेळां येतो. ऐ. ब्राह्मणात ( ४,१८ ) 'सूर्य पलीकडे पडेल या भीतीने देवांनीं त्याला उच्च लोकांच्या सहाय्याने आधार दिला' असे वर्णन आहे. यांत पलीकडे ( पराचः अतिपातात् ) हे शब्द महत्वाचे आहेत; कारण त्यांवरून सूर्य पलिकडच्या प्रदेशांत जातो असें दिसून येतें. अश्विनांनी च्यवन नांवाच्या

* त्रीणि वा आदित्यस्य तेजांसि वसंता प्रातर्ग्रीष्मे मध्यंदिने शरद्यपराह्णे । तै. सं. २, १, २, ५.

1 तस्य पराचोऽतिपातादबिभयुस्तं परमैः स्वर्गैर्लोकैः परस्तात्प्रत्यस्तभ्नुवन् । ऐ. ब्रा. ४, १८.

एका भक्ताला तरुण केलें अशी ऋग्वेदांत कथा आहे. तिचा स्पष्टार्थही च्युत झालेल्या सूर्याला त्यांनी पुनः पूर्वस्थानी आणिलें असा आहे. तात्पर्य यज्ञाचे बीज राखून ठेवण्याचा प्रवर्ग्यांतील विधि हा सूर्याच्या पलिकडच्या प्रदेशांत पडण्याचें लाक्षणिक स्वरूप आहे. कारण त्यांत योजिलेला मंत्र कांहीं निरर्थक नव्हे; त्याचा नीट अर्थ केल्यास त्यावरून पांच ऋतूंच्या व दहा महिन्याच्या प्राचीन वर्षाची खूण त्यांत दिसून येणार आहे.

या सत्रांच्या अवधीविषयी याहून स्पष्ट पुरावा पाहिजे असेल तरी तोही सर्वमान्य वैदिक ग्रथांत आढळून येत आहे. यज्ञ ही संस्था अगदी प्रथमपासून चालू असल्यामुळें त्यांतील परपरागत आलेल्या बारीक सारीक गोष्टीही ऋत्विजाना निश्चित कराव्या लागत. त्यात कांहींची कारणे देतांना त्यांची कल्पनाशक्ति वाटेल तशा भराऱ्या मारी. परंतु अशाही कित्येक गोष्टी त्यांत होत्या की, त्याची कारणे त्याना मुळींच न समजल्यामुळे ‘ अशी पूर्वापर वहिवाट आहे ’ असे ह्मणून त्याना काम भागवावे लागले आहे. संवत्सर सत्राचा अवधि ठरविण्यासाठी आता अशा कांही प्रमाणांचा विचार करावयाचा आहे.

ब्राह्मणे व श्रौतसूत्रे यांत, अंगिरसांचे अयन ( अंगिरसा अयनम् ) गाईचे अयन ( गवां अयनम् ) आदित्यांचे अयन (आदित्याना अयनम्) अशी अनेक संवत्सरसत्रे सांगितलेली आहेत. त्या सर्वांची रचना सूर्याच्या वार्षिक क्रमावर केलेली आहे. वैदिक यज्ञांत ही सत्र अति-पुरातन असून त्यांचे विवेचन फार बारकाईने व काळजीपूर्वक असे याज्ञिक ग्रंथांत केलेलं आहे. ती एकमेकांपासून तत्वतः भिन्न नसून एकाच सत्राची परिस्थित्यनुसार अनेक स्वरूपे झालेलीं आहेत. **गवां अयनम्** हे त्या सर्वांचा आदर्श होय. ऐ० ब्राह्मणांत ( ४, १७ ) ‘ गवामयन सत्र करितात; आदित्य याच गाई होत, ह्मणजे ते आदित्यांचेच अयन करितात ’ असें म्हटलें आहे. या ‘ गवां अयना ’ चा अवधि ठर-विल्यास तोच सर्वांनां लागू होणारा असल्यामुळें इतर सत्रांच्या अवधीचा निरनिराळा विचार करावयास नको. या ‘ गवां अयनाचे ’ ऐतरेय ब्राह्मणांत एकदां व तै० संहितेंत दोनदां असें एकंदर तीन ठिकाणी सविस्तर

---

१ गवामयनेन यंति । गावो वा आदित्या आदित्यानामेव तदयनेन् यंति ऐ. ब्रा. ४, १७.

वर्णन आले आहे. ऐ० ब्राह्मणांत या सत्राचे मूळ व अवधि दिलीं आहेत त्यांत ' शफ आणि शिंगे ' मिळविण्यासाठी गाईंनी सत्र आरंभिलें, व दहाव्या महिन्यांत त्यांना ती मिळाल्यावर त्या उठल्या, पण ज्या आणखी बसल्या त्यांच्या अश्रद्धेमुळें त्यांची शृंगे व शफ नाहींसे झाले. ' असे सांगितलें आहे, त्यावरून ब्राह्मण ग्रंथांत बारा महिन्यांचें ह्मणून वर्णिलेलें हें सत्र पूर्वी दहाच महिन्यांत संपत असे हें उघड दिसतें. पण असे कां व्हावे ? यज्ञ करणाऱ्यांना बारा महिन्यांत मिळणारे फळ दहाच महिन्यांत कसें मिळाले ? या महत्वाच्या प्रश्नांचा ऐतरेय ब्राह्मणात मुळींच विचार केलेला नाही. पण तैत्तिरीय संहितेत हे प्रश्न करून व हें सत्र यजमानाच्या इच्छेनुरूप बारा किंवा दहा महिन्यांनी संपतें असें सांगून, या विकल्पाचे कारण काय हें सांगतां न आल्यामुळे ' पूर्वापर वहिवाटीप्रमाणें ते करितात' ( पदेन खलु वा एते यन्ति) असा शेरा त्यांत मारिला आहे. या तीन वर्णनांत बारीक सारीक भेद असले तरी हे सत्र दहा किंवा बारा महिन्यांत संपत असे या गोष्टीविषयी सर्वांचे एकमत आहे. तांड्य ब्राह्मणांतही ' गवां अयना ' च्या वर्णनांत हा द्विप्रकार अवधि सांगितला आहे. आतां या सत्राच्या अवधीसंबंधाचे स्पष्ट उल्लेख व मागील प्रकरणांतील दहा महिने सत्र चालविणाऱ्या दशग्वांची कथा यांचा एकत्र विचार केल्यास प्राचीनकाळी वैदिक आर्यांचे संवत्सरसत्र दहाच महिन्यांत आटपत असे, असें अप्रतिकार्य अनुमान निघतें. वैदिक लोक जेव्हां ध्रुवप्रदेशातून खाली आले तेव्हां हा अवधि पालटून सर्व सत्रे बारा महिन्यांची झाली. तरी धार्मिक गोष्टीसंबंधाची पुराणप्रियता फार जबर असल्यामुळे सत्राचा जुना अवधि विकल्पाने ठेऊन देण्यांत आला. म्हणून पूर्वपरंपरेच्या सबबीवर तै० संहितेत बारा महिन्यांबरोबरच दहा महिन्यांचा काळही मान्य केलेला आहे. आणि त्यावरून आमच्या मते पुरातनकालीन सत्रांच्या अवधीच्या प्रश्नाचा निर्णय होतो. त्याची कारणे काहींही असोत, एवढें खरें कीं, अगदी प्राचीन संवत्सरसत्र फक्त दहाच महिने चालत असे.

प्राचीन कालमापनपद्धतीचा अवशेष जो हा वार्षिक सत्राचा दहा महिन्यांचा अवधि त्याचें कारण काय असावें हे न समजण्यांत एकटी तैत्तिरीयसंहिताच वांटेकरी आहे असें नाहीं. यूरोपीय सौर वर्षाच्या बाराव्या महिन्याला दिसेंबर असें नांव आहे. व्युत्पत्तिदृष्ट्या या शब्दाचा अर्थ

**दहावा महिना** असा आहे [ दिसेम—( सं० ) दशन्—दहा, आणि बेर—(सं०) वार—कालावधि]. यापूर्वीच्या महिन्यांच्या नांवाचेही सातवा, आठवा, नववा असेच अर्थ आहेत ( सेप्टेम्—सप्तन् इ० ). आरंभीं रोमन लोकांचे वर्ष दहा महिन्यांचें होतें व पुढे कांही काळाने **न्यूमा** राजानें त्यांत पहिले दोन महिने मिळविले असे, प्लूटार्क यानें आपल्या ' रोमन लोकांच्या चरित्रांत ' सांगितले आहे. पण याचे कारण काय असावें याचा आजपर्यंत कोणीही विचार केलेला नाही. शास्त्रीयज्ञानाची एवढी वाढ झालेली असतांही आज मितीस जर रोमन लोकांचें वर्ष प्रथम दहा महिन्याचेच कां होते हें सांगतां येत नाही, तर तैत्तिरीयसंहितेत गवामयनाचा अवधि दहा महिन्यांचा कां होता याचे ' पूर्वापर वहिवाटी ' शिवाय ( पद ) दुसरें कांही कारण सांगितलेले नाही, याचें आश्चर्य मानावयास नको. पण आतां ध्रुवोपपत्तीमुळे बऱ्याच अज्ञात गोष्टींवर प्रकाश पडणार आहे. ' गवां अयना ' चा दहा महिन्यांचा अवधि व रोमन लोकाचे दहा महिन्याचे वर्ष या गोष्टी जर या दोन्ही आर्यशाखा एकत्र असतांच्या काळच्या खुणा असतील तर सबंद वर्षापैकीं उरलेल्या दोन महिन्यांच्या काळाचा हिशेब आपल्याला सहज देतां येण्यासारखा आहे. हा काळ म्हणजे ज्या दीर्घ गर्त्रांत इंद्र बलाला मारून त्याने कोंडिलेल्या गाई सोडवीत असे, अथवा आपल्या गाई चोरणाऱ्या **काकस** नांवाच्या राक्षसाला **हर्क्युलीस** ठार करीत असे, त्या दीर्घ रात्रीचा काळ होय. ध्रुवावरून खालीं आल्यावर आर्यांना आपल्या पचांगात अवश्य ते फेरफार करावे लागले. त्याप्रमाणे त्यांनी जुन्या वर्षात दोन महिने मिळविले. पण या पूर्वीच्या वहिवाटी माफ नाहीशा होण्यासारख्या नसल्यामुळे त्या पुराणकथा आणि यज्ञपद्धति यांत दिसून येत आहेत. त्यांवरून पहातां आर्य लोक एकत्र असतांना त्यांचे वर्ष दहा महिन्याचे असून या दहा महिन्यानतर काळोखाची दीर्घ रात्र येत असे, असें मानावयास कोणतीच हरकत दिसत नाही. तुलनात्मक गाथाशास्त्रावरूनही ही गोष्ट सिद्ध होत असून तद्विषयक विवेचन पुढच्या एका प्रकरणात स्वतंत्रपणे यावयाचे आहे.

हें ' गवां अयनम् ' सत्र गाईंनीच केले असे ऐतरेय ब्राह्मण व तैत्ति० संहिता यांत सांगितले आहे. पण या गाई म्हणजे कोण ? खरोखरीच्या

गाई होत्या अथवा दुसरें कोणी होते ? ऐतरेय ब्राह्मणांत, 'आदित्य याच गाई होत' असे सुचविलें* आहे; व या ऐतरेय ब्राह्मणांतील वचनाला तुलनात्मक गाथाशास्त्रावरून चांगला आधार मिळतो. पुराणकथांत येणाऱ्या गाई म्हणजे संवत्सरांतील दिवस व रात्री असे केवळ वेदांसंबंधानेच नव्हे तर ग्रीक पुराणांसंबधानेही दिसून येते. असे असल्यामुळे शिगे मिळविण्याच्या इच्छेनें गाईंनी आरंभिलेल्या सत्राचा अर्थ अधिक चांगल्या रीतीने आपणांस समजणार आहे. मॅक्स मुल्लरनें आपल्या गाथाशास्त्रावरील ग्रंथांत आर्यपुराणांतील गाईसंबंधाने विवेचन केलें आहे. त्यांत तो ह्मणतो, 'वेदांमध्ये तीन प्रकारच्या गाई आढळतात; खऱ्या गाई, जलरूपी गाई आणि प्रातःकालिक प्रकाशरूपी गाई. या एकमेकांपासून ओळखणें कठीण पडते, इतके त्याचे वर्णन मिश्र असते. **निरुद्धा आपः पणिनेव गावः** यांत पाण्याला गाईची उपमा दिली; पण या उपमेचें रूपक होऊन कित्येक ठिकाणीं तर मूळ पाणी जाऊन गाई या शब्दानेच त्याचे वर्णन प्रामुख्यानें होऊं लागलें. उषेलाही पुष्कळ ठिकाणी गाई ह्मटले आहे. १,९२,१ "या उषांनी पूर्वेकडे आपला केतु फडकावला...त्या तेजस्वी, गाई, माता येत आहेत" व १,९३,४, 'हे अग्निषोमहो, पणीच्या गाई हिरावून तुम्ही पुष्कळांना प्रकाश दिला' या वर्णनांतील गाई ह्मणजे उषा किंवा त्याचा प्रकाश होत हें सहज समजण्यासारखे आहे. १,६२;३ यांत 'बृहस्पतीनें अद्रि फोडून गाई शोधून काढिल्या' असे म्हटले आहे. २,१९,३ 'इन्द्रानें सूर्य उत्पन्न करून गाई शोधून काढिल्या' २,२४,३ 'बृहस्पतीनें गाईंना हांकून लाविलें, ब्रह्मानें ( हत्यारानें ) अद्रि फोडिला, तमाला नाहींसे केलें आणि स्वर्लोकावर प्रकाश केला', इत्यादि वर्णनांतील गाईचें स्वरूप स्पष्ट दिसण्यासारखे आहे. पण याहूनही महत्वाची गोष्ट ह्मटली ह्मणजे उषेच्या गाईचें इतर राष्ट्रांच्या पुराणांत आलेलें वर्णन ही होय. त्या ठिकाणीं गाई म्हणजे दिवस होत हे अगदीं स्पष्ट आहे. **हेलिऑस** ( ग्रीक देवता-सस्कृत सूर्य ) याच्या ३५० गाई व ३५० मेंढ्या ग्रीक पुराणांत आल्या आहेत;त्या ह्मणजे वर्षांचे ३५० दिवस व ३५० रात्रीच होत. व त्यांवरून आर्य लोक विभक्त होण्यापूर्वी त्यांचें वर्ष ३५० दिवसांचें होतें असे सिद्ध होत.

---

* गावो वा आदित्या आदित्यानाम्नेव तदयनेन यंति । ऐ० ब्रा० ४,१७.

असो, तर पणीनें निरुद्ध ( अडकविलेल्या ) केलेल्या गाई म्हणजे शिंगें असलेल्या खऱ्याखुऱ्या गाई नसून दिवसरात्री होत. **गवामयनम्** हें सत्र करणाऱ्या गाई म्हणजे दिवस असा अर्थ घेतल्यास या चमत्कारिक गोष्टींचें मूळ उत्तर ध्रुवाजवळील दहा महिन्यांचे वर्ष असलेल्या प्रदेशांत आहे, असें दिसून येईल. पणीच्या कचाट्यांतून निसटलेल्या गाई ह्मणजे दीर्घ रात्री-नंतर येणारा प्रकाश होय. हा दहा महिने चालल्यावर पुनः दीर्घ रात्र येई, ह्मणजे पणी पुन: गाईंना पळवून नेई. रोमन लोकांचे वर्ष प्रथम दहा महि-न्यांचे होते हे मागे सांगितलेंच आहे. अवेस्त्यांतही **ऐर्यन वइजो** मध्यें दहा महिने उन्हाळा असल्याचे वर्णन आहे. ह्मणजे दहा महिन्यांचे वर्ष व त्याच्या मागाहून येणारी दोन महिन्याची दीर्घ रात्र ही आर्य लोक विभक्त होण्यापूर्वी त्यांस माहीत होती असे मानावयास आतां कांही अडचण नाहीं. त्यांच्यासबंधाचे उल्लेख वेदांत एक दोनच व तेही काल्पनिक असे नसून विपुल व प्रत्यक्ष आहेत. आजपर्यंत ते गूढ राहिले यांचें कारण त्याचा अर्थ लावण्याची खरी गुरुकिल्ली समजली नव्हती हें होय.

मागे सांगितलेच आहे की, ध्रुवाजवळील प्रदेशांत वर्षांचे महिने अक्षांश मानानें सातपासून अकरापर्यन्त असतात. ह्मणून, जरी दहा महिन्यांच्या वर्षाचेच उल्लेख वेदांत स्पष्टपणें आहेत, तरी तेवढ्यावरून इतर प्रकार त्यांत नाहीतच असे मात्र ह्मणतां यावयाचे नाही. कारण, अदितीच्या गोष्टीत सात महिन्यांचा उल्लेख आलाच आहे. एवढेच कीं, दहा महिन्यांचें वर्ष विशेष महत्वाचें होते. अंगिरसांचे अनेक प्रकार असून त्यांतील दशग्व हे श्रेष्ठ होते असें जे ऋग्वेदांत ह्मटले आहे त्यावरून हीच गोष्ट दिसून येते. पण कसेही असले तरी हे वर्णन ध्रुववृत्ताच्या आंतील प्रदेशाचें आहे यांत कांहीं शंका नाही. **हेलिऑसचें** वर्ष ३५० दिवसांचें होतें. हें वर्ष साध्या व्यावहारिक वर्षाहून १० दिवसांनीं कमी आहे. हे दहा दिवस ह्मणजे काळोखाचेच असावे. जेथें दहा महिन्यांचें वर्ष असेल तेथें ६० दिवसांची दीर्घरात्र असेल; अशा-प्रकारच्या दीर्घरात्रीचा अवधि जास्तीत जास्ती किती होता हें समजण्या-सारख्या कांहीं गोष्टी सांपडतात की नाही ते आतां पाहूं.

होमर कवीनें हेलिऑसच्या गाईसंबंधानें जे कांहीं वर्णन केलें आहे त्याचा उलगडा करतां येत नाहीं असें मॅक्स मुल्लरनें ह्मटलें आहे. पण

ध्रुवोपपत्तीची मदत घेतल्यास त्याचा उलगडा चांगला होण्यासारखा आहे. ऑडिसीसच्या सोबत्यांनी हेलिऑसच्या (सूर्याच्या) गाई खाऊन टाकून त्यांना परत येऊं दिलें नाही, किंवा हर्मिसनें अपॉलनच्या गाई चोरून त्यांपैकी दोन ठार केल्या असे जें होमरनें लिहिलें आहे त्यांत अमुक गाई ऊर्फ दिवस खाल्ले ह्मणजे वर्षांतील तितके दिवस दीर्घ काळोखाच्या रात्रीत गडप झाले असे समजलें पाहिजे. यांत दिवसांची संख्या जी कमीजास्त आहे ती अर्थात्च अक्षांशपरत्वें होय. आजपर्यंत प्रकाश व काळोख यांतील रोजच्या झगड्यावर सर्व गोष्टींचा अर्थ लावण्याचा प्रयत्न झाल्यामुळे वरील गोष्टीसारख्या कित्येक गोष्टी अगदी गूढ राहिल्या. परंतु ध्रुवोपपत्तीचे ग्रहण केल्यास त्या सर्व सुगम व स्पष्ट होत आहेत. वेदांतही वलाने किंवा वृत्राने इन्द्राच्या गाई पळवून नेल्याचे सांगितले आहे, पण त्यांची संख्या स्पष्टपणें कोठे आलेली नाही. ऋज्राश्वानें १०० (१,११६,१६) किंवा १०१ (१,११७,१८) मेषांनां मारून वृकापुढे टाकिले असे वर्णन ऋग्वेदांत आलें आहे, त्याचा मात्र शंभर दिवसांच्या अवधीच्या रात्रींशी संबंध असावा. याज्ञिय वाङ्मयांत या दीर्घ रात्रीसंबंधानें एक महत्वाची गोष्ट आली आहे. पण त्या गोष्टीवर पुढील टीका, भाष्ये इत्यादिकांचें एवढे दडपण पडलें आहे की, सोमयागांच्या इतिहासाचा सविस्तर विचार केल्याशिवाय ती स्पष्टपणें पुढें मांडतां येणार नाही. सोमयाग हे अगदी पुरातन असून सर्व यागांचे आदर्श होत. ऋग्वेदांतील कर्मकांडांत यांचेंच प्राधान्य असून ११४ सूक्तांचें सबंद ९ वें मंडल सोमसूक्तांनीच झालेलें आहे. या सोमयागांचें सूक्ष्म निरीक्षण केल्यास त्यावरून आर्यांच्या अति पुरातन काळच्या यज्ञपद्धतीचें स्वरूप थोडेबहुत तरी स्पष्ट होण्यासारखें आहे. ह्मणून त्यांचा आतां थोडासा बारकाईनें विचार करूं.

सोमयाग या नांवावरून त्यांत सोमरस काढून त्याचा हवि देणें ही गोष्ट विशेष आहे हें उघड आहे. हे सोमरसांचे हवि रोज सकाळीं, मध्यान्हीं व सायंकाळी असे तीन वेळां द्यावयाचे असतात. सोमयागांच्या अवधीवरून त्यांचे तीन वर्ग होतात; १ एकाह ह्मणजे एकाच दिवसांत संपणारे, २ अहीन ह्मणजे दोन पासून तेरा दिवसांच्या आंत संपणारे, आणि. ३ सत्रें ह्मणजे तेरा दिवसांपासून तों एक हजार वर्षेपर्यंतही रहाणारे.

**अग्निष्टोम** हा पहिल्या वर्गांत* येतो, पण त्याशीं आपल्याला प्रस्तुत कांहीं कर्तव्य नाहीं. **द्वादशाह** हा दुसऱ्या वर्गांतील असून तो **अहीन** किंवा **सत्र** यांपैकीं कोणत्याही रूपाने करतां येतो. याचे विशेष महत्व आहे. तीन **त्र्यह** दहावा दिवस आणि दोन **अतिरात्र** मिळून हा झालेला‡ असतो. तीन त्र्यहांमिळून झालेल्या नऊ दिवसांना **नवरात्र** म्हणतात. त्याबरोबर द्विरात्र, त्रिरात्र वगैरे सोमयागही सांगितले आहेत. संवत्सरसत्रें तिसऱ्या वर्गांत येत असून **गवां अयनम्** हे त्यांचे आदर्श रूप आहे. यापैकीं विशेष महत्वाचीं सत्रें म्हटलीं म्हणजे संवत्सरसत्रे होत. त्यांचें स्वरूप योग्य रीतीने कळण्यासाठीं **षळह** म्हणजे काय ते पाहिलें पाहिजे. सहा दिवसांचा यज्ञ असा त्याचा अर्थ असून असे पांच षळह म्हणजे एक महिना होतो. **ज्योतिः, गो, आयुस्,** आणि पुनः **आयुस्, गो, ज्योतिस्,** असे सहा एकाह मिळून **षळह** होतो. म्हणजे प्रत्येक षळहाच्या आद्यन्तीं **ज्योतिष्टोम** असतो. **अभिप्लव** आणि **पृष्ठ्य** असे आणखी षळहाचे भेद आहेत. कित्येक षळह आणि दुसरे कांहीं आदिमध्यान्तीं येणारे विशेष विधि मिळून संवत्सरसत्र होते. या सत्राच्या मध्य दिवसाला विषुवान् म्हणतात; व या विषुवानाच्या योगानें सत्राचे बरोबर दोन सारखे भाग होत असून पहिल्यांत होणारे विधि दुसऱ्यांत उलट क्रमाने होतात. या ' गवां अयना ' ची अनुक्रमणिका अशी.

| भाग. | दिवस. |
|---|---|
| १ आरंभीचा अतिरात्र. .... .... ... .... ... | १ |
| २ चतुर्विंश दिन ( त्यालाच आरंभणीय किंवा प्रायणीय ह्मणतात ). ... ... .... ... .... | १ |

---

* ऐतरेय ब्राह्मणांत ( ३, ३९–४४ ) अग्निष्टोमाचें साग्र वर्णन दिलें असून तो या पहिल्या वर्गांतील सर्व यागांची प्रकृति आहे. अत्यग्निष्टोम, उक्थ्य, षोडशी, वाजपेय, अतिरात्र आणि अप्तोर्याम अशा त्याच्या सहा विकृती असून हे सहा व अग्निष्टोम, असे सात मिळून जोतिष्टोमाचे सात भाग होतात ( आश्व. श्रौ. सू. ६, ११, १. )

‡ त्रयश्च वा एते त्र्यहा आदशममहराद्वावतिरात्रौ यद् द्वादशाहः । ऐ. ब्रा. ४, २४.

३ चार अभिप्लव षळह व एक पृष्ठय षळह मिळून एक महिना असे पांच महिने.... ... ... ...१५०
४ तीन अभिप्लव षळह व एक पृष्ठय षळह. ... ... २४
५ अभिजित् दिन. ... ... ... ... ... १
६ तीन स्वरसाम दिन ... ... ... ... ... ३
७ विषुवान् (याची एकंदर सत्रदिनांत गणती करीत नाहीत).
८ तीन स्वरसाम दिन ... ... .... ... ... ३
९ विश्वजित् दिन. ... ... ... ... ... १
१० एक पृष्ठय आणि तीन अभिप्लव षळह. ... ... २४
११ एक पृष्ठय आणि चार अभिप्लव असे चार महिनेपर्यंत...१२०
१२ तीन अभिप्लव षळह, एक गोष्टोम, एक आयुःष्टोम आणि एक दशरात्र मिळून एक महिना. ... ... ३०
१३ महाव्रात. ... ... ... ... .... ... १
१४ शेवटचा अतिरात्र. ... ... .... ... .... १

एकूण दिवस ३६०

संवत्सरसत्रांतील या भागांपैकीं ज्यांत अगदी कांहीं फेर करतां यावयाचा नाहीं असे थोडेच आहेत. पहिला व शेवटचा असे दोन अतिरात्र, चतुर्विंश, महाव्रात, अभिजित्, विश्वजित्, विषुवान् आणि त्याच्या अलीकडे व मागाहून येणारे तीन स्वरसाम, आणि द्वादशाहापैकी दशरात्र एवढेच काय ते त्यांतील विशिष्ट भाग होत. बाकीचे दिवस अभिप्लव आणि पृष्ठय षळहानी भरून काढलेले असतात. असे असल्या-मुळें ‘ गवां अयनम् ’ हे सत्र दहा महिन्यांचे करावयाचें असल्यास वर दिलेल्या ३ व ११ या कलमांतील पांच पाच पळह कमी केले म्हणजे झाले. वर दिलेल्या रचनेंत थोडासा फेरफार केला की, ‘ आदित्यानां अयनम् ’ नांवाचें सत्र * होतें. त्यांत मुख्य विशेष एवढाच कीं, त्यांतील सगळे षळह अभिप्लवच असतात, कांही पृष्ठय आणि कांही अभिप्लव असे नसतात. तसेच सर्व षळह अभिप्लव करून दुसरे बारीक सारीक फेरफार

* यथा वा प्रायणीयोऽतिरात्रश्चतुर्विंश उक्थ्यः सर्वेऽभिप्लवाः षळहा आक्ष्यं-त्यन्यान्यहानि तदादित्यानामयनम । ऐ. ब्रा. ४.१७.

केले असतां त्याचें 'अंगिरसां अयनम्' हें संत्र होतें. हे फेरफार झाले तरी त्यांवरून ३६० दिवसांच्या संख्येला कांहीं बाध येत नाहीं. परंतु कांहीं याज्ञिक चांद्र वर्षाचा अवलंब करून ३५४ दिवसच घेत व त्यामुळें ते वरच्या कोष्टकापैकीं सहा दिवस गाळीत असत. या त्यांच्या सत्राला 'उत्सर्गिनां अयनम्' ह्मणतात. या सर्व सत्रांत तात्पर्य एवढेंच कीं, चांद्र किंवा सौर पैकी ज्या प्रकारचें वर्ष घेतले असेल त्या वर्षाला अनुरूप असा त्या सत्राचा कार्यक्रम करावयाचा. परंतु या गोष्टीशीं प्रस्तुत आपल्याला विशेष कर्तव्य नसल्यामुळें त्यांत याहून खोल जाण्याचे कारण नाहीं. ब्राह्मणांत आणि श्रौतसूत्रांत विषुवान्, अभिजित् अथवा स्वरसाम या दिवशीं करावयाचे विधि सविस्तर सांगितले आहेत. ऐतरेय आरण्यकांत महाव्रताचे वर्णन दिले असून ऐतरेय ब्राह्मणाच्या चवथ्या पंचिकेंत अतिरात्र आणि चतुर्विंश यांचें वर्णन केले आहे. सत्राचा खरा आरंभ चतुर्विंशापासून असून त्याची अखेर महाव्रतानें होते. ऐतरेय ब्राह्मणाच्या चवथ्या पंचिकेत असें सांगितले आहे[2] कीं, 'बृहद्दिव सूक्ताने होता रेताचे सिंचन करतो; अशा रीतीने तो त्या रेताकडून महाव्रात दिनानें प्रजनन करवितो. कारण, प्रतिसंवत्सरी सिंचन केलेले रेत प्रजनन करणारे होते.' या खुलाशावरून असे दिसते की, प्रवर्ग्य विधीप्रमाणेंच महाव्रताचा उद्देशही यज्ञाचें बीज यथाकालीं प्रजनन होण्यासाठी राखून ठेवण्याचा आहे. महाव्रत ह्मणजे जुन्या व नव्या वर्षांना एकत्र जोडणारा दुवा असून सत्राची परिसमाप्ति त्याने होई हे योग्यच आहे. प्रत्येक संवत्सर सत्राच्या आद्यंतीं एक एक अतिरात्र याग असे आणि सत्राच्या शेवटच्या भागांत द्वादशाहाचें विशेष महत्व असे.

याप्रमाणें यज्ञग्रंथात सांगितलेल्या संवत्सरसत्रांच्या रचनेचें अगदीं स्थूल मानानें स्वरूप आहे. हीं सत्रे साधारणतः ३६० दिवसांच्या वर्षावर बसविलेलीं असून त्यांत विषुवान् दिन महत्वाचा असे. कारण, त्याच्या नंतर करावयाचे विधि पूर्वीच्या विधींच्या उलट क्रमाने करावयाचे

---

१ प्रायणीयोऽतिरात्रश्चतुर्विंश उक्थ्यः सर्वे पृष्ठ्याः षळहा आक्ष्यंत्यन्यान्यहानि तदंगिरसामयनम् । ऐ. ब्रा. ४,१७.

२ बृहद्दिवेनात्र होता रेतः सिंचति । तददो महाव्रतीयेनान्हा प्रजनयति । संवत्सरे संवत्सरे वै रेतः सिक्तं जायते । ऐ. ब्रा. ४,१४.

असत. विषुवानाच्या स्थितीवरून ही यज्ञपद्धति स्थापन झाली त्या काळासंबंधानें कोणतीं महत्वाची अनुमाने काढतां येतात हे *'वेदकाल-निर्णयांत' सांगितलें आहे. पण आतां आपल्याला त्याहूनही प्राचीन अशा काळाचा विचार करावयाचा असल्यामुळें सत्र या सामान्य वर्गात मोड-णाऱ्या दुसऱ्या प्रकारच्या सोमयागांचे थोडेसे वर्णन केले पाहिजे. द्वारशाहा-बरोबरच असणाऱ्या दोन रात्रीपासून बारा रात्रीपर्यन्तच्या अहीन यागां-विषयीं मागें सांगितलेच आहे. पण हीं रात्रिसत्रे बारा रात्रीपर्यन्तच थांबत नाहींत. त्यांची मजल त्रयोदशरात्रापासून शतरात्रापर्यन्त गेलेली आहे. परंतु अहीन याची व्याख्या 'बारा किंवा कमी दिवसांचा याग' अशी असल्यामुळें त्रयोदशरात्रादि यज्ञ सत्र या वर्गात घालतात. पण हा कृत्रिम भेद टाकून दिल्यास असे दिसून येईल की, एकाह, द्वा-दशाह व सत्रें यांच्या बरोबरच 'रात्रिसत्रे' नांवाची दोनपासून शंभर रात्रांपर्यन्त (पण त्याहूत जास्त नाही) होणाऱ्या सत्रांचीही मालिका आहे. तैत्तिरीय संहिता, ब्राह्मणें आणि श्रौतसूत्रे यांत हीं सत्रे स्पष्टपणें सांगि-तलीं असल्यामुळें त्यांचें स्वरूप, संख्या किंवा अवधि यांविषयीं कोणतीच शका रहात नाहीं.

आतां यासंबंधानें महत्वाचा प्रश्न असा आहे कीं रात्रिक्रतु, किंवा रात्रिसत्रे हे नांव या सत्रांनांच कां लावलेले आहे व त्यांचा अवधि शंभर रात्रीहून अधिक कां नसावा? रात्रि ह्मणजे वस्तुतः दिवस असें या सत्रांच्या नांवासंबंधाने मानिलें पाहिजे असें यांतील पहिल्या प्रश्नाचे उत्तर मीमांसकानीं दिलेले आहे; त्या अर्थाप्रमाणें पहातां द्विरात्र ह्मणजे दोन दिवसांचा याग, व शतरात्र ह्मणजे शंभर दिवसांचा याग, असे होतें. हा अर्थ सर्व यज्ञग्रंथांत मान्य केलेला आहे; इतकेच नव्हे तर चंद्र हा प्राचीन काळीं कालमापक असल्यामुळें त्या काळी दिवसापेक्षां रात्रीकडे विशेष लक्ष वेधणे साहाजिक होतें व ह्मणून रात्रि हाच शब्द दिवस या अर्थी व्यवहारांत वापरीत असतील, हें खरें. पण पुढे पुनः असा प्रश्न येतो कीं या रात्रिसत्रांची मुदत शंभर रात्रींहून (ह्मणजे दिवसांहून) अधिक कां नसावी? शंभर दिवसांवरून एकदम ३६० दिवसांच्या संव-

---

* पान ११, १२.

त्सरसत्रावर उडी कशी मारली? एकशे एक पासून ३५९ पर्यंत दिवसांचे यज्ञ कां सांगितलेले नाहीत? या प्रश्नांचें समाधानकारक उत्तर कोणी दिलेलें नाही. मात्र ब्राह्मण ग्रथांतील तर्काचें अवलंबन केल्यास असें ह्मणतां येईल की मनुष्याचे आयुष्य शंभर वर्षांहून अधिक नसल्यामुळें शंभर रात्रींहून अधिक अवधीचे सोमयागही नाहींत (तै. ब्रा. ३, ८,१६,). पण हा तर्क कितपत मान्य करतां येईल हे सांगावयास नकोच. तात्पर्य मीमांसकांना सदर प्रश्न सुटला नाहीं एवढे खरें. असो. थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे, यज्ञिय ग्रथांत सांगितलेली जी दोनपासून शंभर रात्रीपर्यन्तचीं रात्रिसत्रे ती 'गवां अयना' सारख्या कोणत्याही संवत्सरसत्राचा भाग नसून त्यांचे स्वतंत्र अस्तित्व कां व त्यांची मुदत शंभर रात्रींहून अधिक कां नाही? याचें कारण कोणी दिलेले नाहीं. रात्रि शब्दाचा अथ दिवस असा घेऊनही त्यांचा संवत्सरसत्रांत अन्तर्भाव करतां येत नाही. पण ध्रुवोपपत्तीच्या साहाय्यानें या प्रश्नांचा बराच समाधानकारक उलगडा करतां येतो. तो कसा हे आतां पाहूं.

पहिला विचार करण्यासारखा प्रश्न असा आहे की अतिरात्र या शब्दांत रात्रि याचा जर सूर्यास्तापासून सूर्योदयापर्यंतचा काळ असा अर्थ आहे व अतिरात्र यज्ञही जर अद्यापिही रात्रीसच करावयाचा असतो, तर द्विरात्र त्रिरात्रपासून शतरात्रपर्यंतच्या यज्ञांतही रात्र ह्मणजे काळोखाचा काळ असे समजून ते यज्ञ खरोखरीच्या रात्रीस करावयाचे असत असे मानावयास काय हरकत आहे? सोमरस रात्री काढीत नाहींत; तेव्हां ही रात्रिसत्रें खरोखर रात्रीचीं नसून दिवसांचीच होतीं, असा एक आक्षेप आमच्या ह्मणण्यावर येईल; पण त्यांत कांही अर्थ नाही. ऐतरेय ब्राह्मणांत (४, ५) अतिरात्राचे मूळ देतांना असे सांगितले आहे कीं "देवांनी दिवसाचा आश्रय केला, व असुरांनी रात्रीचा केला. तेव्हां असुरांना तेथून काढून लावण्याच्या कामी इंद्राला दुसरा कोणी सहाय मिळना. छंद मात्र त्याच्या मागोमाग गेले. तेव्हां त्यानी असुरांनां, रात्रीच्या पूर्व भागांतून पहिल्या पर्यायानें, मधल्या भागांतून मधल्या पर्यायानें व शेवटच्या भागांतून शेवटच्या पर्यायाने असें हाकून लाविले." हे तिन्ही सोमाचे पर्याय रात्रीचे आहेत. शिवाय हे इंद्र व छंद यांशिवाय इतर कोणालाही ते द्यावयाचेच नाहीत असें त्या ब्राह्मणांत स्पष्ट

दर्शविलें आहे. पुढें पुढच्या प्रकरणांत* ' पवमान स्तोत्रांचा संबंध दिवसाशीं असल्यामुळे ती रात्रीस कशी सांगितली ? " असा प्रश्न विचारून तीं रात्र व दिवस या दोहोंचींही आहेत असे त्याचें उत्तर दिलें आहे. यावरून हा सोमरस अतिरात्रामध्यें रात्रीसच काढीत असत व तो फक्त इन्द्रालाच देत असें दिसतें. अतिरात्र प्रयोग अगदी प्राचीन आहे. पारशी ग्रंथांतही याच्यासारखा एक प्रयोग सांगितला आहे. त्यांत रात्रीचे तीन भाग सांगून पहिल्या भागांत अहुरमझ्दाचा पुत्र अग्नि हा यजमानाला उठून कस्ति घालून चांगले इन्धन आणावयास सांगतो व ह्मणतो " दइवानीं ( वैदिक असुर ) केलेला अही आतां येऊन माझ्याशी लढून मला मारणार आहे; तर मला चांगला पेटूं दे " दुसऱ्या व तिसऱ्या भागाविषयींही असेच सांगितलें आहे. अतिरात्रांतील तीन पर्याय आणि हे रात्रीचे तीन भाग यांतील साम्याचा विचार केल्यास असें दिसून येईल कीं, अतिरात्र याग फार प्राचीन असून तो वृत्राशी लढणाऱ्या इन्द्राला मदत करण्यासाठीं ह्मणून रात्रीसच करीत असत.

आतां जी गोष्ट एक रात्रीच्या यागाला लागू आहे ती उघडच अनेक रात्रींच्या यागालाही लागू असली पाहिजे. प्राचीन यज्ञिय आपलीं संवत्सरसत्रें दहा महिन्यांत सपवीत असत, हे पूर्वी सांगितलेच आहे. या दहा महिन्यांनंतर काळोखाची दीर्घ रात्र येत असे. या एवढ्या मोठ्या रात्रींत यज्ञियांनी करावयाचे तरी काय ? एकसारखे निजून रहाणे शक्य नाहीं. यूरोपच्या उत्तर भागांत ज्या ठिकाणी दीर्घ रात्र असते त्या ठिकाणी अद्यापिही सर्व काळपर्यंत लोक निजून रहात नाहीत. तारांच्या स्थितीवरून कालज्ञानही त्यांना होतें. हीच गोष्ट प्राचीन ऋत्विजांनांही लागू आहे. पण जर ते निजत नव्हते तर काय करीत होते असा प्रश्न सहाजिकच येतो ? हात जोडून रिकामे बसत असत असेंही ह्मणतां येत नाही. कारण त्यावेळीं इन्द्रवृत्राचे युद्ध चालल्यामुळे इन्द्राला साहाय्य करणे अवश्य होते. असे असल्यामुळे जर ध्रुवोपपत्ती खरी असेल ह्मणजे वैदिक ऋषींचे पूर्वज जर कधीं खरोखरच ध्रुवाजवळ रहात होते असे असेल, तर तेथे असणाऱ्या दीर्घ काळोखाच्या रात्रीं इंद्र वृत्राशी झगडत

---

* पवमानवदहरित्याहुर्न रात्रिः पवमानवती कथमुभे पवमानवती भवतः.... तेन रात्रिः पवमानवती तेनोभे पवमानवती भवतः । ऐ. ब्रा. ४,६.

असता त्याला साहाय्य करण्यासाठी ते रात्रीस कांहीं तरी करीत असलेच पाहिजेत. ह्मणजे रात्री करण्याचे सोमयाग वैदिक यज्ञग्रंथांत आढळलेच पाहिजेत. तेच हे रात्रिक्रतु होत. अतिरात्र त्यांत धरल्यास एका रात्रीपासून तो शभर रात्रीपर्यन्त त्यांची मुदत होते. ध्रुवाजवळील वसतिस्थानासबंधाने ब्राह्मणकारांनां किंवा मीमासकांना कांहीं माहिती नसल्यामुळे या रात्रिसत्रांना दिवससत्रांचे स्वरूप त्यांनी दिलें. परंतु हा अर्थविपर्यास रात्रिसत्राचे खरे स्वरूप स्मरणांतून गेल्यावर झाला असला पाहिजे. मीमांसकांचा अर्थ मान्य केल्यास या रात्रिसत्रांची मर्यादा शंभर रात्रीपर्यंतच जाऊन कां थांबावी हे सांगतां येत नाहीं, हे वर सांगितलेच आहे; पण ध्रुवोपपत्तीवरून या गोष्टीचे कारण सांगतां येईल. ध्रुववृत्तस्थ प्रदेशांत रात्रीची मुदत अक्षांशमानाने एक पासून शंभर दिवसपर्यंत असते; व त्या मानाने रात्रिसत्रांचीही मुदत एकपासून शंभर रात्रीपर्यंतच असे. ज्या ठिकाणीं दहा दिवसांची रात्र असे त्या ठिकाणीं दशरात्र करीत व ज्या ठिकाणीं शंभर दिवसांची रात्र असे त्या ठिकाणीं शतरात्र करीत. शभर दिवसांपेक्षां रात्रीची मुदत अधिक नसल्यामुळे रात्रिसत्राचीही मुदत शभरांच्या पलीकडे गेलेली नाहीं. मागें सांगितल्याप्रमाणे ज्या ठिकाणीं सात महिन्यांचा प्रकाशाचा काळ असतो त्या ठिकाणीं पांच महिन्यांची दीर्घ रात्र असते. या मुदतींतून दोन्ही काळच्या संध्याप्रकाशाचा एक एक महिना काढून टाकिला ह्मणजे जवळ जवळ शंभर रात्रींचीच मुदत येते. उषःकाळांत स्वतंत्र यज्ञ सांगितलेले असल्यामुळे त्या काळाचा रात्रींत अंतर्भाव करतां येत नाहीं. असो. तर येणेप्रमाणे शतरात्र हा याग दीर्घ रात्रीच्या महत्तम मानाचा दर्शक आहे. या रात्रिक्रतूंचा उलगडा दुसऱ्या कोणत्याही उपपत्तीवरून होत नसल्यामुळे व विशेषतः त्यांच्या शंभर रात्रींच्या मुदतीचा खुलासा करतां येत नसल्यामुळे, ते, सात महिन्यांचा प्रकाशाचा काळ, एक एक महिन्याचा संधिप्रकाशकाल व तीन महिन्यांचा दीर्घरात्रिकाल असे स्थूल मानानें भाग असलेल्या प्राचीन संवत्सराचे द्योतक आहेत असे मानावयास कांहीं हरकत नाहीं.

दुसऱ्याही कित्येक गोष्टींवरून हेच अनुमान निघत आहे. एकट्या इंद्रालाच शतक्रतु हें नांव असल्यामुळें दुसऱ्या कोणी तें बळकावण्याचा प्रयत्न केल्यास त्याची व इन्द्राची चकमक होत असे,

अशा अनेक कथा वेदोत्तरकालीन ग्रंथांत दिल्या आहेत. सायणाचार्यांनीं कित्येक ठिकाणीं वैदिक **शतक्रतु** शब्दाचा अर्थ शंभर **यज्ञांचा** स्वामी असा न घेतां शंभर **शक्तींचा** स्वामी असा केला आहे, व त्याला अनुसरून युरोपीयन पंडितांनीं पौराणिक कथांना पार धुडकावून देऊन वेदांत " क्रतु " याचा ' शक्ति ' किंवा ' युक्ति ' याशिवाय कोणताही अर्थ करावयाचाच नाहीं असा निश्चय केलेला दिसतो. रात्रिक्रतूंसबंधाने वर केलेले विवेचन जर बरोबर असेल, तर पौराणिक कथा व्यर्थ आहेत असे न समजतां शतक्रतु हा शब्द वेदात इन्द्राला ज्या अर्थाने लाविलेला आहे, त्याच अर्थावर पौराणिक कथाही रचलेली आहे असे मानावे लागते. पुष्कळ पुराणांतील कथांना वैदिक कथांचा फारसा आधार नसतो हे जरी कबूल केले तरी प्रस्तुत गोष्टीत तसें न मानण्याला खात्रीलायक पुरावा आपल्याजवळ आहे. शंभर रात्रिक्रतूंची ही संस्था इतर सत्रांपासून अलग असून ती तशी कां हें जोंपर्यंत सांगतां येत नाहीं तोंपर्यंत वैदिक शतक्रतु शब्दाचा पौराणिक कथेशीं संबंध जोडलाच पाहिजे. पुराणांत शंभर यज्ञ हे इंद्रत्वाचे लक्षण असून हे यज्ञ अश्वमेध आहेत, पण शतरात्र कांहीं अश्वमेध नव्हे अशी यावर शंका येईल. परतु वैदिक कथांपासून पौराणिक कथांपर्यंत होणाऱ्या स्थित्यंतरांत हा भेद महत्वाचा नाहीं. शिवाय अश्वमेध हाही सोमयागच असून शतरात्राबरोबर त्याचेही वर्णन केले आहे. अश्वमेध यज्ञांत यावयाचे शंभर हविर्भाग तैत्तिरीय संहितेत सांगितले असून ( ७,२,११ ) ते प्रजापतीला **रात्रीं** प्राप्त झाले ह्मणून त्यांना **रात्रिहोम** ह्मणतात असे तैत्तिरीय ब्राह्मणात ह्मटले आहे ( ३,८,१५,१ ). ऋग्वेदांत (१,१६३,१) यज्ञिय अश्व ह्मणजे समुद्रांतून जाणारा सूर्य असे ह्मटले आहे. म्हणून अश्वमेधांतील अश्वाचे परत येणें ह्मणजे दीर्घरात्रीच्या काळोखांतून सर्याचे पुनः परत येणे असें समजावयास हरकत नाही. तात्पर्य एवढेंच की, शतरात्र हा सोमयाग पुराणांत शंभर अश्वमेधांच्या रूपानें दिसल्यास यांत आश्चर्य मानण्यासारखें कांहीं नाहीं. ध्रुवोपपत्तीनें या दोन्हीं गोष्टींचा चांगला उलगडा होत असल्यामुळे त्या खोट्या ठरवून पुराणांतील इन्द्राची गोष्ट वेदांतील ' शतक्रतु ' याच्या चुकीच्या अर्थावरच रचिली आहे असें मानण्याचे कारण नाहीं.

पाश्चात्य पंडित शतक्रतूचा 'शंभर शक्तींचा स्वामी' या शिवाय दुसरा कोणताही अर्थ करावयास तयार नाहीत हें वर सांगितलेंच आहे. परंतु इंद्राच्या शंभर शक्ति कोणत्या हें सांगतां येणें कठीण असल्यामुळें 'शत' याचा अर्थ **शंभर** असा नक्की न घेतां **पुष्कळ** असा मोघम घेतला पाहिजे. असा अर्थ घेतां येतो. ऋग्वेदांत **शतनीथ** किंवा **शतमूति** प्रमाणेंच **सहस्रनीथ** किंवा **सहस्रमूति** अशीही विशेषणें इंद्राला लाविलेली आहेत. अर्थात् **शत** याचा **शंभर** असाच निश्चित अर्थ तेथे नाहीं हे उघड आहे. **शतयामन्, सहस्रयामन्** इत्यादि शब्दांवरून **शत** किंवा **सहस्र** हे शब्द वेदांत अनेकत्वार्थी योजिलेले असतात असे दिसून येते. पण **शतक्रतूंत** 'शत' शब्दाची अशी गोष्ट दिसत नाही. वरील प्रत्येक शब्दांत 'शत' शब्दाच्या जोडीस 'सहस्र' कोठेना कोठे तरी आलेला आहे. पण 'शतक्रतु' ऋग्वेदांत सुमारें साठ वेळां आला असूनही 'सहस्रक्रतु' असा शब्द एकदांही आलेला नाहीं. यावरून 'शतक्रतु' शब्दांत 'शत' चा अर्थ **शंभर** असाच घेण्याचा वैदिक ऋषींचा आशय स्पष्ट दिसतो. शिवाय 'क्रतु' शब्दाचा 'यज्ञ' असा अर्थच जर ऋग्वेदांत नसता तर पाश्चात्य पंडितांप्रमाणें शतक्रतूचा अर्थ समजणे भाग होतें. पण क्रतु शब्दाचा अर्थ यज्ञ असा ऋग्वेदांत आहे हे ७,३२,२६ या *ऋचेवरून उघड दिसते. ही ऋचा अतिरात्र यागासंबंधानें आहे असें ऐतेरेय ब्राह्मणांत (४,१०) सांगितलें आहे. असे असल्यामुळे पुराणांना अनुसरून शतक्रतूचा अर्थ शंभर यज्ञांचा स्वामी असा घ्यावयास कांहीं हरकत नाही. दुसरीही एक गोष्ट या अर्थाला अनुकूल आहे. इन्द्रानें शत्रूंची ९०, ९९ किंवा १०० पुरें भग्न केली असे ऋग्वेदांत सांगितले आहे. **देवपुराः** ह्मणजे देवांची पुरें

---

* इंद्र क्रतुं न आ भर पिता पुत्रेभ्यो यथा । शिक्षा णो अस्मिन् पुरुहूत यामनि जीवा ज्योतिरशीमहि ॥ ऋ. ७,३२,२६. भावार्थ—हे इन्द्र, ज्याप्रमाणे पिता पुत्राला, त्याप्रमाणे तूं आह्मांला यज्ञाच्या तडीस ने. हे पुरुहूत (अनेकांनी आवाहन केलेला) आह्मीं या रात्रीच्या प्रहरांतून जगून प्रकाशाला पोहोंचूं असें कर. ही ऋचा अतिरात्रासंबंधीं असावी असें डॉ. हौ याचें मत आहे.

याचा अर्थ **दिवस** असा तैत्तिरीय संहितेंत ( ७,२, १३,४ ) दशरात्राच्या वर्णनांत दिला आहे. आतां देवांचीं पुरे ह्मणजे जर **दिवस** तर शंबरांची ह्मणजे इन्द्राच्या शत्रूंचीं पुरें ह्मणजे **रात्री** हे उघड आहे. 'असुरांनीं रात्रीचा आश्रय केला' या ऐतरेय ब्राह्मणांतील मागें सांगितलेल्या वाक्यावरूनही हा अर्थ उघड दिसतो. शंबराचीं १०० पुरे भग्न करणे, शंभर रात्रिक्रतूंचा स्वामी असणें, १,३२,१४ यांत ह्मटल्याप्रमाणे अहीशीं युद्ध करीत असतां ९९ नद्या ( स्रवन्ती ) उलटून जाणे या सर्व गोष्टी एकाच गोष्टीची रूपान्तरे होत. या सर्वांवरून आर्यांच्या आद्यस्थानांतील १०० दिवसांच्या मुदतीची अखंड रात्र सिद्ध होत आहे. "जेव्हां इन्द्र आपल्या वज्राने वृत्रावर प्रहार करितो, तेव्हा त्याच्या गृहांत फिरणारे, **शंभर** दिवसांचे संवर्तन व विवर्तन करतात' असे ऋ. ५,४८,३ यांत‡ सांगितले आहे. दीर्घ रात्रीच्या मागे व पुढे साधे दिवस असल्यामुळे हे शंभर म्हणजे शंभर दिवसांच्या मुदतीच्या दीर्घ रात्रींत इन्द्रासाठी केलेले शंभर यज्ञच होत. सूर्यप्रकाशाच्या काळाच्या मागे व पुढे ही दीर्घरात्र असल्यामुळे हे शंभर यज्ञ दिवसाचा क्रम मोडून पुनः तो चालू करतात असें ह्मणणें सहाजिक आहे. अर्थात् या ऋचेत ध्रुवावरील शतदिनावधि दीर्घ रात्रीचाच संबंध दिसून येतो.

या मताचे दृढीकरण पारशी लोकांच्या अवेसत्यांतील कांहीं स्थलांवरून चांगले होते. त्या स्थलांत **अपओश** नामक दैत्य आणि **तिष्ट्र्य** यांच्या मधील युद्धाचें वर्णन आहे. ऋग्वेदांतील इंद्रवृत्राचे युद्ध ( वृत्रतूर्य ), अप्तूर्य ( जलासाठी युद्ध ), गविष्टि ( गाईसाठीं युद्ध ) आणि दिविष्टि ( दिवसासाठीं युद्ध ) या तीन रूपानीं झालेले आहे. या युद्धांत इंद्र वृत्राला मारून, पाणी, गाई व सूर्य यांना वाट करून देतो.* वेदांतील

---

१ भट्ट भास्कर नांवाचा टीकाकार आपल्या टीकेत या संबंधाने ह्मणतो, 'देवपुराः' देवानां पुरस्थानीयानि पुरविवक्षया इतराण्यहानि 'पर्यूहन्ते' सर्वतो नयंति आत्मनो रक्षार्थम् ।...। 'ते देवाः' देवपुराख्यानि दशरात्रसंबंधीन्यहानि ।

‡ आ ग्रावभिरहन्येभिरक्तुभिर्वरिष्ठं वज्रमा जिघर्ति मायिनि । शतं वा यस्य प्रचरन्त्स्वे दमे संवर्तयन्तो वि च वर्तयन्नहा ॥ ऋ. ५, ४८, ३.

* ऋ. १, ५१, ४; २, १९, ३.

**वृत्रहन्** इन्द्र हा अवेस्त्यांत **वेरेथ्रघ्न** या रूपानें आलेला आहे. पण जलासाठीं झालेले युद्ध अवेस्त्यांत **वेरेथ्रघ्नानें** केलेले नसून पर्जन्यदेवता जो तिष्ट्र्य त्याने केलेले आहे. या दोन्ही प्रकारच्या गोष्टीतील जलार्थ झालेल्या युद्धाचा अर्थ पर्जन्यदेवता ढग फोडून पाऊस पाडते इतकाच आजपर्यन्त करीत आलेले आहेत. परंतु या अर्थानें सूर्याला वाट कशी मिळते हें सांगतां येत नाही. खरोखर या युद्धाचा खऱ्या पावसाशीं कांहीं संबंध नाही हें पुढील स्वतंत्र प्रकरणांत दाखवावयाचे आहे. जलार्थ युद्ध व प्रकाशार्थ युद्ध हीं वस्तुतः एकाच गोष्टीचीं रूपान्तरें आहेत. प्रकाश व तम यांच्या देवतांमधील युद्ध हें या कथांचे मूळ आहे. ऋग्वेदांत इंद्राच्या शत्रूला **शुष्ण**‡ (शोषणारा, पोळणारा) असें एक नांव दिलेलें आहे. अवेस्तिक **अपओश** व वैदिक शुष्ण हे एकच आहेत. अहुरमझ्दानें दिलेल्या **हओमाच्या** आहुतीच्या साहाय्यानें तिष्ट्र्यानें **अपओशाचा** पाडाव केला असे सांगितले आहे. हें युद्ध **वौरुकश** समुद्रांत होऊन अपौशाला मारल्यावर तिष्ट्र्य त्यांतूनच विजयी होत्साता बाहेर येतो. या सर्व वर्णनात विशेष महत्वाचा भाग म्हटला म्हणजे या युद्धांत तिष्ट्र्याला जय मिळून त्याने नियमित वेळीं भक्तापुढें हजर व्हावें म्हणून काय केले पाहिजे हे सांगतांना अहुरमझ्द आणि तिष्ट्र्य यांमध्ये झालेला संवाद हा होय. अहुरमझ्दाला तिष्ट्र्य म्हणतो "माझ्या नांवानें माझें आवाहन करून जर माणसे आहुति देऊन माझी पूजा करितील, तर मीं नेमलेल्या वेळीं भक्ताला भेटेन. तो नेमलेला वेळ एक रात्र असो, दोन असोत, पन्नास असोत वा शंभर असोत." आतां यांत नेमलेला वेळ म्हणजे कोणता? अपौशाला मारल्यानंतर तिष्ट्र्य भक्ताकडे यावयाचा आहे. म्हणजे नेमलेला वेळ हा युद्धाचा काळ असला पाहिजे. हा काळ एक पासून शंभर रात्रीचा होता व त्यांत तिष्ट्र्याला हओमाच्या आहुति देऊन व त्याच्या नांवाने त्याचें आवाहन करून पुष्ट करावे लागत असे. शंभर रात्रीचे सोमयाग हे इंद्रवृत्रांच्या युद्धांत इंद्राला मदत म्हणून करावयाचे असत व ते इंद्राशिवाय दुसऱ्या कोणासाठीही नसत हें वर सांगितलेंच आहे. यावरून पारशी धर्मग्रंथांतील तिष्ट्र्य व अपौश यांतील युद्ध म्हणजे

---

‡ ऋ. १, ५१, ११.

ऋग्वेदांतील इंद्रवृत्रांच्या युद्धाची प्रतिकृतिच आहे असें दिसून येईल. या दोहोंमधील साम्य इतके स्पष्ट असल्यावर शतरात्रयागाच्या उत्पत्तीविषयीं वर केलेलें अनुमान खरे आहे असें मानावयास कांही हरकत नाही. हे साम्य काकतालीय आहे असें ह्मणतां येत नाहीं. या युद्धांतील नायकाला मग तो इन्द्र असो की तिष्ट्र्य असो—यज्ञाच्या योगानें मिळणाऱ्या मदतीची अपेक्षा असे हें या गोष्टीवरून उघड दिसत आहे, आणि खरोखर अशा प्रकारचे यज्ञ त्यांच्यासाठीं करीतही असत. शतक्रतु हा शब्द अवेस्ता ग्रंथांत नाही. तरी पण एकेठिकाणी **मैशहे सतोकरहे** ( शभर शक्तीचा मेष ) त्यांत आलेला आहे. अशा प्रकारचा मेष वेरेथ्रघ्नाचा ( वैदिक वृत्रहन् ) अवतार आहे असेंही एके ठिकाणीं सांगितलें आहे. *ऋग्वेदांतही ( ८,२,४० ) मेषाचे रूप घेतलेल्या इन्द्राचे वर्णन आहे. या सर्व गोष्टींचा विचार केल्यास सतोकरहे मैशहे ह्मणजे वेरेथ्रघ्नच असून **शतक्रतू** प्रमाणे **सतोकरहे** याचा अर्थही ' शंभर शक्तियुक्त ' असा नसून 'शंभर यज्ञांचा स्वामी' असाच असला पाहिजे असें दिसून येईल. या विषयासंबंधानें वैदिक व अवेस्तिक ग्रंथांत इतके निकट साम्य असल्यामुळे वैदिक ग्रंथांत आलेलीं रात्रिसत्रें आर्यांच्या मूलस्थानांतील कमी जास्त प्रमाणाच्या दीर्घरात्रीमुळेच उत्पन्न झाली असे अनुमान करावयास बळकट कारण मिळते. अपौशाला मारल्यावर तिष्ट्र्य मनुष्याच्या वर्षांचे पर्याय सुरू करतो असे जे ह्मटलें आहे त्याचा आतां उलगडा करता येणार आहे. वैदिक उषा मानुषा युगांना सुरू करतात असे जे ह्मटलें आहे त्याचे वरील गोष्ट अवेस्तिक रूपान्तर आहे. दोघांचे तात्पर्य एवढेच की, इंद्रवृत्रांचें किंवा तिष्ट्र्यअपौशांचें युद्ध संपल्यावर दीर्घ उषा सुरू होऊन नवीन वर्षाला आरंभ होत असे.

या सर्व विवेचनावरून अतिरात्र यज्ञाचें मूलस्वरूप आतां चांगलें ध्यानांत येईल. तो रात्रियाग असून, अद्यापिही तो रात्रीसच करतात. मीमांसकांना त्याला दिनसत्र बनवितां आलें नाहीं. पण आतां असा प्रश्न आहे

---

* इत्था धीवन्तमद्रिवः काण्वं मेध्यातिथिम् । **मेषोभूतो** भियंनयः ॥ ऋ. ८,२,४०.

१ पुष्कळ गोष्टींवरून तिष्ट्र्य ही तारा वर्षाचा आरंभ करणारी आहे हें उघड होतें.

र्का याला अतिरात्र हे नांव कां मिळालें? अति या उपसर्गाचा अर्थ ‘ पलीकडचा, दुसऱ्या टोकाचा ’ असा असून ‘ व्यापकत्वा ’ चा त्यांत संबंध नाही. ‘ रात्रि अतीत्य वर्तते इति अतिरात्रः’ असे त्याचें व्याख्यान सायणाचार्यांनीही केलें आहे ( सा. भा. ऋ. ७,१०३,७ ). यावरून अतिरात्र याग रात्रीच्या शेवटी करावयाचा असून रात्रभर करावयाचा नव्हे असे स्पष्ट झाले. असुरांनां रात्रीतून घालवून देण्यासाठीं हा याग करावयाचा असें ऐतरेय ब्राह्मणात ( ४–५ ) अतिरात्राचें मूळ सांगतांना ह्मटले आहे. तांड्य ब्राह्मणांत ( ४,१,४–५ ) ‘ अतिरात्रापासून प्रजापतीनें अहोरात्रे निर्माण केली ’ असे ह्मटले आहे. यावरूनही अतिरात्र याग रात्रीच्या शेवटी करावयाचा असून तो झाल्यावर अहोरात्रांची परंपरा सुरू होत असे असे दिसून येते. परतु असें होण्यास ही रात्र फार मोठी असली पाहिजे. आपल्या इकडे अहोरात्रांचे पर्याय वर्षभर सारखे सुरू असतात. त्यामुळे अमुक एका रात्रीनतर अरोरात्रें सुरू होतात असें आपल्या प्रदेशासबंधाने मानणे निरर्थक आहे शिवाय साध्या रात्रीतूनच जर असुरांना घालवून द्यावयाचे असेल तर हे अतिरात्र दररोज पहाट होण्यापूर्वी केले पाहिजेत. पण ते सत्राच्या आरंभी व शेवटी असे फक्त दोनदांच करावयाचे असतात. असे असूनही खऱ्या सत्राला चतुर्विंशापासून आरभ होऊन ते महाव्रत दिनी सपते; अतिरात्र झाल्यावर नाहीं. यावरून अतिरात्राचा उद्देश केवळ वर्षाच्या ३६० रात्रीपैकीं पहिल्या रात्रीतून असुरांनां हांकून देण्याचा नव्हता असे दिसतें. कारण तसें असतें तर इतर रात्रीही हा याग करावा लागला असता. पण तसें नसल्यामुळें अतिरात्राचा सबध खुद्द सत्रांत न येणाऱ्या अशा एखाद्या विशेष रात्रीशी असला पाहिजे असे मानणें भाग येते. सत्राच्या आरंभीं व शेवटीं करावयाचे असल्यामुळे त्यांना अतिसत्र असे एका अर्थाने ह्मणतां येईल. पण त्यावरून ‘ अतिरात्र ’ या नांवाचा उलगडा होत नाहीं; कारण सत्र कांहीं रात्री व्हावयाचे नसतें. ह्मणून हे दोन अतिरात्र मूळ सत्राच्या आदि अन्तीच केवळ करावयाचे नसून दीर्घ रात्रीच्या आद्यंतीं करावयाचे होते असें मानलें पाहिजे. पहिल्या अतिरात्राबरोबर दीर्घ रात्र संपून सत्राला आरंभ होई, व प्रकाशाचा काल संपून दीर्घरात्र पुनः आली की, सत्र, संपून, पुनः असुरांनां घालवून

देण्यासाठीं अतिरात्र करावा लागे; मध्यंतरीं तो करण्याची गरजच नव्हती. तैत्तिरीय संहितेवरून संवत्सरसत्र पूर्वी एकदां दहा महिन्यांत संपत असे हें निश्चित दिसतें, व त्यासंबंधानें मागे विवेचन आलेच आहे. असले सत्र अतिरात्र करून सुरू करीत व ते संपल्यावर पुनः अतिरात्र करीत असे मानिल्यास सर्व गोष्टीचा यथास्थित उलगडा होतो. पूर्वी सांगितलेली रात्रिसत्रें या दोन अतिरात्रांमधील दीर्घरात्रीत करून त्यांत फक्त इन्द्रालाच हविर्भाग देत असत. तर येणेप्रमाणे, दहा महिन्यांचे किंवा कांही कमी कालाचे 'गवां अयनम्,' ते संपल्यावर अतिरात्र, त्याच्या नंतर दोनपासून शंभर रात्रीपर्यंत रहाणारे रात्रिक्रतु व रात्रिसत्रे आणि पुनः अतिरात्र इतकी मिळून वैदिक ऋषीच्या आदि पूर्वजांचे संवत्सरावधि यज्ञपर्याय होत असत. यांतील प्रत्येक निरनिराळ्या यज्ञांचा उद्देश व त्यांचें स्थान हीं त्यांच्या नांवावरून[1] जशी दिसतात तशीच मूळ होतीं. पण जेव्हां दहा महिन्यांचे वर्ष पालटून बारा महिन्यांचे झाले, तेव्हां गवामयनही ३६० दिवसांचे झाले. या बदललेल्या परिस्थितींत पूर्वीच्या दीर्घरात्रीतील रात्रिक्रतूंचें प्रयोजन नाहीसें झाले, तरी रात्रिसत्राला केवळ प्रास्ताविक याग करून त्याचा खुद्द सत्रांतच समावेश करण्यांत आला. याप्रमाणे मूळ दीर्घरात्रीच्या आद्यंतीं करीत असलेले अतिरात्र याग हे खुद्द सत्राचेच आरंभीचे व शेवटचे भाग बनले. अतिरात्र हा शब्द जर आज राहिलेला नसता तर हा प्रकार समजणे शक्य नव्हतें. रात्रिसत्राचा उपयोग नाहीसा झाल्यामुळे, त्यांचे खरे स्वरूप हळुहळू स्मरणांतून गेले व शेवटी तर 'रात्रि' याचा व्यापकपणे 'दिवस' असा अर्थ समजून या सत्रांना मीमांसकांनी रोजच्या सोमयागांत ढकलून दिले. हा फरक कसा झाला तें पहाणे. आपल्या विषयाबाहेरचे आहे. तरीपण एवढे खरें कीं यज्ञपद्धति नवीन परिस्थितीला अनुरूप करून घेण्याचे बिकट काम ब्रह्मवादी व ब्राह्मणकार यांनी केलें. वैदिक धर्माचें मुख्य अंग ह्मणजे यज्ञ हें

---

१ या विवेचनांत ठरविलेला अतिरात्रांचा काल श्रौतसूत्रकारांस माहीत होतासे दिसतें. लाट्यायनश्रौतसूत्रांत ( ८,२,६ ) '**समाप्ते संवत्सरे रात्रिसत्रेषु राजानं क्रीणीयुः**' 'संवत्सरसत्र संपल्यावर रात्रिसत्रांत सोम ( राजा ) विकत घ्यावा' असें ह्मटलें आहे. त्यावरून संवत्सरसत्र संपल्यावर

असल्यामुळें नवीन परिस्थितीप्रमाणे त्यांत फरक करतांनाही होईल तितके करून जुने कायम ठेवण्याचा प्रयत्न वैदिक ऋषींनी केला असणे स्वाभाविक आहे. असा फरक करणे कांहीं सोपे काम नव्हतें. खऱ्या स्थितीचा विसर पडल्यावर, यज्ञपद्धतीत दिसून येणाऱ्या गोष्टींचें समर्थन करून ब्राह्मणकारांनां जुन्यानव्याचा मिलाफ करावयाचा होता. ब्राह्मण ग्रथांत लागतील तसे गनमुराद तर्क आढळून येतात, असा त्यांच्यावर दोपारोप करणारांनी ही तत्कालीन परिस्थिति लक्षांत ठेविली पाहिजे. यज्ञपद्धति त्यांच्याच काळांत प्रथम बसविली असती तर वाटतील तसे तर्क त्यांच्याने करवले नसते. या गोष्टीचे मूळ माहीत होते तोपर्यंत खुलाशाची गरज नव्हती. पण त्याची विस्मृति पडल्यावर त्या गोष्टींचें तत्कालीन स्थितीला अनुसरून कांहीं सयुक्तिक कारक सांगणे भाग होतें. या दृष्टीने विचार केल्यास ब्राह्मण ग्रथाचें स्वरूप व त्यांची रचना या विपयी विचार करण्यास एक नवीन साधन होणार आहे. पण तो विपय प्रकृत नसल्यामुळे त्याचे येथे जास्त विवेचन करतां येत नाहीं.

येणेप्रमाणे वैदिक ग्रंथांत आढळून येणाऱ्या सोमयागांतील मुख्य मुख्य गोष्टींचे जरूर तेवढे अवलोकन केले; त्यात आजपर्यन्त अगदीं अगम्य ह्मणून समजलेल्या कित्येक गोष्टींचा ध्रुवोपपत्तीच्या साहाय्याने सहज व सरळ उलगडा करता येतो असं आढळून आले. सर्व वैदिक यज्ञपद्धतीचे या दृष्टीने विवेचन करण्याचे हे स्थल नव्हे. पण वर केलेल्या विवेचनावरून व विशेपतः रात्रिसत्रांच्या विवेचनावरून हे सोमयाग मूळ वृत्राशी लढतांना इन्द्राला साहाय्य व्हावे ह्मणून करीत असत असे धरावयास हरकत नाही. प्राचीन रोमन वर्पाप्रमाणे ‘ गवां अयनम् ’ हे सत्रही मूळ दहा महिन्यांचे होतं, हे या प्रकरणाच्या पूर्व भागांत सांगितलेच आहे. रात्रिसत्रे ही अशा सत्राची स्वाभाविक पुरवणी होत. तीस दिवसांची उपा व दीर्घ दिवस आणि दीर्घ रात्र ही त्यांच्या जोडीला घेतल्यास त्यांवरून वैदिक ऋपींच्या पूर्वजांचें आदिस्थान कोठे तरी उत्तरध्रुवप्रदेशांत होते हें निःसंशय सिद्ध होते. नवग्व व दशग्वांची सत्रे, दहाव्या महिन्यांत ह्मातारा होणाऱ्या दीर्घतम्याची गोष्ट, वर्पाचे पांच ऋतु किंवा सूर्याचे सात किंवा दहा घोडे, इत्यादि सर्वांवरून हेंच सिद्ध होतें. अवेस्त्यांतील तिष्ट्र्य व अपौश यांच्या युद्धाच्या कालाचें

वर्णन, इंद्र शंभर यज्ञांचा स्वामी असल्याची पौराणिक कथा या व दुसऱ्या बारीक सारीक पुष्कळ गोष्टी यांवरून आर्यांच्या ध्रुवाजवळलि मूलस्थानाच्या उपपत्तीला बळकटी येते. मागाहून झालेल्या वैदिक ग्रथांत आढळून येणाऱ्या यज्ञसबंधी सूक्ष्म गोष्टीही आदिकाली प्रचलित होत्या असें आमचें ह्मणणें नाहीं. उलट आदिकालचे यज्ञ अगदी साधे होते हेंच विशेष संभवनीय दिसतें. यज्ञ हेंच तत्कालीन धर्माचें प्रधान अंग असल्यामुळें प्राचीन वैदिक ऋषी प्रतिदिवशीं व प्रतिरात्री यज्ञ करीत. आपल्या यज्ञपद्धतीचें पर्यवसान सूक्ष्म नियमांनी बद्ध झालेल्या अशा सवत्सरसत्रांत होईल अशी कदाचित् त्यांना कल्पनाही आली नसेल. ‘ वेदकालीनिर्णयांत ’ सांगितल्याप्रमाणे वार्षिक यज्ञपर्याय सूर्याच्या वार्षिक गतीच्या अनुरोधाने बसविलेले असल्यामुळे हे यज्ञ कालमापनाचें साधन झालेले होते. प्राचीन यज्ञपद्धतीचें इतिहासांत जे मत्त्व आहे तें याच दृष्टीने आहे, व त्याच दृष्टीनें तिचें येथे परीक्षण केलें आहे. या परीक्षणांत, ध्रुवोपपत्तीचें ज्यांवरून अनुमान करतां येईल व त्या उपपत्तीवर ज्यांचा नीट उलगडा करितां येईल, अशा बऱ्याच गोष्टी आपल्याला आढळून आलेल्या आहेत. याप्रमाणें ऋग्वेद आणि प्राचीन यज्ञपद्धति या दोहोंचाही आपल्या अनुमानांना भक्कम आधार असल्यामुळे त्यांच्या खरेपणाबद्दल शंका घेण्याचे कारण नाही.

# आठव्या प्रकरणाची पुरवणी.

## 'गवां अयना'चे कालाविषयीं ऐतरेय ब्राह्मण आणि तैत्तिरीय संहिता यांतील वचनें.

**गावो वै सत्रमासत । शफाँ श्रृंगाणि सिषासत्यस्तासां दशमे मासि शफाः शृंगाण्यजायन्त । ता अब्रुवन् यस्मै कामायादीक्षाम- ह्मापाम तमुत्तिष्ठामेति । ता या उदतिष्ठंस्ता एताः शृंगिण्योऽथ याःसमापयिष्यामः संवत्सरमित्यासत तासामश्रद्धया शृंगाणि प्राव- र्तंत । ता एतास्तूपरा ऊर्जं त्वसुन्वंस्तस्माद् ताः सर्वानृतून्प्राप्त्वोत्तर- मुत्तिष्ठंत्यूर्जं ह्यसुन्वन् सर्वस्य वै गावः प्रेमाणं सर्वस्य चारुतां गताः । सर्वस्य प्रेमाणं सर्वस्य चारुतां गच्छति य एवं वेद ।** ऐतरेय ब्राह्मण ४–१७.

### भावार्थ.

"खूर आणि शिंगे प्राप्त करून घेण्याची इच्छा करणाऱ्या गाई सत्रानु- ष्ठानास बसल्या. त्यांना दहाव्या महिन्यांत खूर आणि शिंगे उत्पन्न झाली. त्या म्हणाल्या, ' ज्या इच्छेनें आम्ही सत्रासाठी दीक्षा घेतली ती पूर्ण झाली. ( आतां ) आपण उठावे. ' ज्या उठल्या त्या ह्या शिंगे- वाल्या ( गाई ). पण संवत्सरसत्र पुरें करूं असे म्हणून ज्या बसल्या त्यांची शिंगे अश्रद्धेमुळें निघून गेलीं. त्या ह्या बिनशिंगाच्या ( गाई ). ( सत्र चालू ठेविल्यावर ) त्यांनी ऊर्ज ( बल ) उत्पन्न केलें. त्यानंतर ( बारा महिने सत्र चालविल्यावर ) त्या सर्व ऋतू प्राप्त करून शेवटी उठल्या; कारण त्यानी ( खूर शिंगें उत्पन्न करणारें ) बल उत्पन्न करून घेतलें. याप्रमाणें गाई सर्वांचें प्रेम आणि सर्वांचे चारुत्व संपादन करत्या झाल्या. जो हें जाणतो तो सर्वांचें प्रेम आणि सर्वांचें चारुत्व संपादन करतो."

यांत प्रथम गाईंचा हेतु **दहाच महिन्यांत** सिद्धीस गेला, आणि म्हणून त्यांपैकीं कांहीं सत्र संपवून उठल्या असें स्पष्ट सांगितलें आहे. ज्यांनीं पुढें दोन महिने सत्र चालविलें त्यांना ' अश्रद्धाळू ' म्हटलें असून

या त्यांच्या अश्रद्धेबद्दल त्यांनां मिळालेलीं शिंगे नाहींशीं झाल्याचें सांगितलें आहे. यावरून एवढें स्पष्ट होतें की संहिता आणि ब्राह्मणे यांत सांगितलेलें सूर्याच्या वार्षिक गतीवर बसविलेलें जें हें संवत्सरसत्र तें एकदां दहा महिन्यांत संपत असे. असें कां असावें ? जे सत्र स्वाभाविकपणे बारा महिन्यांचे दिसते तें पूर्वी दहा महिन्यांत कसें संपत असे ? बारा महिन्यांनंतर मिळणारें सर्व फळ या सत्र करणाऱ्या गाईंना दहाच महिन्यांत कसे मिळाले ? हे प्रश्न फार महत्वाचे असूनही ऐतरेय ब्राह्मणांत त्यांचा उल्लेख केलेला नाही. पण सर्व यज्ञग्रथांत अत्यंत प्राचीन व प्रमाणभूत अशी जी तैत्तिरीय संहिता तीत हे प्रश्न स्पष्ट विचारिले आहेत. ' गवां अयनम् ' हे सत्र यजमानाच्या मर्जीनुरूप **दहा** किंवा **बारा** महिन्यांत संपवितां येते असे त्या संहितेत स्पष्ट सांगितले असून हें वास्तविक बारा महिन्यांचे सत्र दहा महिन्यांत कसे संपे याचे कारण ' पूर्वापर वहिवाटी ' शिवाय दुसरे कांहीही या संहितेत सांगितलेले नाहीं. तैत्तिरीय संहितेंत ' गवां अयना ' विषयीं दोनदा उल्लेख आलेला आहे, त्यांतील पहिला असा:—

**गावो वा एतत्सत्रमासताशृंगाः सतीः शृंगाणि नो जायन्तामिति कामेन । तासां दश मासा निषण्णा आसन्नथ शृंगाण्यजायन्त ता उदातिष्ठन्नरात्स्मेत्यथ यासां नाजायन्त, ताः संवत्सरमाप्त्वोदातिष्ठन्नरात्स्मेति । यासां चाजायंत यासां च न ता उभयीरुदातिष्ठन्नरात्स्मेति । गोसत्रं वै संवत्सरो य एवं विद्वांसः संवत्सरमुपयंत्यृध्नुवंत्येव तस्मात्तपरा वार्षिकौ मासौ पर्त्वो चराति सत्राभिजितं ह्यस्यै तस्मात्संवत्सरसदो यत्किंच गृहे क्रियते तदाप्तमविरुद्धमभिजितं क्रियते ।** तैत्तिरीय संहिता. ७,५,१,१–२.

## भावार्थ.

"शिंगें नसल्यामुळें आपल्याला शिंगें उत्पन्न व्हावीं या इच्छेनें गाई ह्या सत्रानुष्ठानास बसल्या. त्यांना दहा महिने बसून झाले तेव्हां शिंगें उत्पन्न झालीं. ' आम्ही मिळवित्या झालों ' असें म्हणून त्या उठल्या. पण ज्यांना ( शिंगें ) उत्पन्न झाली नाहींत त्या संवत्सर संपवून ' आम्ही

मिळवित्या झालों ' असें म्हणून उठल्या. ज्यांना ( शिंगें ) उत्पन्न झाली आणि ज्यांना झाली नाहींत त्या दोन्ही ( प्रकारच्या गाई ) ' आह्मी मिळवित्या झालो ' असें ह्मणून उठल्या. गोसत्र ह्मणजे संवत्सर ( संवत्सरसत्र ). जे असें जाणतात ते संवत्सराप्रत प्राप्त होऊन खचित उत्कर्ष पावतात. म्हणून बिनशिंगांची ( गाय ) वर्षाकालाचे दोन महिने संतुष्ट होऊन संचार करते ( चरते ). हें तिला ( या ) सत्रानें प्राप्त करून दिले. ह्मणून संवत्सरसत्र करणाऱ्याच्या घरीं जे कांहीं होते ते यशस्वी, यथाकाल आणि विरोधरहित होते."

हें वर्णन ऐतरेय ब्राह्मणांतील वर्णनाहून जरा निराळे आहे. तैत्तिरीय संहितेंत बारा महिने सत्र चालविणाऱ्या गाई बिनशिंगांच्याच राहिल्या, पण ऊर्ज मिळण्याऐवजीं त्यांना वर्षाकाळांत सुखाने चरण्याचा वर मिळाला असें सांगितले आहे. तरी, सत्राच्या अवधीसबंधाने सांगतांना ऐतरेय ब्राह्मणाप्रमाणेच या संहितेंतही ते **दहा** अथवा **बारा** महिन्यांनीं संपतें असें म्हटलें आहे. या अनुवाकाच्या पुढच्या अनुवाकांत पुनः 'गवां अयना'चें वर्णन केले आहे; ते असें:—

**गावो वा एतत् सत्रमासताशृंगाः सतीः शृंगाणि सिषासंतीस्तासां दश मासा निषण्णा आसन्नथशृंगाण्यजायन्त ता अब्रुवन्नरात्स्मोत्तिष्ठामाव तं काममरुत्स्महि येन कामेन न्यषदामेति तासामु त्वा अब्रुवन्नर्धा वा यावतीर्वाऽऽआसामहा एवेमौ द्वादशौ मासौ संवत्सरं संपाद्योत्तिष्ठामेति तासांद्वादशे मासि शृंगाणि प्रावर्तत श्रद्धया वाऽश्रद्धया वा ता इमा यास्तूपरा उभय्यो वाव ता आर्ध्नुवन् याश्च शृंगाण्यसुन्वन् याश्चोर्जमवारुंधतर्ध्नोति दशसु मास्सूत्तिष्ठन्नृध्नोति द्वादशसु य एवं वेद पदेन खलु वा एते यंति विन्दति खलु वै पदेन यन्तद्वा एतदृद्धमयनं तस्मादेतद्गोसानि** । तैत्तिरीय संहिता ७, ५, २, १,–२.

## भावार्थ.

"शिंगे नसल्यामुळें शिंगे मिळविण्याच्या इच्छेनें गाई ह्या सत्रानुष्ठानास बसल्या. त्यांना दहा महिने बसून झाले तेव्हां त्यांना शिंगे उत्पन्न झाली. त्या ह्मणाल्या, ' आह्मी मिळविल्या झालों, उठूं या, ज्या इच्छेनें ( सत्रा-

नुष्ठानास ) बसलों ती इच्छा पूर्ण झालीं. ' त्यांपैकीं निम्या ( गाई )–
किंवा किती असतील त्या–बोलल्या, ' हे बारा महिने बसूं याच, संवत्सर
संपवून उठूं.' त्यांची शिंगे बाराव्या महिन्यांत परंत गेलीं. अश्रद्धेमुळें
ज्या बिनशिंगाच्या राहिल्या त्या ह्या. ज्यांना शिंगें उत्पन्न झालीं आणि
ज्यांना ऊर्ज ( बल ) उत्पन्न झालें त्या दोहोंचाही याप्रमाणें उत्कर्ष
झाला. जो हे जाणतो तो दहा महिन्यांनीं उठो वा बारा महिन्यांनी
उठो त्याचा उत्कर्ष होतो. ते मार्गानेंच ( पूर्वापर वहीवाटीप्रमाणेंच )
जातात. मार्गानें जाणारा सिद्धि पावतो. हे तें यशस्वी अयन ( सत्र ).
तस्मात् ते गोसनि ( गाईना हितावह ) होय."

या अनुवाकाच्या पहिल्या भागांत पूर्वीच्या अनुवाकांतील गोष्टच
थोड्याशा फरकाने सांगितली आहे. पण पुढे मात्र यांत दोन महत्वाच्या
गोष्टी आल्या आहेत. पहिली गोष्ट अशी कीं हे सत्र दहा किंवा बारा
महिन्यांनी असे केव्हांही संपविलें तरी फल सारखेंच मिळतें; कारण दोन्ही
प्रकारच्या सत्र करणाराचा उत्कर्ष होतो असे त्यांत ह्मटले आहे. दुसरी
गोष्ट ही कीं या वैकल्पिक सत्रावधीचें कारण **पद्** ( पूर्वापर वहिवाट–
सायणाचार्य ) होय. ह्मणजे याचें तात्पर्य असें कीं वस्तुतः या वैकल्पिक
भेदाविषयीं या संहितेत मुग्धताच स्वीकारिली आहे. या संहितेत याज्ञिक
विधींचें मूळ सांगतांना कित्येक वेळां जे मनमुराद तर्क केलेले असतात
त्यांचा विचार करता ही मुग्धता लक्षांत ठेवण्यासारखी आहे. एकंदरीत
सगळ्या संवत्सरसत्राची प्रतिमा जे ' गवां अयनम् ' ते पूर्वी एकाकाळीं
दहाच महिन्यांत संपत असे आणि असे वास्तविक बारा महिन्यांचें सत्र
दहा महिन्यांत कसें संपे याचें कारण तैतिरीय संहिताकाळीं माहीत नव्हतें,
ह्या दोन गोष्टी वरील संहितावचनांवरून पूर्णपणे सिद्ध होत आहेत.



# प्रकरण ९ वें.

## वैदिक कथा—निरुद्धा आपः.

ध्रुवोपपत्तीच्या सिद्ध्यर्थ दिलेल्या प्रत्यक्ष पुराव्याचा गोषवारा-गाथाशास्त्र-विषयक प्रमाणांचें स्वरूप त्याहून निराळें आहे-वैदिक वाक्यार्थमीमांसा-निरनिराळ्या पद्धति-नैरुक्त मत त्यांतील कल्पनांचें स्वरूप-उषेची कल्पना आणि तीवरून समजणाऱ्या वैदिक कथा पर्जन्योपपत्ति, इंद्रवृत्राचें युद्ध-वसंतोपपत्ति, अश्विनांचे पराक्रम-वृत्रकथेचा अर्थ बहुधा पर्जन्यपर लावितात-वृत्रवधाबरोबर घडून येणाऱ्या दुसऱ्या गोष्टी-जलांचे मोचन, गाईचें मोचन, उषेचें व सूर्याचें आगमन-त्यांच्या एकसमयावच्छेदकत्वाविषयीं वेदांतील प्रमाणे-युद्धाचा काल आणि स्थल दर्शविणारी वचनें-या गोष्टींच्या एकसमयावच्छेदकत्वाचा उषेच्या किंवा पर्जन्याच्या कल्पनेवर उलगडा होत नाहीं-पर्जन्योपपत्तींत सुचविल्याप्रमाणे इंद्रवृत्रांचे युद्ध अंतरिक्षांत झालेलें नव्हे-वर्षाकालांतही नव्हे-पर्वत, गिरि, अद्रि, इत्यादि शब्दांचा अर्थविपर्यास-पर्जन्योपपत्तीचा कोतेपणा-दुसरी कांहीं तरी कल्पना अवश्य आहे-जलाच्या खऱ्या स्वरूपाविषयीं विवेचन-तीं दिव्य असून, पावसांत पडलेलीं नव्हत-'तीन पृथिवींच्या खालच्या' प्रदेशाची वैदिक ऋषींना माहिती होती-उलट मताचें खंडन-**रजस्, निर्ऋति, अर्धौ,** आणि **समुद्रौ** या शब्दांच्या अर्थाविषयीं विवेचन-दिव्य जलांचे दैनंदिन परिभ्रमण-दिव्य जलांचें स्थान पाताळांत होतें-दिव्य जलांच्या परिभ्रमणाविषयीं अवेस्त्यांतील वचनें-**सरस्वति** आणि **अर्द्वि सूर अनाहित** या नद्या दिव्य (आकाशांतील) होत-सर्व उद्भिज्ज सृष्टीचे आणि जलांचे उगमस्थान-वृत्रयुद्धाचें खरें स्वरूप-जलें (आपः) आणि प्रकाश यांची एकाच काळीं मुक्तता होण्यास त्यांचें स्थान एकच पाहिजे-पाताळांत जलांना वृत्रानें निरुद्ध केल्यामुळें दोहोंची गति बंद होते-क्षितिजावरील पर्वतांच्या द्वारांचें पिधान-जलां (आपः) चें परिभ्रमण आणि सूर्याची गति यांचा निकट संबंध-त्याच्या सिद्ध्यर्थ अवेस्त्यांतील स्पष्ट वचनें-सूर्याचें बराच काल जलांत रहाणें-अवेस्त्यांतील प्रमाणें-मृत शरीराची व्यवस्था-काळोखाची सुरुवात आणि हिंवाळ्यांतील जलप्रवाह बंद होणें हीं एकाच वेळीं

घडतात-काळोखाचा दीर्घ अवधि-दिव्य जलांच्या दैनंदिन परिभ्रमणाविषयी इतर राष्ट्रांच्या पुराणांतील उल्लेख-वृत्रयुद्ध वार्षिक असून हिंवाळ्यांत घडतें याविषयीं प्रत्यक्ष आधार-या वचनांचा ध्रुवोपपत्तीखेरीज अर्थ लागत नाहीं-इंद्रवृत्रांच्या युद्धाचा नक्की दिवस ऋग्वेदांत सांगितला आहे-**चत्वारिंश्यां शरदि** या शब्दांचा खरा अर्थ-शरदृतूच्या चाळिसाव्या दिवशीं इंद्राला शंबर आढळला-हा दिवस दीर्घ काळोखाचा आरंभ होय-शरदृतु सूर्यप्रकाशाचा शेवटचा ऋतु असे दाखविणारी वेदांतील वचने-ऋतूंनीं काल मोजण्याच्या पद्धतीविषयीं प्राचीन लेखांवरून मिळणारीं प्रमाणें-अवेस्त्यांतील अशाच प्रकारची पद्धति-वृत्राचीं शंभर पुरें ह्मणजे काय?—वृत्राला हिमानें मारणें याचा अर्थ-इन्द्राने मुक्त केलेल्या सात नद्या-त्या पृथ्वीवरील नव्हत-पंजाबांतीलही नव्हत-पाश्चात्य विद्वानांच्या मताचे परीक्षण-सप्तसिंधु आणि सप्त आदित्य यांचा निकट संबंध-अवेस्त्यांतील **हप्तहिंदु** शब्दाचे मूळ-तें मूळ वसतिस्थानांतील पुराणांतील नांव असून पुढें नवीन स्थानांत गेल्यावर तेथील एखाद्या ठिकाणाला दिले असावें-वृत्राची कथा मूळ ध्रुवसंबंधीं होय-'निरुद्धा आपः' या ध्रुवाजवळील प्राचीन वसतिस्थानांतील प्रकाश व काळोख यांच्या वार्षिक झगड्याच्या दर्शक आहेत.

---

## वैदिक कथा—निरुद्धा आपः.



तिसऱ्या प्रकरणांत सांगितलेल्या ध्रुवावरील आणि ध्रुवप्रदेशांतील विशिष्ट गोष्टी वैदिक ऋषींना परंपरागत माहीत होत्या असे प्रत्यक्ष दाखविणाऱ्या वेदवाक्यांचे आतांपर्यंत परीक्षण झाले. देवांची रात्र, सहा महिन्यांचा दिवस व सहा महिन्याची रात्र, या गोष्टींचे मूळ पारशी व भारतीय आर्य एकत्र होते त्या काळापर्यंत तरी नेतां येते, असें प्रथम दाखविले. नतर ऋग्वेदांतील उषेच्या सूक्तांचें सूक्ष्म निरीक्षण केल्यावरून त्यांतील उषा अनेक आहेत अशा अर्थाच्या विधानाचा खुलासा त्या उषा एकामागून एक सारख्या येणाऱ्या होत्या याच कल्पनेवर होतो असे दाखविले. उषा तीस आहेत, उषा दिसूं लागल्यापासून सूर्योदय होई-

पर्यंत कित्येक दिवस जात असत, ती चक्राकार भ्रमण करते, इत्यादि गोष्टी सांगणाऱ्या स्पष्ट वचनांवरून वैदिक ऋषींना केवळ उत्तर ध्रुवावरच दिसून येणारे असे हे सृष्ट चमत्कार माहीत होते, हें स्पष्ट दिसून येतें. याहूनही खात्रीलायक पुरावा ह्मणून गेल्या तीन प्रकरणांत, उत्तर ध्रुव-प्रदेशांत दिसणाऱ्या दीर्घ रात्री व तसेच दीर्घ दिवस, दहा महिन्यांचें वर्ष, इत्यादि गोष्टीही वैदिक ऋषींस माहीत होत्या असें सिद्ध करणारीं वचने देऊन त्यांचें विवरण केलें. प्राचीन यज्ञपद्धति व विशेषेंकरून त्यांतील वार्षिक सत्रे व रात्रिसत्रे यांचे परीक्षण केल्यावरून प्राचीन वार्षिक सत्रे नऊ किंवा दहा महिन्यांनी संपत असत व रात्रिसत्रें ही खरो-खरच आपल्या नांवाप्रमाणें शतदिनावधि दीर्घ रात्रींतच इंद्रासाठी केली जात असत, असें दिसून आले. दीर्घतम्याची गोष्ट, अदितीच्या सात पुत्रांची कथा, नवग्व आणि दशग्व यांची सत्रें यांवरूनही तेच अनुमान दृढ होते. तिसऱ्या प्रकरणांत सांगितलेल्या ध्रुवप्रदेशाच्या विशिष्ट लक्षणांपैकी प्रत्येक लक्षणाची माहिती वैदिक ऋषींस होती व हे ऋषी तर ३६० दिवसांचें वर्ष असलेल्या प्रदेशांत रहात असत, हें समज-ल्यावर वैदिक ऋषींस ह्या गोष्टी परंपरागत ज्ञानावरूनच माहीत होत्या असे मानणें अपरिहार्य होतें. यांपैकी एखाद्या गोष्टीविषयींचा पुरावा कदाचित् निर्णायक नसेल. परंतु त्या सर्व गोष्टी ज्योतिषदृष्ट्या एक-मेकांशी कार्यकारणांसारख्या संबद्ध असल्यामुळे त्या सर्वांवरून निघणारीं अनुमानें खात्रीलायक वाटल्यावांचून रहाणार नाहींत. येथपर्यन्त दिलेल्या पुराव्यांत कित्येक वचनांचा जो अर्थ केला आहे तो अगदी नवीन आहे, हें खरे. पण पूर्वीचे चुकीचे अर्थ होण्याचें कारण ३०—४० वर्षांपूर्वी उत्तर-ध्रुवप्रदेश पूर्वी एकदां वसतियोग्य होते ही गोष्टच माहीत नव्हती हें होय. यास्क व सायणाचार्य यांनाही ही गोष्ट माहीत नव्हती; ह्मणून त्यांनी कित्येक ठिकाणी केवळ शब्दास शब्द देण्यापलीकडे कांहीं केलेले नाही. पाश्चात्य पंडितांना ४० वर्षांपूर्वी ध्रौविक वसतिस्थानाची शक्यताच कबूल नसल्यामुळें त्यांनीही त्या वचनांकडे दुर्लक्ष करून कशी तरी वेळ मारून नेलेली आहे. आतांपर्यंत दिलेल्या वचनांपैकी बरींच अशाच प्रकारचीं आहेत. त्यांचा पूर्वं विवेचनांत केलेला अर्थ सरळ व स्वाभा-विक आहे असें निःपक्षपातबुद्धीने विचार करणारास खास दिसेल.

असा अर्थ करण्याचीं कारणें कित्येक ठिकाणीं सविस्तर दिलेलीं असल्यामुळें त्या ठिकाणीं थोडें बहुत विषयान्तर झाल्यासारखें वाटेल; पण एकंदरीत सर्व विवेचन शास्त्रीय पद्धतीनेंच केलेलें आहे. त्यांत ध्रुवावरील वसतिस्थानाची कल्पना गृहीत धरलेली नाहीं, किंबहुना ती असंभवनीय आहे असेंच आरंभीं वाटत होतें. पण त्यासंबंधाचा पुरावा इतका जबर दिसला कीं त्यामुळें ध्रौविक वसतीची उपपत्ति कबूल करणें भाग पडलें; व येथपर्यंतच्या प्रकरणांत दिलेला पुरावा वाचकांसही तितकाच निर्णायक वाटेल असें मानावयास हरकत नाही.

ध्रुवावरील वसतिस्थानाविषयींचा जो पुरावा यापुढें द्यावयाचा आहे, तो आतांपर्यंत दिलेल्या पुराव्याहून जरा निराळ्या स्वरूपाचा आहे. वैदिक ऋषींचे पूर्वज जर कधी उत्तर-ध्रुवाजवळ राहिलेले असतील तर त्यांच्या पुराणकथांत तेथील सृष्ट चमत्कारांचे कांहीं तरी वर्णन असले पाहिजे. म्हणजे जर आपली कल्पना खरी असेल तर वैदिक-ग्रंथांतील पुराणकथांचे निरीक्षण केल्यास त्यांवरून आपल्या कल्पनेला पोषक पण दुसऱ्या कोणत्याही कल्पनेशीं योग्य तऱ्हेने न जुळणाऱ्या अशा कित्येक गोष्टी त्यांत आढळून आल्या पाहिजेत. या गोष्टींचा निरनिराळ्या प्रकारचे पंडित निरनिराळ्या तऱ्हेनें अर्थ लावीत असल्यामुळे अशा प्रकारचा पुरावा कमी दर्जाचा असणार हे उघड आहे. यास्काचार्यांनी निरुक्तांत तीन चार प्रकारच्या अर्थ करण्याच्या पद्धति सांगितल्या आहेत. त्यांत **ऐतिहासिक** अर्थ करणारे असें मानितात की, वैदिक देवता म्हणजे मूळ ऐतिहासिक पुरुष असून पुढें त्यांच्या अंगच्या दिव्य गुणांमुळें त्यांना देवपदवी मिळाली. दुसरे **ब्रह्मवादि** हे कर्मदेवता[1] आणि आजानदेवता[2] असे देवतांचे दोन भेद करितात. तिसरे **नैरुक्त** हे असें मानितात की, वदिक देवता ह्या कोणत्या तरी सृष्ट चमत्कारांच्या दर्शक आहेत. चवथे **अध्यात्मिक** हे वैदिक कथांचा अर्थ ब्रह्मज्ञानपर लावितात. दुसरेही आणखी अर्थ करणारे असे पंडितांचे कित्येक वर्ग आहेत. त्यांत नैरुक्तांखेरीज गाकीचे कोणीही वैदिक देवताविषयक गोष्टींचा सृष्टचमत्कारपर केलेला अर्थ बहुधा मान्य करणार नाहींत. म्हणून असल्या प्रकारचा पुरावा गौण

---

१ ज्यांनी आपल्या स्वतःच्या कर्मांमुळें देवपदवी प्राप्त करून घेतली त्या.

२ जन्मतःच देवपदवीला पोहोंचलेल्या.

अगर अप्रत्यक्ष होय. सहा महिन्यांची रात्र इत्यादि गोष्टींमध्यें या अर्थ लावण्याच्या निरनिराळ्या पद्धतींत मुळीच बदल होणारा नसल्यामुळें त्यांच्या संबंधाचा पुरावा प्रत्यक्ष होय, पण पुराणकथाविषयक प्रमाणें नैरुक्त मत मान्य करणारे मात्र कबूल करितील. नैरुक्त पद्धति म्हणजे कांहीं आजकालची आहे असें नाहीं. तीहि अगदीं प्राचीन असून बहुतेक बाबतींत ती आधुनिक पंडितांनीं मान्य केलेली आहे. तरी आपली कल्पना अगदी नवीन असल्यामुळे दोन्ही प्रकारचा पुरावा निरनिराळा देणेच इष्ट आहे.

निरुक्तकार हे बहुतेक वैदिक कथांचा अर्थ अंधकार व प्रकाश यांच्या युद्धाच्या कल्पनेवर किंवा पाणी व सूर्य यांना अडवून ठेवणारे कृष्णमेघ आणि वातदेवता यांच्या युद्धाच्या कल्पनेवर लावितात. अश्विनांनी वृकाच्या जबड्यांतून वर्तिकेची मुक्तता करणे म्हणजे त्यांच्या मतें रात्रीच्या काळोखांतून प्रकाश आणणे होय. वृत्रासबंधाने निरनिराळी मते देतांना निरुक्तात म्हटले* आहे, “ तर वृत्र हा कोण ? नैरुक्त म्हणतात ‘ वृत्र म्हणजे मेघ ’ ‘ असुर, त्वष्ट्याचा पुत्र ’ असे ऐतिहासिक म्हणतात. पाणी आणि प्रकाश यांच्या मिश्रीभावाने वर्षाव होतो; त्यालाच अलंकारिक भाषेत युद्ध म्हणतात. मंत्र व ब्राह्मण यांत वृत्र म्हणजे सर्प असें म्हटले आहे. त्याने आपल्या शरीराचा विस्तार करून नद्या अडवून टाकिल्या. त्याला मारल्यावर पाणी पुनः वाहूं लागते.” नैरुक्तमतांत पर्जन्य व उषा यांच्या कल्पना ह्या अर्थपद्धतीचे आधारस्तंभ होत. पाश्चात्य विद्वानांनी जरी या पद्धतीत सुधारणा केली आहे, तरी वैदिक देवतांच्या खऱ्या खऱ्या स्वरूपाचा सूक्ष्म विचार करून वैदिक सूक्तांचा अर्थ करण्याची ही पद्धत सुचविल्याचा मान आमच्या प्राचीन नैरुक्तांसच आहे. आपल्या कन्येचा अभिलाष करणाऱ्या प्रजापतीची गोष्ट ऐतरेय ब्राह्मणांत उषेमागून येणाऱ्या सूर्याच्या कल्पनेवर बसवून दाखविली आहे. अहल्या व इंद्र यांच्या कथेचाही असाच अर्थ केलेला आहे. पण निरुक्त-

* निरुक्त २,१६. तत्को वृत्रः। मेघ इति नैरुक्ताः। त्वाष्ट्रोऽसुर इत्यैतिहासिकाः। अपांच ज्योतिषश्च मिश्रीभावकर्मणा वर्षकर्म जायते। तत्रोपमार्थेन युद्धवर्णा भवन्ति। अहिवत्तु खलु मंत्रवर्णाः ब्राह्मणवादाश्च। विवृद्धया शरीरस्य स्रोतांसि निवारयांचकार। तस्मिन्हते प्रस्यंदिरे आपः।

काळांतील सृष्टिज्ञान बेताचें असल्यामुळें त्यांना सर्व गोष्टींचा अर्थ सृष्ट चमत्कारांच्या कल्पनेवर बसवितां येईना. उदाहरणार्थ अश्विनांच्या अनेक गोष्टीपैकीं वृकमुखांतून सुटलेल्या वर्तिकेची गोष्टच कायती यास्काचार्यांनी उषेच्या कल्पनेवर बसविली आहे. या नैरुक्त पद्धतींत पाश्चात्य पंडितांनीं थोडीशी सुधारणा केली आहे; कारण ते बऱ्याच उन्नत अशा उत्तर अक्षांशांत रहात असल्यामुळें हिवाळ्यांतील सूर्याचा कमजोरपणा, त्यानंतर येणाऱ्या वसंताचे महत्व, व तेव्हां पुनः सूर्याचें तेजस्वी होणे इत्याद गोष्टी विशेष ठळक रीतीने त्यांच्या नजरेस येतात. त्यांच्या आधारावर त्यानी बऱ्याच वैदिक कथांचा उलगडा करण्याचा प्रयत्न केला आहे. याप्रमाणें आतांपर्यंत पर्जन्य, उषा व वसंतारंभ या तीन कल्पना नैरुक्त मतांत प्रसिद्ध आहेत. त्यांचें थोडेसें वर्णन करणें येथें जरूर आहे.

उषेच्या कल्पनेच्या पुरस्कर्त्यांनी तिला सर्व कथांचें मूळ मानिले आहे. देव, सूर्य, प्रात:काल, दिवस, वसंत या सर्वांची जननी व स्वतः अमरत्वाची मूर्तिच अशी ती तेजस्वी उषा प्राचीन लोकांपुढें एकापेक्षां एक गहन प्रश्न उभे करीत असे. आपले सोनेरी दरवाजे उघडून विजयी सूर्याला मार्ग करून देणारी उषा उदयाला आली असतां त्या लोकांनां सान्ताकडून अनन्ताकडे भराऱ्या मारावयाला चांगला अवसर मिळत असे. अनन्त, अमर्त्य, दिव्य, इत्यादि कल्पना मनांत जागृत करणाऱ्या उषेचीं विविध नांवे हींच ईशशक्तीचीं दर्शक झाली. सरण्यूनें अश्वीचे रूप घेतल्यावर विवस्वतापासून तिला दोन जुळीं मुलें होणें म्हणजे सूर्योदय झाल्यावर उषा नाहींशीं होणे व दिवसरात्रीची जोडी उत्पन्न होणे होय. सूर्येचें सोमाशीं लग्न होणें, वृषाकपायीचे बैल इंद्राने खाऊन टाकणें किंवा अदितीला आदित्यरूपी पुत्र होणें इत्यादि सर्व उषेच्याच गोष्टी होत. पणींनी चोरलेल्या गाई शोधून काढण्यासाठीं गेलेली सरमा, पुरूरव्यापासून दूर जाणारी उर्वशी हीही उषेचीच स्वरूपे होत. सारांश, एवढाच कीं, या उषेच्या कल्पनेवर शक्य तितक्या गोष्टी जुळविण्याचा हे लोक प्रयत्न करतात. त्यांच्यामतें ही उषा म्हणजे उष्ण किंवा समशीतोष्ण कटिबंधांतील रोजची उषा होय. पण ती तशी नसून ध्रुवप्रदेशांतील दीर्घ उषाच आहे असे समजल्यावर या सर्व गोष्टींचें स्पष्टीकरण निराळ्याच रीतीनें करावें लागेल. पण तें करण्याचें हें स्थळ नव्हे.

आतां दुसरी कल्पना म्हणजे पर्जन्याची. ही कल्पना उषेच्या कल्पनेची पुरवणी म्हणून आपल्या निरुक्तकारांनीं दिलेली आहे. या कल्पनेवर बसविलेली मुख्य कथा म्हणजे इंद्रवृत्रांच्या युद्धाची होय. **इंद्र** शब्दाचा धात्वर्थ ' पर्जन्यबिंदु ' असा असून तो व इंदु हे दोन्ही शब्द एकाच धातूपासून निघाले आहेत. **वृत्र** याचा धात्वर्थ ( वृ–आच्छादणें ) ' आच्छादणारा ' असा आहे. या दोन शब्दांचा अशा रीतीनें अर्थ ठरविल्यावर इतर बाबी थोडी बहुत ओढाताण करून मूळ कल्पनेशीं जुळत्या करीत. या कल्पनेप्रमाणें इन्द्राने पर्वत फोडून पाण्याला वाट करून देणें ह्मणजे ढग फोडून पाऊस पाडणे होय. इन्द्र पर्जन्याची देवता असल्यामुळें त्याचे वज्र म्हणजे विद्युत् होय. पण या कथांत विशेष बिकट भाग म्हटला म्हणजे वृत्रानें ऊर्फ अहीनें जलांना निरुद्ध करून ठेवणे हा होय. ढगांतील पाणी वृत्र कसे अडकवून ठेवितो हे समजणें फार कठीण नाहीं. पण ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणी वृत्राचा वध झाल्यावर 'सिन्धवः' म्हणजे नद्या मोकळ्या झाल्या असे वर्णन आहे. या पर्जन्याच्या कल्पनेच्या पुरस्कर्त्याच्या मताप्रमाणे या नद्या म्हणजे जर पंजाबांतील नद्या असतील, तर त्यांना वृत्राने अडवून ठेविलें म्हणजे काय हे समजणें कठीण आहे. उन्हाळ्यांत नद्या आटतात त्याला अनुलक्षून हें आहे असें या शंकेचें उत्तर नैरुक्तांनीं दिलें आहे. या पलीकडे आपले निरुक्तकार गेलेले नाहीत. पण जर्मन पंडितांनी आणखीही कित्येक गोष्टी पर्जन्याच्या कल्पनेवर बसविण्याचा प्रयत्न केला आहे; व त्यांच्या मतें हिंदी–यूरोपीय लोकांच्या सर्व कथांना मूळ आधार वातावरणांतील चमत्कारांचाच आहे.

तिसरी जी वसंताची कल्पना तीही पहिल्या म्हणजे उषेच्या कल्पनेंप्रमाणेंच सूर्यमूलक आहे. तिच्यावरून पहातां कित्येक वैदिक कथांत हिंवाळा नाहींसा झाल्यावर आनंददायक अशा वसंताच्या आगमनाचें वर्णन आहे. आपले यास्काचार्यादि निरुक्तकार ज्या प्रदेशांत रहात होते, तेथे हिवाळ्यांतील व वसंतांतील सूर्यामध्यें सांगण्यासारखें अंतर नसल्यामुळेंच बहुधा त्यांनीं वैदिक कथांच्या स्पष्टीकरणार्थ ह्या वसंताच्या कल्पनेचा उपयोग केलेला नसावा. परंतु इंग्लंडसारख्या वरच्या अक्षांशांत हा फरक अगदीं ढोबळ दिसत असल्यामुळें पाश्चात्य पंडितांनीं या वसं-

त्याच्या कल्पनेवर बऱ्याच वैदिक कथांचा उलगडा करण्याचा प्रयत्न केला आहे. अश्विनांनी च्यवनाला पुनः तरुण केलें, अत्रीचें तमापासून रक्षण केलें, विहिरीत बुडालेल्या वंदनाला वर काढिलें, ऋज्राश्वाला दृष्टि दिली इत्यादि अश्विनांच्या पराक्रमांचा अर्थ पाश्चात्य पंडितांनी वसताच्या आगमनपर लाविला आहे. हे सर्व पराक्रम अर्थातच वार्षिक होत.

या तीन कल्पनांशिवाय नाक्षत्र कल्पनेवरही कित्येकांनी वैदिक कथांचा उलगडा करण्याचा प्रयत्न केला आहे. बंगळूरचे नारायण ऐयंगार यांनी कांहीं गोष्टीचा अर्थ मृगशीर्ष व रोहिणी या नक्षत्रांच्या स्थितीवर लाविला आहे. या सर्व कल्पनांचें ऊर्फ उपपत्त्यांचें सविस्तर वर्णन करण्याचें हे स्थळ नव्हे. त्यांचा येथें उल्लेख करण्याचे कारण एवढेंच कीं, इतक्या जरी निरनिराळ्या उपपत्त्या काढिलेल्या आहेत तरी अद्यापिही बऱ्याच महत्वाच्या अशा वैदिक कथांचा समाधानकारक उलगडा झालेला नाही. अशा गोष्टी ध्रुवोपपत्तीवर चांगल्या बसत असल्यामुळें ह्या उपपत्तीच्या दृढीकरणार्थ त्या येथे सांगणें गैर होणार नाही. चालू व पुढच्या अशा दोन प्रकरणांत याच हेतूने कित्येक महत्वाच्या वैदिक कथांचा ऊहापोह केला आहे.

इन्द्रवृत्रांच्या युद्धाची गोष्ट ही पर्जन्याच्या कल्पनेवर चांगली बसतें असा साधारण समज आहे; म्हणून तीच आतां प्रथम घेऊं. इंद्रवृत्रांचें युद्ध हें वेदांत चार प्रकारें वर्णिलेले आहे. १ ला प्रकार, **वृत्रतूर्य**, म्हणजे नमुचि, शुष्ण, शंबर, वल, पिप्रु, कुवय इत्यादि निरनिराळीं नावें असलेल्या वृत्राशीं झालेलें इन्द्राचें युद्ध. २ रा प्रकार, **अप्तूर्य** किंवा पाण्यासाठीं केलेलें युद्ध; यांत वृत्राला मारल्यावर ‘सिन्धवः’ किंवा ‘आपः’ मोकळ्या होतात; ऋग्वेदांत इंद्राला **अप्सुजित्** ( पाण्यांत जिंकणारा ) असें ह्मटलें असून, वृत्र त्या पाण्याला गराडा घालून बसल्याचें ( अपः परिशयानम् ) वर्णन केलें आहे. ३ रा प्रकार, **गविष्टि** ह्मणजे गाईच्या शोधासाठीं झालेलें युद्ध. आणि ४ था प्रकार, **दिविष्टि**, ऊर्फ प्रकाशासाठीं झालेलें युद्ध; वृत्राला मारिल्यावर सूर्य आणि उषा यांना इंद्र वर आणितो असें ऋग्वेदांत अनेक ठिकाणीं सांगितलें आहे. इन्द्रवृत्रांच्या युद्धांतील या चारी बाबींचें स्वरूप नीट लक्षांत यावें म्हणून त्यांचें वर्णन करणाऱ्या ऋचांचा सारांश येथें देतों.

इन्द्र आपल्या वज्रानें जेव्हां वृत्रावर प्रहार करतो तेव्हां द्यावापृथिवी भयानें कांपतात. पाण्याला आच्छादून टाकणाऱ्या ( अपो वव्रिवासं ) किंवा पाण्याभोंवती पसरलेल्या ( परिशयानमर्णः ) वृत्राला इन्द्रानें ठार मारिलें. इन्द्राने पाण्याला मोकळें केल्यावर ते वृत्राच्या गुप्त ठाण्यांतून बाहेर पडून त्याला गुरफटून टाकिते. वृत्राचे ९९ किल्ले ( पुरः ) फोडून इन्द्रानें त्याला ठार केलें. तमामध्ये युद्धाची इच्छा करणाऱ्या शुष्णाला त्यानें असूर्य अशा तमांत ठार केले. इंद्राच्या मदतीनें बृहस्पतीनें समुद्राला झोकून देऊन गाईचा गोठा ( गवां गोत्रं ) मोकळा केला. वृत्राला मारल्यावर त्याचें शरीर दीर्घ तमामध्ये पडून राहिले ( दीर्घ तम आशयदिद्रशत्रुः ). वृत्राने वेढून टाकिलेला समुद्र ( अर्णः ) तमानें वेष्टिलेला असून ( तमसा परिवृतम् ) सूर्य ज्याचें अधिरोहण करितो तो समुद्र तेजस्वी आहे ( शुक्रमर्णः ). मायावी नमुचीला इन्द्राने दूरच्या प्रदेशांत ( परावति ) मारिले. इन्द्रानें अर्बुदाला हिमानें मारिलें. गाई परत मिळविण्यासाठी इन्द्राला मदत करतांना अंगिरसांनीं वलाला वर्षाच्या शेवटीं ( परिवत्सरे ) ठार केलें. वृत्राचीं पुरे पाषाणाचीं किंवा लोखंडाचीं ( अश्मन्मयीः आयसीः पुरः ) असून ती शारदीय ( पुरो यदिंद्र शारदीरवातिरः ) आहेत.

वृत्राला मारल्यावर गाई, सूर्य, आणि उषा यांना वाट होते, अशा प्रकारचे वर्णनही ऋग्वेदांत अनेक ठिकाणी आलें आहे. २,१९,३ यात ‘ इंद्रानें समुद्राच्या पाण्याला मोकळें करून सूर्याला उत्पन्न केले, आणि गाई मिळविल्या ’ असें ह्मटलें आहे. दुसऱ्याही कित्येक ठिकाणीं असेंच वर्णन आहे. इंद्राने अहीला मारल्यावर सुरू केलेल्या नद्या वर वाहूं लागल्या (सोदंचं सिधुमरिणात् ) असें २,१५,६ यांत ह्मटलें आहे.

आतां, या सर्व वर्णनांत पर्वत, गिरि, अद्रि, ऊधस् (ओटी, कांस) उत्स (झरा), कबंध, कोश वगैरे जे शब्द आलेले आहेत त्या सर्वांचा अर्थ निरुक्तकारांनीं मेघ असा केला आहे; व तो पाश्चात्य पंडितांनींही मान्य केला आहे. तसेंच गो हा शब्द साधारणपणें गाईचा वाचक असूनही त्याचा अर्थ पाणी असा त्यांनीं केला आहे. वृत्राशीं होणाऱ्या युद्धांत बहुधा मरुत् हे इंद्राचे सहाय असतात; तरी कित्येक प्रसंगीं विष्णु, अग्नि, आणि बृहस्पति यांनींही वलाच्या तडाक्यांतून गाई सोड-

विण्यांत इन्द्राला मदत केली आहे. या गोष्टीचीं दुसरींही कित्येक स्वरूपें ऋग्वेदांत आढळून येतात; पण प्रस्तुत विषयाला आतांपर्यन्त झालेलें विवेचन पुरें आहे.

हें इंद्रवृत्रांच्या युद्धाचे वर्णन वाचणारास असें सहज दिसून येईल की, वृत्राला मारल्याबरोबर एकदम चार गोष्टी घडून येतात. त्या अशाः—१ ली गाई मोकळ्या होणें, २ री पाणी वाहूं लागणें, ३ री उषा उत्पन्न होणे आणि ४ थी सूर्य वर येणे. एकसमयावच्छेदेंकरून घडून येणाऱ्या या चार गोष्टींचा पर्जन्याच्या कल्पनेवर उलगडा होतो की काय हे आतां पहाणे आहे. वृत्र ह्मणजे मेघ असें समजल्यावर त्याला वज्राने फोडून त्यांत असलेले पाणी इंद्र बाहेर काढतो हे ह्मणणे ठीक आहे. पण या पाण्याबरोबरच मोकळ्या होणाऱ्या गाई कोठल्या? गाई ह्मणजे पाणी असे निरुक्तकारांप्रमाणें समजल्यास त्या दोन वस्तु भिन्न नव्हत असे होते. पण पाण्याबरोबर उषा व सूर्य हीं कशीं वर येतात हे समजणे फार कठीण आहे. ढग कित्येक वेळां क्षितिजाजवळ दिसत असतात; पण एवढ्यावरून त्यांना फोडून इन्द्राने सूर्याला वर काढिले असे म्हणणें वेडेपणाचें आहे. या चार गोष्टीपैकी पाणी मोकळे होणे ही गोष्ट प्रधान समजून निरुक्तकारांनीं कदाचित् दुसऱ्या गोष्टीकडे दुर्लक्ष केले असेल. कित्येक पाश्चात्य पंडितांनां तर या चार एकदम घडून येणाऱ्या गोष्टीचा नीट उलगडा करतां न आल्यामुळे आपले अज्ञान झांकण्यासाठी त्यांनीं "वैदिक ऋषींनीं कल्पनांचा घोटाळा केला आहे" असे म्हणून सर्व दोष वैदिक ऋषींच्या डोक्यावर टाकला आहे.

इन्द्रवृत्रांच्या युद्धांतील एवढ्याच बाबी पर्जन्याच्या कल्पनेवर जुळत नाहींत असें नाहीं. मागें एके ठिकाणी सांगितल्याप्रमाणें वृत्रवधाचें स्थान दूरच्या प्रदेशांत (परावति) असून तेथे भयंकर तम (असूर्ये तमसि) आहे. तसेंच इन्द्राने नमुचीला मारून देवयान मार्ग मोकळे केले असें ऋ. १०,७३,७ यांत ह्मटले आहे. अवेस्ता या पारशी ग्रंथांतही अपौशाला मारिल्यावर तिष्ट्रय मझ्दाच्या मार्गांत संचार करतो असें वर्णन आलें आहे. वृत्राचे आश्रयस्थान गुप्त (निण्य) आणि जलावृत असें रजसूच्या तळाशीं आहे, असें ऋ. १, ५२, ६ यांत सांगितलें आहे. वृत्र ह्मणजे मेघ असेंच केवळ समजल्यास यांपैकीं कोणत्याच गोष्टीचा चांगला उलगडा

होत नाहीं. ऋग्वेदांत परावत् व अरावत् ( जवळचा ) आणि देवयान व पितृयाण अशा विरोधी शब्दांच्या जोड्या आलेल्या आहेत. देवयान ह्मणजे उत्तर खगोलार्ध. आतां वृत्रवधाचे स्थान ढगांत होतें असें धरल्यास तें परावति किंवा देवयानाच्या द्वाराशीं होतें असें कसें ह्मणतां येईल? वर दिलेल्या वचनांत वर्णन केल्याप्रमाणे पाहिल्यास तमानें परिवृत झालेल्या पलीकडच्या समुद्रांत म्हणजे ज्यांतून सूर्य सकाळीं वर येतो, त्यांत वृत्राला मारिलेलें आहे. हें वर्णन दक्षिणगोलार्धरूपी खालच्या लोकालाच लागू पडणारें असून ढगांना लागू पडणारे नव्हे. इन्द्राचा पर्जन्याशी कांहीं संबंध नाहीं असें आमचे म्हणणें नाहीं; पण वृत्रहन् असा जो इन्द्र तो वर दिलेलीं वैदिक वचनें लक्षांत घेतां केवळ पर्जन्यदेवता असणे सभवनीय दिसत नाहीं.

वृत्राच्या कथेच्या प्रचलित अर्थावर तिसरा आक्षेप असा आहे कीं, त्याचा काल सांगणाऱ्या वचनांचा अर्थ त्यावरून समाधानकारक असा लागत नाहीं. पर्जन्याच्या कल्पनेप्रमाणें पाहिल्यास हे युद्ध वर्षाकालांत झालेले पाहिजे. पण जे वृत्राचे किल्ले (पुरः) इन्द्रानें फोडले ते शारदीय होते. यावर असें म्हणणें येईल की, पूर्वी वर्षा व शरद् हे दोन ऋतु मिळून एक ऋतु समजून त्या सगळ्याला शरद् असें नांव दिलेले असेल. पण असें मानिलें तरी त्यावर दुसरी अडचण येतेच; कारण, हे युद्ध सवत्सराच्या शेवटी झालेले आहे (ऋ. १०,६२,२). इन्द्राचें अर्बुदाला मारण्याचें शस्त्रही हिम (बर्फ) होतें. शिवाय या युद्धानंतर उषेची प्राप्ति कशी होते व हें युद्ध काळोखांत कां झाले हें त्याचा काळ वर्षाऋतूत होता असें मानिल्यास गूढच रहातें. तात्पर्य, यांपैकीं कोणत्याच गोष्टीचा पर्जन्याच्या कल्पनेनें उलगडा होत नाहीं.

पर्जन्याच्या कल्पनेवर चवथा आक्षेप आणखी असा आहे कीं, पर्वत, गिरि, अद्रि या शब्दांचा मेघ असा मुख्य किंवा गौण असा कोणताच अर्थ नसतांना केवळ रूपकानें तो तसा घ्यावा लागतो. पण हा अर्थ कित्येक ठिकाणीं फार अप्रयोजक दिसतो. तरी आजपर्यंत दुसऱ्या कांहीं चांगल्या कल्पनेच्या अभावी तो तसाच घेत आले आहेत.

येणेंप्रमाणें पर्जन्याच्या कल्पनेवरील आक्षेप आहेत. त्यांचा नीट विचार केल्यास पर्जन्याच्या कल्पनेचा कमकुवतपणा स्पष्ट दिसून येईल.

तिच्यावरून इंद्रवृत्रांच्या युद्धानंतर एकसमयावच्छेदेकरून घडून येणाऱ्या चार गोष्टींचा, तसाच त्या युद्धाच्या कालाचा व स्थानाचा मुळींच उलगडा होत नाहीं. तरीपण आमच्या प्राचीन निरुक्तकारांपासून अद्यापपावेतों या कथेचे मूळ पर्जन्यच होय असे मानीत आले आहेत. इन्द्र-वृत्रांच्या युद्धांत दिसून येणाऱ्या चार गोष्टींपैकीं पाण्याची सुटका होणें या गोष्टीचा उलगडा पर्जन्याच्या कल्पनेवर होतो; व गाई म्हणजे पाणी असे निरुक्तकारांप्रमाणे समजल्यास दोन गोष्टींचा होतो; उरलेल्या दोन गोष्टी उषेच्या कल्पनेवर जुळण्यासारख्या आहेत. पण कोणत्याही एकाच कल्पनेवर चारी गोष्टींचा कांहीं उलगडा होत नाहीं. म्हणून त्यांपैकी पहिल्या गोष्टीला प्राधान्य देऊन आपल्या निरुक्तकारांनीं 'सर्वनाशे समुत्पन्ने अर्धं त्यजति पंडितः' या न्यायानें, इंद्र हा पर्जन्यदेवता आहे या कल्पनेशी जुळतील तेवढ्या गोष्टी जुळवून बाकीच्यांकडे दुर्लक्ष केले. इंद्रवृत्रांच्या युद्धाचा उलगडा करणारी याशिवाय दुसरी कल्पना आजमितीस प्रचलित नाहीं. ही कल्पना अगदीं अपुरी असल्यामुळें, दुसऱ्या एखाद्या कल्पनेनें जर या सर्व गोष्टींचा उलगडा होत असेल, तर ही पर्जन्याची कल्पना सोडून द्यावयास कोणालाही हरकत वाटणार नाहीं.

इंद्रवृत्रांचे युद्ध म्हणजे मूळ पर्जन्यदेवता व मेघ यांमधील झगड्यावरील रूपक आहे असे मानणेंच मुळीं आमच्यामते चुकीचे आहे. हे युद्ध मूळ प्रकाश व काळोख यांमधील लढाई होय हे ऐतरेय ब्राह्मणावरून (४–५, पान १६७ पहा) उघड होत आहे. इंद्र हा प्रकाशाची देवता आहे, ही गोष्ट ऋग्वेदांतील अनेक वचनांवरून सिद्ध करतां येईल. 'इन्द्र ज्योति ( प्रकाश ) मिळविता झाला'* ( ३, ३४, ४ ), 'अंध तमांत प्रकाश मिळविता झाला' ( १,१००,८ ), 'ज्यानें सूर्याला व उषेला उत्पन्न केले तो† इंद्र' ( २,१२,७; ), 'सूर्याला मार्ग करून देणारा' ( पथिकृत्सूर्याय १०,१११,३ ), इत्यादि इंद्राचें वर्णन ऋग्वेदांत आले आहे. या वचनांत वृत्रयुद्धाचा संबधही आलेला नाहीं. असें

---

* अविदज्ज्योतिः ( ३,३४,४ ); ज्योतींषि विवेदिथ ( ८,१५,५ ); विदज्ज्योतिः ( १०,४३,४ ).

† यःसूर्यं य उषसं जजान यो अपां नेता स जनास इंद्रः । ऋ. २,१२,७.

असतां त्याच इन्द्राचें वृत्राशी युद्ध होऊन पाणी मोकळें होतें व उपेलाही वाट मिळते ती कशी, हें सांगणें हीच काय ती मुख्य अडचण आहे. ही अडचण आजपर्यन्त प्रचलित असलेल्या कोणत्याही कल्पनेने नाहीशी होत नाही. यासाठी त्या कल्पना खोट्या म्हणून म्हणण्यापूर्वी वेदांत वर्णन केलेल्या पाण्यांचे स्वरूप तरी काय आहे याचा थोडा विचार करूं.

वृत्रवधानंतर पाणी वाहूं लागलें असे सांगणाऱ्या वचनांत मेघांचा स्पष्ट उल्लेख कधीही केलेला नाहीं. पाण्याला अडवून धरलेले ठिकाण दर्शविण्यासाठी 'पर्वत, गिरी' इत्यादि शब्दांचा व पाणी दर्शविण्यासाठी 'आपः' किंवा 'सिंधवः' या शब्दांचा त्यांत उपयोग केलेला आहे. 'आपः' शब्द ऋग्वेदांत अनेक ठिकाणी आला असून त्यात बऱ्याच ठिकाणी दिव्य ऊर्फ आकाशांतील जलें असा त्याचा अर्थ आहे. "ज्या सूर्याजवळ आहेत, व सूर्य ज्यांच्याजवळ आहे" असें त्यांच्यासंबंधानें ऋ० १,२३,१७ यांत ह्मटलें आहे. ७,४९,२ यांत 'दिव्याः आपः' व 'खनित्रिमाः आपः' ह्मणजे आकाशांतील जले व नद्यांतून वहाणारी जलें असा स्पष्ट भेद केलेला असून त्याचे उद्दिष्ट-स्थान (अर्थ) समुद्र आहे (समुद्रार्था) असे सांगितलें आहे. ऋ. ८,६९,१३ यांत 'सप्तसिंधु वरुणाच्या मुखांत पडतात' असे ह्मटले आहे. इंद्राप्रमाणे वरुणही नद्यांस वहावयास लावितो (२,२८,४) असे वर्णन आहे. आपल्या अर्थाकडे जाणाऱ्या 'आपः'चा दीर्घतमा सारथि झाल्याचें मागें सांगितलेंच आहे. पण या 'दिव्याः आपः'चें खरें स्वरूप काय आहे हें आजपर्यंत नीट न समजल्यामुळें उषेच्या उदयाशी ही जले मोकळी होण्याचा संबंध कसा पोहोंचतो हें पंडितांस समजलें नाहीं. 'दिव्या आपः' ह्मणजे केवळ पावसाचें पाणी इतकाच अर्थ ते बहुधा समजतात. पण ही चूक आहे. कारण, ऋ. १०,८२,६;१२९,३ यांत जगाच्या उत्पत्ती-संबंधाने सांगतांना 'पूर्वी सर्वत्र तम व तमानें झांकलेलें अज्ञात (अप्रकेत) जल होतें,' असें सांगितलें * आहे. शतपथ ब्राह्मण, ऐतरेय उपनिषद्, मनुस्मृति इत्यादि ग्रंथांत हें जग पाण्याच्या वाफांपासून उत्पन्न झालें असें ह्मटले आहे. अर्थात् दिव्य जलांचें स्वरूप वैदिक ऋषींच्या पूर्वजास

* तम आसीत्तमसा गूळ्हमग्रेऽप्रकेतं सलिलं सर्वमा इदम्। ऋ.१०,१२९.३.

चांगलें माहीत होतें, हें उघड होतें. या दिव्य जलांपासून सर्व सृष्टि झाली असा त्यांचा समज असल्यामुळें अर्वाचीन शास्त्रज्ञांच्या विश्वांतील सर्व जागा व्यापून टाकणाऱ्या ' ईथर ' नांवाच्या अति विरल पदार्थांप्रमाणेच वैदिक ऋषींच्या या ' दिव्याः आपः ' होत असेंही ह्मणतां येईल. पण इतके खोल जाण्याचें आपल्याला कारण नाहीं. दिव्य जलें अथवा पुरीष ( पाण्याची वाफ ) यांचें वर्णन ऋग्वेदांत आहे; व अंतरिक्ष, खालचा लोक, आणि सभोंवतालच्या सर्व दिशा त्या ' आपांनीं ' भरलेल्या होत्या असें वैदिक ऋषींचे मत होते; इतकें समजलें ह्मणजे आपलें काम झालें.

पण वैदिक ऋषींना ' खालच्या लोकाची' मुळींच कल्पना नव्हती असें कित्येक पाश्चात्य पंडितांचें मत आहे. ते असें ह्मणतात की, रात्री दिवसा सूर्याचें फिरणें वगैरे सर्व गोष्टी डोक्यावरील आकाशांतीलच होत. परंतु हें ह्मणणें साधार दिसत नाही. ऋ ६,९,१ यांत ' कृष्ण आणि तेजस्वी दिवस **दोन्ही** रजांचें ( लोकांचें ) प्रसिद्ध मार्गांनीं विवर्तन करितात. ' असें सांगितलें आहे. यांत दोन रजें ह्मणजे उघडच वरचा व खालचा असे लोक होत. ५,८१,४ यांत 'हे सवित्या, तूं दोन्ही बाजूनी रजनीच्या भोंवती फिरतोस ( रजनीमुभयतः परीयसे ) ' असें ह्मटले आहे. याहूनही स्पष्ट वचनें ऋग्वेदांत आहेत. ७,१७४,११ यांत " रिपु तीन पृथ्वीच्या खालीं जावो " अशी प्रार्थना केली आहे. त्यांत 'तिस्रः पृथिवी-रधः' असे शब्द घातलेले आहेत. शत्रु तेथें जाऊन पडो याचा भावार्थ तो प्रदेश दुःखमय असला पाहिजे असा उघड दिसतो. पुनः १०,१५२,४ यांत ' जो आह्मांला त्रास देईल तो खालच्या तमोमय प्रदेशांत जावो ' ( अधरं गमया तमः ) अशी इन्द्राची प्रार्थना केलेली आहे. ' आमचा जो द्वेष करतो तो खालीं जाऊन पडो ' ( यो नो द्वेष्टयधरः सस्पदीष्ट, ३,५३,२१ ); ' जो दासाच्या वर्णाला खालच्या गूढ प्रदेशांत टाकता झाला ' ( यो दासं वर्णमधरं गुहाकः २,१२,४ ) इत्यादि वचनांवरूनही अंधारमय अशा पृथ्वीच्या खालच्या प्रदेशाची वैदिक ऋषींची कल्पना स्पष्ट दिसून येते. पृथ्वीच्या खालीं ह्मणजे केवळ पृथ्वीच्या पृष्ठभागाच्या आंत असा अर्थ घेतां येत नाहीं. कारण तसें असतें तर तीन्ही पृथ्वीच्या खाली असें ह्मणण्याचें कारण नव्हतें. ही गोष्ट दुसऱ्याही एका प्रमाणा-वरून दिसून येईल. **तिस्रः पृथिवीरधः** याच्या उलट ' तिस्रःपृथिवी

रुपरि ' ( तीन पृथ्वींच्या वर ) हीं पदें येतील. आणि खरोखरच अशीं पदें ऋग्वेदांत आलेलीं आहेत. १,३४,८ यांत * ' हे अश्विनहो तुह्मी तिन्ही पृथ्वींच्या वरच्या प्रदेशांतून रात्रंदिवस स्वर्गलोकाचें रक्षण करतां. ' असे ह्मटलें आहे. पृथ्वीचा त्रिप्रकार भेद ऋग्वेदांत दुसऱ्या अनेक ठिकाणीं आला असून ( १,१०२,८;४,५३,५;७,८७,५), अवेस्त्यांतही तो सांगितला आहे. ऋ. ४,५३,५ यांत तर हा त्रिप्रकार भेद अंतरिक्ष, रजस, रोचन, आणि द्यौ यांनाही लाविलेला आहे, व यावरून तीन पृथिवी ह्मणजे काय हें समजून येईल. एकच पृथ्वी तीन प्रकारची मानिली आहे. तिन्ही पृथ्वींच्या वर राहून अश्विन स्वर्गाच्या द्वाराचें रक्षण करतात, यावरून त्या प्रदेशाच्या उलट असलेला खालचा प्रदेश ह्मणजे काय याची चांगली कल्पना होईल. हा खालचा प्रदेश ह्मणजे पृथ्वीच्या पोटांतील नसून सर्व पृथ्वीच्या खालचा होय. 'तीन पृथ्वीच्या खाली' आणि ' तीन पृथ्वींच्या वर ' असे स्पष्ट शब्द ऋग्वेदांत असतांना पृथ्वींच्या खालच्या प्रदेशाची वैदिक ऋषींना माहिती नव्हती हें ह्मणणें टिकणार नाही.

रजस्चे ' पार्थिवं रजः, ' ' दिवो रजः ' आणि ' परमं रजः ' असे तीन भेद असून त्यांत पहिलें पृथ्वींचे व दुसरे आकाशाचें असून, तिसऱ्या सर्वांत उंच अशा रजामध्ये पाण्याचे स्थान आहे असें सांगितले असल्यामुळें पृथ्वीच्या खालच्या प्रदेशाला या त्रिप्रकार रजोविभागांत जागाच नाहीं असा कित्येकांचा आक्षेप आहे. पण या आक्षेपांत कांहीं अर्थ नाही. कारण तीन रजांप्रमाणेच सहा रजेही १,६४,६ यांत सांगितली आहेत (षळिमा रजांसि). ' सविता कृष्ण रजांतून ( कृष्णेन रजसा ) वर येतो ' ( १,३५,२ ), ' सविता परावताहून ( दूर ठिकाणाहून ) वर येतो ' ( आ देवो याति सविता परावतः १,३५,३ ), या वाक्यांवरून कृष्ण रजस् व परावत् हे शब्द समानार्थक असावेत असें दिसतें. सूर्य समुद्रांतून वर येतो ( ७, ५५, ७ ) व मावळतांना समुद्रांत जातो (१०,११४,४) असें जें वर्णन आहे त्यावरून हा समुद्र म्हणजे पृथ्वीच्या खालचाच असला पाहिजे असें स्पष्ट दिसतें. निर्ऋतीच्या मांडीवर निजलेला ( सुषुप्वांसं निर्ऋतेरुपस्थे, १,११७,४ ) आणि तमांत असलेला (तमसि क्षियन्तम् )

* तिस्रःपृथिवीरुपरि प्रवा दिवो नाकं रक्षेथे द्युभिरक्तुभिर्हितम् ॥ ऋ.१,३४,८.

असे सूर्याचे वर्णन ऋग्वेदांत आलें आहे. ‘ द्यौ व पृथ्वी यांच्या आंत फिरल्यावर सूर्य निर्ऋतींत प्रवेश करिता झाला ’ असें ऋ. १,१६४,३२ यात सांगून, १०,११४,२ यांत तीन निर्ऋती ( तिस्रो निर्ऋतीः ) सांगितल्या आहेत. या तीन निर्ऋती म्हणजे वरच्या तीन लोकांप्रमाणे पृथ्वीच्या खालचे तीन लोक होत. १०,१६१,२ यांत ‘ निर्ऋतीचे उपस्थ ’ याचा मृत्युप्रदेश असा अर्थ आहे. “ पुरूरवा दूरच्या प्रदेशांत जाऊन तेथें निर्ऋतीच्या उपस्थावर शयन करता झाला ” असे, १०,९५,१४ यांत सांगितलें आहे. मरुत् हे अवंश अशा निर्ऋतीमधून आकाशांत चढतात असे ७,५८,१ यांत म्हटलें आहे. या सर्व वचनावरून निर्ऋति ऊर्फ मृत्युप्रदेश याला पश्चिमेस सुरवात होते व तिच्या मांडीवर निजणारा सूर्य पुनः पूर्वेस उगवतो हें उघड सिद्ध होते. म्हणजे ही निर्ऋति पृथ्वीच्या वरचा भाग नसून पश्चिमेपासून पूर्वेपर्यंत पसरलेला जो पृथ्वीच्या खालचा प्रदेश तोच होय. ऋग्वेदांत याविषयी वर सांगितलेली स्पष्ट वचने असल्यामुळे वैदिक ऋषींना खालच्या लोकाची कल्पना नव्हती असे म्हणतां यावयाचे नाहीं.

दुसऱ्याही कित्येक ऋग्वेदवचनांवरून ही गोष्ट सिद्ध होते. **रजसी** या द्विवचनी शब्दाप्रमाणें **उभौ अर्धौ** असा आणखी एक द्विवचनी शब्द ऋग्वेदांत आला आहे. २,२७,१५ यांत या दोन अर्धांची कल्याणप्रद ( साधू ) होण्याविषयी प्रार्थना केली आहे. हीं दोन अर्धे म्हणजे पृथ्वी व आकाश असे कांहीं जण समजतात. पण ही चूक आहे. कारण आकाशाचाच **पर** व **उपर** असा भेद १,१६४,१२ यांत केला आहे. यापुढे १७ व्या ऋचेत ‘ वत्साला घेऊन गाय **पराच्या** खालीं व **अवराच्या** वर दिसूं लागली ’ असे सांगून पुढे ‘ ती कोणत्या **अर्धांत** (कंस्विदर्धं) निघून गेली ’ ? असा प्रश्न विचारला आहे; त्यावरून हे अर्धे ह्मणजे पृथ्वी किंवा आकाश नव्हे हें उघड आहे. अथर्ववेदांत (१०,८,७) या दोन अर्धांचा उल्लेख करून म्हटलें आहे कीं, ‘प्रजापतीनें एका अर्धानें जग निर्माण केलें; पण दुसऱ्या अर्धाचा मागमूस लागावयाला कांहीं खूण आहे काय ’ ? यांत दुसरें अर्धं म्हणजे पृथ्वी नव्हे हें सहज दिसून येईल. खालचा व वरचा लोक दर्शविणारा आणखी एक ‘ समुद्रौ ’ असा शब्द ऋग्वेदांत (१०,१३६,५) आहे. यांतील एक समुद्र अलीकडच्या

बाजूला असून दुसरा पलीकडच्या बाजूला आहे (७,६,७). शुक्र व कृष्ण अर्णाविषयीं मागे उल्लेख केलाच आहे. या दोन समुद्रांसंबंधानें **अवस्तात्** आणि **परस्तात्** असेही शब्द आलेले आहेत. ८,८,१४ यांत 'परावत्' प्रदेशाचा 'अंबराशी' (आकाश) विरोध दाखवून, ३,५५,६ यांत सूर्य 'परस्तात्' प्रदेशांत शयन करतो असें सांगितलें आहे. तर येणेंप्रमाणें **परावत्** व **अर्वावत्** ही जोडी, 'रजसो,' 'अर्धौ' 'समुद्रौ' या शब्दांनी दर्शविलेली असून जेव्हां दोन्ही खगोलार्धं उद्दिष्ट असतील तेव्हां उभयतः शब्द घातला आहे. ३,५३,५ यांत "हे मघवन्, हे बंधो इन्द्र! पलीकडे (परा) जा आणि पुनः इकडे ये, (कारण) तुझें दोहोंकडे काम (उभयत्र ते अर्थ) आहे" असें म्हटले आहे.

अशा प्रकारची इतकीं हो वचनें आपल्यापुढे असता वैदिक ऋषींना खालच्या खगोलार्धाची माहिती नव्हती हे म्हणणे जुळणार नाही. शिवाय हे म्हणणें प्रथमदर्शनींच संभवनीय दिसत नाहीं. वैदिक ऋषींना व्यवहाराला पुरेसे चंद्रसूर्याच्या गतीचें गणित करितां येत होतें ही गोष्ट आतां सुप्रसिद्ध आहे. इतके ज्ञान ज्यांना होतें त्यांना 'आकाश हें क्षितिजाजवळ पृथ्वीला चिकटविलें आहे व सूर्य सायंकाळीं खालून न जातां वरच कोठें तरी गडप होतो' असें वाटणे शक्य नाहीं. ऐतरेय ब्राह्मणांतील एका वाक्यावरून (३,४४) कांहीं जणांनी तसे अनुमान काढले आहे. पण तें वाक्य अस्पष्ट असून त्यावरून तसे स्पष्ट अनुमान निघत नाही. पाश्चात्य पंडितांनीं आपल्या स्वतःकडील कल्पना वैदिक ऋषींवर लादण्याचा प्रयत्न केल्यामुळे हा घोटाळा झालेला आहे. आतांच्या इतके सूक्ष्म ज्योतिषज्ञान वैदिक ऋषीना नसेल, आणि म्हणून त्यांनी "सूर्य आतां (मावळल्यावर) कोठे आहे आणि त्याचे किरण कोणत्या द्यौला प्रकाशित करतात?" असा प्रश्न विचारला आहे (१,३५,७). पण त्यावरून आतांपर्यंत केलेल्या विवेचनाला मुळींच बाध येण्यासारखा नाहीं.

वैदिक ऋषींना खालचा लोक ऊर्फ अधःखगोलार्ध माहीत होतें ही गोष्ट जर लक्षांत आणिली तर **दिव्य आपांचें** स्वरूप व गति यांचा चटकन् उलगडा होईल. सर्व विश्व भरून टाकणारे सूक्ष्म तत्व म्हणजे पाण्याची वाफ, व ही वाफ सारखी पृथ्वीभोवती भ्रमण करीत असल्यामुळेच सूर्य चंद्र व तारका या पृथ्वीभोवती फिरतात अशी प्राचीन

आर्यांची कल्पना होती. या कल्पनेवर बऱ्याच वैदिक कथांचा उलगडा होणार आहे. या पाण्याच्या ओघांस "आकाशांत वाहत असून शेवटीं वरुणाच्या मुखांत पडणाऱ्या नद्या" असें ह्मटलें आहे (८,६९,१२). अधः खगोलार्ध हें पाण्याचें वास्तव्यस्थान असून वरुणाचें राज्य, यमाचें राज्य व वृत्राचें गुप्त (निण्यं) घर हीं सर्व त्यांतच आहेत. या पाण्याच्या गतीचें वर्णन पारशी धर्मग्रंथांत फार स्पष्ट रीतीनें केलेलें आहे. त्यांत ह्मटलें आहे "**वौरुकश** समुद्र पाण्याचें निधान आहे, तर उठा वायु-मार्गानें वर जाऊन खालीं पृथ्वीवर या; आणि पुनः वायुमार्गानें वर जा. उठा व वाहूं लागा. ज्याच्या उगवण्यानें अहुरमझ्दानें वायुमार्ग सुरू केला, अशा (सूर्या) ऊठ आणि फिरूं लाग. हे जवाश्व सूर्या तुला 'गरोन्मानेम' मध्यें रहावयाचें आहे व मझ्दाच्या आणि देवांनीं सुरू केलेल्या जलमार्गानें जावयाचें आहे, तर पृथ्वीवर उगवून तीवर प्रकाश कर." या वर्णनांत 'वौरुकश' समुद्रांतून निघून हीं दिव्य जलें आकाशांत जातात व पुनः खालीं जाऊन दुसरी प्रदक्षिणा सुरू करितात असें ह्मटलें आहे. हीं जलें व प्रकाश एकाच ठिकाणापासून निघतात. ऋग्वेदांतही हीं जलें देवांनीं केलेल्या मार्गानें जातात (७,४७,३ देवाना-मपि यन्ति पाथः) असें ह्मटलें आहे. अवेस्त्यांतील जलांप्रमाणें ऋग्वे-दांतील आपः सुद्धां समुद्राकडे गमन करणाऱ्या असून वायुमार्गानें जाऊन शेवटीं वरुणाच्या मुखांत जातात. पण अवेस्त्यांत एक विशेष सांगितला आहे. तो हा कीं, त्यांत जवाश्व सूर्याला या आकाशांतील जलांच्या मार्गानें जावयास सांगितलें आहे. अवेस्त्यांत एके ठिकाणीं **आर्द्वि सूर अनाहित** नांवाची नदी **हुकैर्य** पर्वताच्या शिखरावरून **वौरुकश** समुद्रांत जोरानें वहात जाते असें वर्णन आहे. ऋग्वेदांतील **सरस्वती** नदीसंबंधानेही असेंच वर्णन आहे (५,४३,११). या दोन्ही नद्या आकाशांतील असून खालीं आ-ल्यावर पृथ्वीवरील नद्यांना त्या भरून टाकितात असें ह्मटलें आहे. पृथ्वीवरील सर्व पदार्थांना रसाचा पुरवठा पर्जन्याच्या द्वारें या दिव्य जलांकडूनच होतो. पारशी ग्रंथांत आणखी असें ह्मटलें आहे कीं, "पृथ्वी आणि प्रकाशमय आकाश यांच्यामध्यें तारकालोक (यांत जल व वनस्पतींचीं बीजें असतात), चंद्रलोक व सर्वांत उंच असा सूर्यलोक असे तीन लोक आहेत." जलाचें निवासस्थान असें जें उच्चतम रजस्

ऋग्वेदांत सांगितलें आहे त्यावरून पृथ्वीच्या खालचें असें त्याचें निवास स्थान नाहींच असें जें कित्येकांना वाटतें, तसें वाटण्याचें कारण नाहीं. कारण या उच्च प्रदेशांतील जलें तरी खालच्या स्थानांतूनच येतात. **अर्द्वि सूर अनाहित** ही अवेस्त्यांतील नदी तारकालोकातून वहाते, आणि तिचीं सर्व जले सूर्यलोकांत जाऊन पृथ्वीवर अवर्षण होऊं नये म्हणून तिची यज्ञ करून पूजा करावी लागते. ऋग्वेदांतील सरस्वतीही पार्थिव प्रदेश व विस्तृत असें रजस् भरून टाकणारी आहे ( आपप्रुषी पार्थिवान्युरू रजो अंतरिक्षं । सरस्वती निदस्पातु ६,६१,११ ). पण या दोन नद्यांतील विशेष साम्य ह्मटलें म्हणजे सरस्वतीला ऋग्वेदात (६,६१,७) 'वृत्रघ्नी' म्हटलें असून **अर्द्वि सूर अनाहित** नदीनें **थ्राएतौनाला** ( ऋ. त्रित आप्त्य ) **अझी दहाक** नामक त्रिशीर्ष राक्षस तुझ्या हातून मरेल असा आशीर्वाद दिलेला आहे. ही गोष्ट म्हणजे ऋग्वेदांतील 'त्रित आप्त्या'च्या गोष्टीचेच बहुतेक रूपांतर आहे. त्रित आप्त्याला आपल्या पित्याची आयुधे मिळाल्यावर व इंद्राकडून प्रेरणा झाल्यावर त्यानें त्वष्ट्याचा मुलगा जो त्रिशीर्ष त्यावर हल्ला करून त्याला ठार केले, आणि गाई मोकळ्या केल्या. या गोष्टीवरून सरस्वतीरूप दिव्यजले आणि वृत्रवध यांच्यामधील संबंध स्पष्ट दिसून येतो. सरस्वती ही आकाशांतील नदी नसून पंजाबांतील हल्लीची सरस्वतीच होय असें कित्येक मानतात. पण वर सांगितल्याप्रमाणे अवेस्तिक **आर्द्वि सूर अनाहित** आणि ऋग्वेदांतील सरस्वती यांच्या साम्यावरून ती दिव्य नदीच आहे हे उघड होतें. यज्ञाच्या योगानें तिच्यापैकी कांहीं जल पृथ्वीवर येऊन त्याबरोबर वनस्पतीची बीजेही येतात. या बीजांचा वृक्ष वौरुकश समुद्राच्या मध्यभागीं असून तीं बीजें या दिव्यजलांच्या बरोबर आकाशांत जाऊन पर्जन्याबरोबर पृथ्वीवर येतात असें अवेस्त्यांत सांगितलें आहे. ऋग्वेदांतही ( १,२३,२० ) अशा प्रकारची कल्पना आहे. दिव्य जलांचे परिभ्रमण हें अशा प्रकारचें आहे. खालचा लोक त्यांचें निवासस्थान असून तो सर्व बाजूंनीं पर्वताच्या योगानें मर्यादित झालेला आहे असें स्पष्ट ह्मटले आहे. या पर्वतांमधून हीं दिव्यजलें बाहेर आली ह्मणजे तीं वरच्या खगोलार्धात भ्रमण करून व जातां जातां पृथ्वीवर पाऊस पाडून पुनः वौरुकश समुद्रांत जातात. पण एखादे वेळेस हीं जले पर्जन्यरूपानें

खालीं न येतां वरच्यावर सूर्यलोकांत जाऊन अवर्षण होण्याची भीति असे. म्हणून यज्ञादिकांनीं त्याची पूजा करून त्यांचा आशीर्वाद घ्यावा लागे.

वृत्राच्या कथेचा खरा अर्थ लक्षांत यावयाला या दिव्य जलांचें स्वरूप व त्यांची गति यांसंबंधानें प्राचीन आर्यांची कल्पना काय होती हें नीट समजलें पाहिजे. हीं दिव्य जलें व प्रकाश एकाच ठिकाणापासून निघून समान्तर मार्गांचें आक्रमण करितात अशी त्यांची कल्पना होती. नदींतून ज्याप्रमाणें होडी वगैरे वहाते त्याप्रमाणें सूर्यादि खस्थ गोल या दिव्यजलांच्या प्रवाहाबरोबर आकाशांतून वहातात. अर्थात् या जलांना जर कोणी अडवून धरिलें तर भयंकर परिणाम होणें सहाजिक आहे. कारण त्यांचा प्रवाह बंद झाल्यास सूर्य, चंद्र, तारा हीं फिरावयाचीं बंद होऊन सर्व जगत् तमोमय होऊन जाईल, व सर्व व्यवहार बंद पडतील. वृत्राच्या दुष्टपणाचा एवढा मोठा घातक परिणाम होत असे. रजसाच्या तळाशीं (पृथ्वीच्या खालच्या लोकांत) आपल्या गुप्त वाड्यांत राहून वृत्र या पाण्यांना अडवून वर येऊं देईना. तेव्हां इंद्राला त्याचा वध करून त्यांना मोकळें करून द्यावें लागे. पाण्यांची मुक्तता झाल्यावर अर्थातच सूर्यचंद्रादि पुनः उगवूं लागत; म्हणजे याजलांबरोबर उषा, सूर्य व गाई (प्रातःकाल) हीही येत. म्हणून हें युद्ध चार प्रकारचें असणें साहाजिकच आहे. या लढाईंत पर्वतांचें अंग कोणतें व कसें असे हेंही आतां समजण्यासारखें आहे. खालच्या समुद्राच्या सीमेवर **अल्बुर्झ** उर्फ **हर् बेरोझैति** नावाचा जो पर्वत अवेस्ता ग्रंथांत सांगितला आहे त्यांचीं द्वारें वृत्र आपलें शरीर फुगवून बंद करीत असे, म्हणून वृत्राला मारल्यावर हीं द्वारेंही इंद्राला मोकळीं करावीं लागत. अल्बुर्झ पर्वताला पूर्वेस १८० व पश्चिमेस १८० अशीं द्वारें असल्याचें अवेस्त्यांत सांगितलें आहे. सूर्य चंद्र तारा हीं नित्यशः यांतूनच वर येतात. अर्वाचीन संस्कृत वाङ्मयांत प्रसिद्ध असलेले उदयगिरि व अस्तगिरि याच पर्वताचे अवतार होत. इंद्राला शंबर ज्या पर्वतावर आढळला (२,१२,११), जो पर्वत अंगिरसांनीं फोडला (१,७१,२) व ज्यांत वलानें गाई लपवून ठेविल्या होत्या, तोही पर्वत हाच होय. वृत्रकथेचा हा अर्थ कित्येक पंडितांनां कदाचित् चमत्कारिक

वाटेल. पण या अर्थांत अस्वाभाविक असें कांहींच नाहीं. जल-प्रवाह व सूर्यादिकांचा उदय यांमधील वर दाखविलेला संबंध कांहीं काल्पनिक नाही. वेदांत जरी तो अगदी स्पष्ट शब्दांनी सांगितलेला नाहीं तरी ही उणीव पारशी धर्मग्रंथांनीं भरून काढिली आहे. वेदांतील पितृंचे अवेस्त्यांतील जोडिदार जे 'फ्रवशी' त्यांचे पराक्रम वर्णन करतांनां "त्यांनीं जलांना सुंदर मार्ग दाखवून दिले; कारण तीं बराच वेळपर्यंत न वाहतां एकाच ठिकाणी थांबून राहिलीं होतीं; तीं जले मझ्दानें त्यांच्यासाठी तयार करून नेमून दिलेल्या मार्गांनं वाहूं लागली" असे सांगून, पुढे लगेच "त्यांनी तारका, सूर्य, चंद्र आणि अनंत प्रकाश यांना मार्ग दाखविले, कारण ते दएवांच्या ( वैदिक राक्षस ) त्रासामुळे न हालतां एकाच ठिकाणी बराच वेळ थांबून राहिले होते" असें ह्मटले आहे. या ठिकाणी प्रकाश व पाणी यांतील संबंध अगदी स्पष्ट सांगितला आहे. वृत्रकथेचा नीट अर्थ करण्यांत मुख्य अडचण होती ती हा संबंध स्पष्ट दाखवून देण्याचीच होती. पण अवेस्त्यांतील या वर दिलेल्या वाक्यांवरून ती दूर झाली आहे.

अवेस्त्यांत दोन ठिकाणीं हीं जले वहावयाचीं केव्हा थांबतात तें सांगितले आहे. हीं दोन्ही स्थलें महत्वाची असल्यामुळे त्यांचे सविस्तर वर्णन केले पाहिजे. हिवाळ्यांत मृत झालेल्या मनुष्याची व्यवस्था कशी लावावी असा प्रश्न मझ्दाला केला असतां तो उत्तर देतो "प्रत्येक घरांत मृतासाठी तीन कट उभारून त्यात ते प्रेत, दोन रात्री, तीन रात्री, किंवा महिनाभर ह्मणजे पक्षी उडूं लागत, वनस्पती वाढूं लागत, प्रवाह वाहूं लागत आणि वायू पृथ्वीवरील पाणी शुष्क करूं लागेपर्यंत ठेवावें. आणि मग पक्षी उडूं लागले, प्रवाह वाहूं लागले ह्मणजे मझ्दाच्या भक्तानें ते प्रेत सूर्याकडे डोळे होतील असें दक्मावर ठेवावे". या वर्णनांतील प्रवाह वाहणें ह्मणजे काय हें नीट समजून घेतले पाहिजे. या प्रवाहाचा संबंध सूर्याच्या उदयाशीं आहे. हे प्रवाह व सूर्यचंद्रादि गोल हिंवाळ्यांत चालावयाचे थांबत; ह्मणून मझ्दाच्या भक्तानें मृत शरीराची व्यवस्था लावणें ती हे प्रवाह सुरू होऊन सूर्य उगवेपर्यंत—मग तो काळ दोन रात्रींचा असो तिहींचा असो अथवा महिन्याचा असो—लावूं नये असें सांगितलें आहे. हा काळ हिंवाळ्याचा असून तो दोन रात्री-

पासून महिन्यापर्यंतच्या अखंड काळोखाचा असला पाहिजे. कारण सूर्य-किरण प्रेतावर पडल्याशिवाय तें शुद्ध होत नाहीं असें मझ्दाच्या पूजकांचे मत होतें. हा काळ अखंड काळोखाचा असल्या शिवाय प्रेताचे काय करावें असा प्रश्न उपस्थित होणेंच संभवनीय नाहीं. समशीतोष्ण किंवा उष्ण कटिबंधांत रहाणाऱ्या मझ्दभक्ताला ही अडचण उत्पन्न होणार नाहीं. कारण तेथें रात्रीचें महत्तम मान २४ तासांपेक्षां कमी असतें. काळोखांत प्रेताची व्यवस्था लावावयाची नाही असा पक्का निर्बंध असल्याशिवाय महिनाभर प्रेतासारखी घाणेरडी वस्तु कोणी घरांत ठेवावयास सांगणार नाही. ह्मणून जरी वरच्या वर्णनांत काळोखाचा स्पष्ट उल्लेख आलेला नाही तरी तो उद्दिष्ट आहे हें उघड आहे. पण दुसऱ्या ठिकाणीं हा काळोखाचा उल्लेख स्पष्ट आहे. या ठिकाणीं मझ्दाला असा प्रश्न विचारला आहे कीं, "जर भक्ताच्या घरांत एकादा कुत्रा किंवा मनुष्य मेला व जर तेव्हां पाऊस किंवा बर्फ पडत असेल, किंवा माणसें व जनावरें वाट चुकतील असा **काळोख** येत असेल तर भक्तानें काय करावें"? त्यावर मझ्दाचें उत्तर पुन: पूर्वी प्रमाणेंच आहे. या वर्णनांत पाऊस किंवा बर्फ यांच्या बरोबरच काळोखही सांगितला आहे. त्यावरून हिवाळा हा प्रवाह बंद होण्याचा किंवा सूर्य चालावयाचा थांबण्याचा काल होता हें उघड होतें. या काळांत सूर्य एक सारखा क्षितिजाखाली असल्यामुळें अखंड काळोख असे. ह्मणून तेव्हां एकादा मनुष्य मेल्यास त्यांचें प्रेत जलप्रवाह सुरू होऊन सूर्य उगवेपर्यंत तसेंच घरांत ठेवावें लागे. दक्षिणायनांत मरण येणे हे वाइट आहे अशी जी आपल्याकडे कल्पना आहे तिचे मूळही या उत्तर ध्रुवावरच्या दीर्घ रात्रीतच आहे हें मागें दर्शविलें आहेच. ऋग्वेदांत ( १, १०६, ६ ) 'काटांत पडलेला कुत्स वृत्रहन् अशा इन्द्राला रक्षण करण्याकरितां बोलाविता झाला' असें म्हटलें आहे, त्यांत आलेला **काट** शब्द अवेस्तिक 'कट'च होय. या वचनावरून ऋग्वेदातही वृत्रवध होऊन जलप्रवाह वाहूं लागत व सूर्य उगवूं लागेपर्यंत मृत शरीर घरांतच खांचेंत (कट) ठेवण्याच्या चालीचा उल्लेख असावा असें वाटते. पण तो प्रश्न गौण असून दिव्य जलांच्या परिभ्रमणाचा विचार प्रस्तुत आपल्याला कर्तव्य आहे. वर दिलेल्या अवेस्त्यांतील

वचनांवरून हिंवाळ्यांत हीं दिव्य जलें वहावयाचीं बंद होऊन सूर्यही त्यांबरोबर चालेनासा होई; व हिंवाळा संपतांना ऋवशींच्या ऊर्फ पितृंच्या मदतीने देव त्या जलांना मुक्त करून सूर्याला वर यावयाला वाट करून देत, ही गोष्ट स्पष्ट होते. हें समजल्यावर आतां इन्द्रानें नदीला वर वहावयास कसें लाविलें (२,१५,६), वृत्राला मारून त्यानें सप्तसिंधूंना मुक्त कसे केलें (१,३२,१२), किंवा प्रकाशाला अव्याहत प्रकाशण्यास कसें लाविलें हे कळून येईल. ध्रुवोपपत्तीच्या साहाय्यानें या दिव्य जलांच्या भ्रमणाचा आजपर्यंत कोणी विचार न केल्यामुळे इंद्रवृत्रांच्या युद्धांतील एकसमयावच्छेदेंकरून घडून येणाऱ्या चार गोष्टींचा उलगडा व्हावयाचा राहिला.

दिव्य जलांचें आकाशांतील भ्रमण भारतीय व इराणी आर्यांच्या पुराणकथांतच काय तें आहे असें नाहीं. होमर या ग्रीक कवीच्या ग्रंथांतही तें आले आहे. हेलिऑस ह्मणजे सूर्य हा सुवर्णाच्या नावेंतून पश्चिमेकडून पूर्वेकडे येतो असें होमरनें वर्णिले आहे. होमरच्या मतें पृथ्वी ह्मणजे एकसारखे सपाट मैदान आहे असें त्याच्या टीकाकारांनी गृहीत धरल्यामुळे त्यांना या वर्णनाचा उलगडा झालेला नाहीं. पण खरोखर पृथ्वी गोल आहे व तिच्या खालचा लोक वायुरूप जलानें पूरित आहे, असेंच मत होमरच्या काव्यांत आहे. एकदां घेतलेली कल्पना कायम ठेवण्याच्या अट्टाहासामुळे पंडित लोकांनी सरळ व स्पष्ट अशा वचनांचा आपल्या मताप्रमाणें अर्थ करून घेण्यासाठीं त्या वचनांचे लागतील तसे धिडवडे काढले आहेत. पण त्यांचा सविस्तर विचार करण्याचे हें स्थळ नव्हे. युरिपिडिस, आरिस्टाटल यांच्या ग्रंथांतही वायुरूप जलांच्या प्रवाहांचे उल्लेख असल्याबद्दल डॉ. वारन यानें लिहिलें आहे. प्राचीन जर्मन लोकांच्या कथांत अशीच एक विश्वव्यापी नदी आली असून फिनिश पुराणांतही एक चढती व एक उतरती अशा दोन नद्यांचें वर्णन आहे. लेटीश लोकांच्या कथांत अश्विनांच्या कृत्यांसारखीं कृत्यें वर्णिलीं असून त्यांत समुद्रांत बुडणाऱ्या सूर्यकन्येला नावेंत बसवून देवांनीं तारिल्याचें सांगितलें आहे. देवांचे पराक्रम वर्णितांनां नावा आणि रथ या दोघांचेहि उल्लेख केलेले असतात (ऋ. १,११६,३,८,५,२९;१,४६,७). त्यांपैकीं नावांचा उपयोग खालच्या समुद्रांतून येतांनां केलेला असून रथांचा आकाशांत

करीत. पण कधीं कधीं याच्या उलटही प्रकार दिसतो. उदाहरणार्थ दीर्घतमा हा दहा महिने पाण्यावरच जात असून दहा महिन्यांनंतर जीर्ण होऊन पाण्यांच्या स्थानाकडे म्हणजे पृथ्वीच्या खालीं असलेल्या समुद्राकडे जातो असे वर्णन आहे. असो. वायूरूप जलांच्या प्रवाहाची कल्पना आर्य पुराणातच नसून इजिप्शन व यहुदि लोकांच्या पुराणांतही आहे. तात्पर्य ही कल्पना सर्व देशांतील पुराणांत आढळत असल्यामुळें वर लिहिल्याप्रमाणे वृत्राच्या कथेतील पाणी व प्रकाश यांच्या एकदम हो-ण्याच्या मुक्ततेचा उलगडा करण्यांत तिचा उपयोग करून घेण्याला खोट्या पूर्वग्रहाशिवाय दुसरा कांहीं प्रत्यवाय दिसत नाहीं.

आतां प्रकाश व पाणी यांची एकदम मुक्तता कशी होते हें कळण्या-साठीं दिव्य जलांच्या भ्रमणाच्या कल्पनेचा उपयोग करून घेण्याचें कबूल केल्यावर प्रश्न असा येतो कीं वृत्रकथेचा उलगडा करण्यांत ध्रुवाजवळील वसतीच्या कल्पनेचा उपयोग कसा होणार? वृत्राने अडविलेली जले म्हणजे तीन पृथ्वीच्या खालीं असलेलीं दिव्य जले असें कबूल केले; पण तेवढ्यावरून ध्रौविक वसतिस्थानाची कल्पना त्याला कशी उपयोगी पडणार? इंद्रवृत्रांचे युद्ध रोजचे आहे असे मानण्याला त्यांत कांहीं प्रत्य-वाय नाही असेही कोणी म्हणेल. पण थोड्या विचाराअंतीं रोजच्या युद्धाच्या कल्पनेवर त्या युद्धांतील सर्व गोष्टींचा उलगडा होत नाहीं असें दिसून येईल. वृत्राला मारण्याचा काल वर्षाच्या अखेरीचा आहे(१०,६२,२). या गोष्टीवरून हे युद्ध दैनिक नसून वार्षिक आहे असे उघड दिसतें. आणखी इन्द्रानें अर्बुदाला वज्राच्या ऐवजी हिमानें मारिलें आहे ( ८,३२,२६ ). तेव्हां हे युद्ध नुसतें वार्षिक नसून हिवाळ्यांतच होणारे आहे. वृत्राचे किल्लेही 'शारदीय' आहेत. या सर्व गोष्टीचा उल्लेख दैनिक युद्धाच्या कल्पनेवर होणारा नसून ध्रुवस्थानाच्या कल्पनेवरच होणारा आहे.

इन्द्राचें वृत्राशीं होणारें युद्ध शरदृतूंत सुरू होऊन शिशिराच्य अखे-रीस संपत असे, असें जें अनुमान वरील विवेचनांत काढिलें आहे तें ऋग्वेदांतील एका महत्वाच्या वचनावरून फारच दृढ होतें. या वचनांत इंद्रवृत्रांच्या युद्धाची तिथीच दिली आहे. ऋ. २,१२,११ यांत* " पर्व-

* यः शंबरं पर्वतेषु क्षियन्तं **चत्वारिंश्यां शरद्यन्वविंदत्** । ओजायमानं यो अहिं जघान दानुं शयानं स जनास इंद्रः ॥ ऋ. २,१२,११.

तावर रहाणारा शंबर शरदृतूंत चाळिसाव्या दिवशीं इंद्राला आढळला. " असे ह्मटले आहे. यांत मूळचे शब्द **चत्वारिंश्यां शरदि** असे आहेत. **चत्वारिंश्यां** हें स्त्रीलिंगी चत्वारिंशी या क्रमवाचक संख्या विशेषणाचे सप्तम्यंत एकवचन असून त्याचा अर्थ ' चाळिसावींत ' असा आहे. **शरदि** हें ही शरद् या स्त्रीलिंगी नामाचे सप्तमीचें एकवचन आहे. संस्कृतांत नामाच्या लिंग–वचन-विभक्तीप्रमाणे विशेषणाच्याही लिंगवचनविभक्ति असाव्या लागतात. या साधारण नियमाप्रमाणें **चत्वारिंश्यां शरदि** या शब्दांचा अर्थ ' चाळिसाव्या शरदांत ' ऊर्फ ' चाळिसाव्या वर्षी ' असा होतो; कारण संस्कृतामध्ये वसंतादि ऋतु-वाचक शब्द संवत्सरवाचकही आहेत. हाच अर्थ सायणासह सर्व टीकाकारांनी घेतला आहे. पण 'इंद्राला शंबर चाळिसाव्या वर्षी सांपडला ' या ह्मणण्याचा अर्थ काय ? इंद्र त्याला चाळीस वर्षे शोधीत होता की काय ? तसे समजल्यास हें युद्ध वार्षिक नसून चाळीस वर्षांनीं एकदां होणारे आहे असें होईल. पण ' अभिन्दन्परिवत्सरे वलं ' (१०,६२,२) या वचनाच्या हें अगदी उलट आहे. आर्य व अनार्य यांच्यांत चाळीस वर्षे चाललेल्या युद्धावरील हे रूपक आहे असे कांहीं पंडित समजतात. पण इंद्राचे शत्रू अनेक नामांनी प्रसिद्ध असल्या-मुळे ही कल्पना मुळींच ग्राह्य नाही. शंबराशीं झालेले युद्ध गविष्टीसाठीं आहे असें निविदांत स्पष्ट ह्मटले * आहे. तात्पर्य ' चाळीसाव्या वर्षी ' शंबर इन्द्राला सांपडला, या ह्मणण्यांत कांहीं अर्थ दिसत नाहीं. पण ' चत्वारिंश्यां शरदि ' या शब्दांचा ' चाळिसाव्या शरदांत ' असाच अर्थ घेण्याचें कारण नाहीं. एकाद्या

* निविद् नामक लहान सूत्रमय वाक्यांत इंद्राचे पराक्रम थोडक्यांत पण सुरेख वर्णिले आहेत. या निविद् देवांना हवि देण्याच्या वेळीं म्हणावयाच्या असतात. ईंद्राचे पराक्रम वर्णन करणाऱ्या निविदांपैकीं कांहीं अशाः—' इंद्रो मरुत्वान् सोमस्य पिबतु । ... । घ्नन्वृत्रासृजदपः । मरुतामोजसा सह । ... । अप्तूर्ये वृत्रतूर्ये । शंबरहत्ये गविष्टौ । ... । परमस्यां परावति । ... । वज्रस्य भर्ता । पुरां भेत्ता ।...। अपां स्रष्टा । अपां नेता । ' या निविदांत 'शंबरहत्य म्हणजे शंबराशीं झालेलें युद्ध आणि ' गविष्टि ' म्हणजे गाईसाठीं झालेलें युद्ध यांना एकच म्हटलें आहे.

गोष्टीचा महिना, दिवस वगैरे सांगतांनां त्या शब्दाची सप्तमी घालण्याचा संस्कृतांत चांगला प्रघात आहे. ' कार्तिके शुक्ले त्रयोदश्यां ' असे संस्कृतांत ह्मणतात. याचा अर्थ ' कार्तिक शुद्ध त्रयोदशीला ' असा होतो. विशेषेंकरून तिथि सांगतांना क्रमवाचक संख्याविशेषणाची सप्तमी घालून तिथिशब्द बहुधा गाळलेला असतो. तैत्तिरीय ब्राह्मणांत ( १, १, ९, १० ) ' यदि संवत्सरे न आदध्यात् द्वादश्यां पुरस्तात् आदध्यात् ' ह्मणजे ' जर संवत्सराच्या शेवटीं अग्न्याधान केलें नाहीं तर पुढें द्वादश दिवशीं करावें ' असें ह्मटलें आहे. त्यांत ' द्वादश्यां ' याच्या पुढें ' तिथौ ' शब्द न घालतां अध्याहृत ठेवला आहे. या रीतीला अनुसरून ' चत्वारिंश्यां शरदि ' या शब्दांचा अर्थ केल्यास ' शरदृतूंत चाळिसाव्या दिवशीं ' असा सरळ अर्थ होतो. ह्मणजे या अर्थाप्रमाणे इन्द्राला शंबर शरदृतूच्या चाळिसाव्या दिवशीं सांपडला असें झालें.

आतां शरदृतु हा चवथा ऋतु असल्यामुळें त्याचा चाळिसावा दिवस ह्मणजे वसंतापासून सुरू होणाऱ्या वैदिक संवत्सराचा २२० वा दिवस होय. ह्मणजे प्राचीन रोमन वर्षाप्रमाणें इंद्राला शंबर आढळला तो आक्टोबरच्या दहाव्या तारखेला आढळला असला पाहिजे. प्राचीन रोमन लोकांच्या वर्षाला मार्चपासून सुरुवात होत असे हे पूर्वीं सांगितलेंच आहे. तेव्हां पासून २२० वा दिवस ह्मणजे ७ महिने संपून आठव्याचा दहावा दिवस होय. ऋ. १, १५५, ६ यांत विष्णूनें चोहोंबरोबर नव्वदांनां वाटोळें फिरावयास लाविल्याचे सांगितलें आहे. याचा संबंध ९० दिवसांच्या चार ऋतूंशीं असला पाहिजे. हा वर्षविभाग खरा धरल्यास शरद् हा तिसरा ऋतु होतो, व त्याचा ४० वा दिवस ह्मणजे पुनः वर्षाच्या ८ व्या महिन्याचा दहावा दिवसच होतो. अदितीच्या सात पुत्रांची गोष्ट सांगतांनां तिनें टाकून दिलेला आठवा पुत्र ह्मणजे काळोखाचा आठवा महिना होय हें सांगितलेंच आहे. हा आठवा पुत्र अपरिणत स्थितींत असल्यामुळें तिनें टाकून दिला ह्मणजे सात महिने संपून आठवा महिना पुरा होण्यापूर्वींच सूर्य क्षितिजाखालीं गेला असा अर्थ उघडच आहे. हा काळ व शरदृतूचा चाळिसावा दिवस हे दोन्ही अगदीं मिळते आहेत; व या दोन्ही स्थळांचा

योग्य अर्थ कोणत्याही चालू कल्पनेवरून होत नसल्यामुळें वर सांगितलेलाच अर्थ घेतल्याशिवाय आपल्याला गत्यन्तर नाहीं.

या अर्थाप्रमाणें शरद् हा वर्षांतील शेवटचा प्रकाशयुक्त ऋतु होतो. शरद् शब्द शृ—जीर्ण होणें या धातूपासून निघाला आहे. ह्मणजे त्याचा धात्वर्थ 'जीर्ण होण्याचा ऋतु' असा आहे. यांत जीर्ण होणारा 'सूर्य' असून सायणाचार्यांनीं ह्मटल्याप्रमाणें 'तृण' वगैरे नव्हे. तै. *संहितेंत 'आदित्याचीं तीन तेजें आहेत, त्यांत वसंतरूपी प्रातःकालांतील पहिले, ग्रीष्मरूपी मध्यान्हांतील दुसरें आणि अपराण्हरूपी शरदांतील तिसरें' असे सांगितलें आहे. यांत प्रातः, मध्यंदिन आणि अपराण्ह यांचा नेहमींचा अर्थ असेलसें वाटत नाहीं. या तीन स्थिति सूर्याच्या वार्षिक गतीच्या असून त्यांत शरदाला सायंकाल ह्मणजे जीर्ण होण्याचा काळ ह्मटले आहे. ह्मणजे शरदानंतर प्रकाशाचा काल नाहीं असें यावरून उघड दिसतें. शबरानें जैमिनीसूत्रांवरील आपल्या भाष्यांत एक वेदवचन ह्मणून ¶ दिलें आहे. त्यांत 'आदित्य हाच सर्व ऋतु होय. तो उगवतो तेव्हां वसंत, गोदोहनकालीं ग्रीष्म, मध्यंदिनीं वर्षा, अपराण्हीं शरद् व मावळल्यावर हेमंतशिशिर' असे ह्मटले आहे. याचा जर कांहीं अर्थ होत असेल, तर तो एवढाच कीं, सूर्याचें तेज शरदतूंत अगदी कमी होऊन त्याच्या पुढचे दोन ऋतु अंधारमय होत, ह्मणजे त्या ऋतूंत सूर्य क्षितिजाखालीं जाई. रात्रिवाचक हिम्या शब्द ऋग्वेदांत (१,३४,१) आला असून त्यावरूनही रात्रीचा हिमाशीं व शिशिर ऋतूशीं असलेला संबंध स्पष्ट दिसत आहे.

पण प्राचीन काळी केवळ ऋतु व दिवस एवढ्यावरच कालगणना करीत असत असे मानावयास प्रमाण काय? असा प्रश्न या विवेचनावर उत्पन्न होईल. या प्रमाणाच्या अभावीं **चत्वारिंश्यां शरदि** याचा

---

* त्रीणि वा आदित्यस्य तेजांसि वसंता प्रातर्ग्रीष्मे मध्यंदिने शरद्यपराण्हे। यावंत्येव तेजांसि तान्येवावरुंधे। तै. सं. २,१,२,५.

¶ आदित्यो वा सर्व ऋतवः स यदैवोदित्यथ वसंतो यदा संगवोऽथ वर्षा यदाऽपराण्होऽथ शरद् यदास्तमेत्यथ हेमंतशिशिरौ। यांत सूर्याच्या वार्षिक क्रमापैकीं हेमंतशिशिर हे ऋतु रात्रीसारखे आहेत असें स्पष्ट सांगितलें आहे.

अर्थ ' शरदृतूच्या चाळिसाव्या दिवशीं ' असा करतां येणार नाहीं. पण हा आक्षेप निराधार आहे. मुंबई सरकारनें १८८१ सालीं छापिलेल्या पश्चिम हिंदुस्थानांतील शिलालेखांसंबंधाच्या पुस्तकांत चवदाव्या ‡ लेखाचा काल दिला आहे तो असाः—" रञो वासिठिपुतस सामिसिरि पुळुमायिस सवछरे सतमे ७ गिह्मपंखे पचमे ५ दिवसे पथमे १; याचें संस्कृत असें— " राज्ञो वासिष्ठीपुत्रस्य स्वामिश्री पुलुमायिनः संवत्सरे सप्तमे ७ ग्रीष्म-पक्षे पंचमे ५ दिवसे प्रथमे." ' वासिष्ठीपुत्र स्वामिश्री पुलुमायि राजाच्या सातव्या वर्षी ७ ग्रीष्माच्या पांचव्या पक्षांत ५ पहिल्या दिवशीं ' असा याचा अर्थ आहे. ग्रीष्माचा पांचवा पक्ष ह्मटला आहे त्यावरून त्यांत वर्षाचे सहा ऋतु न मानितां ग्रीष्म, वर्षा व हेमंत हे तीनच मानिले असावे असे दिसतें. पण ते कसेंही असलें तरी त्यांत महिन्याचा उल्लेख न करितां ऋतु, पक्ष व दिवस यांवरच काल सांगितला आहे ही गोष्ट महत्वाची आहे. याच्या पुढच्या विसाव्या* लेखांत " वासिष्ठीपुत्र पुलुमायी राजाच्या २४ व्या वर्षी हेमंताच्या पांचव्या पक्षांत, दुसऱ्या दिवशीं " असा लेखकाल दिला आहे. तिसऱ्या§ एका लेखाचा काल " माढरीपुत्र स्वामिश्रीसेन राजाच्या आठव्या वर्षी ग्रीष्माच्या पांचव्या पक्षांत दहाव्या दिवशीं " असा दिला आहे. डॉ. रा. गो. भांडारकर यांनी आपल्या ' दक्षिणच्या इतिहासां'त **माढरीपुत्राचा** काल इ. स. १९०—१९७ हा व पुलीमयीचा त्याच्यापूर्वी ६० वर्षें ह्मणजे सन १३०— १५४ असा ठरविला आहे. ह्मणजे हे तिन्ही लेख दुसऱ्या शतकांतील म्हणजे आर्यभट्ट व वराहमिहिर यांच्या पूर्वीचे आहेत. ऋतु, मास, पक्ष व तिथि यांनीं कालगणना करण्याची पद्धति आर्यभट्ट व वराहमिहिर

---

‡ हा लेख कार्ल्यांच्या लेण्यांतील आहे.

* सिधं रञो वासिठिपुतस सिरिपुळिमाविस सवछेर चतुविसे २४ हेमतान पंखे ततिये ३ दिवसे बितिये २; याचें संस्कृतः—सिद्धम् । राज्ञो वासिष्ठीपुत्रस्य श्रीपुळिमावेः संवत्सरे चतुर्विंशे २४, हैमंतानां पक्षे तृतीये, दिवसे द्वितीये २।

§ हा लेख कान्हेरी येथील लेण्यांतील आहे—सिधं रञो माढरिपुतस स्वामि सिरिसनेस सवछेरे ८ गिप ५ दिव १० । याचें संस्कृतः—सिद्धम् । राज्ञो माढरि-पुत्रस्य स्वामिश्रीसेनस्य संवत्सरे ८, ग्री. प. ५ दिव. १० ।

यांच्या ग्रंथांपासून रूढ झालेली आहे. म्हणजे त्यांच्यापूर्वी महिना न सांगतां ऋतु, पक्ष व दिवस एवढ्यावरच कालगणना करण्याची पद्धति असल्यामुळे प्राचीन काळी याहूनही साधी म्हणजे केवळ ऋतु व दिवस यांवरच काळ सांगण्याची रीत होती असें मानावयास मुळीच हरकत नाही. अवेस्त्यामध्येही ही रीत आढळून येते. परंतु ध्रुवस्थानाची कल्पनाच कोणाला न शिवल्यामुळे 'चत्वारिंश्यां शरदि' या शब्दांचा खरा अर्थ कोणाला आजपर्यंत कळला नाही; व 'चत्वारिंश्यां' या स्त्रीलिंगी शब्दाचा 'शरदि' शब्दाशी व्याकरणरीत्या सहज मेळ बसल्यामुळें ही चूक वज्रलेप झाली. आह्मी सुचविलेला अर्थ अगदी साधा व सरळ आहे. 'चत्वारिंश्यां' हें 'शरदि' याचे विशेषण न घेतां ते दोन्ही शब्द स्वतंत्र सप्तम्यंत मानिले म्हणजे झाले. पण त्यामुळे अर्थामध्यें होणारा फरक मात्र दांडगा आहे. ध्रौविक वसतिस्थानाची कल्पना माहीत नव्हती तेव्हां या अर्थाकडे लक्ष न जाणें स्वाभाविक होते. पण आतां ती माहीत झाल्यावर इंद्राला शंबर शरदाच्या चाळिसाव्या दिवशी सांपडला, वलाची पुरें शारदीय आहेत, किंवा अर्बुदाला इंद्राने हिमाने मारिले इत्यादि गोष्टींचा खरा अर्थ कळण्यास अडचण पडणार नाही. ध्रुवप्रदेशांत आठव्या महिन्यांत सूर्य क्षितिजाखाली गेल्यावर, दीर्घ संध्या व तिच्या मागून येणारी सुमारे शंभर दिवसांच्या अवधीची अखंड रात्र व तीस दिवसांची उषा या गोष्टीतच वृत्रकथेचे मूळ असून त्या कल्पनेवरच त्या युद्धांतील प्रत्येक बाबीचा उलगडा करतां येतो.

वृत्रकथेंत आणखी एक बाब लक्षांत ठेवण्यासारखी आहे. तिचा हें परीक्षण पुरे करण्यापूर्वी थोडा विचार केला पाहिजे. वृत्रवधानंतर जलें व प्रकाश ही दोन्ही मोकळी होतात हे वर सांगितलेंच आहे. या जलांनां कधीं कधी 'सिन्धवः' असें ह्मणून त्या **वर** वहातात (उदंच), व त्या सात आहेत असें ह्मटलें आहे. दिव्य जलांच्या आकाशभ्रमणाच्या कल्पनेवर त्या नद्या (सिन्धवः) वर कशा वहातात हें समजतें. पण त्या सातच कां असाव्या हें सांगतां येत नाहीं. पर्जन्याच्या कल्पनेच्या पुरस्कर्त्यांच्या मतें ह्या सात नद्या पंजाबांतील असून इन्द्रानें मेघ फोडून पाण्यांना मोकळें करून दिल्यावर त्या जोरानें वाहूं लागतात. ऋ.

१०, ७५ या सूक्तांत* ज्या नद्या वर्णिल्या आहेत त्यांशी या 'सप्तसिन्धवः'चा संबंध लावून ते अवेस्त्यांतील 'हप्तहिंदु' या शब्दाकडे बोट दाखवून त्याचा अर्थ 'पंजाब' असा घेतात. सकृद्दर्शनी ही कल्पना सुदर दिसते; पण तीवरून सप्तसिधूचा खरा अर्थ लागत नाहीं. दिव्यजलांच्या भ्रमणाच्या कल्पनेशिवाय प्रकाश व पाणी यांची मुक्तता एकदम कशी होते हें समजत नाहीं; ही गोष्ट कबूल केली ह्मणजे इन्द्रानें **वर** वहावयास लाविलेल्या नद्या जमिनीवरच्या नव्हेत हें उघड होतें. शिवाय पंजाब शब्दाचा अर्थ सात नद्यांचा देश असा नसून पांच नद्यांचा देश असा आहे; आणि वाजसनेयी$ संहितेत ( ३४, ११ ) त्याचे तसेंच वर्णन केलेलें आहे. ऋग्वेदांतील ( १०, ७५ ) नद्यांच्या सूक्तांत एकंदर पंधरा नद्यांची नांवें आहेत, पण त्यांपैकीं सप्तसिधूंत कोणत्या घ्यावयाच्या हें काठेंही सांगितलेलें नाहीं. त्यामुळें निरनिराळे पंडित सप्तसिंधूंत निरनिराळ्या नद्यांचा समावेश करतात. ह्मणून 'पांच नद्यांचा' ह्मणून प्रसिद्ध असलेला देश पूर्वीं सात नद्यांचा होता, असें मानण्यांत पुष्कळ अडचणी येतात. **सप्त सिंधवः** हा शब्द ऋग्वेदांत दहा बारा वेळां आला असून त्यांपैकीं पांच ठिकाणीं सात नद्या ह्मणजे प्रकाशाबरोबर वाहूं लागणाऱ्या नद्या होत असें स्पष्ट ह्मटलें आहे ( १, ३२, १२, २, १२, ३; इ. ). अर्थात् त्या पृथ्वीवरील नव्हत हें उघड आहे. 'सप्तसिन्धवः' शब्द पृथ्वीवरील नद्यांचा बोधक असा कोठेंही नाहीं असें आमचें ह्मणणें नाहीं. ऋग्वेदांत सप्तसिन्धूंचे तीन कलाप दिलेले आहेत; पहिल्यांत दिव्य नद्यांचा, दुसऱ्यांत पृथ्वीवरील व तिसऱ्यांत पाताळांतील नद्यांचा समावेश होतो. ह्मणजे पुराणांत वर्णन केलेल्या गंगेप्रमाणें ह्या नद्या आकाश पृथ्वी व पाताळ या तिन्ही ठिकाणीं होत्या असें वैदिक ऋषी मानीत असत असें दिसतें. ह्मणून खास पृथ्वीवरच्या अशा सात नद्या वैदिक ऋषींना माहित नव्हत्या असें ह्मणतां येणार नाहीं. पण

---

* इमं मे गंगे यमुने सरस्वति शुतुद्रि स्तोमं सचता परुष्ण्या । असिक्न्या मरुद्वृधे वितस्तयार्जीकीये शृणुह्या सुषोमया ऋ. १०,७५,५.

$ पंच नद्यः सरस्वतीमपि यंति सस्रोतसः । सरस्वती तु पंचधा सो (सा+उ) देशेऽभवत् सरित् ॥ वा. सं. ३४, ११.

हा सप्तांकमूलक विभाग पंजाबांतील सात नद्यांवरून सुचलेला असावा असे मानण्यास मात्र कांहीं आधार नाहीं. दुसरें असें कीं, सप्तांकमूलक असा विभाग ऋग्वेदांत नद्यांचाच केवळ नसून दुसऱ्याही अनेक वस्तूंनां तो लागू केलेला आहे. पृथ्वीवरील सात धामें ( घरे ) (१,२२,१६), सप्त सानु ( ८,९६,२ ), सूर्याचे सात किरण किंवा अश्व (१,१६४,३,),सात दिशा, सात आदित्य इत्यादिकांतही हाच विभाग आहे. पुराणांतही, सप्त स्वर्ग, सप्त पर्वत, सप्त समुद्र, सप्त पाताळें वगैरे प्रसिद्ध आहेत. अवेस्ता व ग्रीक कथा यांतही हा सप्तमूलक विभाग आलेला आहे. ह्मणजे सात नद्या हें या सप्तमूलक विभागाचें एक उदाहरण असल्यामुळें पंजाबांतलि सात नद्यांवरून तो सुचला असावा असे ह्मणतां येणार नाहीं. कारण तसें समजल्यास आर्य लोकांची फुटाफूट होण्यापूर्वी त्यांचें वसतिस्थान पंजाबांत होतें असें ह्मणावे लागेल. तर मग आतां या सात नद्यांचा उलगडा कसा करावयाचा ? या प्रश्नाचे उत्तर जलें व प्रकाश यांची मुक्तता एकदम कशी होते हे पाहिलें ह्मणजे मिळेल. ऋ. २,१२,१२ यांत 'सप्तसिंधू' ना मोकळें करणाऱ्या इंद्राला 'सप्तरश्मि' ह्मटले आहे; त्यावरून सात किरण व सात नद्या यांमधील संबंध लक्षांत येईल. जलें व सूर्य हे बरोबर गमन करीत असल्याचे अवेस्त्यांत सांगितले आहेच. या दोन्ही गोष्टीचा विचार केल्यास सात सूर्यांना सात घोडे किंवा सात नद्या वाहून नेण्यास लागतात असे स्वाभाविकच अनुमान होते. अदितीचे सात पुत्र सात दिशांत स्थापिलेले असून ते सात महिने उत्पन्न करतात हे अदितीच्या कथेवरून पूर्वी दाखविलेंच आहे. आतां हे सात निराळे सूर्य सात नद्यांशिवाय निरनिराळ्या दिशांतून फिरणार कसे ? तात्पर्य प्रकाश व नद्या यांतील निकट सबंध कळल्यावर ही दोन्ही सात प्रकारची कशीं हें समजणें अवघड नाहीं. ९,५४,२ यांत आकाशांतील सात नद्या सांगितल्या आहेत. पर्जन्याची कल्पना व पंजाबाची वस्तुस्थिति यांवरून सात नद्या मोकळ्या झाल्याबरोबर उषा क्षितिजावर कशी येते हें सांगतां येणे शक्य नसल्यामुळें, व दिव्य जलांचें भ्रमण आणि ध्रवावरील वसतिस्थानाची कल्पना यांच्यावरच त्या गोष्टींचा उलगडा करतां येत असल्यामुळें पाश्चात्य पंडितांची कल्पना कितीही वाक्पांडित्यानें खुलविलेली असली तरी ती त्याज्य होय. आतां सप्तसिंधुवाचक असा

'हप्तहिंदु' हा शब्द अवेस्त्यांत कसा आला हे सांगावयास दूर जावयाला नको. हप्तहिंदुप्रमाणे **वारेण** ( वरुण ), **हैतुमंत** ( सेतुमत् ) **रंघ** ( रसा ) **हरह्वैति** ( सरस्वति ) इत्यादि शब्दही अवेस्त्यांत आलेले आहेत. हे शब्द जर फाटाफूट होण्याच्या पूर्वीचे आहेत तर 'हप्तहिंदु' हाही तसाच असला पाहिजे. हीं सर्व नावे आर्यांनी आपल्या मूलस्थानांतून नवीन वसाहतींत नेली व तेथे नवीन स्थळाना ती दिली, असें मानणें सयुक्तिक व स्वाभाविक दिसते. हिंदुस्थानाप्रमाणे ब्रह्मदेशांतही अयोध्या, मिथिला वगैरे शहरांची नावे आहेत. हिंदुस्थानांतून तिकडे वसाहत करण्यासाठी जाणाऱ्या लोकांनी ती दिलेली आहेत असे म्हणतात. हीच गोष्ट सप्तसिंधुवाचक हप्तहिंदूची असली पाहिजे. म्हणजे हप्तहिंदु हे नाव पारशी लोकांच्या पूर्वजांनी पंजाबाला वस्तुस्थितीवरून दिलेले नसून तें त्यांनीं आपल्या मूल स्थानांतूनच आणलेले असले पाहिजे.

येथपर्यंत केलेल्या विवेचनावरून एवढे दिसून येईल की, वृत्राच्या बंदीतून इंद्राच्या साहाय्याने मुक्त होणाऱ्या जलाचे खरे स्वरूप व गति ही अगदी ब्राह्मणकालापासूनच बरोबर माहीत नाहीशी झालेली आहेत. पूपन् ही देवता अंतरिक्षाचे आक्रमण नावेतून करीत असल्याबद्दलची वचन ऋग्वेदांत कित्येक आहेत. पण अश्विन किंवा सूर्य हे बहुधा रथांतूनच गमन करीत असल्याचे वर्णन आहे. यावरून अंतरिक्ष हें दिव्य जलांचें निवासस्थान नसून इंद्राच्या हातून मुक्त होणारीं जलें ह्मणजे ढगांतून सांठविलेली जलेच होत असे निरुक्तकारादिकांस वाटले. वृत्रवधानंतर वाहूं लागणाऱ्या सात नद्या म्हणजेही गंगायमुनादि नद्यांप्रमाणेंच भारतीय नद्या होत अशी त्यांनी आपली समजूत करून घेतली. पण असे करतांना त्यांना पर्वत, गिरि इत्यादि शब्दाची ओढाताण करून त्यांच्यापासून 'मेघ' असा जबरीचा अर्थ काढावा लागला. पुढे पाश्चात्य पंडिताच्या हातांत हा प्रश्न गेल्यापासून 'हप्तहिंदु' या नांवावर भुलून त्यांनी त्या नद्या ह्मणजे पंजाबांतील नद्या असा अर्थ केला. पण पंजाब पांच नद्यांचा देश असून सात नद्यांचा नव्हे. नद्या सुरू झाल्याबरोबर उषा दिसूं लागते एवढ्या एकाच गोष्टीवरून त्या नद्या पंजाबांतील नव्हत असे सिद्ध होतें. यावरून पंजाबांत ऋग्वेदकाळी आर्यांची वसाहत नव्हती असें म्हणण्याचा इरादा नाही. कारण ऋग्वेदांत पंजाबांतील नद्यांचीं नांवेंच स्पष्ट आलेलीं

आहेत. असो, तर आतां वेदांत सांगितलेल्या सप्तसिंधु म्हणजे जर पंजाबांतील नद्या नव्हत, तर वृत्राच्या कथेचा उलगडा करण्याची दुसरी कांहीं कल्पना काढणें जरूर आहे. वायुरूप जलें किंवा दिव्य नद्या ह्या खालच्या लोकांतून वर आकाशांत व तेथून पुनः खालच्या लोकांत, सूर्य-चंद्रतारकांसह वहात असतात या कल्पनेवर वृत्रकथेंतील सर्व बाबींचा चांगला उलगडा होतो. वृत्र आपलें शरीर फुगवून क्षितिजाजवळील पर्वतांची द्वारें कशी बंद करी व त्यामुळे दिव्य जलें वर न येऊन सूर्य व उषा हींही आर्यांच्या ध्रुवाजवळच्या मूलस्थानांत बराच काळपर्यन्त उगविण्याची कशी थांबत या गोष्टींचा आतां चांगला उमज पडतो. दिव्य जलें आकाशांतून वहातात ही कल्पना सर्व राष्ट्रांच्या पुराणकथांत आढळून येते; व तीवरून इंद्रवृत्रांच्या युद्धाचें चौहेरी स्वरूप चांगलें समजून येते. **अपांनेता,** किंवा **अपांस्रष्टा** असा इंद्र म्हणजे ढगांतील पाण्यांना मुक्त करणारा नसून ज्या जलबाष्पांनीं सर्व विश्व व्यापून टाकिलें आहे; व ज्यांपासूनच इंद्रानें हें जगत् निर्माण केलें त्या जलबाष्पांचाच **नेता** किंवा **स्रष्टा** होय. म्हणजे इन्द्रवृत्रांचे युद्ध ही पावसाळ्यांत दिसून येणारी साधी गोष्ट नसून विशेष आश्चर्याची व सर्व विश्वाशीं संबंध असणारी गोष्ट होय. म्हणूनच वृत्रवध हा इंद्राच्या सर्व पराक्रमांत मोठा पराक्रम आहे. शंभर सोमांचे हविर्भाग मिळाल्यामुळें पुष्ट होऊन इंद्र आपल्या तमांतील शत्रूला मारून सात नद्यांना मोकळें करी, व मग त्या सूर्य चंद्र उषा यांना घेऊन वर वाहूं लागत. हें युद्ध शरदृतूच्या चाळिसाव्या दिवशीं सुरू होऊन वसंतारंभापर्यंत चालू असे. इंद्र हा पर्जन्यदेवता नव्हेच असें म्हणतां येत नाहीं. कारण ऋग्वेदांत कित्येक ठिकाणीं तो पाऊस पाडतो असें म्हटलेलें आहे. पण वृत्राला मारून नद्या व उषा यांना मुक्त करणारा इंद्र कांहीं पर्जन्यदेवता नव्हे. वृत्रानें अडवून धरिलेल्या पाण्याची गोष्ट अगदीं प्राचीन आहे. **वृत्र** हा **आर्थ्रास** या रूपानें ग्रीक पुराणांत व **वृत्रहन्** हा **वेरेथ्रघ्न** या रूपानें पारशी ग्रंथांत आला आहे. कदाचित् इंद्र व वृत्रहन् हे मूळचे एक नसतील. कारण इंद्र* शब्द यूरोपांतील आर्य-

* संस्कृत ‘ इंद्र ’ शब्दाचें कै० म० मो० कुंटे यांनीं जर्मन ‘ आदिन् ’ शब्दाशीं साम्य दाखविलें आहे. भरतखंडांतील आर्यसुधारणेची स्थित्यंतरें, वैदिककथा प्रकरण.

भाषांत सांपडत नाहीं. इन्द्राला वैदिक देवतांत प्रधानस्थान मिळाल्यावर मूळचे वृत्रहन्चे पराक्रम इंद्राच्या पदरीं कदाचित् बांधले असतील. कसेंही असलें तरी वृत्रकथेसंबंधानें वर काढिलेल्या अनुमानांना त्यापासून मुळींच बाध येत नाहीं. या कथेचें मूळ ढग व पाऊस यांत नसून अखंड काळोखाच्या दीर्घरात्रीनंतर येणाऱ्या प्रकाशांत आहे, हे अगदीं उघड आहे. इंद्राला पर्जन्यदेवतात्व मागाहून आलें असो किंवा कोणा अन्य देवतेचे वृत्रवधादि पराक्रम मागाहून पर्जन्यदेवतेला लाविलेले असोत, वृत्रानें कोंडून ठेविलेली जलें हीं पृथ्वीखालच्या समुद्रांत वास्तव्य करणारीं वायुरूप जलें असून त्यांचा बंदिवास व मुक्ति ही ध्रुवाजवळील आर्यांच्या मूलस्थानांत प्रतिवर्षी होणाऱ्या प्रकाश व दीर्घ काळोख यांवरील रूपकें होत यांत कांहीं संशय नाही. हा खरा प्रकार जो आजपर्यंत अज्ञात राहिला, त्याचें कारण प्राचीन मनुष्यासंबंधाचे आपले ज्ञानच आजपर्यंत फार कोते होते हे होय.



# प्रकरण १० वें.

## वैदिक कथा—प्रातःकालिक देवता.

वसंतोपपत्ति आणि अश्विनांच्या कथा—जलें व प्रकाश यांच्यासाठीं होणाऱ्या युद्धांत अश्विनांनी केलेलें काम—त्याचा ध्रुवोपपत्तीवरच कायतो उलगडा होण्यासारखा आहे—अश्विनांच्या पराक्रमाविषयींच्या कथा—च्यवान, रेभ, भुज्यु, अत्रि, वंदन इत्यादिकांना त्यांनी वृद्धाचें तरुण केले, किंवा समुद्रांतून वर काढिले, दृष्टि दिली वगैरे—प्रात्याहिक उषेच्या उदयावर किवा हिंवाळ्यांत निस्तेज होणाऱ्या सूर्याच्या वसंतऋतूंत पुनः तेजस्वी होण्यावर या सर्व कथांचा अर्थ आजवर लावण्यांत आलेला आहे—पण या कल्पनेवर त्या कथेंत आलेल्या अंधत्वाचा किंवा काळोखाचा अर्थ लागत नाही, तसाच त्यावरून अश्विनांनी तारिलेल्या भक्तांच्या संकटाच्या अवधीचाही खुलासा होत नाहीं—तसाच त्या संकटाच्या स्थानाचाही उलगडा होत नाहीं—अगाध व काळोखाचा समुद्र ह्मणजे पाताळ लोक होय—वर तळ असलेला उपडा कटाह ह्मणजे पाताळांतील उलटें गोलार्ध होय—ऋज्राश्वाची कथा—शंभर मेषांचा वध म्हणजे शंभर दिवसांचा अवधि काळोखाचा करणें—सप्तवध्रीची कथा—दहा महिन्यांच्या गर्भावस्थेनंतर सुखरूप प्रसूतीसाठी प्रार्थना करणें—या कथेचा उलगडा अद्यापि झालेला नाहीं—वेदांत द्यावापृथ्वीच्या मधल्या प्रदेशाला गर्भाचें स्थान कल्पिलें आहे—क्षितिजावर असणारा सूर्य यांत फिरत असतो—दहा महिन्यांची गर्भावस्था म्हणजे सूर्याचे दहा महिने क्षितिजावर असणें—सुखरूप प्रसूतीसाठी केलेल्या प्रार्थनेवरून दीर्घ रात्री बिषयींची चिंता दिसून येते—पुत्र जन्मल्यावर लगेच अदृश्य होणें म्हणजे काय ?—गुप्त अग्नीची कथा या संबंधींच असावी—कुमाराच्या कथेचें वेदांतील मूळ—अश्विनांच्या पराक्रमांचा योग्य उलगडा करण्यांत वसंतोपपत्तीपेक्षां ध्रुवोपपत्तीच अधिक चांगली दिसते—सूर्याचें चक्र चोरणाऱ्या इंद्राची कथा—**दशप्रपित्वं**च्या अर्थाविषयी विवेचन—त्यावरून दहा महिन्यांनंतर येणाऱ्या दीर्घ काळोखाचा बोध होतो—विष्णूचीं तीन पावलें—त्यांविषयीं निरनिराळीं मतें—विष्णूची पावलें सूर्याच्या वार्षिक गतीची दर्शक होत—तिसरें अदृश्य पाऊल म्हणजे पाताळ लोक—विष्णूचें शिपिविष्ट हें नांव—तें ध्रुवप्रदेशांतील दीर्घ रात्रींत

अदृश्य झालेल्या सूर्याचें दर्शक आहे–सवितृ, अग्नि आणि अश्विन यांचीं तीन स्थानें–त्रित आप्त्याची कथा–त्रित ऊर्फ तिसरा म्हणजे संवत्सराचा तिसरा भाग होय–ही कथा हिंदी–जर्मनीय काळची आहे–आपः–त्यांच्या स्वरूपाचें दिग्दर्शन–वैदिक ग्रंथांतील सप्तांकमूलक आणि दशांकमूलक विभागांची निरनिराळी उदाहरणें–हा दुहेरी विभाग ध्रुवप्रदेशांतील सात व दहा महिन्यांच्या सूर्यप्रकाशाचा बोधक असावा–दाशराज्ञ युद्ध–ते दशविभागात्मक तमाशी होणाऱ्या झगड्याचें दर्शक असावें–बृहस्पति आणि त्याची नष्ट झालेली स्त्री यांची ऋग्वेदांतील कथा–दहा अयज्यु राजे–रावण–रामायणांतील पौराणिक भाग मूळचा वैदिक असावा–हनुमान् आणि वृषाकपि–रामायण होमरच्या काव्याची नक्कल की काय ?—दोघांचेंही मूळ एकच असेल–उपसंहार.

---

## वैदिक कथा–प्रातःकालिक देवता.



मागील प्रकरणांत इंद्रवृत्रांच्या युद्धाच्या कथेचें खरें स्वरूप दाखविण्याच्या कामी पर्जन्याची कल्पना किती अपुरी आहे ते सविस्तर दाखविलें. ध्रौविकवसतिसिद्धांत आणि खालच्या व वरच्या लोकांतून वाहणाऱ्या वायुरूपी जलाची कल्पना यांच्या संयोगानें त्या कथेंतील आजपर्यंत गूढ म्हणून राहिलेल्या बाबींचा कसा सुरेख उलगडा करतां येतो हेही त्यांत दाखविलें. आतां वसंतोपपत्तीवर जुळविलेल्या अशा कथा घेऊन त्यांचाहि खरा उलगडा त्या उपपत्तीवरून होत नाहीं असें दाखवावयाचें आहे. या कथा देवांचे वैद्य जे अश्विन त्यांच्या पराक्रमासंबधाच्या आहेत. ऋग्वेदांत पहिल्या मंडळांतील ११२, ११६, ११७ व ११८ या सूक्तांत त्यांच्या बहुतेक पराक्रमाचें वर्णन आलें आहे. वृत्राच्या स्वरूपाप्रमाणेच अश्विनांचें स्वरूपही निरनिराळ्या पंडितांनी निरनिराळें मानिलें आहे. यास्कानें सांगितल्याप्रमाणें अश्विन ह्मणजे द्यावापृथिवी असें कित्येक मानतात, दिवस रात्र असें कित्येक समजतात, व कित्येकांच्या मतें ते चंद्रसूर्य होत. ऐतिहासिक म्हणतात की, अश्विन हे पुण्य कर्मे करणारे प्राचीन राजे होते. पण आपल्याला त्यांच्या विषयीं विचार करणें तो निरुक्तकारांच्या धोरणानेच

करावयाचा आहे. अश्विनांसंबंधी नैरुक्त मतेंहि अनेक त्याहेत. कित्येकांच्या मतें उषा, सूर्य आणि अग्नि यांच्या उदयापूर्वी आपलें तेज पसरविणारा शुक्र म्हणजे अश्विन होय. दुसरे कित्येक जण अश्विन म्हणजे पुनर्वसूच्या दोन तारा असे मानितात. तथापि अश्विनांच्या पराक्रमाचा संबंध हिवाळयांत कमी झालेले सूर्याचे तेज परत आणून देण्याशी लावण्यांत सर्वांचें एकमत आहे. हे पराक्रम अनेक असल्यामुळे त्या सर्वांचा येथे विचार न करतां त्यांपैकी जितक्या बाबींचा वसंताच्या किंवा उषेच्या कल्पनेवर उलगडा न होतां फक्त ध्रौविक वसतीच्या कल्पनेवरच होतो तेवढयांचेच विवेचन करावयाचे आहे.

पहिली गोष्ट अशी कीं, मागील प्रकरणांत सांगितलेल्या प्रकाश व पाणी यांच्यासाठीं होणाऱ्या झगड्यांत अश्विनांचेंही थोडेसे अंग आहे. अश्विन हे उषेबरोबर येणाऱ्या देवतांपैकी आहेत असें यज्ञग्रंथांत सांगितलेलें आहे (ऐ.ब्रा.* २,१५ ). सूर्योदयापूर्वी होत्याने ह्मणावयाचे आश्विनशस्त्र ह्मणून एक स्वतंत्र शस्त्रच आहे. सूर्याची कन्या त्यांच्या रथावर चढल्याचे ऋ. १,११६,१७; ११९,५ यांत सांगितले आहे. ऐतरेय ब्राह्मणांत (४;७–८) आश्विन शस्त्र मिळविण्यासाठीं देवांमध्ये झालेल्या शर्यतीचे वर्णन देऊन अश्विनांनी ती जिकली व त्यांना अग्नि, उषा व इंद्र यांनी त्यांच्यापासून आश्विन शस्त्राचा भाग मिळविण्याचें वचन घेऊन त्यांना वाट करून दिली असें सांगितले आहे. यज्ञाग्नीचे प्रज्वलन, उषा किंवा सूर्य यांचे उदय वगैरे गोष्टी अश्विनांबरोबरच होत असतात असे १,१५७,१ व ७,७२,४ यांत ह्मटलें आहे. अश्विनांच्या उदयाचा काल 'रक्तवर्ण गाईमध्यें कृष्ण तम आहे तो.' असा १०, ६१, ४ यांत दिला आहे ( कृष्णा यद् गोषु अरुणीषु सीदत् ). या गोष्टींवरून अश्विनांचा उषा व सूर्य यांशी असलेला संबंध स्पष्ट दिसत असल्यामुळे ते प्रातःकालिक देवतांपैकी आहेत ही गोष्ट त्यांच्या कथांचें परीक्षण करतांना लक्षांत ठेविली पाहिजे. वृत्रहन् व शतक्रतु हीं इंद्राची विशेषणे ऋग्वेदांत अश्विनांना लाविलेली आहेत ( ८,८,२२ वृत्रहंतमा; १, ११२,२३ शतक्रतू ). १,१८२,२ यांत त्यांना इंद्रतमा व मरुत्तमा ह्मणजे इंद्राचे व मरुतांचे गुण विशेषेकरून असलेले असें ह्मटलें आहे.

---

* एते वाव देवा प्रातर्यावाणो यदग्निरुषा अश्विनौ । ऐ. ब्रा. २,१५

त्यांनीं नमुचीशीं होणाऱ्या युद्धांत इंद्राचें रक्षण केल्याचेंही १०,१३१,४ यांत सांगितलें आहे. १,४६,२ यांत त्यांना **सिंधुमातरा** ह्मणजे समुद्रापासून उत्पन्न झालेले असें ह्मटलें आहे. ४, ४३, ५ यांत त्यांचा रथ समुद्रांतून येतो असें सांगून, १, ११२, १२ यांत 'आपल्या बिनघोड्यांच्या रथांतून त्यांनी रसा नामक आकाशांतील नदीला पूर आणिल्याचें' सांगितलें आहे. यावरून त्यांचा पाण्याशी असलेला संबंधही दिसून येतो. ही जले जमिनीवरचीं नसून दिव्य आहेत; कारण ८, २६, १७ यांत ते आकाशांतील समुद्रांत रहातात असें ह्मटलें आहे. ( दिवो अर्णवे ). त्यांनीं अतिथिग्व आणि दिवोदास यांना शंबरापासून सोडविले असून इंद्राचा प्रियभक्त जो कुत्स त्यालाही मदत केलेली आहे. या सर्व गोष्टीचा विचार केल्यास प्रकाश व जलें यानां मुक्त करण्यासाठी इन्द्रांने केलेल्या युद्धांत हे त्याचे सहाय होते हें स्पष्ट होते. ते देवाचे वैद्य असून त्यांनी पुष्कळांना दुःखमुक्त केलें आहे. अश्विनांच्या कथेतील या बाबींचा उलगडा वसंतोपपत्तीनें होत नसून प्रकाश व काळोख यांतील दैनिक झगड्यावरूनही होत नाही. या सर्व गोष्टीचा उलगडा केवळ ध्रौविक वसतीच्या उपपत्तीनेच होणारा आहे, व तो तसा केला ह्मणजे अश्विनांनी कित्येक, लंगड्या, अंधळ्या इत्यादिकांना कसें दुःखमुक्त केलें हें कळून येईल.

अश्विनांनी केलेल्या पराक्रमांचा सारांश असाः—म्हाताऱ्या व निराश्रित अशा च्यवानाला त्यांनी सुदृढ देह दिला, आणि त्याचें आयुष्य वाढवून त्याला पुनरपि तरुण केलें. सांडलेल्या पशूप्रमाणें असलेल्या विष्णापूला त्यांनीं पूजा करणाऱ्या (ऋजूयते) विश्वकाच्या परत स्वाधीन केले. समुद्रांत सांपडलेल्या भुज्यूला त्यांनी शंभर वल्हीं असलेल्या ( शतारित्राम् ) नावेच्या साहाय्यानें वर काढिलें. दहा दिवस व नऊ रात्री पाण्यांत अडकलेल्या, मेला असें समजून सोडून दिलेल्या, व जखमी झालेल्या रेभाला त्यांनीं बरें करून वर काढिलें. जळत्या खाचेंत पडलेल्या अत्रीला त्यांनीं मदत केली व त्याला तमांतून वर काढिले. त्यांनीं एका वर्तिकेला वृकाच्या जबड्यांतून सोडविलें. शंभर मेष वृकीला दिल्याबद्दल ऋज्राश्वाला बापानें अंधळें करून टाकिलें, तेव्हां त्यांनी त्या वृकीच्या प्रार्थनेवरून त्याला पुनः दृष्टि दिली. युद्धांत

विश्पलेची तंगडी तुटली होती, तेव्हां त्यांनीं तिला एक लोखंडाची तगडी लावून दिली. एका वध्रिमतीला (नपुंसक पतीच्या स्त्रीला) त्यांनीं हिरण्यहस्त नांवाचा पुत्र दिला. गर्भधारणास असमर्थ झालेली शय्यूची गाय त्यानी पुनः दुभती केली, आणि यदूला अति वेगवान् व राक्षसांना मारणारा असा एक घोडा त्यांनीं दिला (ऋ. १,११६).

दुसरेही अश्विनांचे पुष्कळ पराक्रम आहेत. पण त्या सर्वांचें तात्पर्य एवढेंच कीं, लंगड्या, अंधळ्या इत्यादिकांना त्यानीं दुःखमुक्त केलें. त्यात कित्येक ठिकाणीं हिवाळ्यांत कमकुवत झालेल्या सूर्याचा संबंध स्पष्ट दिसत असल्यामुळें मॅक्स मुल्लरादि पडितांनी त्या सर्व कथा हिवाळ्यांत कमजोर होणाऱ्या व वसंतांत पुनः तेजस्वी होणाऱ्या सूर्याविषयींच्या आहेत असे ठरविले. अंधारमय खाचेंत पडलेला च्यवान हा त्यांच्या मतें निस्तेज झालेला सूर्य होय, व त्याला अश्विनांनीं वर काढिलें म्हणजे वसंतारंभीं सूर्य पुनः सतेज झाला. त्यांनी नीट करून दिलेला विश्पलेचा पाय म्हणजे कृष्णपक्षांतील चंद्राचा चतुर्थ (पाद) होय. ऋज्राश्वाचा अधळेपणा म्हणजे रात्रीचा काळोख, व अंध आणि लंगडा परावृज् म्हणजे दक्षिणायनान्तबिन्दूजवळचा सूर्य, असे हे वसंतकल्पनावादी समजतात. त्यांच्यामतें नावेंतून समुद्रांत पडलेल्या भुज्यूची किंवा रेभाची गोष्ट म्हणजे मावळणाऱ्या सूर्यावरील रूपक होय. वध्रीची (नपुंसकाची) स्त्री वध्रिमति हिला अश्विनांनीं हिरण्यहस्त नांवाचा पुत्र दिला म्हणजे उषेच्या मागून सूर्याला त्यांनी उदयाला आणिले. तात्पर्य या प्रत्येक गोष्टीत संकटांत सांपडलेल्या चंद्राचे किंवा सूर्याचें वर्णन आहे असे ते मानितात. अश्विन हे प्रातःकालच्या प्रकाशाला सोडवून आणणारे, किंवा दक्षिणायनान्तबिंदूजवळ गेल्यामुळें निस्तेज झालेल्या सूर्याचा उद्धार करणारे होत. म्हणून रोज प्रातःकाळीं सूर्याचें वर येऊन तेजःपुंज होणें किंवा वसंतारंभी त्याची निस्तेजता जाऊन त्यानें जोमांत येणें या गोष्टी देवांचे वैद्य जे अश्विन त्यांनी केल्या असें म्हणणें साहजिक आहे; असें उषेच्या किंवा वसंताच्या कल्पनेच्या पुरस्कर्त्यांचें मत आहे.

या वसंतकल्पनावाद्यांनीं यास्काचार्यांच्या पद्धतीवर थोडी चढ केली आहे हें खरें; कारण यास्काचार्यांनी एक वर्तिकेची गोष्ट मात्र उषःकल्पनेवर बसविली आहे. तरी प्रस्तुत रूढ असलेल्या वसंतकल्पनेच्या

साहाय्याने केलेल्या अश्विनकथांच्या अर्थावरून बऱ्याच गोष्टींचा उलगडा होत नाहीं. सूर्याचे हरएक प्रकारचें संकट म्हणजे त्याचें दक्षिणायनांतील निस्तेज होणें असें समजल्यास अश्विनांनी त्याला **काळोखांतून** वर कसें काढिले हे सांगतां येत नाहीं. वंदनाच्या कथेंत काळोखाचा उल्लेख स्पष्ट असून भुज्यु हा समुद्रांत पडलेला व अगाध तमांत ( अनारंभणे तमसि ) बुडालेला असतां त्याला अश्विनांनीं वर काढून मुक्त केलें आहे. अत्रीलाही त्यांनी तमांतूनच वांचविले आहे. दक्षिणायनांत सूर्याचें तेज कमी होत असल्यामुळें त्यावेळीं त्याला, लंगडा, पांगळा वगैरे विशेषणे शोभतील, परंतु वर सांगितल्याप्रमाणे त्याचा काळोखाशीं संबंध असल्यामुळे व कित्येक ठिकाणीं त्याला अंधळा म्हटलेलें असल्यामुळें, अंधाला दृष्टी देणे वगैरे अश्विनांच्या पराक्रमांचा संबंध हिवाळ्यांतील सूर्याच्या कमजोरपणाशी लावणे सयुक्तिक नाही; कारण अंधपणाचा संबंध काळोखाशी आहे. हा काळोख खराखुरा रात्रींचा काळोख होय हें उघड आहे. ह्मणून काळोख व प्रकाश यांतील रोजच्या झगड्याशी या गोष्टींचा संबंध लाविल्यास अश्विनांचे पराक्रम दैनिक होते असें ह्मणावे लागेल. पण वस्तुतः ते दैनिक नसून सावत्सरिक असल्यामुळें वैदिक पंडितांनी त्यांचा संबंध सूर्याच्या हिवाळ्यांतलि कमजोरपणाकडे लाविला आहे. पण या कल्पनेवर काळोखाचा उलगडा होत नाहीं. हा काळोखही कित्येक दिवसांच्या अवधीचा आहे. ह्मणून या अश्विनकथांचा संबंध ध्रुवप्रदेशांतील वर्षांतून एकवार येणाऱ्या अखंड अशा दीर्घ रात्रीशीच असला पाहिजे असें मानणे भाग पडते.

वसंताच्या कल्पनेवर आणखी एका गोष्टीचाही उलगडा होत नाही. अश्विनांनीं ज्यांना दुःखमुक्त केले त्यांच्या दुःखाचा काळ चोवीस तासांहून अधिक सांगितला आहे. रेभ हा ( १,११६,२४ ) दहा दिवस व नऊ रात्री पाण्यानें वेष्टिलेला होता. तसाच भुज्यु हाही अगाध अशा तमांत तीन दिवस व तीन रात्री होता. अश्विन हे **परावत्** ह्मणजे दूरच्या प्रदेशांत तीन दिवस व तीन रात्रि होते ( ८,५,८ ). दक्षिणायनान्तबिन्दूशी सूर्य स्थिर झाल्यासारखा कांहीं काळ दिसतो; त्या काळाशीं या दहा किंवा तीन दिवसांचा संबंध असावा असा मॅक्स मुल्लरनें तर्क केला आहे. पण तेथें सूर्य दहा दिवसपर्यंत स्थिर झालेला खरोखर

असत नाही; व असतो असे जरी कबूल केलें तरी शेवटीं **दीर्घतम्याच्या** गोष्टीत हा तर्क कुंठित होतोच. कारण दीर्घतमा दहाव्या युगांत म्हातारा झाल्यावर शत्रूंच्या पीडेपासून अश्विनांनीं त्याला मुक्त केलेलें आहे. दीर्घतम्याच्या कथेंत युग शब्दाचा अर्थ महिना घेतला पाहिजे हें पूर्वी एका प्रकरणांत दाखविलेच आहे. हा अर्थ जर बरोबर असेल तर दीर्घतमारूपी सूर्य दक्षिणायनान्तबिंदूच्या जवळ दोन महिने स्थिर होता असे मॅक्स मुल्लरच्या मतानें मानावे लागेल. पण ध्रौविक वसतीच्या उपपत्तीचा आश्रय केल्यास ही सर्व अडचण नाहींशी होते. कारण ध्रुव-प्रदेशांत सूर्याचा क्षितिजाखालीं असण्याचा काळ एका रात्रीपासून तों शंभर रात्रीपर्यन्त किंबहुना सहा महिने पर्यन्तही असतो.

वसंतोपपत्तीवर उलगडा न होणारी तिसरी गोष्ट म्हणजे अश्विनांनीं ज्यांना दुःख मुक्त केलें त्यांच्या दुःखाचें स्थान ही होय. भुज्यूचें संरक्षण जमीनीवर झालेले नसून ज्या ठिकाणी अगाध तम आहे (**अनारंभणे तमसि**) अशा समुद्रांत (अप्सु) झालेलें आहे. वृत्राने वेढून टाकिलेला किंवा बृहस्पतीनें खाली फेकून दिलेला समुद्र (२,२३,१८) हे सर्व एकच होत हे त्यांच्या वर्णनाची तुलना केल्यास सहज दिसून येईल. हे दोन्ही समुद्र म्हणजे पूर्व प्रकरणांत वर्णन केलेल्या जलबाष्पांचें स्थान होत. सूर्य हिवाळ्यांत जातो तें स्थान कांहीं हा समुद्र नव्हे. म्हणून अश्विनांनीं आपल्या आश्रितांना काळोखाच्या समुद्रांतून कसे बचाविले हें ध्रौविक वसतीच्या उपपत्तीशिवाय सांगतां यावयाचे नाही. ऋ. ८,४०,५ यांत बाजूला छिद्र असलेल्या (**जिह्मबारम्**) सात तळांच्या समुद्राला इन्द्रानें उघडें केल्याचे सांगितले आहे. खाली तोंड असलेल्या विहिरीला अश्विनांनीं वर उचलल्याचें सांगतांनां १,११६,९ यांत **जिह्मबार** हाच शब्द घातलेला आहे. १,८५,११ यांतही गोतमाची तहान भागविण्यासाठीं आडव्या तोंडाच्या विहिरीला अश्विनांनी वर ढकलले असे म्हटलें आहे. हा समुद्र किंवा विहीर म्हणजे मेघ होत असें टीकाकारांनीं सांगितलें आहे. पण आमच्या मतें हें सर्व वर्णन पाताळ लोकालाच यथार्थ लागू पडणारें आहे; कारण तेथील वस्तु आपल्या उलट दिशेनें लटकलेल्या असतात असा समज आहे. ग्रीक व ईजिप्शन् लोकांचा **हेडिस** ऊर्फ पाताळ लोक

अशाच प्रकारचा आहे. इतर राष्ट्रांच्या प्राचीन कथांतही पाताळाचें वर्णन अशाच प्रकारचें आहे. पाताळ ह्मणजे काळोखाच्या व पाण्यानें भरलेल्या अशा उपड्या कटाहासारखा असल्यामुळें गोतमाची तहान भागविण्यासाठीं अश्विनांना त्याच्या बाजूला छिद्र पाडून पाणी वर आणावें लागणें साहाजिक आहे. मरुतांनींही असाच पराक्रम केल्याचें १, ८५, १० यांत सांगितलें आहे. बुंधा वर असलेल्या ( उच्चाबुध्न ) व खालीं मुख असलेला ( जिम्हबार ) अशीं जी विशेषणें कूपाला ( अवत ) दिली आहेत ( ऋ. १, ११६, ९ ) त्यांवरून नित्याहून कांहीतरी निराळ्या प्रकाराचें वर्णन त्यांत आहे हें उघड आहे. अर्थात् हीं विशेषणें मेघांना लावतां येण्यासारखीं नाहीत. हा कूप वर ढकलल्याचें सांगितलें आहे ( ऊर्ध्वं नुनुद्रे ). निस्तल ( अबुध्न ) अशा प्रदेशांत वरुण आपला वृक्ष उभा करितो, व त्याचे आह्मांला न दिसणारे असे किरण वरून निघून खाली जातात ( नीचीनाः ) असे जे १, २४, ७ यांत वर्णन आहे तें, सर्व वस्तु बिनआधारी व उलट्या असलेल्या पाताळाच्या वर्णनाशीं उत्तम जुळतें. त्यांतील काळोखाच्या व निस्तल अशा समुद्रांतच भुज्यु बुडालेला असून अश्विनांनी दिलेल्या नावेतून तरून गेला. अथर्ववेदांत " तिरकें मुख असलेल्या व वर बुंधा असलेल्या अशा चमसांत ( पेल्यांत ) सर्व तेज ठेविलेले असून त्या महापुरुषाचें गोपन करणारे सप्तर्षि त्यांतच राहिलेले आहेत " असें सांगितलें आहे. (१०,८,९)[1]. बृहदारण्यकोपनिषदामध्येंही हा मंत्र आला असून त्यांत **तिर्यग्बिल** याच्या ऐवजीं **अर्वाग्बिल** असा शब्द घातला आहे. यास्कानें (निरुक्त १२,३८) हा चमस ह्मणजे आपल्या डोक्यावरील खगोलार्ध व सप्तऋषि ह्मणजे सूर्याचे सात किरण, किंवा चमस ह्मणजे मनुष्याचें अंतर्गोल असें कपाल असे दोन प्रकारचे अर्थ दिले आहेत. पण हे वर्णन वरचें खगोलार्ध किंवा मनुष्यकपाल यांच्यापेक्षां पाताळालाच अधिक लागू पडतें. पारशी ग्रंथांतही अशाच प्रकारचें वर्णन असून त्यांत सात **अमेश स्पेंतांचें** तेज **यिमापासून** तीन वेळ निघून गेलें व तें अग्नि **दहाकाशीं** युद्ध करून परत आणावें लागलें असें सांगितलें आहे. हें युद्ध

---

१ तिर्यग्बिलश्चमस ऊर्ध्वबुध्नस्तस्मिन्यशो निहितं विश्वरूपम् । तदासत ऋषयः सप्त साकं ये अस्य गोपा महतो बभूवुः ॥

**वौरुकश** समुद्रांत झालेलें आहे. ह्मणून या दोन्ही वर्णनांची तुलना करितां हा उपड्या तोंडाचा चमस ऊर्फ पेला ह्मणजे पाताळांतील काळोखाचें व जलबाष्पांचें स्थान असे जें तेथील उलटें खगोलार्ध तेंच होय असें ह्मणण्याला सबळ आधार मिळतो. भुज्यु ज्यांत बुडाला असता अश्विनांनीं त्याचें रक्षण केलें तो हाच प्रदेश होय.

भुज्यु या निराधार व काळोखाच्या समुद्रांत तीन रात्री व तीन दिवस होता व रेभ दहा रात्रीं व नऊ दिवस होता असे सांगितलेलें आहे. अर्थात् हा अवधि अखंड काळोखाचा असला पाहिजे. ऋज्राश्वाच्या ( रक्तवर्ण अश्व ) गोष्टींतही या ध्रुवाजवळच्या अखंड काळोखाचाच संबंध असावा असे दिसतें. ऋज्राश्वानें १०० किंवा १०१ मेंढ्या मारून वृकीला दिल्यामुळें त्याच्या बापानें रागावून त्याला अंध केलें, व पुढे वृकीच्या विनंतीवरून अश्विनांनी त्याला त्याची दृष्टि परत दिली. या मेंढ्या ह्मणजे तारा असून सूर्य उगवल्याबरोबर त्या अदृश्य होतात ह्मणून त्यांना ऋजाश्वाने मारिले असे ह्मटलें असावे, असा मॅक्स मुल्लरनें तर्क केला आहे. पण तसें धरल्यास त्या १०० किंवा १०१ कां असाव्या याचा उलगडा होत नाही. शिवाय ग्रीक कथेंतील हेलिऑस ह्मणजे सूर्य याच्या ३५० मेंढ्या ह्मणजे ३५० रात्री व ३५० बैल ह्मणजे ३५० दिवस होत असें त्यानेंच सांगितलें आहे. ३५० दिवसांचें हे वर्ष रेभाच्या गोष्टीशी चांगलें जुळतें. त्याच हेलिऑसच्या गोष्टीवरून ऋज्राश्वाच्या गोष्टीचा उलगडा होईल का नाहीं हे पाहिलें पाहिजे. तसा विचार केल्यास ग्रीक ऑडिसीसच्या मित्रानें हेलिऑसचे बैल खाणें व ऋज्राश्वानें मेंढ्या मारून वृकीला देणे या गोष्टींतील साम्य तावडतोब लक्षांत येईल. वैदिक ग्रंथांत वृक म्हणजे तमाची मूर्ति असें मानिलें असल्याचे दिसतें. म्हणून शंभर मेंढ्यांच्या वधाचा संबंध सूर्याच्या तेजाशी न लावतां काळोखाशींच लावला पाहिजे; म्हणजे ऋज्राश्वानें शंभर दिवस काळोखाच्या स्वाधीन केले असे मानिलें पाहिजे. हे शंभर दिवस अखंड काळोखाचे असल्यामुळें ऋज्राश्व तितका काळपर्यंत अंध होता व मग प्रकाशाचे अग्रदूत जे अश्विन त्यांनीं त्याला पुनः दृष्टि दिली असें म्हणणें स्वाभाविक आहे. याप्रमाणें शंभर मेंढ्यांच्या वधाची गोष्ट शंभर दिवसांच्या अवधीच्या अखंड रात्रीच्या कल्पनेवर चांगली जुळवितां येते. म्हणजे एकंदरींत अश्विनांच्या कथेवरून तीन-

पासून शंभरपर्यंत दिवसांच्या अखंड रात्रीविषयीं अनुमान करावयास चांगला आधार मिळतो.

अश्विनांच्या कथांपैकी आपल्या उपपत्तीला अत्यंत महत्वाचा भाग ह्मटला ह्मणजे **अत्रि सप्तवध्रीची** गोष्ट होय. त्याला जळत्या खांचेंत टाकून दिलें असतां त्या भयंकर स्थितीतून व काळोखांतून ( तमसः ) अश्विनांनीं त्याला मुक्त केले (६,५०,१०). वध्रीच्या ( नपुंसक ) स्त्रीला हिरण्यहस्त नांवाचा पुत्र अश्विनांनी दिल्याचें ( १,११७,२४ ) मागें सांगितलेंच आहे. पांचव्या मंडळांतील ७८ वे सूक्त सप्तवध्रीचें ( ऋषी ) असून त्यांत सप्तवध्रि लांकडी पेटींत सांपडला असतां त्याला अश्विनांनीं मुक्त केल्याचे सांगितले आहे. ही लांकडी पेटी किंवा वृक्ष म्हणजे रात्र असें धरल्यास सप्तवध्रि आपल्या स्त्रीपासून रात्रौ विलग्न झाल्यामुळें तिला तो वध्रीप्रमाणेच झाला व प्रातःकाली अश्विनांनीं त्याला मुक्त केल्यावर पुनः तो आपल्या स्त्रीचा यथार्थ पति झाला, अशा तऱ्हेचा या गोष्टीचा खुलासा मॅक्स मुल्लरने केला आहे. पण तसें समजल्यास त्याला नुसतें वध्रि ह्मणण्याऐवजी सप्तवध्रि कां ह्मटलें या प्रश्नाचा उलगडा होत नाहीं. **वध्रि** या शब्दाचा अर्थ चामड्याची वादी असाही आहे. ह्मणून सप्तवध्रि ह्मणजे चामड्याच्या सात वाद्यांनीं जखडलेला असाही त्याचा अर्थ होऊं शकेल. पण या गोष्टीतील अन्य बाबीचा विचार करितां सप्तवध्रि म्हणजे सात—नपुंसक अशाच अर्थानें तें विशेषण अत्रीला लाविलेलें असलें पाहिजे असे दिसतें.

वर सांगितलेले पांचव्या मंडळांतील ७८ वे सूक्त अश्विनांचें असून त्याचा ऋषि **अत्रि सप्तवध्रि** हा आहे. त्यांत अत्रीनें अश्विनांची आपल्याला संकटांतून मुक्त करण्याविषयीं प्रार्थना केली आहे. त्यांत पहिल्या तीन मंत्रांत अश्विनांना यज्ञार्थ आवाहन केले असून चवथ्यांत खांचेंत पडलेल्या अत्रीनें वेदना होणाऱ्या स्त्रीप्रमाणें अश्विनांला साहाय्यार्थ बोलाविलें आहे. पांचव्या व सहाव्या मंत्रांत वृक्षांत बद्ध झालेल्या अत्रीला सोडविण्यासाटी प्रसूत होणाऱ्या स्त्रीच्या अंगाप्रमाणें वृक्षाची बाजू विदारण करण्याविषयीं

---

१ वि जिहीष्व वनस्पते योनिः सूष्यंत्या इव । श्रुतं मे अश्विना हवं सप्तवध्रिं च मुंचतम् ॥ ५ ॥ भीताय नाधमानाय ऋषये सप्तवध्रये । मायाभिरश्विना युवं वृक्षं सं च वि चाचथः ॥ ६ ॥ ऋ. ५,७८.

प्रार्थना केलेली आहे. या नंतरच्या शेवटच्या तीन मंत्रांत दहा महिने-पर्यंत गर्भात असलेल्या कुमाराच्या प्रसवाचें वर्णन आहे. या मंत्रांचा पहिल्या सहा मंत्रांशीं संबंध काय असावा हें कोणत्याही वैदिक पंडिताला अद्यापपर्यंत सांगतां आलेलें नाही. सायणाचार्यांनीं या तीन मंत्रांना गर्भस्राविणी उपनिषद् ह्मटलें आहे; व लड्विग् या पाश्चात्य पंडिताच्या मतें चवथ्या मंत्रांतील उपमानभूत अशा प्रसूतिवेदना होणाऱ्या स्त्रीवरून सुचलेल्या कुमारप्रसवाचें साग्र वर्णन या तीन मंत्रांत दिलें आहे. परंतु केवळ उपमेवरून सुचलेल्या अशा अप्रस्तुत विषयाचें इतके साग्र वर्णन सूक्ताच्या अखेरीस करणे फारच विक्षिप्त दिसतें. म्हणून या मंत्रासंबंधाचा हा विलक्षणपणा मान्य तरी केला पाहिजे किंवा त्यांचा दुसऱ्या कोणत्या तरी रीतीनें खुलासा करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. ते मंत्र असेः–

यथा वातः पुष्करिणीं समिंगयति सर्वतः ।
एवा ते गर्भ एजतु निरैतु दशमास्यः ॥ ७ ॥
यथा वातो यथा वनं यथा समुद्र एजति ।
एवा त्वं दशमास्य सहावेहि जरायुणा ॥ ८ ॥
दशमासाञ्छशयानः कुमारो अधि मातरि ।
निरैतु जीवो अक्षतो जीवो जीवन्त्या अधि ॥ ९ ॥

हे मंत्र अगदीं सरळ असून त्यांचा अर्थ असाः—

" ज्याप्रमाणें वात पुष्करिणीला ( कमळांचें तळे ) चोहोंकडून हालवितो, त्याप्रमाणें तुझा गर्भ हालो आणि दहा महिन्यांनंतर बाहेर येवो ॥ ७ ॥

" ज्याप्रमाणें वात, वन किंवा समुद्र हालतो, त्याप्रमाणें, हे दहा महिन्यांच्या गर्भा ! तूं जरायूसह (गर्भावरील आच्छादन) बाहेर ये ॥ ८ ॥

" मातेच्या गर्भात दहा महिने राहिलेला कुमार सजीव व सुखरूप बाहेर येऊन आपल्या जीवंत मातेला जीवंत दिसो ॥ ९ ॥ "

सहाव्या मंत्रांत वृक्षाच्या बाजूचें सप्तवध्रीसाठीं विदारण करण्यासाठीं अश्विनांची प्रार्थना केल्यावर लगेच हे तीन मंत्र आलेले असल्यामुळें

त्याचा मागच्या गोष्टीशीं संबंध असणें अगदी स्वाभाविक आहे. पण वसंताच्या किंवा उषेच्या कल्पनेवर हा संबंध जुळवितां येत नाही. या मंत्रांतील शब्दांत काठिण्य मुळींच नाहीं. दहा महिन्यांच्या पूर्ण गर्भाची सुखरूप सुटका होण्याविषयी त्यांत प्रार्थना केली आहे हे स्पष्ट आहे. पण हा गर्भांतील कुमार कोण असावा ? वध्रिमतीला हिरण्यहस्त नांवाचा पुत्र अश्विनांनी दिल्याचे मागें सांगितलेंच आहे. तेव्हां तिनें सुखरूप प्रसूतीसाठीं प्रार्थना केली असावी हे संभवत नाही. सप्तवध्रीनेंही आपल्या स्त्रीच्या सुखरूप प्रसूतीसाठीं प्रार्थना केली असे म्हणतां येत नाही; कारण तिच्यापासून त्याला पुत्रप्राप्ति कधींच झालेली नाही. तात्पर्य, या तीन मंत्रांचा सूक्ताच्या पूर्वभागाशी असलेला संबंध आजपर्यन्त मुळीच समजलेला नाही.

पण ध्रुवोपपत्तीच्या साहाय्यानें या गोष्टीचा चांगला उलगडा होतो. ऋग्वेदांत कित्येक ठिकाणीं उषा सूर्याला उत्पन्न करिते असें ह्मटलेलें आहे. ( १,११३,१;७,७८,३ ) परंतु उषेच्या गर्भांत सूर्य दहा महिने असतो असें ह्मणतां येत नाही. तसेंच **दशमास्यः** किंवा **दशमासान्** हे जे शब्द सूक्तांत आलेले आहेत ते निरर्थक आहेत असेंही ह्मणतां येत नाही. अर्थात् या गोष्टीचा दुसरा कांहींतरी खुलासा असला पाहिजे. ऋग्वेदांत सूर्याला द्यावापृथ्वीचा किंवा एकट्या द्यूचा पुत्र ह्मटलेलें आहे. या गोष्टीवरून हा खुलासा मिळण्यासारखा आहे. ऋ. १०,९७,१ यांत सूर्याला **दिवस्पुत्र** ह्मटलेलें आहे. तसेंच १,१६४,३३ यांत* "द्यूनें आम्हाला उत्पन्न केले, तो आमचा पिता, तेथेंच आमचे मूळ आहे. ही अफाट पृथ्वी आमची माता होय. या दोन उत्तान चमूंच्या उदरांत पित्याने आपल्या कन्येच्या गर्भाचे आधान केलें;" असें सांगितले आहे. या पूर्वीच्या $ऋचेत, "आपल्या मातेच्या गर्भांत अपूर्णावस्थेत असलेला तो अनेकविध संपत्तिमान् होत्साता निर्ऋतींत निघून गेला. ज्यानें

* द्यौर्मे पिता जनिता नाभिरत्र बंधुर्मे माता पृथिवी महीयं । उत्तानयोश्चम्वोर्योनिरंतरत्रा पिता दुहितुर्गर्भमाधात् ॥ ऋ. १,१६४,३३.

$ य ईं चकार न सो अस्य वेद य ईं ददर्श हिरुगिन्नु तस्मात् । स मातुर्योना परिवीतो अंतर्बहुप्रजा निर्ऋतिमा विवेश ॥ ऋ. १,१६४,३२.

त्याला उत्पन्न केलें तो त्याला जाणत नाही. ज्यांनीं त्याला पाहिले त्यांच्यापासून तो आतां गुप्त झाला आहे." असें सांगून १,१६०,१ ‡यांत " हे द्यावापृथिवी सर्व कल्याण करणारे, रजांना धारण करणारे, व्यापक स्वरूपाचे, शोभनजन्मवान् आणि ज्ञाते आहेत. हा तेजस्वी सूर्य नियमानुसार या दोन देवींच्या मधून गमन करीत असतो, " असे ह्मटलें आहे. या मंत्रांवरून तीन गोष्टी स्पष्ट दिसून येतात; १ ली सूर्य हा द्यावापृथिवीरूपी दोन चमसांचा पुत्र मानिलेला आहे; २ री, या दोहोंच्यामध्यें सूर्य पोटांतील गर्भाप्रमाणे फिरतो; ३ री, तो आपल्या मातेच्या गर्भांत कांहीं काळ फिरल्यावर तमोमय प्रदेशांत (निर्ऋति) जाऊन पूर्वी ज्यांना दिसत होता त्यांना दिसत नाहींसा होतो. सूर्याच्या संवत्सरगतीवर याप्रमाणे रूपक केल्यावर, तो निर्ऋतींत जातो ह्मणजे आपल्या मातेच्या गर्भांतून बाहेर पडतो असे म्हणावयास कल्पनेची फार ओढाताण करावयास नको. पण त्या गर्भांत तो दहा महिने होता या म्हणण्याचा अर्थ काय? या प्रश्नाचे उत्तर ध्रौविकउपपत्तीवरून चांगले मिळेल. दीर्घतमा दहाव्या महिन्यात म्हातारा होतो व दशग्वांचें वार्षिक सत्रही तितक्याच काळांत पुरे होत असे हे पूर्वी सांगितलेंच आहे. तेव्हां क्षितिजावर दहा महिनेपर्यन्त दिसणारा सूर्य द्यावापृथ्वीच्या गर्भांत दहा महिने फिरतो असे ह्मणणे स्वाभाविक आहे. या काळानंतर तो निर्ऋतींत जाऊन दोन महिने तेथील वृक्षांत अडकून पडतो; तेव्हां त्याच्या मुक्ततेसाठी अत्रीनें अश्विनांची प्रार्थना केली हें ठीकच आहे. अथर्ववेदांत (११,५,१) सूर्याला ब्रह्मचारी म्हणून तो पृथिवी व द्यौ यांच्यामध्ये फिरतो व मोठ्यानें आक्रंदन करीत रक्तवर्ण असा तो पृथ्वीवरून बृहच्छेप (मोठे शिश्न) ओढीत नेतो, असे ह्मटले आहे. आतां द्यावापृथ्वीच्या मध्ये फिरतांना जर त्याला बृहच्छेप असेल तर निर्ऋतीत जाऊन पडल्यावर त्याला वध्रि (नपुंसक) ह्मणणें साहाजिक आहे. आतां त्याला सप्तवध्रि कां ह्मटले हा प्रश्न राहिला. पण त्याचें उत्तर सोपें आहे. ऋग्वेदांत द्यौ, पृथ्वी, पाताळ, समुद्र, जलें हीं सर्व सात सात मानिलेलीं आढळतात; तसेच दानु (राक्षस) हेही सात

‡ तेहि द्यावापृथिवी विश्वशंभुव ऋतावरी रजसो धारयत्कवी। सुजन्मनी धिषणे अंतरीयते देवो देवी धर्मणा सूर्यः शुचिः॥ ऋ. १,१६०,१.

असून ( १९,१२०,६ ) त्यांना मारणाऱ्या इन्द्राला सप्तहन् म्हटलेलें आहे ( १०,४९,८ ). वृत्राचे किल्लेही सात असून अश्विनांनी फोडलेला गाईंचा व्रज सप्तास्य ( १०,४८,८ ) म्हणजे सात मुखांचा आहे. या गोष्टींचा विचार करतां क्षितिजावर फिरणारा सूर्य जर **बृहच्छेप** आणि **सप्ताश्व** किंवा **सप्तकर** आहे तर तमोमय अशा निर्ऋतींत उतरल्यावर त्याला **सप्तवध्रि** म्हणणें कांहीं वावगें नाहीं. असा अर्थ घेतल्यास वर सांगितलेल्या तीन मंत्रांचा सर्व सूक्तांशी चांगला संबंध दाखवितां येईल. मातेच्या उदरांत रहाण्याचा दहा महिन्यांचा काळ म्हणजे सूर्य क्षितिजावर असे पर्यन्तचा काळ होय. यानंतर दोन महिने पाताळांतील समुद्राच्या वृक्षांत अडकल्यावर अश्विन त्यास बाहेर काढीत. या गोष्टीचा उलगडा आजपर्यंत झालेला नसून तो आतां ध्रुवोपपत्तीवरच होणारा आहे.

या कथेंत दिसून येणाऱ्या एका कोड्याचा या ठिकाणी थोडा विचार करणें अवश्य आहे. येथे अशी कल्पना केली आहे की, सूर्य आपल्या मातेच्या गर्भात दहा महिने वावरल्यावर खालीं पाताळांत पडतो; म्हणजे तो गर्भातून बाहेर आल्यावर अदृश्य होतो. हा प्रकार सामान्य प्रकाराच्या उलट आहे. सामान्यतः बालक मातेच्या उदरांतून बाहेर आला ह्मणजेच दृश्य होतो. हा प्रकार लक्षांत घेऊन वैदिक ऋषींनीं त्याचे एक अजब कोडें बनविलें. या कोड्याचें ऋग्वेदांत अनेक ठिकाणीं वर्णन आले आहे. १,१६४,३२ यांत ' ज्यानें त्याला ( सूर्याला ) उत्पन्न केले त्यालाच तो दिसत नाहींसा होतो ' असे ह्मटल्याचे वर सांगितलेच आहे. ५,२,१ यांत* " युवति माता कुमाराला गुप्तपणें नेते, व पित्यापाशीं देत नाहीं, अरातींत असलेल्या त्याचें म्लान होणारे मुख लोकांना दिसत नाहीं " असें ह्मटलें आहे. आणखी,+ १,७२,२ यांत " वत्स आमच्या भोंवती फिरत असतांही तो चतुर अशा अमर्त्य देवांनाही दिसत नाही; त्याच्या मागोमाग चालणारे देव थकून अग्नीच्या चारु अशा उच्च पदीं

---

* कुमारं माता युवतिः समुब्धं गुहा बिभर्ति न ददाति पित्रे । अनीकमस्य न मिनज्जनासः पुरःपश्यन्ति निहितमरतौ ॥ ऋ. ५,२,१.

+ अस्मे वत्सं परि षंतं न विदन्निच्छंतो विश्वे अमृता अमूराः । श्रमयुवः पदव्यो धियंधास्तस्थुः पदे परमे चार्वग्नेः ॥ ऋ १,७२,२.

उभे राहिले," व १,९५,४ यांत * तर "तुमच्यापैकी कोणाला हें रहस्य समजलें आहे? वत्साने आपल्या मातेलाच जन्म दिला; सर्वांचें बीज असा तो महान् द्रष्टा स्वसामर्थ्यैंकरून आपांच्या मांडीवरून पुढें येतो" असें ह्मटलें आहे. दीर्घ तमांमध्यें फार काळ (ज्योक्) राहिलेल्या (१०,१२४,१) व नंतर जलांचा पुत्र (अपां नपात्) होत्साता पुनः बाहेर येणाऱ्या (१,१४३,१) अग्नीचें हें वर्णन आहे. जलांचा पुत्र ह्मणजे मेघांत उत्पन्न होणारा विद्युद्रूप अग्नि होय असें साधारणतः मानितात. पण तसे मानिल्यास त्याच्या काळोखांत रहाण्याचा उलगडा होत नाही. पण दिव्य जलभ्रमण व ध्रुवोपपत्ति यांच्या साहाय्याने हे कोडें समाधानकारक रीतीने सुटते. द्यावापृथ्वीच्या मध्ये दहा महिने वावरणाऱ्या सूर्याच्या स्थितीला दहा महिन्यांची गर्भावस्था ह्मणणें स्वाभाविक आहे. पण त्यांत आश्चर्य एवढेच की, गर्भात असे तोंपर्यंत तो दृश्य असून बाहेर पडल्याबरोबर मात्र तो अदृश्य होतो. यावर तो जातो कोठे? खाली पडल्यावर वृक्षांत अडकून पडतो कीं काय? त्याची प्रसूति झाल्यावर माता त्याला पित्याकडे कां घेऊन जात नाही? त्याची सुटका तरी सुखरूप होते की नाही? असे प्रश्न साहाजिक उत्पन्न होतात, व वैदिक ऋषींनी पुनः पुनः त्यांचा विचार करून ते सोडविण्याचा प्रयत्न केलेला आहे. ही सूर्याची गोष्ट अग्नीलाही लागू आहे; कारण ऋग्वेदांत सूर्य व अग्नि यांचे एकत्व अनेक वेळां प्रतिपादिलेलें आहे. ३,२,१४ यांत अग्नीला उषःकालीं जागें होणारें (उषर्बुधं) प्रकाशयुक्त आकाशांतील दिव्य तेज असे ह्मटलेलें आहे. ऐतरेय ब्राह्मणांत † (८,२८) "सूर्य अस्तंगत होतांना अग्नीत प्रवेश करतो व प्रातःकाली पुनः त्याच्यापासूनच उत्पन्न होतो" असें सांगितलें आहे. दहा महिन्यांच्या गर्भावस्थेनंतर गुप्त होण्याची गोष्ट सूर्याची असो वा अग्नीची असो, दहा महिनेपर्यंत प्रकाशल्यावर क्षितिजाखालीं जाणाऱ्या

---

* क इमं वो निण्यमा चिकेत वत्सो मातॄर्जनयत स्वधाभिः । बह्वीनां गर्भो अपसामुपस्थान्महान्कविर्निश्चरति स्वधावान् ॥ ऋ. १,९५,४

† आदित्यो वा अस्तं यन्नग्निमनुप्रविशति ।...। अग्नेर्वा आदित्यो जायते ॥ ऐ. ब्रा. ८,२८.

सूर्याशीं तिचा संबंध आहे, एवढें खास. आतां हा नाहीसा होणारा कुमार जातो कोठें, त्याचे होते काय ? तो आपल्या मातापितरांना परत मिळतो की नाही, मिळत असल्यास केव्हां व कसा मिळतो ? त्याला परत मिळवून देण्याचें काम ऋग्वेदांत **ऋभु** किंवा **अश्विन** यांनी केलेले आहे. १,११०,८ यांत ऋभूंनी मातेला वत्साशी युक्त केल्याचे सांगितले आहे. अश्विनांच्या पराक्रमाचा उल्लेख मागे झालाच आहे. आतां या दहा महिन्यांनंतर च्युत होणाऱ्या अग्नीच्या किंवा सूर्याच्या गोष्टीवर पुराणांतील स्कंदाची किंवा कुमाराची गोष्ट कशी रचिली असावी हे सहज सांगतां येईल. खाली पडल्यावर ( स्कंद ) गुप्त होणारा ( गुह ), प्रातःकाली सात नद्या ऊर्फ मातांबरोबर उगवणारा व विजयी होत्साता प्रकाशकिरणांसह ऊर्फ देवांच्या सैन्यासह देवयान मार्गाचे आक्रमण करणारा असा सूर्य हाच कुमार कार्तिकेय होय. वृत्राबरोबर होणाऱ्या युद्धात मरुत् हे इन्द्राचे साहाय्यकर्ते असल्यामुळें या मरुतांचा पौराणिक प्रतिनिधि जो रुद्र त्याचा हा कुमार पुत्र होणे कांही अशक्य नाहीं. सूर्याला वर येते वेळी वृत्राने बुजविलेली उदयगिरीची ( अवेस्तिक आलबुर्झ ) द्वारें फोडावी लागत असल्यामुळे या कुमाराला क्रौंचदारण ( क्रौंच पर्वत फोडणारा ) हें अभिधानही योग्यच आहे. या विषयाचे साग्र परीक्षण करण्याचें हे स्थळ नसल्यामुळें तो येथेंच सोडला पाहिजे. ध्रौविक उपपत्तीला पोषक अशा कांही बाबी आश्विनांच्या कथांत आहेत कीं नाही हें पहाण्याचा आपला उद्देश होता, व तो उद्देश सफलही झाला आहे. सप्तवध्रीच्या कथेतील **दशमास्य** हा शब्द व दीर्घतम्याच्या गोष्टीतील **दशमे युगे** हे शब्द दहा महिन्यांच्या सूर्यप्रकाशाचे स्पष्ट सूचक असून तीन, दहा किंवा शंभर दिवसांच्या अखंड रात्रीचेही स्पष्ट किंवा अप्रत्यक्ष उल्लेख या कथांत आलेले आहेत. ' निर्ऋतीच्या उपस्थांत ' किंवा ' तमांत ' शयन करणारा सूर्य असे जे शब्द आलेले आहेत, त्यांवरून हा तम खरा असून लाक्षणिक अर्थाचा नव्हे हे उघड आहे. तात्पर्य या सर्व कथांचा भर दहा महिन्यांनंतर क्षितिजाखाली जाणाऱ्या सूर्यावर असून हिवाळ्यांत थोडा बहुत निस्तेज होणाऱ्या सूर्यावर नाही यांत शंका नाही. अश्विनांच्या सर्व पराक्रमांचे धोरण या अगाध तमाच्या निरालंब समुद्रांतून सूर्याला वर काढण्याकडे आहे. वसंतोपपत्ति व ध्रौविकउपपत्ति या

दोन्हीही सूर्यसंबंधी आहेत, तरी ध्रौविक उपपत्ति जास्त व्यापक असल्यामुळे वसंतोपपत्तीने उलगडा न होणाऱ्या अनेक गोष्टींचा तीवरून चांगला खुलासा होतो, व ही गोष्ट उलटपक्षी ध्रुवोपपत्तीला पोषक होऊन तिला स्थापित करते.

## सूर्याचें चक्र.

सप्त आदित्य व आठवा मार्तोड यांच्या गोष्टींवरून सात महिन्याचा सूर्यप्रकाश व त्यानंतर येणारी मोठी थोरली अखंड काळोखाची रात्र अशी ध्रुवप्रदेशातील एक स्थिति दिसून येते हे मागे सांगितलेंच आहे. अक्षांशाच्या मानाने ६ पासून ११ पर्यंत सूर्यप्रकाशाचे महिने ध्रुववृत्ताच्या आंतील प्रदेशांत असतात. नवग्व आणि दशग्व यांची वार्षिक सत्रे व अश्विनांच्या कथांपैकी सप्तवध्रीची कथा यांवरून नऊ आणि दहा महिन्यांच्या सूर्यप्रकाशाच्या काळाचे अनुमान करता येते; हेंही येथपर्यंतच्या विवेचनावरून दिसून आले आहे. आतां ऋग्वेदांतील प्रत्यक्ष सूर्याच्याच गोष्टीवरून असला कांही प्रकार अनुमित होतो की नाहीं हे पहावयाचे आहे. सूर्याच्या रथाला दहा किंवा सात घोडे आहेत अशा अर्थाच्या वचनावरून दहा किंवा सात महिन्याच्या प्रकाशाचे पूर्वी अनुमान केलेंच आहे. पण इंद्राने सूर्याचे चक्र चोरून नेल्याची गोष्ट याहूनही स्पष्ट आहे. ही गोष्ट नीट कळण्यासाठीं इंद्राचा सूर्याशी संबंध काय आहे हे पाहिले पाहिजे. इन्द्र उषेसह सूर्याला उदयास आणितो व आकाशांत त्याची स्थापना करितो ( ८,३,६ इ० ). तमांत पडलेल्या सूर्याला दशग्वाच्या साहाय्याने इन्द्राने माणसांसाठी वर काढिले ( ३,३९,५ ). त्याने सूर्याला मार्ग करून दिला ( १०,१११,३ ); व असुरांशी युद्ध करून प्रकाश परत मिळविला. तात्पर्य इन्द्र हा सर्व ठिकाणीं सूर्याचा मित्र व सहायक आहे. असे असूनही ऋग्वेदात[1] ( १,१७५,४;४,३०,४;५,३१,१,१०,४३,५ ) सूर्याचे चक्र चोरून इंद्राने त्याचा पराभव केल्याचे सांगितले आहे. मेघाच्या योगाने सूर्य आच्छादून जाणे किंवा त्याचे रोजचे मावळणे या गोष्टीशी वरील कथेचा संबंध असावा असे कित्येकांनी अनुमान केले आहे. परंतु इंद्रानें ढग उत्पन्न करणे व त्यांनं सूर्याचे आच्छादन करणे ही गोष्ट अगदी अनिश्चित असल्यामुळे एखाद्या कथेला ती आधारभूत

---

१ मुषाय सूर्यं कवे चक्रं; मघवा सूर्यं जयत्, इ०

धरली असेलसें संभवत नाही. रोजच्या सूर्याच्या मावळण्याशी या कथेचा संबंध जोडण्याला आपल्यापाशी कांही आधार नाहीं. ह्मणून दुसरा कांही तरी या गोष्टीचा खुलासा शोधून काढला पाहिजे. सूर्याच्या रथाला एक चाक आहे ही गोष्ट ऋग्वेदांत ( १,१६६,१ ) तशीच* पुराणांतही प्रसिद्ध आहे. हे चक्र इन्द्रानें हरण केल्यावर सर्व व्यवहार अर्थातच बंद पडणार. या कथेत हे चक्र म्हणजे प्रत्यक्ष सूर्याचें बिंबच सोय. **सूर्यं चक्रम्** ( सूर्य हें चक्र ) असे जे शब्द ऋग्वेदांत ( १,१७५,४;४,३०,४ ) आले आहेत, त्यांवरून असे मानावयास हरकत नाहीं. इन्द्रानें चक्र नेलें ह्मणजे प्रत्यक्ष सूर्यच नाहीसा झाला; केवळ रथाचें एक चाक गेलें असे नव्हे. पण इंद्रानें या चाकाचें केलें काय ? असुराना जाळून टाकण्यासाठी इंद्रानें सूर्यकिरणांचा उपयोग केलेला आहे ( ८,१२,९ ).[१] सूर्याचें चक्र उर्फ सूर्यबिंब चोरून नेण्यांतही इंद्राचा हाच हेतु असावा. पण इन्द्राचें असुरांशी झालेले युद्ध प्रकाशासाठी मुख्यतः झालेले असल्यामुळें सूर्याचें बिंब नेऊन त्यानें पुनः सूर्यालाच वर काढिले असे कसे ह्मणावें ? असा प्रश्न उत्पन्न होईल. पण ही अडचण फारशी जड नाहीं. सूर्य व प्रकाश यासंबंधी प्राचीन व अर्वाचीन कल्पना भिन्न आहेत. हे दोन्ही समवेत असतात असे आपण मानितो. पण **तमांसि क्षियन्तम्** ( तमांत राहिलेल्या ) हे विशेषण ऋग्वेदांत सूर्यासंबंधानें निदान दोन वेळ तरी आलेलें आहे ( ३,३९,५;१,११७,५ ). त्यावरून क्षितिजाखालीं गेल्यावर सूर्याचें तेज नाहींसें होतें अशी वैदिक ऋषीची कल्पना स्पष्ट दिसून येते. ही गोष्ट मान्य केल्यास असुरांचा पराभव करून प्रकाश आणण्यासाठीं इन्द्राला सूर्यबिंबाचा काय उपयोग होता हे समजावयाला कठीण पडणार नाही. सूर्याचें तेज नाहीसें करणाऱ्या असुरांचा नाश करून त्याला पुनः तेजस्वी करण्यांत इंद्र त्याला साहाय्य करतो; ह्मणूनच "इंद्रानें सूर्याच्या चक्राला थांबविलें आणि गरगर फिरवून रजाच्या तळीं आच्छादक अंध-

---

* रथस्यैकं चक्रं भुजगयमिताः सप्त तुरगाः । निरालंबो मार्गश्चरणरहितः सारथिरपि ॥ या सुभाषितांत सूर्याच्या पौराणिक स्वरूपाचें सार आलें आहे.

१ इंद्रः सूर्यस्य रश्मिभिर्न्यर्शसानमोषति । ऋ. ८,१२,९.

कारांत त्याला फेकून दिलें " असें ह्मटलें आहे[1] ( ४,१७,१४ ). पण आपल्याला या बाबतींत विशेष महत्वाचा मंत्र ह्मटला ह्मणजे ६,३१,३ हा होय. तो असाः—

त्वं कुत्सेनाभि शुष्णमिंद्राशुषं
युध्य कुयवं गविष्टौ ।
दश प्रपित्वे अध सूर्यस्य
मुषायश्चक्रमविवेरपांसि ॥

याच्या पहिल्या दोन ओळींत कठीणपणा मुळीच नाहीं. त्यांचा अर्थ असाः—" हे इन्द्र, गाई मिळविण्यासाठीं तू कुत्सासह अशुष आणि कुयव अशा शुष्णाशीं युद्ध कर." या मंत्राचें दुसरें अर्ध मात्र सरळ नाही. पदपाठांत 'अविषेरपांसि' हे शब्द 'अविवेः रपांसि' असे तोडले आहेत, व त्यांचा अर्थ 'संकटें नाहींशीं केली' असा आहे. आतां या दुसऱ्या दोन ओळींतील **दश** आणि **प्रपित्वे** हे दोन शब्द वगळतां बाकी शब्दांचा अर्थ असाः—" तूं सूर्याचे चक्र चोरून संकटे नाहींशीं केलीस." आतां **दश** आणि **प्रपित्वे** याचा अर्थ काय ते पाहूं. सायणाचार्यांनी **दश** ह्मणजे **अदशः** असें समजून व **प्रपित्वे** ह्मणजे 'युद्धांत' असा अर्थ घेऊन एकदर पदाचा अर्थ " तू युद्धात ( त्याला ) दंश करतोस " असा केला आहे. पण ही केवळ ओढाताण असून, त्या अर्थाची याच गोष्टीचे वर्णन करणाऱ्या इतर स्थलांशीं संगति लागत नाहीं. उदाहरणार्थ, ऋ. ४,१६,१२ यांत 'शुष्णाला **अह्नः प्रपित्वे** मारिलें' असे म्हणून ५,३१,७ यात 'प्रपित्वाला' पोचल्यावर शुष्णाचा पराभव झाला असे सांगितलें आहे. या दोन्ही स्थळीं युद्धाचा **काळच** सांगितला आहे यांत कांहीं शंका नाहीं. या तिन्हीं स्थळीं **प्रपित्व** शब्द आला असून तिन्ही ठिकाणीं शुष्णाशीं झालेल्या युद्धाचें वर्णन असल्यामुळें **दश प्रपित्वे, अह्नः प्रपित्वे** आणि **प्रपित्वं यन्** हीं सर्व पदे समानार्थकच समजली पाहिजेत. अर्थात्च प्रपित्वाचा अर्थ जो असेल तो तिन्ही ठिकाणीं एकच असला पाहिजे. प्रपित्व शब्द ऋग्वेदांत इतर ठिकाणींही

1 अयं चक्रमिषणत्सूर्यस्य न्येतशं रीरमत्ससृमाणम् । आ कृष्ण ईंजुहुराणो जिघर्ति त्वचो बुध्ने रजसो अस्य योनौ ॥ ऋ. ४,१७,१४.

आला आहे. पण त्याच्या अर्थाविषयीं पंडितांचें ऐकमत्य नाहीं. कित्येक त्याचा **अग्रभाग** असा अर्थ समजून, **अन्हः प्रपित्वे** म्हणजे दिवसाच्या आरंभी किंवा प्रातःकाळीं असा अर्थ करितात. सायणाचार्यांनी ८,४,३ वरील भाष्यांत **प्रपित्वे**चा अर्थ 'प्राप्त झालें असतां,' ( प्राप्तेसति ) असा केला आहे. अशा स्थितींत **प्रपित्व** व त्याचा विरोधी असे शब्द जेथें आले असतील अशा स्थलांवरून अर्थाचा निश्चय केला पाहिजे. ऋ॰ ७,४१,४, व ८,१,२९,* यांत **प्रपित्व** शब्दाचा **मध्ये** व **उदिता** या शब्दांशीं स्पष्ट विरोध दाखविला आहे. अर्थात् त्याचा अर्थ 'शेवटीं', 'अतीं' असाच घेतला पाहिजे. वाजसनेयी संहिते वरील ( २४,३७ ) व्याख्यानांत महीधरानें **प्रपित्वे** ह्मणजे **प्रपतने** असें समजून त्याचा अर्थ दिवसाच्या शेवटीं असा केला आहे. हा अर्थ घेतल्यास ४,१६,१२ यांतील **अन्हः प्रपित्वे नि बर्हीः** या वाक्याचा अर्थ इन्द्रानें शुष्णाला दिवसाच्या शेवटीं मारिलें असा होतो. दश प्रपित्वे या पदाचा अर्थ सदर अर्थाला अनुसरूनच केला पाहिजे. पण पदपाठांत केल्याप्रमाणें **दश प्रपित्वे** हे शब्द निराळे घेतले असतां तसा अर्थ घेता येत नाहीं. म्हणून **दशप्रपित्वे** हे एक पद घ्यावें म्हणजे त्याचा अर्थ 'दहा ( महिन्यां ) च्या शेवटीं' असा होईल. या रीतीनें एकंदर ऋचेचा अर्थ असा होतोः—"हे इन्द्र गाई परत मिळविण्यासाठीं तू सर्वभक्षक ( अशुष ) व धान्यांचा शत्रु ( कुयव ) अशा शुष्णाबरोबर युद्ध कर. दहा ( महिन्या ) च्या समाप्तीनतर तूं सूर्याचें चक्र चोरून संकटें नाहींशीं केलीस." हा अर्थ अगदीं सरळ असून त्यांत **दश** शब्दाचा नवीनच कांहीं तरी अर्थ करून इन्द्राला आपल्या शत्रूस दश करविण्याची जरूर पडत नाहीं. **अन्हः प्रपित्वे** ( ४,१६,१२ ) व **दशप्रपित्वे** हीं दोन्ही पदयुग्में इंद्रशुष्णांच्या युद्धवर्णनांत आलेलीं असल्यामुळें **अन्हः प्रपित्वे** प्रमाणेच **दशप्रपित्वे** हहीं पद कालवाचक असावें असें सहजच दिसतें. अर्थात् त्याचा अर्थ **दशानां प्रपित्वे** ( दहांच्या शेवटीं ) असा घेण्यासाठीं **दश** व **प्रपित्वे** हीं पदें एकत्रच घेतलीं पाहिजेत. याप्रमाणें व्याकरणविषयक संबंध जुळविल्यावर

---

* उतेदानीं भगवंतः स्यामोत प्रपित्व उत मध्ये अह्नाम् । उतोदिता मघवन्त्सूर्यस्य वयं देवानां सुमतौ स्याम ॥ ७,४१,४. मम त्वा सूर उदिते मममध्यंदिने दिवः । मम प्रपित्वे अपि शर्वरे वसवा स्तोमासो अवृत्सत ॥ ८,१,२९.

**दश** ह्मणजे दहा 'दिवस' की दहा 'महिने' एवढेच ठरवावयाचें राहिले **अन्हः प्रपित्वे** या शब्दांवरून ते दहा दिवस असावे असे वाटण्याचा संभव आहे. पण इन्द्रशुष्णांचे युद्ध दाशाहिक खात्रीने नसून वार्षिक किंवा दैनिक असल्यामुळे **दश** ह्मणजे दहा महिने असाच अर्थ घेतला पाहिजे. ७,१०३,९ यांत **द्वादशस्य** या सख्याविशेषणाचा द्वादशस्य मासस्य असाच अर्थ घेतलेला आहे. तर याप्रमाणे या मंत्रात तमोरूप असुराला मारण्यासाठीं इन्द्राने सूर्याचे चक्र केव्हां चोरिले ते नक्की सांगितले आहे. दशग्वांचे दशमासिक सत्र आटोपल्यावर ह्मणजे प्राचीन रोमन वर्षाच्या अखेरीस ही गोष्ट घडून आलेली आहे. वर सुचविलेली या मत्रांतील पदांची रचना सरळ असून, त्याप्रमाणे होणारा अर्थ इतर गोष्टींशा अगदी जुळता आहे, इतकेच नव्हे, तर चालू अर्थापेक्षा तो अधिक सयुक्तिकही आहे. चालू अर्थाची सर्व जबाबदारी पदपाठावर आहे; कारण त्यात जर **दश प्रपित्वे** ही पदे तोडलेली नसती तर त्याचा अर्थ इतका गूढ राहिला नसता. शिवाय पदपाठ ह्मणजे अगदी अस्खलनशीलच आहे असेही नाहीं. यास्क व सायणाचार्य यांनीही कित्येक वेळां त्यांत फेरफार सुचविलेले आहेत. (उदा. १,१०५,१८,१०,२९,१ आणि निरुक्त, ५,२१;६,२८). ह्मणून सदर मत्राचा समाधानकारक अर्थ होण्यासाठीं पदपाठ सोडून दशप्रपित्वे हे एक पद घेण्यांत आम्हीही कांही भलत्याच मार्गाचे अवलबन करीत आहो असे नाहीं. असा अर्थ घेतला असतां या मंत्रावरून सूर्याच्या वार्षिक गतीचे सविस्तर वर्णन आपल्याला मिळते. सूर्याला उदयास आणून तो दहा महिने प्रकाशल्यावर पुनः त्याचे चक्र चोरून नेऊन त्याच्यासह तमोरूपी असुरांशी झगडण्यासाठीं इद्र क्षितिजाखालीं जातो, असा या सर्व कथेचा तात्पर्यार्थ होय. हा अर्थ ध्रौविक उपपत्तीवरून नीट समजत असल्यामुळें तिच्या सत्यतेसंबधाचे ही कथा ह्मणजे एक अप्रत्यक्ष प्रमाण होय.

## विष्णूचीं तीन पदें.

ध्रुवप्रदेशांतील परिस्थिति दर्शविणाऱ्या दुसऱ्या कांही ज्या गोष्टी आहेत त्यांचाही याच प्रकरणांत विचार करूं. विष्णूचीं तीन पदें ऋग्वेदांत अनेक ठिकाणी स्पष्टपणें सांगितली आहेत, (१,२२,१७–१८; १,१५४,२). त्यासंबंधाचें दोन पूर्वाचार्यांचें मत यास्कानें (१२, १९)

दिलें आहे. त्यांपैकीं शाकपूणीच्या मतें हीं पावलें पृथ्वीवर, अंतरिक्षांत व आकाशांत ठेविलेलीं असावीत. दुसरा जो और्णवाभ त्याच्यामतें त्यांपैकीं एक पाऊल उदयगिरीवर ( समारोहण ), दुसरें ख—स्वस्तिकीं ( विष्णुपद ), आणि तिसरें अस्तगिरीवर ( गयशिरस् ) अशी ठेवलेली असावीत. रामायणांत ( ४,४०,६४ ) एका ठिकाणीं उदयपर्वताच्या सौमनस नामक शिखरावर विष्णूचे पहिले पाऊल पडलेलें आहे असे सांगितलें आहे. पुढे दुसरे पाऊल मेरूवर आहे असें सांगून " सूर्य जेव्हां उत्तरेकडे जंबुद्वीपाला प्रदक्षिणा करतो तेव्हां तो बहुधा मेरूच्या शिखरावरून दिसत असतो " असे म्हटलें आहे. यावरून विष्णूचें तिसरें पाऊल जंबुद्वीपांत सूर्यास्तानंतर ठेविलेलें असतें असा रामायणाचा मावार्थ दिसतो. हीं विष्णूचा पदे पुराणांत विष्णूचा पांचवा अवतार जो वामन त्याच्या तीन पदांच्या रूपानें आलेली आहेत. बलीची गोष्ट सर्व प्रसिद्धच आहे. बलीने तीन पदे भूमी देतो ह्मटल्यावर वामनानें पहिल्या पदानें सर्व पृथ्वी भरून दुसऱ्या पदानें आकाश भरिलें. तेव्हां तिसरें पाऊल ठेवण्यासाठी संपूर्ण विश्वांत कोठेहि जागा न राहिल्यामुळें बळीनें आपले वचन सत्य करण्यासाठीं म्हणून आपले डोकें पुढें केलें व त्यावर वामनाला तिसरें पाऊल ठेवावयास सांगितले. तेव्हां वामनानें बलीच्या डोक्यावर पाय देऊन त्यास पाताळांत ढकलिलें व इन्द्राला पुनः सर्व विश्वाचे राज्य मिळवून दिले. या सर्व गोष्टींत विष्णु ह्मणजे सूर्य होय ही गोष्ट सर्वमान्य आहे. पण विष्णूची ही तीन पदें दैनिक आहेत कीं सांवत्सरिक आहेत याविषयीं वैदिक पंडितांत एकमत नाहीं. यासाठीं प्रत्यक्ष वेदांतील विष्णूच्या वर्णनावरून याचा निर्णय करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. ऋ. १,१५५,६ यांत विष्णूने आपल्या चार नांवाच्या ९० अश्वांना चक्राप्रमाणें फिरावयास लाविल्याचे सांगितलें आहे, त्याचा संबंध ९० दिवसांच्या चार ऋतूंशीं उघड दिसतो; व त्यावरून विष्णूचें पराक्रम ह्मणजे सूर्याच्या वार्षिक गतीवरील रूपक होय असें मानावयास बळकट आधार मिळतो. तसेंच विष्णु हा इंद्राचा मोठा सखा ( इंद्रस्य युज्यः सखा १,२२,१९ ) असून वृत्रांशीं लढण्यांत त्याची इन्द्राला पुष्कळ मदत झालेली आहे. वृत्राला मारतेवेळीं इन्द्रानें लवकर ये, असें विष्णूला सांगितलें असून ( ४,१८,११ ) विष्णूनें त्याच्या मदतीनें गाईचा गोत्रही

फोडिला आहे ( १,१५६,४ ), व दोघांनीं मिळून शबराचा पराभव करून सूर्य, उषा व अग्नि यांना उत्पन्न केल्याचें ७,९९,४–५ यात सांगितलें आहे. या गोष्टींत सांगितल्याप्रमाणें विष्णु जर इन्द्राचा मित्र व वृत्रयुद्धांत त्याचा सहायक असेल तर त्याचें तिसरें पाऊल या युद्धभूमीवर म्हणजे पाताळांत पडलेलें असले पाहिजे. विष्णूचीं दोन पदें मात्र मनुष्यांना दृश्य असून तिसरें अदृश्य आहे असें जे १,१५५,५ यांत म्हटलें आहे त्याचा अर्थ आतां नीट कळून येईल. पाताळांतील तिसरें पाऊल अदृश्य आहे असें म्हणणें योग्यच आहे. वृत्राचें वसतिस्थान गुप्त ( निण्य ) असून तमोमय आहे हें पूर्वी सांगितलेंच आहे. विष्णूचीं तीन पदें म्हणजे सूर्याचें वार्षिक भ्रमण होय. पहिलीं दोन पदें तो क्षितिजावर असतांचीं असून तिसरें अखंड काळोखाच्या दीर्घ रात्रींतील म्हणजे या वृत्राच्या स्थानांतील होय. याच ठिकाणीं विष्णु इन्द्राला वृत्राचा पराभव करण्यांत आणि उषा, सूर्य व यज्ञ हीं परत मिळविण्यांत मदत करितो. मागच्या प्रकरणांत इन्द्राचें वृत्राशीं उर्फ शबराशीं होणारें युद्ध वसंत आरंभ धरून आठव्या महिन्यांत होतें असें दाखविलें आहे. हे सूर्यप्रकाशाचे आठ महिने व पुढचे काळोखाचे चार महिने मिळून विष्णूचीं तीन पावलें होत. विष्णु चार महिनेपर्यंत सुप्त असतो असें पुराणांत सांगितलें आहे, त्यावरूनही हेंच अनुमान निघतें. विष्णु क्षीर समुद्रांत अहि ( शेष ) शयनावर निद्रा घेतो असें जे पुराणांत वर्णन आहे त्यांतील अहि व समुद्र म्हणजे पृथ्वीच्या खालचा पाताळांतील समुद्र व वृत्ररूपी अही होत. विष्णूच्या चार महिन्यांच्या निद्रेचा संबंध कित्येकांनीं चार महिन्यांच्या पर्जन्यकाळाशीं लाविलेला आहे. पण ही मागाहूनची कल्पना आहे. विष्णूचें तिसरें पद व त्याची निद्रा हीं मुळचीं एकरूपच होत. शिवाय हें तिसरें पद अदृश्य असल्यामुळें त्याचा संबंध वर्षाकाळाशीं लावतां येत नाहीं; कारण वर्षाकाळांत सूर्य कांहीं सर्वस्वी अदृश्य नसतो. ध्रुववृत्तान्तर्गत दीर्घ काळोखाच्या रात्रीशिवाय विष्णूच्या अदृश्य अशा तिसऱ्या पदाचा व निद्रेचा उलगडा होत नाहीं.

पण या पौराणिक गोष्टीशिवाय खुद्द वेदांतही अशाच धोरणाची विष्णुसंबंधी एक कथा आहे. विष्णूला ७,१००,६ मध्यें **शिपिविष्ट** हें कुत्सितार्थक नांव दिलेलें आहे. त्यांत ऋषि म्हणतो ' हे विष्णो तूं

आपल्याला **शिपिविष्ट** म्हणवून घेतलेंस, तर तसा तुझा दोष काय होता ?' शिपिविष्ट या पदासंबंधी एक जुनी दंतकथा देऊन हें पद ' कुत्सितार्थीय ' आहे असें सांगून ( ५,७–९ ), यास्कानें त्याचे दोन अर्थ दिले आहेत. " शेपः इव निर्वेष्टितः " ह्मणजे ' गुह्येंद्रियाप्रमाणे वेष्टिलेला ' किंवा " अप्रतिपन्नरश्मि " म्हणजे ' ज्याचे किरण प्रच्छन्न झालेले आहेत ' असा पहिला अर्थ असून दुसरा ' ज्याचे किरण (शिपयः) आविष्कृत झालेले आहेत' ( आविष्टाः ) असा आहे. यावरून यास्काच्या वेळीं शिपिविष्ट शब्दाचा अर्थ अनिश्चित झालेला होता असें कांहीं पडितांनीं अनुमान केलें आहे. पण असे मानण्याचें कारण नाहीं. अर्वाचीन संस्कृत वाङ्मयांतही शिपिविष्ट शब्दाचा " सडलेल्या केसांचा " किवा " गलत्कुष्ट असलेला " असा वाईट अर्थ स्पष्ट आहे. शिपिविष्ट शब्दाचे मूळ स्मरणांतून गेल्यामुळें व तो शब्द विष्णुसारख्या देवतेला लावलेला असल्यामुळे त्याचा वाईट अर्थ घालविण्यासाठी ब्रह्मवादि व पंडित यांनीं निरनिराळे अर्थ सुचविले. त्यांत **शिपि** शब्दाचा ' किरण ' असा अर्थ करून यास्कानें प्रथम त्यांतून चांगला अर्थ काढण्याचा यत्न केला. म्हणूनच बहुधा महाभारतांत ( शां. प. अ. ४३२, श्लो.६९,७१) " शिपिविष्ट हे विशेषण यास्कानेच प्रथम विष्णूला लाविले " असें म्हटलेले आढळतें. पण त्यावरून महाभारताचा कर्ता वेदानभिज्ञ होता असें मानणे मात्र सयुक्तिक नाहीं. तैत्तिरीय संहितेंत विष्णूची **शिपिविष्ट** म्हणून पूजा केलेली सांगितली आहे ( २,२,१२,४–५ ) व शिपि शब्दाचा ' पशवः ' असा अर्थ दिला आहे. पण याप्रमाणें शिपि शब्द यज्ञ, पशु, किंवा किरण यांचा वाचक धरून व्युत्पत्तीच्या जोरावर शिपि-विष्ट शब्दाला चांगला अर्थ देण्याचे प्रयत्न बहुतांशीं फसले आहेत. या-वरून शिपिविष्ट शब्दाचा मूळचा अर्थ वाईट असून कोणत्यातरी शारीरिक व्याधीचा तो दर्शक होता हेच सिद्ध होते. ब्रह्मवाद्यांनीं त्यांत कांहीं गुह्य अर्थ आहे असें सांगितलें आहे. पण याचें कारण त्या शब्दाचा खरा अर्थ त्यांस माहित नव्हता हें नसून आपल्या देवतेला असले वाईट नांव नसावें ही इच्छाच होय. ७,१००,५–६ यांत आलेल्या शिपिविष्ट शब्दाचा

वर सांगितलेला वाईट अर्थच आहे यांत संशय नाहीं. त्या* ऋचांचा भावार्थ असाः—'हे विष्णो, ज्ञातव्य गोष्टी जाणणारा मी तुझा भक्त तुझ्या शिपिविष्ट या नांवाची स्तुति करितो; शक्तिहीन असा मीं सामर्थ्यवान् आणि या लोकाच्या पलीकडे रहाणाऱ्या तुझें स्तवन करितों. मी शिपिविष्ट आहें असें तूं ह्मणतोस तर ते तुझे नाम वर्जनीय कां असावे? अन्यरूप धरून संग्रामांत तूं गेलेला असल्यामुळे हे तुझे रूप तूं आह्मांपासून लपवूं नको.' रजसः पराके ( या लोकाच्या पलीकडे ) असे जे शब्द यांत आलेले आहेत, त्यांवरून या ऋचांच्या खऱ्या अर्थाचे धोरण समजण्यासारखे आहे. या पलीकडच्या लोकांतच विष्णूला हे वाईट उपपद मिळाले आहे. हे वाईट उपपद आहे तरी काय? **शिपिविष्ट** याचा अर्थ वर सागितल्याप्रमाणे 'शेपाप्रमाणे वेष्टिलेला' असा आहे; म्हणजे विष्णूचे तेज या खालच्या लोकात असेपर्यंत तमामुळे लुप्त झालेले होतें. म्हणूनच या उपपदांबद्दल विषाद मानूं नको असें ऋषीनें विष्णूला सांगितले आहे. या नामाने सूचित होणारे रूप विष्णूने तात्पुरते स्वीकारलेले असल्यामुळें असुरवधानंतर त्याची गरज सपते; आणि म्हणूनच खरे स्वरूप प्रकट करण्यासाठी विष्णूची ऋषीने प्रार्थना केली आहे. हाच या वर सांगितलेल्या ऋचाचा खरा अर्थ होय. क्षितिजावर असतांना सूर्याला **बृहच्छेप** असे म्हटल्यास तमोमय अशा पाताळांत त्याला **शिपिविष्ट** ऊर्फ "शेपाप्रमाणे ( शिश्नाप्रमाणे ) वेष्टिलेला" असे म्हणणे योग्यच होईल. यांत विष्णूच्या भक्ताला विषाद मानण्यासारखे काहींच नाहीं. तात्पर्य ह्या गोष्टीचा सबंध रोगयुक्त होत्सात्या विष्णूने पाताळांत जाऊन असुरांच्या मस्तकावर आपले पद ठेविले, किंवा जले, प्रकाश, सूर्य, उषा इत्यादिकाना वर आणण्यासाठी इन्द्र युद्ध करीत असतां कृष्णकवच घालून त्याला मदत केली व अखड काळोखाच्या दीर्घ रात्रीनंतर सूर्याला तेजोयुक्त करून वर आणिले या गोष्टीशीच आहे.

---

* प्रतत्ते अद्य शिपिविष्ट नामार्यः शंसामि वयुनानि विद्वान् । तं त्वा गृणामि तवसमतव्यान्क्षयन्तमस्य रजसःपराके ॥ ५ ॥ किमित्ते विष्णो परिचक्ष्यं भूत्प्रयद्ववक्षे शिपिविष्टो अस्मि । मा वर्पो अस्मदपगूह एतद्यदन्यरूपः समिथे बभूथ ॥ ६ ॥ ऋ. ७,१००.

विष्णूप्रमाणेंच संपूर्ण विश्वाचें आक्रमण करणाऱ्या ज्या अन्य वैदिक देवता आहेत, त्यांच्या वसतिस्थानाचा विचार करतांही हेंच अनुमान दृढ होतें. सविता, अग्नि व अश्विन या देवता अशा प्रकारच्या आहेत. निरनिराळ्या लोकांचे आक्रमण करणाऱ्या सवित्याचीं ( ५,८१,३ ) तीन आकाशें ( द्यावः ) असून त्यांतील दोन जवळ जवळ आहेत व तिसरें यमाच्या प्रदेशांत आहे ( १,३५,६ ), याचा अर्थ सवित्याचीं दोन ठिकाणे वरच्या आकाशांत असून तिसरे पाताळांत आहे असा होय. अग्नीचींही तीन ठिकाणें असून एक समुद्रात, दुसरें आकाशांत ( दिवि ) व तिसरें जलांत आहे ( अप्सु. १,९५,३ ). विष्णूलाच केवळ माहीत असलेलें असे अग्नीचें तिसरे स्थान ( १०,१,३ ) व विष्णूचें तिसरें पद हीं एकच असली पाहिजेत. अग्नि हें सूर्याचेंच एक रूप असल्यामुळें त्याचे पाण्यांत गुप्त होणें व अपां नपात् ( पाण्याचा पुत्र ) होऊन त्यातून वर येणें ह्मणजे सूर्याचें क्षितिजाखालीं गेल्यावर बऱ्याच दिवसांच्या अखंड काळोखानंतर उदयास येणेंच होय. अश्विनांचींही तीन स्थानें असून ( ८,८,२३ ) त्यांच्या रथाच्या तीन चाकांपैकीं एक विष्णूच्या तिसऱ्या पदाप्रमाणे एका गुप्त ठिकाणीं आहे. या तीन देवतांच्या स्थानांतील साम्य काकतालीय मानतां येत नाहीं; आणि ह्मणून वर दिलेल्या सर्व वचनावरून असा ग्राह्यांश निघतो कीं, या देवतांचीं तृतीय ऊर्फ गुप्त स्थानें जलमय व तमोमय असा जो पाताळांतील पितृलोक, ऊर्फ यमलोक त्यांतच कोठें तरी असलीं पाहिजेत.

## त्रित आप्त्य.

विष्णूचीं तीन पदें ह्मणजे चतुर्मासात्मक असे वर्षाचे तीन विभाग असून त्यांपैकीं पहिलीं दोन दृश्य असून तिसऱ्यांत सूर्य क्षितिजाखालीं गेल्यामुळें तें अदृश्य असतें हें वरील विवेचनांत दाखविलें आहे. आतां रूपकानें या तीन विभागांना बंधु कल्पिल्यास त्यांपैकीं पहिले दोन तिसऱ्याला काळोखाच्या खांचेंत लोटून देतात अशी कथा तयार होईल; आणि खरोखरच ऋग्वेदांतील त्रित आप्त्य व अवेस्त्यांतील थ्राएतौन यांची गोष्ट अगदीं अशी आहे. तैत्तिरीय ब्राह्मणांत ( ३,२,८,१०-११ ) एकत, द्वित, आणि त्रित ऊर्फ पहिला, दुसरा व तिसरा अशा तीन बंधूंची गोष्ट आली असून तींत त्रिताला पहिल्या दोन बंधूंनी कूपांत ढकलिलें व तेथून त्याला बृहस्पतीनें वर

काढिलें असें सांगितलें आहे. एकत हा ऋग्वेदांत कोठें आलेला नसून द्वित दोन ठिकाणीं आलेला आहे (५,१८,२;८,४७,१६). **त्रित** शब्द संख्याविशेषण ह्मणून ६,४४,२३, यांत आलेला असून **त्रितेषु रोचनेषु** ( तिसऱ्या लोकात ) असा प्रयोग तेथें केलेला आहे. **त्रित** या वैदिक देवाला **आप्त्य** ह्मणजे पाण्यापासून उत्पन्न झालेला किंवा 'जलनिवासी' असें उपपद लाविलेलें आहे. वृत्राचा वध करण्यांत मरुत् व इन्द्र याचा सहायक ह्मणूनही तो पुष्कळ वेळा आला आहे. १०,८,८ यांत 'इंद्राच्या प्रोत्साहनानें **त्रितानें** त्वष्ट्याचा पुत्र जो **त्रिशिरस** त्याला मारून गाई मोकळ्या केल्याचें सांगितलें आहे. १०,९९,६ यांत त्यानें आपल्या लोखंडी वज्रानें वराहाला मारिलें असें ह्मटलें आहे. पण त्याच्या कथेतील आपल्याला महत्वाची अशी गोष्ट १,१०५ यांत सांगितली आहे. या सूक्तांत **त्रित** हा वव्रांत किंवा कूपांत पडलेला असतां त्यानें आपल्या मुक्ततेसाठीं देवाची प्रार्थना केली, तेव्हां बृहस्पतीनें त्याला दुःखमुक्त केलें (१७) असें सांगितलें आहे. या सूक्तांपैकीं कित्येक मंत्र बरेच सूचक आहेत. उदाहरणार्थ, ९ व्यांत त्यानें आकाशांतील रश्मींशीं आपला संबंध सांगून तो आपल्याला माहित असल्याचेंही त्यानें सांगितलें आहे. १८ व्यांत रक्त वृकाला तो जात असतां दिसल्याचें वर्णन आहे. या गोष्टींवरून **त्रिताचा** प्रकाशदेवतांशीं संबंध असून काल्परत्वें तो तमोमय कूपांत पडलेला होता असें दिसतें. ९,१०२,२ यांत त्रिताचें स्थान, विष्णूच्या तिसऱ्या पदाप्रमाणें, गुप्त असल्याचें सांगितलें आहे. अवेस्त्यांतही अशीच गोष्ट आली आहे. आथ्व्य ( स–आप्त्य ) हें पैतृक नाम असलेला **थ्राएतौन** यानें **अझि दहाक** नांवाच्या तीन शिराच्या व सहा डोळ्यांच्या असुराला मारिलें. या असुरावर चाल करून जात असतां थ्राएतौनचे दोघे बंधु त्याच्याबरोबर असून त्यांनीं वाटेंत त्याचा वध करावयाचा विचार चालविला होता. अशा रीतीनें या वैदिक व अवेस्तिक गोष्टींत उत्कट साम्य असल्यामुळें वर दिलेली ब्राह्मणांतील कथा ऋग्वेदांतील इकडच्या तिकडच्या काहीं फुटकळ वचनांवरून जुळविलेली होती असें ह्मणतां येत नाहीं. पण ध्रुवोपपत्तीच्या अभावीं चार महिन्यांच्या अखंड काळोखाची कल्पना पुढें आलेली नसल्यामुळें त्रिताचें नांव त्रित ऊर्फ तिसरा असें कसें पडलें हें पाश्चात्य पंडितांस कळलें नाहीं, ह्मणून त्यांनीं त्याच्या गोष्टीचा खुलासा करण्यासाठीं

मोठ्या गमतीच्या कल्पना लढविल्या आहेत. मॅक्स मुल्लरच्या मतें **त्रित** याचें मूळचे रूप **तृत** असे असून त्याचा अर्थ अर्वाचीन **तराणि** प्रमाणे 'तरून जाणारा' असा असावा व त्याचा सबंध सूर्य रोज मावळल्यावर खालच्या समुद्रांतून तरून पुनः वर येतो या कल्पनेशी असावा. पण जुन्या आयरिश भाषेतील समुद्रवाचक **त्रिअथ** शब्द स्वरशास्त्राच्या दृष्टीनें ग्रीक **त्रितोन**, संस्कृत **त्रित** आणि झेन्द **थ्रित** या शब्दांशी संबद्ध असल्यामुळे, तसेंच जुन्या नॉर्स भाषेंत **आदिन्** ( इंद्र ) वाचक **थ्रिदि** असाच शब्द असल्यामुळे **तृत** शब्दाचे **त्रित** असे गैरसमजामुळे रूपान्तर झालें असल्यास तें या निरनिराळ्या आर्य शाखांची फाटाफूट होण्यापूर्वीच झालेले असलें पाहिजे असे समजावे लागते व मॅक्स मुल्लरने तसें मानिलेंही आहे. **त्रित** ह्मणजे तिसरा कसा हे सांगतां न आल्यामुळे मॅक्समुल्लरला एवढा खटाटोप करून कांहीएक आधाराशिवाय निवळ स्वतःच्या कल्पनेवर प्राचीन आर्यांच्या पदरी विनाकारण गैरसमज बांधावा लागला आहे. पण ध्रुवोपपत्तीच्या साहाय्यानें त्रित ह्मणजे तिसरा कसा हें सहज समजतें. त्रिताचा काळोख समुद्र व प्रकाश यांशी असलेला संबंध, वृत्राच्या वधांत त्यानें केलेली कामगिरी, जुन्या आयरिश भाषेतील समुद्रवाचक **त्रिअथ** शब्द, या सर्व गोष्टीचाही आतां उलगडा होण्यास अडचण पडणार नाही. पाताळ लोक हा जलबाष्पांचें वास्तव्यस्थान असल्यामुळे त्यांतून बृहस्पतीने त्याला वर काढिले हे ठीकच आहे. त्रिताच्या स्थानासंबंधाने मॅक्समुल्लरने लिहिले आहे की " त्रिताचे गुप्त स्थान ऊर्फ वव्र हे ज्या अनारंभण तमांतून सूर्य व त्याचीच अन्य रूपे असलेले असे अत्रि, वंदन आदिकरून दररोज वर येतात तो अनंत असा काळोखाचा प्रदेशच होय." यापैकीं **दररोज** हे शब्द वगळले असतां त्रिताच्या कथेचे खरे स्वरूप या वाक्यांत बरोबर सांगितले आहे असे दिसून येईल. त्रिताचे स्थान काळोखांतील आहे एवढें समजल्यावर ध्रुवोपपत्तीशी पोंचावयास कांही फार प्रयास नको होते. त्याच्या गोष्टींतील इतर बाबीचा मॅक्समुल्लरनें योग्य संबंध लाविला असूनही **दररोज** या शब्दानें सगळ्यांची माती झाली आहे. ह्मणून तेवढा शब्द गाळला की त्या विद्वान् पंडितांच्या शब्दांतच त्रिताचें खरे स्वरूप व्यक्त झालेलें दिसून येईल.

## आपः.

दिव्य जलांचें सविस्तर वर्णन मागील प्रकरणांत आलेंच आहे. पाताळ लोक उपड्या कटाहाप्रमाणे मानिलेला असल्यामुळे तेथे जाणारी प्रत्येक देवता 'अनारंभणे तमसि' किंवा 'अबुध्न समुद्रांत' जाते असें म्हटलेले आहे. या समुद्राच्या कडेवर खालच्या व वरच्या लोकांमध्ये मर्यादा घालणाऱ्या पर्वताचीही कल्पना केलेली आहे. पाताळांतून "आपः"ना वर यावयाचें म्हणजे वृत्राने बुजविलेली या पर्वतावरील विवरे किंवा द्वारे खुली करावी लागत. बृहस्पतीने खुल्या केलेल्या अवताचे (विहिरीचे) मुख **धोंड्यांनीं** बंद झालेले [ अश्मास्यम् ] होते [ २,२४,४ ], व पणीने ऊर्फ वृत्रानें ज्या किल्यांत गाईंना अडकवून ठेविले होते, त्या किल्याचे दरवाजेही दगडांचेच होते [ १०,६७,३ ]. वृत्राच्या उदरांत एक पर्वत असून† ( १,५४,१० ) शंबराचे वास्तव्यही पर्वतावरच होते. निरुक्तकारांनी वेदार्थनिर्णयाची मोठी कामगिरी केली हे खरें. तरी कित्येक ठिकाणी व्युत्पत्तीला त्यांनी फारच वाहविली आहे; व त्याअन्वये वरील "पर्वता" च्या अर्थाचीही फार ओढाताण करून गैरसमजामुळे त्याचा अर्थ त्यांनी मेघ असा केला आहे. तरी पण येथपर्यंत केलेल्या विवेचनावरून जलमय अशा पाताळाचा, पर्वत व काळोख यांशी स्पष्ट संबध दिसून येतो. वृत्र, भुज्यु, सप्तवध्रि, त्रित इत्यादिकाच्या गोष्टींवरून ही पाताळातील जले केवळ दुष्ट असुरांचेच वास्तव्यस्थान नसून, सूर्य, अग्नि, विष्णु, अश्विन आणि त्रित यानांही वर्षांतून काही काळ त्यांत जाऊन रहावे लागे असे दिसते. विष्णूचें निद्रा घेण्याचे किंवा रोगयुक्त झाल्यास प्रच्छन्न रहाण्याचे ठिकाण हेच. त्यातच यज्ञिय अश्वाला त्रिताने सज्ज केल्यावर त्यावर इंद्राने प्रथम आरोहण‡ केले, ( १,१६३,२ ). आर्यांच्या मूलस्थानांत सात महिने प्रकाशणाऱ्या सात सूर्यांना घेऊन वहाणाऱ्या सात अंतरिक्षांतील नद्यांचे उगमस्थानही या पाताळांतील **आपः**च होत. अंतरिक्षात वाहून पर्जन्यरूपाने पृथ्वीवर जलाची समृद्धि करणाऱ्या आपः याच. तीन पृथ्वींच्या खालून पश्चिमेकडून पूर्वेकडे अशा त्या पसरलेल्या असून त्यांतच प्रलयस्थान व सूर्यादि प्रातःकालिक देवतांचे जन्मस्थान

---

† अंतर्वृत्रस्य जठरेषु पर्वतः । ऋ. १, ५४, १०.

‡ यमेन दत्तं त्रित एनमायुनगिंद्र एणं प्रथमो अध्यतिष्ठत् । ऋ. १,१६३,२.

होतें. वरुण व यम यांचें साम्राज्य यांतच असून पितृही यांतच सुखा-समाधानानें रहात. पृथ्वी किंवा द्यौ यांप्रमाणेच या आपोमय पाताळा-चाही तीन, सात किंवा दहा प्रकारचा विभाग वैदिक ऋषींनीं केला होता. तात्पर्य बऱ्याचशा वैदिक व पौराणिक कथांचा नीट उलगडा व्हावयाला पाहिजे असेल, तर या दिव्य आपःचें स्वरूप नीट ध्यानांत आणिले पाहिजे. तसे न केल्यास त्या कथांत केवळ गोंधळच आहे असे वाटण्याचा बराच संभव आहे. या ठिकाणी संकलित केलेली हीं आपःची बरींच लक्षणें पृथ्वीवरील क्षारसमुद्रालाच अर्वाचीन वाङ्मयात लाविलेली आहेत. उदाहरणार्थ भर्तृहरीने " इतः स्वपिति केशवः " इत्यादि श्लोकांत समुद्राविषयीच्या पौराणिक आख्यायिकांचे संकलन केले आहे. या सर्व आख्यायिका वैदिक आपोदेवताच्या कल्पनेवरच रचिलेल्या आहेत. सर्व जगतीचे उद्गमस्थानच अशा ह्या आपोदेवतांचे वेदांमध्यें एवढे महत्व कां आहे हे आता निराळे सांगावयास नको.

## सप्तमूल आणि दशमूल विभाग.

वेदांमध्यें सप्तमूल व दशमूल विभाग अनेक प्रकारे आला आहे. पाताळ, पृथ्वी आणि द्यौ याचे तीन, सात, किंवा दहा विभाग, तसेच सात, नऊ किंवा दहा महिन्यांनी संपणारी वार्षिक सत्रे, नवग्व, दशग्व इत्यादिकां-विषयी मागे उल्लेख आलाच आहे. इतर राष्ट्रांच्या पुराणांतही असा दोन प्रकारचा भेद आढळून येत असल्याबद्दल मागे उल्लेख केलेला आहे. या विभागांपैकी सप्तमूल विभागासंबंधाने यास्क व सायणाचार्य एवढेच म्हणतात की, सूर्याचे किरण सात प्रकारचे असल्यामुळे त्याचे घोडे किंवा

---

१ इतः स्वपिति केशवः कुलमितस्तदीयद्विषाम् । इतोऽपि शरणार्थिनः शिखरिणां गणाः शेरते ॥ इतोऽपि वडवानलः सह समस्तसंवर्तकैः । अहो विततमूर्जितं भरसहं च सिंधोर्वपुः ॥ भर्तृहरि-नीतिशतक.

भावार्थ–अहो या सागराचें शरीर किती विस्तृत, भव्य आणि सहन-शील आहे ह्मणून सांगावें ! त्याच्या एका कोनांत केशव ( विष्णु ) निद्रा घेतो आहे, तर दुसऱ्यांत त्याच्या शत्रूंच्या ( राक्षसांच्या ) टोळ्या राहिलेल्या आहेत; एका बाजूला पर्वतांचे गण आश्रयासाठी बसले आहेत, तर दुसऱ्या बाजूला प्रलयकालीन मेघांसह वडवानल पडला आहे.

अग्नीच्या जिव्हा सात कल्पिलेल्या आहेत. शं. पां. पंडित यांनीं तर वेदार्थयत्नांत या सप्तमूल विभागाचा सबंध लोलकांतून दिसणाऱ्या सात प्रकारच्या रंगांशीच लावला आहे. सकृद्दर्शनीं हे सर्व ठीक दिसतें. पण या सप्तमूल विभागांबरोबरच जिकडे तिकडे दशमूल विभागही सांगितला असल्यामुळे थोडा विचार केल्यास या खुलाशासंबंधानें शंका येऊं लागते. सायणाचार्य व यास्क यांनीं या दुसऱ्या दशमूल विभागांकडे दुर्लक्ष करूनच वेळ मारून नेली आहे, पण हा विभाग इतक्या ठिकाणीं आला आहे कीं, त्याकडे दुर्लक्ष करतां येणे शक्य नाहीं. म्हणूनच या दोन प्रकारच्या विभागांचे कारण शोधून काढण्याचा प्रयत्न केला पाहिजे. करितां प्रथम हे दोन्ही विभाग किती किती प्रकारानें आले आहेत तें पाहूं.

प्रथम सूर्य घेऊं. त्याला ५,४५,९ यांत सात अश्वांचा म्हणून १,१६४,३ यांत त्याच्या रथाचीं सात चाकें असून त्याला सात घोडे किंवा सात नांवाचा एक घोडा जोडलेला असतो असें ह्मटलें आहे. पण ९,६३,९ यात सूर्यानें आपल्या रथाला दहा घोडे जोडल्याचें सांगून १,१६४,१४ यांत संवत्सर देवतेचें चक्र दहा घोडे ओढीत असल्याचें सांगितलें आहे. अथर्ववेदांत सूर्याच्या रथाला अष्टाचक्र म्हटलें आहे. ( ९,४,२२ ).

सप्तरश्मि हे विशेषण इंद्राला ( २,१२,१२ ) तसेंच त्याच्या रथाला लाविलेलें आहे ( ६,४४,२४ ). पण ५,३३,८ यांत दहा अश्व त्याला वाहून नेतात असें ह्मटलें आहे. ८,२४,२३ यांत त्याच्याविषयीं दशमं नवम् असे शब्द आले आहेत. तैत्तिरीय आरण्यकांत ( ३,११,१ ) इंद्राचा आत्मा दहाप्रकारें गमन करतो असें सांगितलें आहे ( इंद्रस्यात्मानं दशधा चरतम् ). त्याचप्रमाणे अवेस्त्यांत वेरेथघ्न ( वै. वृत्रहन् ) चे दहा अवतार सांगितले आहेत. दशद्यु ( दहा प्रकारें प्रकाशणारा ) नामक एक इंद्राचा आश्रित असून ( १,३३,१४; ६,२६,४ ) दशोणी व दशमाय अशा दोन असुरांना त्यानें द्योतनाकडून पादाक्रान्त करविलें आहे ( ६,२०,८ ).

सोम व पूषन् यांचा रथ पंचरश्मि व सप्तचक्र असून ( २,४०,३ ) सोमाचे रश्मि ९,९७,२३ यांत दहा सांगितले आहेत.

अग्नीचे रश्मि सात असून ( १,१४६,१; २,५,२ ) त्याचे अश्व सप्तजिव्ह आहेत ( ३,६,२ ). पण १,१४१,२ यांत त्याला दशप्रमति म्हणून, १०,५१,३ यांत त्यांची दहा गुप्त स्थानें सांगितली आहेत.

९,८,४ यांत धिति ( प्रार्थना ) सात सांगितल्या असून १,१४४,५ यांत त्या दहा सांगितल्या आहेत.

अन्नें सात असून ( ३,४,७ ), १,१२२,१३ यांत तीं दहा प्रकारचीं सांगितलीं आहेत. शतपथ ब्राह्मणांत ( १,८,१,३४ ) दहा प्रकारें तयार केलेले हवि सांगितलें आहे.

सात विप्र ( ३,७,७ ) किंवा सात होते ( ३,१०,४; ४,२,१५; १०,६३,७ ) कित्येक ठिकाणीं सांगितले आहेत. पण तैत्तिरीय ब्राह्मणांत ( २,२,११; २,२,४,१ ) दहा होते स्पष्ट सांगितले असून दहा दशग्व तर प्रसिद्धच आहेत ( ३,३९,५ ).

प्रथमज होता जो बृहस्पति तो सप्तास्य असून ( ४,५०,४ ) अथर्व वेदांत एके ठिकाणीं ( ४,६,१ ) त्याला दशास्य व दशशीर्ष ह्मटले आहे.

पृथ्वीचे विभागही सात ( १,२२,१६ ) किंवा दहा ( दशावनी ) आहेत ( १०,९४,७ )

अश्विनांनीं फोडलेला गायवाडा सप्तास्य असून ( १०,४०,८ ) ८,८,२०;४९,१०;५०,९ यांत दशव्रजही सांगितला आहे.

१०,९३,४ यांत अर्यमा, मित्र, वरुण, रुद्र, मरुत्, पूषन् आणि भग असे सात राजे आले आहेत. पण ८,५,३८ यांत दहा हिरण्यसदृश राजे सांगून, ७,८३,७ यांत दहा अयज्यु ( यज्ञ न करणारे ) राजे सांगितले आहेत.

येणेप्रमाणें देवता किंवा तद्विषयक वस्तु याचे विभाग आहेत. हे सर्वच ठिकाणी सारखे स्पष्ट असतील असे नाहीं. तरी एकंदरीत त्यांच्या सप्तमूल व दशमूल विभागांसंबंधाने शंका येण्याचे कारण नाहीं. याशिवाय पृथ्वी, आकाश व पाताळ ह्यांचे प्रत्येकीं तीन विभाग, आणि देवांचे प्रत्येक लोकांतील ११ प्रकार आहेत ते निराळेच. अथर्ववेदात (११,७,१४) आणखी नऊ पृथ्व्या, नऊ समुद्र व नऊ आकाशें सांगितली आहेत. इतक्या सर्व प्रकारच्या विभागांचा उलगडा यास्काच्या

रीतीनें होत नाहीं. कारण सप्तमूल विभाग सूर्याच्या सात किरणांवरून झाला किंवा त्रिमूल विभाग पृथ्वी, आकाश व पाताळ यांवरून सुचला असे मानिलें, तरी इतर प्रकारच्या विभागांचें कारण त्यावरून समजत नाहीं. पण सात विप्र, नवग्व व दशग्व यांच्या साम्यावरून ह्या विभागांचे स्पष्टीकरण होण्यासारखें आहे. सूर्याच्या सात किंवा दहा घोड्यांचा संबंध सूर्यप्रकाशाच्या सात किंवा दहा महिन्यांशीं असावा हे साहाजिक दिसतें. ध्रुववृत्तान्तर्गत आर्यांच्या मूलस्थानांत निरनिराळ्या ठिकाणी अक्षांशाच्या मानाने प्रकाशयुक्त महिन्यांची संख्या सात पासून अकरापर्यन्त होती. पण त्यात सात, नऊ व दहा महिने प्रमुख होते असे सप्त विप्र, नवग्व व दशग्व यांवरून दिसते. अंगिरस् हे **विरूप** ( नानाविध ) असल्याचे मागे सांगितलेच आहे. त्याचप्रमाणें **अर्यमा** हाही आपल्या अनेकविध रूपांपैकी ( विषुरूपेषु ) **सप्तहोतृ** या रूपाने विशेष प्रसिद्ध होतासे दिसते (१०,६४,५). अंगिरसाना ' असुराचे वीर ' म्हटलेले आहे ( ३,५३,७ ). १०,२७, १५ यांत, सात, आठ, नऊ आणि दहा असे वीर सर्वत्र उद्भूत होत असल्याचे सांगितले आहे. अर्थात् या संख्याचा संबंध होत्यांच्या संख्येशीच असला पाहिजे. हे वीर खालीं, वर, मागे पुढे असे सर्वत्र उद्भूत होत असल्याचे सांगितले आहे; त्याप्रमाणेच ८,४,१ यातहीं* इन्द्राचे पूजन पुढे, मागें, खाली, वर असे सर्वत्र होते असे म्हटले आहे. याचा अर्थ एवढाच कीं, ध्रुवाजवळील भूमीत निरनिराळ्या स्थळी प्रकाशयुक्त महिन्यांच्या मानाने निरनिराळ्या प्रकारचे **होते** ( होतारः ) होते. ध्रुवोपपत्तीशिवाय दुसऱ्या कोणत्याही उपपत्तीने या सर्व गोष्टीचा उलगडा होत नसल्यामुळे सध्यां तरी तिचे ग्रहण करणे उचित होय.

## दहा राजे आणि रावण.

दहा हिरण्यसदृश राजे ( ८,५,३८ ) आणि दहा यज्ञ न करणारे राजे ( अयज्यवः दश राजानः ७,८३,७ ) ऋग्वेदांत आलेले असून त्यांच्यासंबंधाने एक विशेष महत्वाची गोष्ट आहे. दिवोदास अतिथिग्वाचा पुत्र सुदास हा या दहा राजांशीं लढत असता त्याचा पुरोहित जो वसिष्ठ

---

* यदिंद्र प्रागपागुदङ् न्यग्वा हूयसे नृभिः । ऋ. ८, ४, १.

त्यानें इंद्रावरुणाची मदत त्याला मिळवून दिली होती ( ७,३३,२–५; ८३,६–८ ). या युद्धाला **दाशराज्ञ** युद्ध ह्मटलेलें आहे. हें युद्ध आर्य व अनार्य यांच्यांत झालेलें होतें असें कित्येक पंडितानीं ठरविलें आहे. पण आमच्या मते इन्द्र व सप्तदानू यांच्या युद्धाचेंच तें एक निराळें स्वरूप असावें. सप्तमूल भेदान्वयें इंद्राला सप्तहन् ( १०,४९,८ ) ह्मटल्यास दशमूल भेदान्वयें तो दशहन् होईल. दशहन् शब्द ऋग्वेदांत प्रत्यक्ष आलेला नाहीं, तरी या दहा राजांशीं झालेल्या त्याच्या युद्धावरून ते मान सहज येते. दशमाय व दशोणी हे इन्द्राचे शत्रू असून, दशद्यु हा त्याचा एक आश्रित आहे; या गोष्टींचा विचार केल्यास सप्तदानूंप्रमाणें इंद्राचे तमोरूप शत्रू दशविधही मानिलेले असून, सुदास व ' अयज्यवः दश राजानः ' यातील युद्ध ह्मणजे दशग्वाच्या भूमीतील प्रकाश व काळोख यांतील युद्ध होय असें दिसून येईल. पण या युद्धाचें महत्व याहूनही अधिक आहे. राजन् शब्द ऋग्वेदांत केवळ क्षत्रियवाची नसून एकदां तर तो अंगिरसांनाही लाविलेला आहे ( १,१३९,७ ). ह्मणजे ' दहा हिरण्यसदृश राजे, ' ' दहा होते, ' ' दहा अंगिरस ' किंवा ' दहा महिन्यांचे सत्र करणारे दशग्व ' या सर्वांचा अर्थ एकच आहे. अंगिरसांचा मुख्य जो बृहस्पति तो सप्तास्य किंवा दशास्य असा दोन्ही प्रकारचा ऋग्वेदांत सांगितला आहे. सरमा व पणी यांच्या कथेशीं या बृहस्पतीचा संबंध असून त्याने इंद्राला साहाय्य करून, किंवा कित्येक वेळां स्वतःही, गाई परत आणण्याचे काम केलेले आहे. (१,८३,४;१०,१०८, ६–११). बृहस्पतीची नाहींशी झालेली स्त्री देवांनी परत मिळवून दिल्याची गोष्ट १०,१०९ यांत सांगितली आहे. तैत्तिरीय आरण्यकात इंद्राला अहल्येचा जार ( अहल्यायै जारः ) म्हटले असून, या दोन्ही गोष्टींचा संबंध पंडितांनीं उषेशीं लाविला आहे.

या सर्व गोष्टी मोठ्या सूचक असून त्यांवरून रामायणांतील कित्येक गोष्टी सहज लक्षांत येतात. रामायणाला ऐतिहासिक आधार आहे कीं नाहीं हें पहाण्याचें हे स्थळ नव्हे. तरी त्यांतील मूलभूत कथा व वैदिक कथा यांतील साम्य मोठें चटकदार असल्यामुळे त्याचा येथें थोडासा उल्लेख करणे गैर होणार नाहीं. रामायणांतील मुख्य गोष्ट इतकी सविस्तर सांगितलेली आहे कीं, दर्शनींच ती ऐतिहासिक आहे असें खास वाटतें.

तरी त्यांत रामाचा शत्रु दहा तोंडाचा एक विक्षिप्त प्राणी होता हें कसें? दहा तोंडांच्या राक्षसाला कांहीं साधारणतः ऐतिहासिक ह्मणतां येणार नाही. ह्मणून रामायणाच्या मूळ ऐतिहासिक कथेंत वैदिक कथा मोठ्या खुबीनें जोडून दिल्या असाव्या असें वाटतें. सुदासाचे शत्रू जे दहा राजे त्यांनांच दहा तोंडाचा एक राजा करणें कविकल्पनेला कठीण नाहीं. दहा अंगिरसांचा मुख्य जो बृहस्पति त्याला असाच दहा शीर्षांचा म्हटलेले आहे. या दशाननाचा भाऊ सहा महिने झोप घेणारा असल्यामुळे तो ध्रुवावरचा असावा असें सहज दिसतें. हिवाळ्यात सर्व देव कारागृहांत कोंडलेले असून ते उन्हाळ्यांत पुनः मोकळे होतात अशी फ्रुगोनियन लोकांत कल्पना असल्याचें प्लूटार्कनें लिहिलें असून या गोष्टीचा ध्रुवप्रदेशातील अखंड दीर्घ काळोख व प्रकाश यांच्यामधील झगड्याशीं प्रो. व्हिस या पाश्चात्य पंडितानें संबंध लाविला आहे. रावणानें सर्व देवांना तुरुंगांत टाकलेले असून रामानें त्यांची मुक्तता केल्याची गोष्ट अशाच तऱ्हेनें जुळविली पाहिजे. रामायणांतील हनुमानाचाही संबंध वैदिक वृषाकपीशीं लावितां येण्यासारखा आहे. वृषाकपि ह्मणजे दक्षिणायनबिंदूजवळचा सूर्य किंवा ध्रुवोपपत्तीप्रमाणें दीर्घ काळोखाच्या आरंभीं क्षितिजाखालीं उतरणारा सूर्य होय. सूर्य तमोग्रस्त झाला असतां हनुमानाचा जन्म झाला आहे, ह्या गोष्टीवरून या ह्मणण्यास थोडासा आधार मिळतो. तात्पर्य रामायणांतील दंतकथात्मक भाग उषेच्या प्रत्यावर्तनाच्या वैदिक कथेतून घेतला असावा असें ह्मणणें काहीं गैर होणार नाहीं. इलियड या ग्रीक काव्यांतील बरींच नांवें मॅक्स मुल्लरनें वैदिक नांवांशीं जुळविलीं आहेत. हेलन ह्मणजे सरमा, पॅरिस ह्मणजे पणि, ब्राएसिस ह्मणजे भृग्य असें त्यानें ठरविलें आहे. याप्रमाणें सर्व नांवांचा जरी उलगडा करतां आला नाहीं, तरी एवढें खरें कीं, उषारूपी चोरून नेलेल्या स्त्रीला परत आणण्याची गोष्ट भारतीय व ग्रीक आर्यांना एकाच ठिकाणाहून मिळालेली आहे. ह्मणून रामायण व इलियड या दोन काव्यांत जर सदृश गोष्टी आढळल्या तर त्या एकमेकांनी एकमेकांपासून चोरलेल्याच असल्या पाहिजेत असें ह्मणण्याचें कांहीं कारण नाहीं. या समान गोष्टींवरून या दोन्ही लोकांचे

---

१ वेदकालनिर्णय पान ८२—८३.

मूळचें एकत्वच उलट सिद्ध होतें. हा विषय जरी फार मनोरम आहे तरी तो फार मोठा व अप्रस्तुत असल्यामुळे त्यांत खोल शिरण्याचा मोह येथेंच सोडून देणे भाग आहे. विष्णूच्या दहा अवतारांचा धागाही हिरण्यसदृश दहा राजांशी पोचवितां येईल. अवेस्त्यांत तर वायु, वृषभ, अश्व, उष्ट्र, वराह, युवा, काक, मेष, बक आणि नर असे वेरेथ्रघ्नाचे दशावतार स्पष्टच सांगितले आहेत. त्यांत अश्व, वराह, युवा आणि नर हे तर आमच्या कल्कि, वराह, वामन आणि राम, यांशी सदृश आहेत. तात्पर्य दशावतारांची कल्पना आम्हीं व पारशी एक असतांच्या काळची आहे. मत्स्य, कूर्म, वराह, नारसिंह, वामन आणि राम ह्या अवतारांचा धागा थोड्याबहुत प्रमाणानें ऋग्वेदाशीं नेऊन भिड-वितां येईल. परंतु त्यासंबंधे कोणतेही निश्चित विधान करण्यापूर्वी चांगला शोध व विचार केला पाहिजे. ध्रुवोपपत्ति जर स्थापित झाली, तर वैदिक व पौराणिक अशा दोन्ही प्रकारच्या कथांचा अर्थ बऱ्याच प्रमाणांत बदलून कित्येक ठिकाणी तर तो अगदीच नवीन बसवावा लागेल. परंतु या उपपत्तीला आधारभूत असा पुरावा देण्याचाच या पुस्तकाचा उद्देश असल्यामुळें येथे हे काम करतां येणे शक्य नाहीं.

येणेप्रमाणें आपल्या उपपत्तीला थोडाबहुत तरी आधार देणाऱ्या अशा बहुतेक वैदिक कथांचे येथवर विवेचन झाले. ध्रुवोपपत्तीवर उलगडा होणाऱ्या आणखीही कांही गोष्टी आहेत. उदाहरणार्थ, मित्र व वरुण या मूळच्या जोड देवता आहेत, त्या कशा हे आपल्याला आतां सांगतां येईल. ध्रुवोपपत्तीप्रमाणें पाहिल्यास त्या षण्मासावधि दीर्घ दिवस व दीर्घ रात्र यांच्या देवता होत, ह्मणूनच वरुणाला क्षपांनां ( रात्रींना ) परिस्वजन ( आलिंगन ) देणारा असे ह्मटले आहे ( ८,४१,३ ). अशा सर्व गोष्टी येथे सांगण्याचें प्रयोजन नाहीं. आतांपर्यंत केलेल्या विवेचना-वरून वैदिक कथांतील बऱ्याच बाबींचा, प्रकाश व काळोख यांतील रोजचा झगडा ( उषेची कल्पना ), किंवा हिवाळ्यावरील वसंताचा वार्षिक विजय ( वसंत कल्पना ), किंवा मेघांवरील पर्जन्यदेवतेचा विजय ( पर्जन्याची कल्पना ) या कल्पनांवर उलगडा होण्यासारखा नाहीं अशी कोणाचीही खात्री होईल. वृत्राचा दरवर्षी वध होणें, त्या वधा-बरोबर जलें व प्रकाश वर येणे, शरदृतूच्या ४० व्या दिवशी इंद्राला

शंबर सापडणें, त्यांचें परावत् प्रदेशांत युद्ध होणें, दीर्घतम्याचें १० व्या महिन्यांत वृद्ध होणें, अदितीनें आपल्या आठव्या पुत्राला ( मार्तांड ) टाकून देणें, त्रिताचें काळोखाच्या खांचेत पडणें, किंवा विष्णूचें तिसरें पद अदृश्य असणे, इत्यादि गोष्टींचा प्रचलित कल्पनांवर उलगडा होत नाहीं. पण त्या ध्रुवोपपत्तीवरून चांगल्या समजत असल्यामुळे ही उपपत्ति त्यांच्यावरून अप्रत्यक्षरीत्या स्थापित होते. इंद्रवृत्रांचें युद्ध, सप्तवध्रि, अदितीचे सात तेजस्वी पुत्र व आठवा मार्तांड, सूर्याचे चक्र व दीर्घतमा इत्यादिकांच्या कथांतून त्यांच्या जन्मभूमींत असलेला सात किंवा दहा महिन्यांचा सूर्यप्रकाशकाल दर्शविणारीं वचने स्पष्ट आहेत. ह्मणून इतकीं सर्व वचने केवळ काकतालीय होत असे मानण्याची तयारी असल्याशिवाय आपल्याला ध्रुवोपपत्ति अमान्य करतां येत नाहीं; कारण तीवरून आजपर्यंत न समजलेल्या किंवा दुर्लक्ष करून सोडून दिलेल्या अशा पुष्कळ गोष्टींचा सरळ व समाधानकारक अर्थ लागत आहे. ही ध्रुवोपपत्ति ह्मणजे आजपर्यंत प्रचलित असलेल्या वसंतादि कल्पनांना हुसकून लावून त्यांची जागा पटकावील असें नाहीं. एवढेंच की आजपर्यंत बरोबर अर्थ न लागल्यामुळे सोडून दिलेल्या बऱ्याच वैदिक कथांचा चांगला उलगडा करीत असल्यामुळे वसंतादि उपपत्त्यांपेक्षा अर्थातच ही अधिक व्यापक आहे. ह्मणून वैदिक कथांचा अर्थ लावतांना हिचा इतरांपेक्षां बराच जास्त उपयोग होईल. या दृष्टीने पाहिल्यास इतरांबरोबर हीही आपल्या ग्रहणास सर्वथा पात्र असली पाहिजे, इतकेंच नव्हे तर कित्येक प्रसंगीं इतरांची जागाही हिलाच द्यावी लागेल. पुराणकथाशिवाय ध्रुवप्रदेशांतील सृष्टचमत्कारांचे वर्णन करणाऱ्या ऋग्वेदांतील स्पष्ट वचनांवरूनही ती स्थापित होते हे पूर्वप्रकरणात दाखविले असून, अवेस्तिक व रोमन कथांचाही या अनुमानाला पूर्ण पाठिंबा आहे. ही उपपत्ति आधुनिक भूगर्भविषयक, व पुराणवस्तुविषयक शोधांच्या मुळीच विरुद्ध नाहीं हेंही पूर्वी सिद्ध केले आहे. अशी ही इतक्या गोष्टींचा सरळ उलगडा करणारी एकच उपपत्ति असतां, ती केवळ नवीन म्हणून अमान्य करावयाची कीं काय ? असें करणे तर्कशास्त्राच्या व शास्त्रीय पद्धतीच्या अगदीं विरुद्ध होईल. आम्ही तर आमच्या उपपत्तीच्या यशापयशाचा भार तर्कशास्त्राचे नियम व शास्त्रीय पद्धतीचें विवेचन यांवरच सर्वस्वीं टाकिला आहे.

---

# प्रकरण ११ वें.

## अवैस्तिक प्रमाणें.

..वैस्तिक प्रमाणांचें स्वरूपकथन—त्या स्वरूपाविषयीं विद्वानांचीं भिन्न भिन्न मतें—या प्रमाणांचें पुनर्निरीक्षण करण्याची आवश्यकता-वंदिदादाच्या पहिल्या अध्यायाचा सारांश—अहुर मझ्दानें उत्पन्न केलेले सोळा प्रदेश—प्रथम उत्पन्न केलेला प्रदेश जो ऐर्यन वइजो तो पारसी आर्यांची मूलभूमि होय—ऐर्यन वइजोच्या स्थानाविषयीं निरनिराळी मते—अवेस्त्यांतील वर्णनांत सांगितलेल्या लक्षणांवरूनच ऐर्यन वइजोचे स्थान ठरविले पाहिजे—त्या मूळच्या सुखमय स्थानांत अंग्र मैन्यूने प्रथम दहा महिन्यांचा हिवाळा उत्पन्न केला—म्हणजे पूर्वी तेथे दहा महिने उन्हाळा व दोन महिने हिवाळा अशी स्थिति असावी असे अनुमान होते—ध्रुवप्रदेशांतील हवामानांत झालेल्या या आकस्मिक फरकाला भूस्तरशास्त्रात चांगला आधार आहे—दोन महिन्यांचा हिवाळा तेथे अखंड दीर्घ रात्रीशीं समकालीन असणार—ऐर्यन वइजोमध्यें सात महिन्यांचा उन्हाळा आणि पांच महिन्यांचा हिवाळा असल्याचे बुंदहिश ग्रंथातील वर्णन—दहा महिन्यांच्या उन्हाळ्याशीं याचा विरोध येत नाहीं—ध्रुवप्रदेशांत दोन्हीही शक्य आहेत—ऋग्वेदांतील समानार्थक वचने—सात महिन्यांचा उन्हाळा, अदितीची कथा आणि शंबरयुद्धाचा दिवस यांची एकवाक्यता—वंदिदादाच्या दुसऱ्या अध्यायांतील तात्पर्यार्थ—ऐर्यन वइजो मधील यिमाचा वर—त्यांत सूर्य वर्षातून एकदांच उगवत असे—यावरून ऐर्यन वइजो उत्तर ध्रुवावर होता असे ठरते – तो इराणच्या पूर्वेस नव्हता—त्याचे वर्णन काल्पनिक दिसत नाहीं—तेथे झालेल्या हिमपाताचेच ते वर्णन होय—ध्रुवप्रदेशांतील वसतिस्थानाचा हिमपातामुळे नाश झाल्याचें हे अत्यंत प्राचीन ऐतिहासिक प्रमाण होय—अवैस्तिक प्रमाणांचे विशिष्ट महत्व—त्यांना नवीन शास्त्रीय शोधांचें पूर्ण पाठबळ आहे—ऐर्यन वइजो सोडून जाणें हिमपातामुळें अवश्य झालें—पहिल्या फर्गर्दांतील सोळा भूमी ह्मणजे दक्षिणेकडे येतांना वाटेंत लागलेले प्रदेश होत—हे प्रदेश पहिल्या अध्यायांतील मजकुराचें ऐतिहासिक स्वरूप स्थापित करतात—शतपथ ब्राह्मणांतील प्रलयाची कथा—हिंदी आर्यांच्या उत्तरेकडील मूळच्या वसतिस्थानाची दर्शक अशी आणखी वचनें—वैदिक आणि अवैस्तिक प्रमाणांवरून निघणारीं अनुमानें.

## अवैस्तिक प्रमाणें.



ध्रुव प्रदेशांतील आर्यांच्या वसतिस्थानाच्या सिद्ध्यर्थ वेदान्तर्गत प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष प्रमाणे देतांनां मागील प्रकरणांतून ठिकठिकाणीं अवेस्त्यांतील कथांचाही तुलनेसाठी प्रसंगवशात् उल्लेख केला आहे. पण त्याहून विशेष महत्वाची अशी काही स्थले अवेस्त्यांत असून त्यांत आर्यांचे उत्तरेकडील मूलस्थान व तेथून, उक्षस् (ऑक्सस्) यक्षावर्त (जग्झार्टिस्) सिंधु इत्यादि नद्यांच्या काठच्या प्रदेशापर्यंत झालेली त्याची स्थानान्तरें याचा स्पष्ट उल्लेख आलेला आहे. ही अवेस्त्यातील प्रमाणे वैदिक प्रमाणांना जोड देतात इतकेच नव्हे, तर ध्रुवोपपत्तीच्या सिद्ध्यर्थ स्वतंत्र पुरावाच तो दाखल करीत असल्यामुळे त्याचा या प्रकरणांत सविस्तर विचार करणे अवश्य आहे. वेदाप्रमाणेच अवेस्त्याचेही प्राचीनत्व आता सर्वमान्य असल्यामुळे त्याविषयीं येथे प्रमाण देण्याची गरज नाहीं. दोन्ही ग्रंथ एकाच मूळवृक्षाच्या शाखा असल्यामुळे, वेदाप्रमाणे अवेस्ता हा जरी अविच्छिन्न राहिलेला नाहीं, तरी एकमेकातील उणीवा एकमेकांकडून भरून निघत असल्यास त्या शक्य तितक्या ठिकाणीं भरून काढणे गैर होणार नाही. दीर्घ उषा, अखंड काळोख, दशमासावधि सवत्सरसत्र इत्यादिकांविषयींचे उल्लेख वेदात आहेत, तरी आर्यांचे अगदी उत्तरेकडील मूलस्थान व ते सोडून खाली दक्षिणेकडे त्यांनीं प्रयाण करण्याचीं कारणे याविषयींचे उल्लेख त्यात सांपडत नाहीत. पण सुदैवाने वेदातील ही उणीव अवेस्त्याने फार सुरेख भरून काढिली आहे. मागील प्रकरणांत सांगितलेल्या अवेस्त्यातील कथांवरून सहा महिन्याचा दिवस व सहा महिन्यांची रात्र किंवा एक दिवसापासून शंभर दिवसांच्या अवधीची अखंड रात्र इत्यादिकांची माहिती मज्दभक्ताच्या पूर्वजांना होती, हे सिद्ध होते. या सर्व कथांची प्रतिरूपे वेदामध्येही आहेत. पण उत्तरेकडील आर्यांचे मूलस्थान, व त्याचा बर्फाच्या योगाने झालेला नाश यांविषयींचें अवेस्त्यांतील वर्णन स्वतंत्र एकटें असून, वैदिक प्रमाणांसंबंधाने पूर्व प्रकरणांत केलेल्या विवेचनावरून, तें प्राचीनकाळीं खरोखर घडून आलेल्या ऐतिहासिक गोष्टीची साक्ष देत आहे असें निःसंशय दिसते. हें वर्णन अवेस्त्यांतील वंदिदाद नामक पुस्तकाच्या पहिल्या दोन

अध्यायांत आलेलें आहे. त्यासंबंधानें पाश्चात्य पंडितांमध्यें दोन मतें असून कांहीं त्याला ऐतिहासिक मानतात, व दुसरे केवळ दंतकथात्मक समजतात. यांपैकीं दुसऱ्या मतालाच आज विशेष मान आहे. पण हें मत ठरलें त्यावेळीं ध्रुवप्रदेशांतील वसतीविषयीं वेदांत प्रमाणें आहेत ही गोष्ट माहीत नव्हती, इतकेंच नव्हे, तर भूस्तरशास्त्रावरून तें अशक्यच वाटत होतें. ही गोष्ट लक्षांत घेतां, आतां भूस्तरशास्त्रानें त्याची शक्यता सिद्ध केल्यामुळें व वेदांत तत्संबंधाची प्रमाणेंही सांपडत असल्यामुळें अवेस्त्यांतील या वर्णनाचें नवीन दृष्टीने पुनर्निरीक्षण करणें अवश्य झाल आहे.

वंदिदादाच्या पहिल्या अध्यायांत अहुरमझ्दानें उत्पन्न केलेल्या सोळा भूमीची यादी दिली आहे. प्रत्येक भूमि तयार झाल्यावर अहुर मझ्दाचा प्रतिस्पर्धी जो अंग्र मैन्यु त्याने ती रहाण्याला अयोग्य करण्यासाठीं तीत कांहीं तरी अरिष्ट उत्पन्न केले आहे. या अध्यायाचा सारांश असा.—

" पवित्र अशा झरथुष्ट्राला अहुर मझ्द म्हणतो, 'जी भूमि पूर्वीं वसतीला सर्वस्वी अयोग्य होती ती मी सुखकर केली आहे, मी हे केलें नसतें, तर सर्व प्राणी ऐर्यन वइजोकडे धांवले असते. १–२.

" म्या अहुरमझ्दाने ऐर्यन वइजो ही पहिली उत्तम भूमि निर्माण केली. तेव्हा अंग्र मैन्यूने प्रतिकारार्थ म्हणून, मोठा अहि व हिम अशी आसुरी सृष्टि तीत उत्पन्न केली. तेव्हा तेथें हिवाळ्याचे दहा महिने असून उन्हाळ्याचे दोन आहेत. ३–४.

" म्या अहुरमझ्दानें सुगंधयुक्त अशी गऊ नांवाची दुसरी उत्तम भूमि उत्पन्न केली. तेव्हा तिच्या प्रतिकारार्थ अंग्रमन्यूने पशु आणि क्षेत्रें याचा नाश करणारी अशी दुष्ट मक्षिका तेथें उत्पन्न केली. ५.'"

याप्रमाणे एकामागून एक असे सोळा प्रदेश अहुरमझ्दानें उत्पन्न केले. त्यांत चवदावा वरेन ( सं. वरुण ), पंधरावा हस हेंदु ( सं. सप्तसिंधु ) व सोळावा रघ ( सं० रसा ) नदीच्या कांठचा प्रदेश असे होते.

या सोळा प्रदेशांपैकी दहांची ओळख आज प्रसिद्ध असलेल्या प्रदेशांशीं झेन्द पंडितांनी खात्रीलायकपणे लाविलेली आहे. अर्थात् वंदिदादांतील हा मजकूर केवळ दंतकथात्मक नसून ऐतिहासिक आहे असें मानावें लागतें. पण यांपैकीं पहिली भूमि जी ऐर्यन वइजो तीसंबंधानें

पंडितांमध्यें मतभेद आहे. ऐर्यन वइजो ही अहुरमझ्दानें उत्पन्न केलेली पहिली आनंदभूमि असून तिचा अर्थ आर्याची जन्मभूमि (वइजो—सं. बीज) असा आहे. आतां त्यासंबंधानें असा प्रश्न आहे की ही भूमि केवळ काल्पनिक आहे कीं खरी आहे? व खरी असेल तर ती कोठें होती? दुसरा प्रश्न असा आहे की, या सोळा निरनिराळ्या भूमि म्हणजे आर्यांना दक्षिणेकडे येत असतां मार्गांत लागलेल्या होत्या कीं काय? या प्रश्नांसंबंधानें वंदिदादांत कांहीच सांगितलेले नसल्यामुळें ह्या सोळा भूमीविषयीं मजकूर ह्मणजे तत्कालीन इराणी लोकांना माहीत असलेल्या प्रदेशांचे वर्णन असून त्यांचा प्राचीन आर्यांच्या प्रयाणमार्गाशीं कांहीं संबंध नाहीं असें अनुमान पंडितांनी केले आहे. त्यांच्या मतें ऐर्यन वइजो हा प्रदेश उक्षस् व यक्षावर्त नद्यांच्या उगमाजवळचा प्रांत होय. पण डॉक्टर हौ आदिकरून दुसरे पंडित असे ह्मणतात कीं ऐर्यन वइजो हा प्रांत अगदी उत्तरेकडील असून बाकीचे प्रांत मार्गांत लागलेले होत.

यां पैकीं पहिल्या मताच्या अभिमान्यांनी आपले मत कांही गोष्टी गृहीत धरून त्यांच्या आधारावर बनविले आहे. पण ऐर्यन वइजोचें वंदिदादांत जे वर्णन आले आहे, त्यावरून तो अगदी उत्तरेकडील प्रदेश असावा हे उघड दिसते. ऐर्यन वइजो हा अहुरमझ्दानें उत्पन्न केलेला पहिला सुखमय प्रदेश असून अंग्रमैन्यूनें दुष्टपणानें त्यात दहा महिन्यांचा हिंवाळा व दोन महिन्याचा उन्हाळा असे उत्पन्न केले. हें वर्णन यक्षावर्त नदीच्या बऱ्याच उत्तरेकडील प्रदेशालाच फक्त लागू पडणारे आहे. अंग्रमैन्यूनें अहि व हिम उत्पन्न करण्यापूर्वी ऐर्यन वइजोमध्ये सुखकारक हवापाणी होते, ह्मणजे अंग्रमैन्यूने दुष्टपणामुळें मूळच्या उलट स्थिति निर्माण केली. अर्थात् ही दुःसह स्थिति ह्मणजे जर दहा महि-न्यांचा हिंवाळा व दोन महिन्याचा उन्हाळा अशा प्रकारची झाली, तर पूर्वीची स्थिति उघडच याच्या उलट ह्मणजे दहा महिन्यांचा उन्हाळा व दोन महिन्यांचा हिंवाळा अशी सुखकर असावी असें सहज अनुमान होतें. तात्पर्य ऐर्यन वइजोमधील हवापाणी प्रथम चांगले असून कांहीं आकस्मिक कारणानें त्यांत एकाएकीं फरक झाला असें या वंदिदादाच्या पहिल्या अध्यायावरून उघड होतें. उत्तरध्रुवाजवळील प्रदेशांत सूर्याचे किरण

तिरके पडत असल्यामुळें तेथील उन्हाळा सुखकरच असणार, व हिंवाळा त्याच्या मानाने अगदी थोडा ह्मणजे दोन महिन्यांचा असल्यामुळें तोही फार दुःसह नव्हता. ह्मणजे एकंदरीत अंग्रमैन्यूचा कोप होण्यापूर्वीची ऐर्यन वइजोची हवापाण्यासंबंधी स्थिति फारच मजेदार होती. परंतु त्यांत एकाएकी भयंकर हिमपात झाल्यामुळें ही स्थिति पालटून हिंवाळा फार मोठा ह्मणजे दहा महिन्यांचा होऊन उन्हाळा फार अल्पावधि ह्मणजे दोन महिन्यांचा झाला. ही स्थिति फार दुःसह असून तींत मनुष्यांना रहातां येणें शक्य नाहीं. अर्थातच तेथील रहिवाशांना हिमपात झाल्यावर कोठें तरी दूर जावें लागलें असलें पाहिजे.

तीस चाळीस वर्षांपूर्वी अशा प्रकारचें अनुमान करणें केवळ अशक्य होतें. ध्रुवाजवळची हवा सदैव अशीच भयंकर असावयाची व त्यामुळे तेथें वसति असणें कधींही शक्य नव्हते असें त्यावेळी ठाम मत होतें. पण अगदीं अलीकडच्या भूस्तर-विपयक शोधांनी ही अडचण आतां दूर केली आहे. हिमकालापूर्वी ध्रुवाजवळची हवा सुखकर सौम्य व म्हणून मनुष्यांना रहावयाला योग्य अशी होती याविषयीं आतां वादच उरलेला नाहीं. अंग्रमैन्यूनें दुष्टपणानें केलेली कृति व भूस्तरशास्त्रांतील हिमपात हीं एकच होत हें त्यांच्या वर्णनाची तुलना केल्यास सहज समजून येईल. याप्रमाणें नवीन शास्त्रीय शोध अवेस्त्यांतील वर्णनाशीं इतके मिळते असतां, कित्येक झेन्द पंडितांनीं केवळ कल्पनेवर काढिलेलें अनुमान त्याज्य समजून, आजमितीला दहा महिन्यांचा हिंवाळा असलेला ऐर्यन वइजो उत्तरध्रुवाजवळच कोठें तरी असला पाहिजे, असें मानणें आपल्यास भाग आहे. असें मानावयाचें नसेल तर अवेस्त्यांतील वरील वर्णनाचा इराणी लोकांच्या प्राचीन भूमीच्या हकीगतीशीं कांहीं संबंध नाहीं असें ह्मटलें पाहिजे; पण पूर्वीच्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें इतका सबळ वेदांतील पुरावा उपलब्ध झाला असतां, अवेस्त्यांतील वर्णन कांहीं तरी काल्पनिक असावें असें ह्मणणें सयुक्तिक नाहीं. हिंदी–युरोपीय लोकांचें प्राचीन वर्ष दहा महिन्यांचा सूर्यप्रकाश व त्याच्या मागून येणारी दोन महिन्यांची अखंड रात्र यांमिळून होत असे हें पूर्वी सप्रमाण सिद्ध केलेंच आहे. ऐर्यन वइजो मधील वर्षही अशाच तऱ्हेचें होतें. हम ( सं. समा ) हा उष्णकालवाचक झेन्द् शब्द

वेदांत वर्षाचा वाचक आहे. ह्मणजे अवेस्त्यांत सांगितलेले उन्हाळ्याचे दहा महिने ह्मणजे दहा महिन्यांचा सूर्य प्रकाशाचा काळ ऊर्फ " मानुषा युगा " व त्यामागाहून येणारी द्विमासावधि अखंड रात्र यांमिळून झालेलें वर्षच होय. वंदिदादांतील वर्णनांत हिंवाळ्याच्या दोन महिन्यांत सतत काळोख होता असे कांहीं स्पष्ट सांगितलेलें नाहीं हें खरें. पण दहा महिन्यांच्या उन्हाळ्यावरून ऐर्यन वइजो हा प्रदेश ध्रुवाजवळचा होता असें एकदां मानिले ह्मणजे दोन महिन्यांचा हिंवाळा हा अखंड काळोखाचा होता हें उघडच झाले. आज मितीस ही अखंड रात्र दहा महिन्यांच्या हिंवाळ्याच्या मध्ये असते. पण हिमकालापूर्वी जेव्हां त्या प्रदेशांत दहा महिन्यांचा उन्हाळा होता, तेव्हां हिवाळ्याचे दोन महिने व अखड दीर्घ रात्र हीं एककालावच्छिन्नच असलीं पाहिजेत. आर्यांच्या जन्मभूमीतील हिमकालापूर्वीच्या व नंतरच्या हवापाण्याच्या स्थितींत एवढा फरक आहे. दोन्ही वेळा अखंड दीर्घ रात्र ही सारखीच असणार; पण ज्यावेळी तेथील हिवाळा अल्पावधि होता, तेव्हां तो या अखंड रात्रीपुरताच असे. ही स्थिति पालटून जेव्हां आतां तेथे दहा महिन्यांचा हिंवाळा होऊं लागला, तेव्हां ही अखंड दीर्घ रात्र त्याच्या मध्यभागीं येऊन पडली. तात्पर्य वंदिदादांतील ऐर्यन वइजोच्या वर्णनावरून तेथ पूर्वी असलेल्या दहा महिन्यांच्या उन्हाळ्याचें व त्यामागून येणाऱ्या दोन महिन्यांच्या अखंड रात्रीचें अनुमान करून अंग्र मैन्यूच्या स्वारीनंतर हिमपाताच्या योगानें ही स्थिति उलट झाली असें मानावें लागतें. तिष्ट्र्याच्या अपौशाशीं झालेल्या युद्धाचा महत्तम काल शंभर रात्रींचा असल्याचें, व हिवाळ्यांत दोन रात्री तीन रात्री किंबहुना महिनाभरही घरांत प्रेत ठेवण्याच्या चालीवरून हा काल अखंड काळोखाचा असल्याचें पूर्वी सांगितलेंच आहे. या गोष्टीशी वरील ऐर्यन वइजोचें वर्णन जोडल्यास हा प्रदेश, म्हणजे प्राचीन इराणी लोकांचें नंदनवन, उत्तर ध्रवाजवळच कोठें तरी असून अंग्रमैन्यूची त्यावर स्वारी होण्यापूर्वी तेथे सौम्य व दीर्घ उन्हाळे व अल्पावधि व गरम परंतु अखंड काळोखाचे हिंवाळे होते, आणि या स्वारीनंतर म्हणजे हिमपातानंतर ही स्थिती पालटून कित्येक शें हात जाडीचा बर्फाचा थर त्यावर पडून तो मनुष्यास रहावयास नालायख झाला ही गोष्ट स्पष्ट सिद्ध होते.

या वर्णनांत आणखी एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. ऐर्यन वइजोचे वर्णन करतांना प्राचीन झेन्द् टीकाकारांनीं 'त्यांत सात महिन्यांचा उन्हाळा व पांच महिन्यांचा हिंवाळा' असल्याचें सांगितलें आहे. हा मजकूर प्रक्षिप्त असावा असें कित्येक पंडितांचें मत आहे. पण ते सयुक्तिक दिसत नाहीं. सकृद्दर्शनीं एकाच प्रकरणांत दहा महिन्यांचा व सात महिन्यांचा उन्हाळा आणि दोन महिन्यांचा व पांच महिन्यांचा हिंवाळा अशा दोन जोड्या विसंगत दिसतात. पण दशमासावधि उन्हाळ्याइतकीच सप्तमासावधि उन्हाळ्याची गोष्टही प्राचीन आहे, असें बुंदहिश नामक पारशी ग्रंथावरून दिसतें; कारण त्यांत 'आवान् महिन्याच्या औहरमझ्द ( पहिल्या ) दिवशीं हिवाळा सुरू होतो, दीन ( दहाव्या ) महिन्याच्या अतारो ( नवव्या ) दिवशी तो ऐरान वीजमध्यें फार कडक होऊन स्पेंदरमद् महिन्यांत तो समाप्त होतो; झणून दीन महिन्याच्या अतारो दिवशी जिकडे तिकडे हिवाळा आला असे सुचविण्यासाठी अग्नि प्रज्वलित करतात' असे सांगून आवान्, आतारो, दीन, वोहूमन् आणि स्पेंदरमद् असे हिवाळ्याचे पांच महिने त्यांत स्पष्ट सांगितले आहेत. शिवाय या काळांत रपित्विन् गाह नांवाचा विधीही करीत नाहींत, कारण 'रपित्विन् हा हिंवाळ्यांत जमिनीखालीं जाऊन उन्हाळ्यांत वर येतो' असेही त्यात सांगितले आहे. हे जसे पांच हिंवाळ्याचे महिने तसे फरवर्दिन् पासून मित्रोपर्यंत सात महिने उन्हाळ्याचे त्यांत सांगितले आहेत. यावरून सात महिन्यांचा उन्हाळा व पांच महिन्यांचा हिंवाळा अशी ऐर्यन वीजो मधील प्राचीन स्थितीच बुंदहिशमध्यें दिलेली असली पाहिजे; कारण त्यांतच पुढें बारा महिन्यांची व चार ऋतूंची नांवे सांगून हिंवाळ्याचे दीन, वोहूमन् आणि स्पेंदरमद् असे तीनच महिने दिले आहेत. अर्थात् पांच महिन्याच्या हिंवाळ्याची गोष्ट प्राचीन असून, तीन महिन्यांची स्थिति बुंदहिश लिहिला त्यावेळची असावी. म्हणूनच वंदिदादाच्या प्राचीन टीकाकारांनीं प्राचीन कथा राखून ठेवण्याच्या बुद्धीनें दहा महिन्याचा उन्हाळा व दोन महिन्यांचा हिंवाळा यांच्याबरोबरच, सात महिन्यांचा उन्हाळा व पांच महिन्यांचा हिंवाळा हे सांगितले असले पाहिजेत. आतां या गोष्टी परस्परविरुद्ध दिसतात; व त्यांचे खरें कारण कळलें नाहीं तोंवर

त्या परस्परविरुद्ध असणारच. ऐर्यन वइजो हा प्राचीन इराणचा अगदी पूर्वेकडचा भाग असे समजलें ह्मणजे वर दिलेले हे वर्षाचे विभाग विसंगत आहेत खरे. पण हे प्राचीन इराणी लोकांचे मूलजन्मस्थान ध्रुववृत्ताचे आंत कोठे तरी होते असे मानिल्यास, हा सर्व विसगतपणा नाहींसा होतो; कारण त्यांत दहा आणि सात महिन्याचा उन्हाळा एकाच काळी पण जरा निरनिराळ्या ठिकाणी असतो हे आपणांस माहीत आहे. ध्रुवबिन्दु व ध्रुववृत्त यांमधील भागांत अक्षांशाच्या मानाने वर्षांतून सात ते अकरा महिनेपर्यंत सूर्य क्षितिजावर असतो. तेव्हां अवेस्त्यांतील उन्हाळ्याच्या अवधीसंबंधाचीं दोन निरनिराळी विधाने विलक्षण किंवा विसगत आहेत असें ह्मणण्याचे कारण नाही. मूळ वाक्याचा नीट अर्थ केल्यास दोन्हीं प्रकारचीं वर्णने एकाच ठिकाणाच्या दोन निराळ्या भागांना लागू पडणारीं आहेत असे दिसून येईल. वैदिक प्रमाणांचा विचार करताना सात व दहा महिन्यांचा अशा दोन्ही प्रकारच्या सूर्यप्रकाशयुक्त कालाच्या खुणा ऋग्वेदात सांपडतात हे सांगितलेच आहे. असा प्रकार ध्रुववृत्तांतर्गत प्रदेशाशिवाय दुसऱ्या कोठेही शक्य नसल्यामुळे वरील विवेचनांत ठरविल्याप्रमाणे ऐर्यन वइजो हा ध्रुवाजवळचाच प्रदेश असला पाहिजे असें सिद्ध होतें. बुदहिश मध्ये ' दीन महिन्याच्या नवव्या दिवशीं हिंवाळा आलेला आहे, असे सुचविण्यासाठी अग्नि प्रज्वलित करण्याची ' जी चाल सांगितली आहे, ती हिवाळा आलेला आहे हे सुचविण्यासाठी नसून त्याला सुरवात होत आहे असे सुचविण्याकरतां असावी. कारण, हिंवाळ्याच्या आगमनार्थ अग्नि प्रदीप्त करणे तो दोन तीन महिने थडी पडून गेल्यावर करण्यापेक्षां आरंभीं करण्यांतच औचित्य आहे. असा या चालीचा अर्थ घेतल्यास नऊ महिने दहा दिवसाचे वर्षही त्यावेळीं आर्यस्थानाच्या कोणत्या तरी भागांत सुरू होते असें दिसेल. हे अनुमानही दहा महिन्याच्या प्राचीन रोमन वर्षांशी अगदी जुळते आहे. पण ही बारीक बाब सोडून दिली तरी या गोष्टीसंबधाने वैदिक व अवैस्तिक कथात फारच साम्य आहे. बुदहिशमध्यें तीन महिन्यांचा एक ऋतु असे वर्षाचे चार ऋतु सांगितले आहेत. फर्वर्दीन, अर्द्दहित्, आणि होर्वदाद् मिळून वसंत; तीर, अमरोदाद्, आणि शत्वैरो मिळून ग्रीष्म; मित्रो, आवान्, आतारो मिळून शरद्; आणि दीन्, वोहूमन्, व स्पेंदरमद् मिळून शिशिर. या

हिशोबाप्रमाणें शरदाचा ४० वा दिवस आवान् महिन्याचा १० वा दिवस होतो; व मग 'इंद्राचें शंबराशीं झालेलें युद्ध शरदाच्या ४० व्या दिवशीं सुरू झालें' या वैदिक वचनाचा, 'ऐर्यन वइजोमध्यें आवान् महिन्यापासून शिशिर सुरू होतो,' या बुंदहिशमधील वचनाशीं बराच ( दहा दिवसांच्या फरकानें ) मेळ बसतो. याप्रमाणें वैदिक, अवैस्तिक, रोमन इत्यादि कथांमध्यें उन्हाळा संपण्याच्या काळासंबंधानें एकवाक्यता आहे. ह्मणून सात किंवा दहा महिन्यांच्या सूर्यप्रकाशाचें वर्ष हिंदी–युरोपीय काळांतील ह्मणजे हिंदी व युरोपीय आर्य एकत्र होते त्या वेळचे असून या त्याच्या दुहेरी स्वरूपाचा उलगडा या लोकांचे मूलस्थान ध्रुवप्रदेशांत होतें, असें मानिल्याशिवाय होत नसल्यामुळे ऐर्यन वइजो देखील ध्रुवाजवळच होता असें मानणे अपरिहार्य होते. वास्तविक अवेस्त्यांतील वरील वर्णन सरळ आहे; आणि जर झेन्द् पंडितांनीं ऐर्यन वइजोची स्थापना विनाकारण प्राचीन इराणाच्या पूर्व सरहद्दीवर केली नसती, तर त्यांत सकृद्दर्शनी दिसणारा विरोधही केव्हांच नाहींसा करतां आला असता. अशी स्थिति असल्यामुळें ऐर्यनवइजोसंबंधाच्या दोन मतांपैकीं खरें कोणते हें सांगावयास नकोच. अधिकाधिक घोंटाळा उत्पन्न करणाऱ्या कल्पनेपेक्षां सर्व बाबीचा समाधानकारक उलगडा करणारी कल्पनाच ग्राह्य होय हे कोणीही सांगेल.

ऐर्यन् वइजोमधील हवापाण्याचे वर्णन करणाऱ्या वंदिदादांतील वचनाचा येथवर विचार केला. ध्रुवोपपत्तीवर या वचनांचा चांगला खुलासा करतां येतो. ऐर्यन वइजो मधील मूळची हवापाण्याची स्थिति ठरवितांना ती अंग्रमन्यूनें उत्पन्न केलेल्या स्थितीच्या उलट असली पाहिजे अशी कल्पना केली आहे. पण वंदिदादाच्या दुसऱ्या अध्यायांत जो मजकूर आला आहे, त्यावरून अशी केवळ कल्पना करण्याचे कारण उरत नाहीं. हा अध्याय पहिल्या अध्यायाच्या पुरवणीदाखल असून त्यांत ऐर्यन वइजोची सविस्तर हकीगत व अंग्र मैन्यूनें त्यांत थंडी व बर्फ उत्पन्न करण्यापूर्वीच्या तेथील हवापाण्यासंबंधाच्या अत्यंत सुखावह अशा स्थितीचें वर्णन आलें आहे. त्याचे दोन भाग असून पहिल्या भागांत ऐर्यन वइजोचा राजा जो यिम त्याला अहुरमझ्दानें मझ्दापासून धर्मनियम घेण्यास सांगितलें आहे. तसें करण्याचें यिमानें नाकारल्यावर

अहुरमज्दानें त्याला आपल्या लोकांना सुखी ठेऊन त्यांची वृद्धि करण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणें यिमानें रोग व मृत्यु यांना आपल्या लोकांपासून दूर सारून त्यांना सुखी ठेविले व आपल्या राज्याची सीमा वाढविण्याचा तीन वेळां प्रयत्न केला. या गोष्टीचा संबंध कदाचित् उत्तरध्रुवाजवळील आर्यवसाहती वाढविण्याच्या प्रयत्नाशी असेल पण त्याचा येथे विचार करण्याचें आपल्याला कारण नाहीं. दुसऱ्या भागात अहुरमज्दानें भर-विलेल्या सर्व देवांच्या सभेचें वर्णन आहे. या सभेला यिम राजा आपल्या सर्व बड्या सरदारांसह हजर होता. या सभेत अहुरमज्दाने यिमाला अशी सूचना दिली कीं, ऐर्यन वइजोवर भयंकर थडी व बर्फ यांची स्वारी होणार असून तीमुळे त्यांतील सर्व वस्तू नाश पावतील; तर या संकटाला तोंड देण्या-साठीं ह्मणून तूं एक **वर** (घर) तयार कर, आणि त्यांत सर्व प्राणी व वनस्पती यांचीं बीजे जतन करून ठेव. त्याप्रमाणे यिमाने **वर** तयार केला. या वरांतील लोकांना सूर्य, चंद्र व तारका ही **वर्षांतून फक्त एकदांच उगवलेलीं दिसत,** असें सांगून पुढे या अध्यायांत या वरांत लोक कसे आनंदाने राहिले त्याचें वर्णन केले आहे.

हा यिमाचा **वर** बायबलमधील नोहाच्या नावेप्रमाणेच आहे; एवढाच फरक की, बायबलमधला पूर पाण्याचा असून अवेस्त्यांतील पूर बर्फाचा आहे. अवेस्त्यांतील बर्फाचा पूर भूस्तरशास्त्राशीं विरुद्ध नसून उलट भूस्तरशास्त्रांतील अगदीं अलिकडच्या शोधांवरून तो खरा ऐतिहासिक आहे असे अगदीं स्पष्ट सिद्ध होत आहे. दुसरें यिमाच्या वरांतील लोकांना ‘ सर्व वर्ष एका दिवसासारखे भासले, ’ व ‘ सूर्य आणि तारका वर्षातून एकदांच काय त्या उगवलेल्या दिसत ’ असें जे वर्णन आहे, त्यावरून हा **वर** उत्तर ध्रुवाजवळ होता याबद्दल तिलप्राय संदेह रहात नाहीं. याप्रमाणें यिमाच्या वराची जागा नक्की ठरल्यावर ऐर्यन वइजोची आपोआप ठरलीच; कारण हा वर ऐर्यन वइजोमध्येच होता. ऐर्यन वइजो ध्रुवाजवळ होता असें ह्मणण्याला हे आणखी एक उत्तम प्रमाण आहे. या वराची कथा कदाचित् खरी नसून काल्पनिक आहे असें जरी म्हटलें, तरी एका वर्षाएवढा दिवस, व वर्षांतून एकदांच सूर्य उगवणे या गोष्टीही केवळ कल्पनेनेच समजलेल्या असतील, व उत्तर ध्रुवाजवळच्या स्थितीशीं त्या जुळतात त्या केवळ काकतालीय न्यायानें जुळतात असें

म्हणतां येत नाहीं. वंदिदादकालीन लोकांनीं या गोष्टी प्रत्यक्ष पाहिलेल्या नसतील, तर त्या त्यांना परंपरागतच समजल्या असल्या पाहिजेत; म्हणजे त्यांच्या पूर्वजांनीं उत्तर ध्रुवाजवळ रहात असतां त्या प्रत्यक्ष पाहिलेल्या असल्या पाहिजेत. ऐर्यन वइजो प्राचीन इराणाच्या पूर्वेस होता असें म्हणणारे पंडित, उक्षस् व यक्षावर्त नद्यांच्या उगमाजवळचा हा डोंगर-सपाटीचा प्रदेश आतांच्यापेक्षां फार ऊंच होता व त्यामुळें तेथे फार थंडी होती, असें ह्मणून ऐर्यन वइजो मधील दहा महिन्यांच्या हिवाळ्याचा उलगडा करूं पहातात. पण असे मानण्यांत कोणत्या अडचणी आहेत याचा त्यांनी विचार केलेला दिसत नाहीं. ऐर्यन वइजो-मधील दहा महिन्यांचा हिवाळा अंग्र मैन्यूच्या स्वारी नंतरचा असून त्यापूर्वी तेथें सुखकरच हवा होती. पण तसे असावयास, पूर्वी तो प्रदेश उच्च नसून अंग्र मैन्यूने तो ऊंच केल्यामुळे तेथे थड हवा झाली असें मानावे लागते. आज तर उक्षस् नदीच्या उगमाशीं दहा महिने हिवाळा असण्यासारखी स्थिति नाहीं, म्हणजे अंग्र मैन्यूच्या स्वारीनंतर कालान्तराने तो पुनः सखल झाला असे ह्मटले पाहिजे. पण दुर्दैवानें या प्रदेशाचें वर होणें व खाली होणे या सबंधानें भूस्तरशास्त्र–विपयक पुरावा मुळींच नाहीं आणि तसा पुरावा कदाचित् असता, तरीही यिमाच्या वरातील लोकांना सबद वर्ष एका दिवसासारखें वाटले या एकाच गोष्टी-वरून हे वर्णन ध्रुवासंबंधीच आहे याविषयीं सशय रहाताना. तात्पर्य एवढेच की, ध्रुवेतर ठिकाणीं ऐर्यन वइजो होता असे ह्मणणे केवळ फोल होय. पुराणांतील नद्यांचीं किंवा प्रदेशाचीं नावे मागाहून खऱ्या नद्यांनां किंवा प्रांतांना दिली असतील. पण तेवढ्यावर केवळ नामसादृश्यावरून त्या मूळ नद्यांचा किंवा देशांचीं स्थाने जर आपण ठरवूं लागलो, तर ऐर्यन वइजो हा हिमालय व विंध्यपर्वतांच्या मधला प्रदेश होय असें म्हणावे लागेल; कारण या प्रांतालाही ऐर्यन वइजो याच अर्थाचे आर्यावर्त असे नांव आहे. असाच प्रकार झेन्द् पंडितांनीं केला आहे. दहा महिन्यांच्या हिवाळ्याच्या उल्लेखाच्या साहाय्यानें ऐर्यन वइजोचें स्थान ठरविण्याचे सोडून इराणांतील नद्यांच्या नांवावरून ते ठरविण्याचा प्रयत्न झेन्द् पंडितांनी केला. वास्तविक हीं नावें प्राचीन असून जेव्हां प्राचीन इराणी लोक तेथें रहावयास आले तेव्हां तेथील ठिकाणांना त्यांनी

ती दिलीं असलीं पाहिजेत. झेद् पंडितांच्या या कल्पनेमुळें ऐर्यन वइजोच्या स्थानाचा खुलासा होण्याऐवजी त्यासंबंधानें अधिकच घोटाळा झाला. पण आधुनिक शास्त्रीय शोधांनीं अवेस्त्यांतील वर्णन अगदीं खरें आहे, असें सिद्ध झाल्यामुळें ऐर्यन वइजो हा प्राचीन इराणाच्या पूर्व सरहद्दीवर होता हें झेन्द् पंडितांचे मत टाकून देण्याशिवाय मार्गच नाहीं.

दुसऱ्या अध्यायांतील महत्वाचा भाग म्हटला ह्मणजे ज्यांत अहुरमझ्दानें यिमाच्या राज्यावर येणाऱ्या भयंकर थंडीची व हिमाची त्याला सूचना दिली आहे तो होय. ही सूचना भविष्यरूपानें दिली असून ती वाचणारास प्राचीन इराणी लोकांच्या पूर्वजांनीं प्रत्यक्ष पाहिलेल्या हिमकालाचेच ते वर्णन असावें असें सहज दिसून येईल. ती सूचना अशीः—

अहुरमझ्द यिमाला म्हणतो, "हे विवंगत्पुत्रा यिमा, या पृथ्वीवर भयकर थडीचा काळ येऊन अतिशय धुकें पडेल, व अत्युच्च पर्वताच्या शिखरावरही **अरेद्वि** इतका जाड बर्फाचा थर पडेल. आणि त्यामुळें, रानांत रहाणारे, डोंगरावर रहाणारे, व खालीं दऱ्यांत रहाणारे असे तिन्ही प्रकारचे पशु नाश पावतील. हा हिमकाल येण्यापूर्वी पशूंकरितां क्षेत्रांत विपुल तृण उगवेल; वाहणारे पाण्याचे प्रवाह आणि वितळणारें बर्फ यांच्यामुळें ही भूमी पृथ्वीत सुखकर अशी आहे, व तींत अद्यापिहि पशूंची पावलें उमटलेलीं दिसत आहेत. ह्मणून तूं एक दीर्घ चौकोनी वर तयार कर आणि त्यांत, गाई, मेंढ्या, मनुष्यें, श्वान, पक्षी व रक्तवर्ण अग्नि यांचीं बीजें आणून ठेव."

सबंद वर्ष एका दिवसाप्रमाणें जेथें भासत होतें त्या यिमाच्या राज्यावर धाड घालणाऱ्या हिमकालाचें याहून स्पष्ट वर्णन तें काय असणार? त्यांत अंग्र मैन्यूचा उल्लेख नसून एखादा आधुनिक भूस्तरशास्त्रज्ञ हिमकालांतील हिमावरणाचें जसें वर्णन करील त्याप्रमाणेंच तेंही सरळपणें केलेलें आहे. डोंगराच्या माथ्यावर सुद्धां पडणाऱ्या बर्फामुळें डोंगरावर व दऱ्यांत रहाणारे असे सर्व प्रकारचे पशु नाश पावतील असें अहुरमझ्दानें यिमाला सांगितलें; त्यांत तें बर्फ **अरेद्वि** इतकें उंच असेल असें म्हटलें असून त्याचा अर्थ 'अतिशय' किंवा 'चवदा अंगुळें' (एक वीत दोन अंगुळें) असा भाषांतरकारांनीं केलेला आहे. हातभर जाडीचा बर्फाचा थर डोंगर व दऱ्या यांवर सारखा पडला असता सर्व जीवजात

मरून जाईल हें कांहीं सांगावयास नको. तात्पर्य, हिमपाताच्या आगमनाचें वर्णन याहून हुबेहुब करणें कठीणच आहे. आर्यांची मूळची सुखकर भूमी बर्फ व थंडी यांमुळें कशी नष्ट झाली यासंबंधाने इतका स्पष्ट मजकूर आपल्याजवळ असतां, पहिल्या फर्गर्दांत ( अध्यायांत ) वर्णिलेली अंग्र मैन्यूची धाड कोणत्या प्रकारची होती हें सांगणें मुळींच कठीण नाहीं. ऐर्यन वइजोमधील हवा पूर्वी सुखकर असून बर्फ व थंडी यांच्यायोगानें ती पार बिघडून गेली हा केवळ तर्क नसून वंदिदादांतील वर्णणांत तसें स्पष्ट सांगितले आहे. हें वर्णन इतके हुबेहुब आहे की, तें केवळ दंतकथात्मक किंवा काल्पनिक असेल असें कधींही म्हणतां येणार नाही. भूस्तरशास्त्रविषयक आधुनिक शोधांवरून निदान दोन तरी हिमकाल आजवर होऊन गेले, असें सिद्ध झालें असून अमेरिकन शास्त्रज्ञांच्या मते शेवटचा हिमकाल इ. स. पूर्वी ८००० वर्षांपूर्वीच संपून हिमोत्तरकालाला आरंभ झालेला आहे. अवेस्त्यांतील हिमपाताचें वर्णन भूस्तरशास्त्रांतील शोधांशी इतकें मिळते असतांना, ते खरें ऐतिहासिक आहे असे मानावयास पूर्वकल्पित दुराग्रहाशिवाय दुसरी कांहीं अडचण दिसत नाही. तीस चाळीस वर्षांत उपलब्ध झालेल्या भूस्तरशास्त्रीय प्रमाणांवरून कळून आलेल्या ह्या चमत्काराचे वर्णन वंदिदादाच्या कर्त्यांनें केवळ कल्पनेनें केलें असेल असें संभवत नाहीं. तीस चाळीस वर्षांपूर्वी त्याला केवळ कल्पनासृष्टि ह्मणणें शोभत असेल पण आतां हिमपाताची कल्पना स्पष्टपणे कळून आल्यामुळें सदर अवेस्त्यांतील वर्णनासंबंधीं असल्या निराधार तर्कांस मुळींच मान देतां येत नाही. खऱ्या गुरुकिल्लीच्या अभावीं आपल्या भूमीसंबंधानें लिहून ठेवलेल्या प्राचीन लेखांचा कसा भलताच अर्थ करण्यांत येतो यांचें मात्र हे तर्क ह्मणजे एक उदाहरण होत. झेंद् पंडितांनीं विनाकारण गैरसमज करून घेतला नसता तर ऐर्यन वइजो ऊर्फ आर्यांचें जन्मस्थान उत्तर ध्रुवाजवळच असून तेथून ते केवळ लोकसंख्येच्या वाढीमुळें किंवा कोणत्या तरी अप्रतिकार्य मनोवृत्तींमुळें तेथून निघाले नसून हिमपातानें ती भूमी रहाण्याला अयोग्य झाल्यामुळेंच त्यांना ती सोडून द्यावी लागली असें सहज समजलें असतें. तात्पर्य, अलीकडे तीस चाळीस वर्षांत उपलब्ध झालेल्या शास्त्रीय प्रमाणांवरून समजून आलेल्या हवामानांतील या अत्यंत प्राचीन क्रान्ती-

विषयींचा लेखी पुरावाच वंदिदादांत नमूद करून ठेविलेला आहे यांत कांहीं शंका नाहीं.

येथवर केलेल्या विवेचनावरून वंदिदादांतील पहिल्या दोन फर्गदांतील कथा आपल्याला किती महत्वाच्या आहेत हें कळून आलें. ऋग्वेदांतील उषेच्या सूक्तांवरून तीस दिवसांच्या अवधीच्या दीर्घ उषेचें आमच्या मूलस्थानांतील अस्तित्व सिद्ध होतें; तसेंच इतर वचनांवरून तेथील षण्मासावधि किंवा कांहीं कमी अशा रात्री व सात किंवा दहा महिन्यांचे वर्ष इत्यादि गोष्टीही कळून येतात. वैदिक कथांवरून कित्येक वैदिक देवताही मूळच्या ध्रुवावरीलच दिसतात, हेंही मागील दोन प्रकरणांत दाखविलें आहे. पण इतकें असूनही, ध्रुवावर वसति केव्हां होती, व ती तेथून केव्हां उठली याचा निर्णय करतां येण्यासारखें एकही वचन ऋग्वेदांत नाहीं. ह्यासाठीं भूस्तरशास्त्राची मदत घ्यावी लागली. या शास्त्रांतील अगदीं अलीकडच्या शोधांवरून ध्रुवप्रदेशांत जी हवा आज अति कडक व थंड आहे तीच गेल्या हिमकालापूर्वी सौम्य व सुखकर होती असें सिद्ध झालें आहे. आतां वैदिक वचनांवरून जर ध्रुवप्रदेशांतील आर्य वसतीचें अनुमान होत असेल, तर अर्थातच तेथें असणारी आर्यांची वसति हिमकालापूर्वीची असून नंतरची नव्हे हें उघडच झालें. पण अवेस्त्यांतील पूर्वोक्त कथांमुळें आतां भूस्तर शास्त्रीय शोधांवरून असें नुसतें अनुमानच करण्याची कांहीं गरज राहिली नाहीं. या कथांवरून असें स्पष्ट दिसतें कीं, (१) ऐर्यन वइजो मधील हवा मूळ चांगली असून अग्र मैन्यूनें तिचा बिघाड केला, (२) ऐर्यन वइजोचें स्थान असें होतें कीं त्यांत बांधिलेल्या वरांतून सबंद वर्षांत सूर्य एकदांच उगवलेला दिसे, (३) आणि ही सुखकारक भूमि हिमपातामुळें तेथील सर्व प्राण्यांचा नाश झाल्यामुळें रहाण्याला अयोग्य झाली. भूस्तरशास्त्रांतील अलीकडच्या शोधांच्या अभावीं हीं वचने स्पष्ट असूनही त्यांचें रहस्य कळलें नसतें, व कदाचित् त्यांत आलेल्या गोष्टी असंभवनीयही वाटल्या असत्या. कित्येक झेन्द् पंडितांची अशी स्थिति झाल्यामुळेंच आपल्याला हवा तो अर्थ त्यांतून काढण्यासाठीं त्यांनीं या वचनांची लागेल तशी ओढाताण केली. म्हणून हा गैरसमज दूर करून अवेस्त्यांतील कथांचा खरा अर्थ दाखवून देण्यांत

भूस्तर शास्त्रीय शोधांची जी मदत झाली आहे ती नाकबूल करितां येणार नाही. तरी पण त्यावरून या कथांचे महत्व कांहीं कमी होत नाही. प्राचीन काळी युरेशियाच्या अगदी उत्तर भागांत घडून आलेल्या ज्या भयंकर हिमपातामुळें तेथील आर्यांना दक्षिणेकडे यावे लागलें, त्याचा इतिहास हजारो वर्षे केवळ कथांच्या रूपानें स्मरणांत राहिलेला आहे; व जरी या कथा आजवर गूढ राहिल्या होत्या, तरी अलीकडील शास्त्रीय शोधांवरून त्यांचा खरा अर्थ समजल्यामुळें, त्यांच्या सत्यतेविषयीं आतां चांगली खात्री पटण्यासारखी आहे. धार्मिक वाङ्मयांतील गोष्टींची ऐतिहासिक सत्यता आधुनिक शास्त्रांनी पटवून दिल्याची अशी थोडीच उदाहरणें सांपडतील. याप्रमाणे प्राचीन कथा व आधुनिक शास्त्रे यांवरून ऐर्यन वइजोचें ध्रुवाजवळचें स्थान व त्याचा हिमामुळे झालेला नाश या गोष्टी सिद्ध झाल्यावर, पहिल्या फर्गर्दांतील वर्णनांत आलेल्या सोळा भूमीचा संबंध आर्यांच्या हळूहळू झालेल्या प्रयाणाशीच असला पाहिजे, असे सहजच झाले. त्या फर्गर्दांत जरी स्थानत्यागाचा काही उल्लेख केलेला नाही, तरी ऐर्यन वइजो हा अगदी उत्तरेकडील प्रदेश असून त्याचा हिमामुळे नाश झाला एवढे समजल्यावर स्थानत्यागाच्या स्पष्ट उल्लेखाचें कांहीं कारण नाहीं. सोळा निरनिराळे प्रदेश एका विशिष्ट क्रमाने सांगितले आहेत ही एवढीच गोष्ट ते प्रदेश आर्यांच्या प्रयाणमार्गांत क्रमशः लागलेले होत असे मानावयाला पुरेशी आहे. वंदिदादातील मजकुराचे प्रत्येक अक्षर ऐतिहासिक दृष्ट्या खरे आहे असे म्हणण्याचा आमचा उद्देश नाही; कारण आपल्या इकडील मेरूप्रमाणेंच ऐर्यन वइजोदेखील पुराणांच्या जाळ्यांत गुरफटून गेलेला आहे. तरी पण इराणी आर्यांच्या ध्रुवाजवळील मूलस्थानाची ऐतिहासिक माहितीच वंदिदादांत दिली असून, त्याच्या पहिल्या फर्गर्दांत, ते आपल्या मूलस्थानांतून निघून हिमोत्तरकालाच्या आरंभीं रसा ( रंघ ) नदीच्या काठी किंवा सप्तसिंधूच्या प्रान्तांत येऊन तेथे वसाहत करीपर्यन्त त्यांना वाटेत लागलेल्या देशांचेच वर्णन आहे, या गोष्टी नाकबूल करतां येत नाहीत.

या इराणी आर्यांच्या नंदनवनावर आलेल्या बर्फाच्या पुराच्या गोष्टींचें आपल्या प्राचीन वाङ्मयांतील प्रलयाच्या कथेशीं बरेंच साम्य आहे. या प्रलयाच्च अगदीं प्राचीन वर्णन म्हटलें म्हणजे शतपथ ब्राह्मणांतील ( १,

८,१,१–१० ) असून महाभारत, मत्स्यपुराण, भागवत इत्यादि ग्रंथातही ही कथा आलेली आहे. या सर्व कथांचा विचार येथें न करतां फक्त शतपथ ब्राह्मणांतील कथेचेंच थोडेसे परीक्षण केल्यास पुरे आहे. ती कथा अशी:—एके दिवशी प्रातःकाळीं मनूला स्नानाकरितां पाणी दिलें असतां त्यांत असलेला एक मत्स्य मनूच्या हातांत सांपडला. तेव्हां या मत्स्यानें आपला प्राण वांचविण्याविषयी मनूची प्रार्थना केली आणि या उपकारांची फेड करण्यासाठीं ह्मणून सर्व प्राण्यांना वाहून नेणाऱ्या एका जलाच्या औघापासून त्याचें रक्षण करण्याचें मत्स्यानें कबूल केलें. या कथेत हें संभाषण केव्हां व कोणत्या स्थळी झालें हे सांगितलेलें नसून त्या औघाचेंही स्वरूप अधिक सविस्तर सांगितलेलें नाहीं. असो. मत्स्यानें सांगितल्याप्रमाणें मनूनें त्याला प्रथम एका भांड्यांत नंतर एका लहान तळ्यांत ठेऊन व शेंवटीं समुद्रांत नेऊन त्याचें रक्षण केलें. तेव्हां त्यानें मनूला सांगितलें कीं, अमुक एक वर्षी भयंकर जलप्रलय होणार आहे, तर तो होण्यापूर्वी एक नाव बांधून त्यांत तू बसून रहा. मनूनें त्याप्रमाणें नांव बांधिली व जेव्हां पूर चढूं लागला, तेव्हां तींत बसून त्यानें तिचा दोर त्या मत्स्याचा शिंगाला बांधिला आणि अशा रीतीनें तो उत्तरगिरीशीं ( हिमालय ) येऊन पोंचला. तेथें आल्यावर मत्स्यानें मनूला सांगितलें कीं, तूं आपली नाव एखाद्या वृक्षाला बांध ह्मणजे पाणी जसें जसें उतरेल तशी तशी ती खालीं येईल. मनूनें तसें केलें आणि ह्मणूनच या उत्तरगिरीला 'मनूचें अवसर्पण' असें नांव मिळालें, असेंही त्या ब्राह्मणांत सांगितलें आहे. या प्रलयांतून एकटा मनूच काय तो बचावला. पुढे त्याला संततीची इच्छा उत्पन्न होऊन त्यानें पाकयज्ञ केला. तेव्हां एका वर्षानें इडा नांवाची स्त्री उत्पन्न होऊन तिच्यापासून त्याला संतति प्राप्त झाली.

ह्या गोष्टीचा अथर्ववेदांत उल्लेख केलेला आहे असें दिसतें, कारण त्यांत ( १९,३९,७–८ ) कुष्ठ नांवाची वनस्पति **नावप्रभ्रंशनम्** नांवाच्या हिमवानाच्या शिखरावर उत्पन्न झाली असें ह्मटलें आहे. महाभारतांत या हिमालयाच्या शिखराला **नौबंधनम्** ह्मटलें आहे. पण ही कथा केव्हां व कोठें घडली याबद्दल त्यांत कांहीं सांगितलेलें नाहीं. मत्स्यपुराणांत मनूच्या तपश्चर्येचें स्थान मलय ऊर्फ मलबार हें दिलें असून, भागवतांत

द्रवीड देशाचा राजा **सत्यव्रत** यालाच या प्रलयाच्या कथेचा नायक ह्मटलेले आहें. पण या सर्वांत प्राचीन अशी जी ब्राह्मणांतील हकीगत तींत मनु कोणत्या स्थळीं नावेंत बसला हें कांहींच सांगितलेलें नाहीं. शिवाय हा पूर पाण्याचा असून अवेस्त्यांतील पुराप्रमाणें बर्फाचा नाही. तथापि मनूची कथा ही एखाद्या लहानशा पुराची कथा नसून अवेस्त्यांत वर्णिलेल्या सार्वत्रिक प्रलयाचीच आहे यांत कांही शंका नाहीं. शतपथ ब्राह्मणांत या पुराला **औघः** असें ह्मटलें आहे; तरी संस्कृतांत बर्फाचा वाचक जो **प्रालेय** शब्द तो पाणिनीच्या मतें (७,३,२) **प्रलय** शब्दापासूनच झालेला आहे. यावरून प्रळय आणि बर्फ यांचा मूळ संबंध भारतीयांना प्रथम माहीत असून मागाहून त्याकडे दुर्लक्ष झालेलें असावें असें दिसतें. भूस्तरशास्त्रावरून असे समजतें कीं, प्रत्येक हिमकालाच्या प्रसंगीं बर्फ पडणाऱ्या प्रान्तांतून वहाणाऱ्या नद्या आपल्याबरोबर विपुल गाळ व माती घेऊन दूरच्या जमिनीलाही त्या पुरानें भरून टाकितात. शतपथ ब्राह्मणांतील औघ शब्दाचाही असल्याच एखाद्या जंगी पुराशी संबंध असून मनु त्याबरोबर आपल्या नावेसह वहात वहात हिमालयाशीं येऊन पोंचला असेल. ह्मणजे ही ब्राह्मणांतील गोष्ट केवळ पाण्याच्या पुराचीच होती असें मानण्याचें विशेष कारण नाहीं. ही कथा अवेस्त्यांतील बर्फाच्या प्रलयाच्या गोष्टीचेंच रूपान्तर होय. ही जलप्रलयाची गोष्ट भारतीयांनीं बायबलांतील गोष्टीवरून आपल्या ग्रंथांत घातली असेल अशी एक कल्पना कांहीं वर्षांपूर्वी कित्येक पंडितांनीं काढिली होती. पण शतपथ ब्राह्मणांत "कृत्तिका मात्र पूर्व दिशेपासून चळत नाहीत' असें जें म्हटलें आहे, त्यावरून हें ब्राह्मण इ. स. पूर्वी २५०० वर्षांच्या अलीकडचें नाहीं हे सिद्ध झाल्यामुळें ही कल्पना त्यांना सोडून द्यावी लागली. तात्पर्य ही प्रलयाची कथा मूळ आर्यच असून अवैस्तिक व वैदिक हकीगतीचें मूळ एकच असलें पाहिजे. अवेस्त्यांतील यिम हा **विवंघतूचा** पुत्र आहे, तर वैदिक मनूहि वैवस्वत ऊर्फ **विवस्वताचा** पुत्र ह्मणून प्रसिद्ध आहे (श. ब्रा. १३,४,३,३; ऋ. ८,५२,१). यमालाही ऋग्वेदांत वैवस्वत म्हटलेलें आहे (१०,१४,१). म्हणून अवेस्त्यांतील गोष्टीचा नायक यिम (सं. यम) व वेदांतील गोष्टींचा नायक मनु आणि एक पूर बर्फाचा तर दुसरा जलाचा असें जरी आहे,

तरी दोन्ही गोष्टींचा संबंध एकाच भूस्तरविषयक उत्पाताशीं आहे यांत शंका नाहीं. शतपथ ब्राह्मणांतील हकीगतीपेक्षां वंदिदादांतील हकीगत स्पष्ट असून तिच्या बहुतेक बाबींचा हिमपातविषयक शास्त्रीय शोधांशी चांगला मेळ पडत असल्यामुळे शतपथ ब्राह्मणापेक्षां ती प्राचीन आहे असें अनुमान होतें.

उत्तरेकडील वसतिस्थानाचे ज्यांवरून थोडेबहुत अनुमान करितां येईल अशीं दुसरींही कांही वचने आमच्या प्राचीन वाङ्मयांत आहेत. ऋग्वेदांत अनेक ठिकाणी आलेले **शतम् हिमाः** ( १,६४,१४,२,३३,२;५,५४, १५ इ. ) हे शब्द, ऐतरेय ब्राह्मणांतील* ( ८,१४ ) उत्तर कुरु उत्तर मद्र यांचे उल्लेख हे उत्तरेकडील वसतिस्थानाचेच अवशेष असावे. उत्तर कुरु हे देवाची भूमि असून त्यांना कोणीही मर्त्य जिंकूं शकणार नाही असें ऐतरेय ब्राह्मणांत सांगितलें आहे ( ८,२३ ). रामायणांत ( ४, ४३,३८ ) त्यांना पुण्यकर्मे करणारांची वास्तव्यभूमि असे ह्मटलें आहे. महाभारतांत सभापर्वामध्ये ( अ. २८ ) ' या उत्तर कुरूंना जिंकावयास कोणीही धजत नाही ' असें अर्जुनाला सांगितलेले आहे. टालेमी या प्राचीन ग्रीक शास्त्रज्ञानेही ऑत्तारो कोरा या नांवाच्या पर्वताचा, लोकांचा व नगराचा उल्लेख केलेला आहे. उत्तरकुरूचा प्रदेश हिमालयाच्या पलीकडचा असून तेथील लोक वैराज्य भोगितात असे ऐतरेय* ब्राह्मणांत सांगितले आहे (८,१४). ' वाग्देवता

१ जलप्रलयाची कथा ग्रीक पुराणांतही आलेली असून मनूच्या वैदिक गोष्टीशीं तिचें कांहीं बाबतींत बरेंच साम्य आहे. ती गोष्ट अशी—पृथ्वीवर अतिशय अन्याय झाल्यामुळें झुसनें ( द्यौः पितर् ) अतिशय पाऊस पाडून, अति उंच पर्वतशिखरांशिवाय बाकीच्या सर्व ग्रीस देशाला पाण्यांत बुडवून टाकिले. त्यांत ड्युकेलियन हा आपल्या बापाच्या सांगण्यावरून एक नाव बांधून तीत राहिल्यामुळें बचावला. पुढें त्याच्या प्रार्थनेवरून झुसनें त्याच्या बरोबर राहण्यासाठीं स्त्रीपुरुष उत्पन्न केले. नावेंतून सुखरूप उतरल्यावर ड्युकेलियननें झुसला यज्ञ करून संतुष्ट केलें. आरिस्तातल या ग्रीक तत्ववेत्यानेंही आपल्या ग्रंथांत ही गोष्ट खरी ऐतिहासिक समजूनच तिची चर्चा केली आहे.

* तस्मादेतस्यामुदीच्यां दिशि ये केच परेण हिमवंतं जनपदा उत्तरकुरव उत्तरमद्रा इति वैराज्यायैव तेऽभिषिच्यन्ते । ऐ. बा. ८, १४.

( पथ्यास्वस्ति ) उत्तर दिशेला ( उदीचीं दिशम् ) जाणते ' असे कौषी-
तकी ब्राह्मणांत सांगितले आहे. या सर्व गोष्टींवरून प्राचीन काळीं
उत्तरेशी आर्यांचा असलेला संबंध दिसून येण्यासारखा आहे असे **मूर**
या पाश्चात्य पंडिताचें मत आहे. पण यांपैकीं एकही गोष्ट निर्णायक
नसून ध्रुवस्थानाच्या सिध्यर्थ त्यांचा प्रत्यक्ष असा कांहींच उपयोग नाहीं.
वैदिक व अवेस्तिक वचनांवरून निघणाऱ्या अनुमानांना अप्रत्यक्ष पुष्टि
यांच्यावरून मिळेल; आणि त्याच दृष्टीनें त्यांचा या ठिकाणी उल्लेख
केला आहे. आमची खरी मदार म्हटली ह्मणजे पूर्वीच्या प्रकरणांत दि-
लेलीं वैदिक वचनें व या प्रकरणात सांगितलेल्या अवेस्त्यांतील गोष्टी
ह्यांवरच आहे. या दोहोंवरून आर्यांच्या ध्रुवप्रदेशांतील मूलस्थानाविषयीं
प्रत्यक्ष पुरावा मिळत असून, तें मूलस्थान हिमकालांत नष्ट झाल्यामुळें
प्राचीन आर्यांना आपली जन्मभूमि सोडून दक्षिणेकडे प्रवास करीत व
मध्य आशियांतील कित्येक देश ओलांडित उक्षस्, कुभा, रसा इत्यादि
नद्यांच्या कांठी वसाहती कराव्या लागल्या व तेथून पुढें कांहीं दिवसांनीं
त्याची एक शाखा पूर्वेस वळली व दुसरी पश्चिमेकडे इराणांत जाऊन
राहिली इत्यादि गोष्टींचेही त्यांवरून चांगले अनुमान होते.



# प्रकरण १२ वें.

## तुलनात्मक गाथाशास्त्रांतील प्रमाणें.

तुलनात्मक गाथाशास्त्रांतील प्रमाणांचे महत्व-वैदिक प्रमाणांना त्यांवरून दुजोरा मिळतो-ध्रुवोपपत्तीवरून यूरोपीय आर्यांच्या पुराणकथांचा उलगडा होतो-लेट् लोकांच्या पुराणांतील अनेक उषा-ग्रीक पुराणांतील हेराक्लिसच्या अनेक स्त्रिया-सेल्टिक पुराणांतील सूर्याच्या स्त्रीची अनेक नावे-ग्रीक पुराणांतील ३५० दिवसांचें वर्ष-रोमन वर्ष पूर्वी दहा महिन्यांचे होतें याविषयी प्लूटार्कचें मत-प्राचीन सेल्टिक वर्ष आक्टोबरच्या शेवटीं संपे-या वर्षाचे दोन भाग-डिमेटरची कन्या सहा महिने तमोमय घरांत जाई-प्लूटो ( पाताळाचा राजा ) पर्सिफोनला सहाच महिने आपले जवळ ठेवितो-मोइतूर्याच्या युद्धाचा दिवस-प्राचीन नॉर्स लोकांचें वर्षही असेच होतें-या सर्वांवरून सहा महिन्याच्या दिवस रात्रीचा बोध होतो-या अनुमानाला व्युत्पत्तिशास्त्राचा आधार--वैदिक नवग्वांचे जोडीदार-रोमन पुराणांतील नोव्हम् साईल्स--सेल्टिक् पुराणांतील नऊ रूपांची कन्या-नॉर्स पुराणांतील थॉरचीं नऊ पावलें--अवेस्त्यांतील विफ्र नवाझ-नॉर्स् देव बाल्डर आकाशांत बराच वेळ थांबतो-ही गोष्ट ध्रुवप्रदेशांतील दीर्घ दिवसाची द्योतक आहे-स्लॅव्होनिक पुराणांतील इवान्‌ची कथा-वैदिक त्रिताशी त्याचे साम्य-वैदिक विष्णूप्रमाणें आयरिश आणि नॉर्स पुराणांतील देव वर्षांतून कांहीं काल रोगग्रस्त होत-हा काल हिंवाळ्याचा व दीर्घ अंधकाराचा होय-मानुष्यकशास्त्रांतील नवीन शोधांवरून आर्यांचें मूळचें स्थान उत्तर जर्मनी किंवा स्वीडनमध्यें होतें असें म्हणूं लागले आहेत-याच्याही पलीकडे उत्तरेकडे जाणें अवश्य आहे-सर्व मानव जातीचेंही मूलस्थान ध्रुवाजवळ असूं शकेल-प्रो० व्हिसची शोध करण्याची पद्धति-त्याचीं अनुमानें-पौरस्त्य व पाश्चात्य कथांवरून ध्रुवस्थानाचीच सिद्धि होते.

## तुलनात्मक गाथाशास्त्रांतील प्रमाणें.



द आणि अवेस्ता यांतील कथांवरून निघणाऱ्या अनुमानांना इतर आर्य राष्ट्रांच्या पुराणकथांवरून कितपत पाठबळ मिळतें हें या प्रकरणांत पहावयाचें आहे. मागील प्रकरणांत जीं वैदिक व अवैस्तिक प्रमाणे दिली आहेत त्यांचे स्वरूप सर्व-सामान्य आहे. ती केवळ आशियाखंडालाच लागू पडणारीं आहेत असे नाहीं. त्यामुळे जरी इतर राष्ट्रांच्या कथांचा त्यांशीं विरोध आला तरीही त्यांवरून निघणारीं अनुमानें त्याज्य होणार नाहींत. असें जरी आहे तरी इतर राष्ट्रांनी आपल्या उत्तरेडील मूलस्थानाचें पुराणकथांच्या रूपानें किंवा कालगणनेच्या पद्धतींत स्मरण ठेविलें आहे की नाही हें पहाण्यासाठीं त्यांच्या कथांचे निरीक्षण करणें उपयुक्तच होणार आहे. या गोष्टीचे प्रामाण्य कदाचित् वैदिक कथांइतके मानतां येणार नाही; तरी वैदिक कथांना त्यांचेपासून दुजोरा मिळतो ह्मणून तरी त्यांचे महत्व आहेच. तुलनात्मक गाथाशास्त्र आणि तुलनात्मक व्युत्पत्तिशास्त्र यांच्या इतिहासावरून असे दिसते की, युरोपीय पंडिताना संस्कृतभाषा व तिच्या द्वारा वैदिक वाङ्मय यांची ओळख झाल्यापासून ग्रीक व रोमन पुराणांसंबंधाने नवीन दृष्टि उपलब्ध झाली. त्याचप्रमाणे आतां ध्रुवावरील वसतिस्थान सिद्ध करणारी वेद व अवेस्ता यांतील प्रमाणे उपलब्ध झाल्यामुळे यूरोपीय आर्यांच्या पुराणकथांतील बऱ्याच बाबींचा उलगडा होणार आहे.

वैदिक प्रमाणांचा ऊहापोह करतांना जो क्रम स्वीकारला होता, तोच येथेंही घेऊन, प्रथम कालगणनेचा विचार करून त्यावरून, दीर्घ उषा, दीर्घ दिवस व रात्र, किंवा बारा महिन्यांहून कमी अवधीच्या सूर्यप्रकाशाचे वर्ष इत्यादि ध्रुवविशिष्ट गोष्टींचा पाश्चात्य आर्यांच्या कथांमध्यें कांहीं मागमूस आढळतो की नाही हे पाहूं. वेदांमध्यें उषा अनेक आहेत, अशा तात्पर्याची जीं वचनें आलीं आहेत त्यांप्रमाणे **लेट्** लोकांच्या पुराणांत **दिएवो दुक्तेचा** अनेकवचनी उल्लेख करून अशा अनेक सुंदर **दिएवो दुक्रुझेलिस्** ह्मणजे देवकन्यका आहेत असें ह्मटले आहे. उषावाचक **दिवो दुक्ते** या शब्दाचा अर्थ द्यौची कन्या असा असून ऋग्वे-

दांतील **दिवो दुहिता** शब्दाचेच तो रूपान्तर आहे. ग्रीक कथांतही **हेराक्लिस**च्या अनेक स्त्रिया असून त्यांची नांवें पीत, सोनेरी, तेजस्वी अशा अर्थाचीं असून **इऑस** ऊर्फ उषस्‌शीं त्यांचा संबंध स्पष्ट दिसून येतो. हीच गोष्ट सेल्‌टिक् पुराणांत आली असून कुचुलैनच्या ह्मणजे सूर्य-देवाच्या स्त्रीची अनेक नावे त्यांत दिली आहेत. वेदांतील उषेच्या वर्णनाप्रमाणें या वर्णनावरून ध्रुवप्रदेशाचा प्रत्यक्ष बोध होण्यासारखा नाहीं. पण यांपैकीं उषेला लेटिश पुराणांत द्यौची कन्या ह्मणून ऋग्वेदाप्रमाणेंच तिचा अनेकवचनी उल्लेख केला आहे; म्हणून ऋग्वेदांतील सविस्तर वर्णनावरून जे अनुमान काढले तेच लेटिश कथांनाही लावावयास हरकत नाही. ग्रीक व सेलटिक पुराणांनाही हीच गोष्ट लागू आहे.

गवां अयनम् आणि त्याबरोबर नवग्व आणि दशग्व यांची कथा सांगतांना ग्रीक पुराणांतील हेलिऑस् ( सूर्य ) याचे ३५० बैल व तितक्याच मेंढ्या असल्याचें सांगून त्यावरून ३५० दिवसांच्या वर्षाचे अनुमान केले आहे. तसेच रोमन वर्षाचा शेवटचा महिना जो डिसेंबर ( स. दशमवार ) त्याच्या नांवावरून तो मूळ दहावा महिना असावा असें मानून प्राचीन रोमन वर्ष दहाच महिन्याचे होते असे सांगितले आहे. प्ल्यूटार्कने प्रसिद्ध रोमन लोकांचीं चरित्रे लिहिलीं आहेत, त्यात न्यूमा नामक राजाच्या चरित्रांत असे म्हटले आहे कीं, 'न्यूमाने महिन्यांचा क्रम बदलून मार्च पहिला होता तो तिसरा केला आणि जानेवारी व फेब्रुवारी हे अकरावे व बारावे होते ते पहिले व दुसरे केले.' यावरून कित्येकांनी रोमन लोकांचे प्राचीन वर्ष दहा महिन्याचे नसून बारांचेच होते असें ठरविले आहे. पण प्ल्यूटार्कनेच पुढे सांगितलें आहे कीं, 'न्यूमाने जानेवारी व फेब्रुवारी हे महिने नवीनच घातले; त्यापूर्वी रोमन लोक वर्षाचे दहाच महिने धरीत असत, असे पुष्कळांचें ठाम मत आहे.' शिवाय प्ल्यूटार्कने आपले स्वतःचे मत देताना म्हटले आहे कीं, 'रोमन वर्षाचे प्रथम दहाच महिने होते व बारा नव्हते, असें मानावयास त्यांतल्या शेवटच्या महिन्याच्या नांवाचा मोटा आधार आहे; कारण अजूनही त्याला दहावा महिना अशा अर्थाचें डिसेंबर हेंच नांव आहे. शिवाय मार्च पासून पांचवा, सहावा इत्यादि महिन्यांचीही त्याच अर्थाची क्विन्टिलिस् ( पांचवा, ) सेक्स्टिलिस् ( सहावा ) इत्यादि नांवें असल्यामुळें मार्च हा पहिला महिना

होता हें उघड होतें." हे प्लूटार्कचें ह्मणणें सोडून देतां येण्यासारखें नाहीं. कारण महिन्यांना पांचवा, सहावा इत्यादि क्रमवाचक नांवें देण्याची पद्धत डिसेंबरपासून एकाएकी सोडून दिली असेल असें ह्मणणें सयुक्तिक नाहीं. जानेवारी व फेब्रुआरी हे महिने खरोखर न्यूमानें मागाहून घातलेले असून, ते कां घातले हे जेव्हां समजत नाहींसें झालें, तेव्हां ते पुढून मागे आणले असें मत प्रचलित झालें असावें. कारण प्लूटार्क शिवाय आणखी मॅक्रोबियस् या ग्रंथकारानेही आदि रोमन राजा जो रोम्युलस् त्याचें वर्ष दहाच महिन्यांचें होतें असे ह्मटले आहे. अर्थात् त्याबद्दल मुळींच शंका नसून वेदांतील दशग्वांच्या दशमासिक सत्रांच्या गोष्टीशींही ते चांगलें जुळत आहे.

सेल्ट्, टयूटन् आणि ग्रीक या लोकांच्या प्राचीन वर्षाविषयींची प्रमाणें इतकीं निश्चित नाहीत; तरी त्या प्रत्येकामध्ये वर्षाचा थोडा तरी भाग थंडी व काळोख यांनीं व्याप्त असल्याचे स्पष्ट दिसत असल्यामुळे तें वर्ष मूळचे ध्रुवावरचे असावे असे म्हणावयास हरकत नाहीं. सेल्टिक् पुराणकथांवरून असें दिसते की, त्यांचें प्राचीन वर्ष आक्टोबरच्या शेवटीं संपून, तेथून थडी व काळोख यांना आरंभ होत असे; कारण हिवाळ्याच्या आगमनाप्रीत्यर्थ करावयाचा समारभ ते आक्टोबरच्या शेवटच्या दिवशीं करीत असत. उन्हाळ्याच्या म्हणजे सेल्टिक्पुराणाप्रमाणें पहातां वर्षाच्या मध्यभागी करावयाचा **लग्नसद्**चा उत्सव आगष्ट महिन्याच्या पहिल्याच दिवशी होत असे, व उन्हाळ्याला सुरुवात मेच्या पहिल्या दिवसापासून होई. प्राचीन सेल्टिक् वर्षाचे दोनच भाग असल्याचेंही कांहीं गोष्टींवरून दिसून येते. **डि-मेटर** म्हणजे भूमाता (सं०ज्या-माता) ही आपली कन्या **प्राझर्पाइन्** इच्या संगतीत सहा महिने सुखानें घालवून, पुढच्या सहा महिन्यांत ती पृथ्वीच्या खालीं तमोमय घरांत गेल्यामुळें तिच्या वियोगामुळें दुःख करीत असते. तशीच ग्रीकपुराणांत दुसरी एक गोष्ट आहे. झुसची ( सं-द्यौस् ) कन्या पर्झिफोन हिला पाताळाचा राजा प्लूटो हा पळवून नेतो; पण त्याला वर्षांतून फक्त सहाच महिने आपल्याजवळ तीस बाळगतां येतें. ऋग्वेदांत इन्द्र-शंबरांच्या युद्धाच्या आरंभाचा जसा नक्की दिवस दिला आहे, तसा सेल्टिक पुराणांतहीं मोइतूर्याच्या युद्धाचा दिवस नवंबरची पहिली तारीख म्हणून सांगितला आहे.

नावेंतील लोकांचें व ग्रीक लोकांचें प्राचीन वर्षही अशाच तऱ्हेचें होतें असें प्रो० ऱ्हिस या विद्वान् पंडितानें दाखविले आहे.

यावरून युरोपांतील आर्यांनाही सहा महिन्यांचा दिवस व सहा महिन्यांची रात्र यांची माहिती असून, या भेदतत्वावरच त्यांची कालगणना-पद्धति बसविली होती असे दिसते. तुलनात्मक व्युत्पत्तिशास्त्रावरूनही या अनुमानाला बळकटी येते. आर्यांच्या बहुतेक शाखांच्या वर्षाचे उन्हाळा व हिवाळा असे दोनच भाग होते, असे मानावयाला व्युत्पत्तिशास्त्रावरून आधार मिळतो असे डॉ० श्रेडर नांवाच्या पंडिताने आपल्या ग्रथांत दाखविले आहे. निरनिराळ्या आर्य भाषांना सबद वर्षाचा वाचक असा एकही शब्द समाईक नाही. ध्रुववृत्तांत वर्षांतून सहा ते बारा महिन्यां-पर्यंत सूर्यप्रकाशाचा काल असल्यामुळे वर्षाचा बोध करून घेण्याकरितां बारा महिन्यांच्या वर्षाच्या कल्पनेपेक्षां, अमुक महिन्यांचा उन्हाळा व हिवाळा अशीच कल्पना तेथील लोकांना अधिक सोपी वाटली असावी. सबंद वर्षाचा बोध करण्याकरितां **मानुषा युगा** आणि **क्षपः** असे जे शब्द आले आहेत त्यांचा यावरून उलगडा होण्यासारखा आहे.

नवग्व आणि दशग्व यांच्या नांवात जे सख्यात्मक भाग आहेत त्यां-वरून त्यांच्या सत्राच्या अवधीच्या कालाची कल्पना करता येते असे मागे दाखविलेच आहे. या नवग्व–दशग्वासारखी मडळी इतर आर्यपुराणातही आहेत की काय हे आतां पाहू. रोमनपुराणातील **नोव्हमूसाईल्स** व नवग्व, यांचे शाब्दिक साम्य आहे; पण त्यांच्या स्वरूपात तसें साम्य दिसत नाही. परतु सेल्टिकपुराणातील नवरूपा कन्येशी मात्र त्यांचे खरे साम्य दिसते; कारण तिचा कुचुलैन ऊर्फ सूर्य–देवाशीं सबध आहे. **कांचोबर** याची **फेडेल्म** नांवाची एक सुदर कन्या होती. पश्चिमेकडून आपले शत्रू वर आले असे ऐकताच कुचुलैन हा आपल्या पित्यासह तिकडे गेला, व सायंकाळी एकाएकी तेथून निघून तो आपल्या संकेतस्थानी आला; त्या ठिकाणी फेडेल्म हिने त्याला दुसऱ्या दिवशीच्या युद्धासाठी तयार करण्याकरितां त्याच्या स्नानाची तयारी करून ठेविली होती. ही गोष्ट नवग्व–दशग्वांनी सोमांच्या आहुती देऊन वृत्रयुद्धासाठी इन्द्राला पुष्ट कर-ण्याच्या गोष्टीसारखीच आहे. तात्पर्य ही नवरूपा कन्या म्हणजे वैदिक नवग्वांचे सेल्टिक रूपांतरच होय. नॉर्स पुराणांत पृथ्वीचा पुत्र जो **थॉर्**

तो राक्षसाचा वध केल्यावर, नऊ पावलें चालून सर्पविषामुळें मृत्यु पावतो असे सांगितलें आहे. थॉरचीं ऊर्फ सूर्यदेवाचीं हीं नऊ पावलें म्हणजे तो क्षितिजावर आल्यापासून पुनः दीर्घ काळोखाच्या आरंभीं क्षितिजाखालीं जाईपर्यंतचा नऊ महिन्यांचा काळ असला पाहिजे. अवेस्त्यांतील **विफ्र नवाझ** याची गोष्टही अशाच प्रकारची दिसते. थ्राएतौनानें त्याला हवेंत झोंकून दिल्यामुळें तो सारखा तीन दिवस व तीन रात्री उडत होता; पण त्याला खालीं येतां येईना. तिसऱ्या रात्रीच्या शेवटीं जेव्हां उषेचा उदय झाला, तेव्हां त्यानें अर्द्विसूर अनाहित हिची प्रार्थना करून तिला **हओमाच्या** आहुति देण्याचें कबूल केले. प्रार्थना ऐकून अर्द्विसूर अनाहितेने त्याला सुखरूप खाली आणिलें. हा विफ्र नवाझ वैदिक विप्र नवग्वच होय. सात विप्र व नवग्व हे ऋग्वेदांत (६,२२,२) एकत्र सांगितलेले असून, ५,७४,७ यांत अश्विनांना **विप्रवाहसा** म्हणून ते दूरच्या प्रदेशांत तीन दिवस व तीन रात्री राहिल्याचें सांगितलें आहे. नऊ महिन्यानंतर आपलें सत्र आटोपून पाताळांत इंद्राला मदत करण्यासाठी जाणाऱ्या नवग्वांची गोष्ट आश्विनांच्या कथेशीं जोडून विफ्र नवाझाच्या गोष्टीच्या रूपानें ती अवेस्त्यांत सांगितली असावी.

येणें प्रमाणें सेल्टिक, ग्रीक, आणि नॉर्स वाङ्मयांतील कथांवरून हिंवाळ्यांतील दीर्घ काळोख किंवा सहा अथवा दहा महिन्यांच्या प्रकाशाचें वर्ष इत्यादि गोष्टी यूरोपीय आर्यांच्या पूर्वजांना माहीत होत्या असे दिसतें. नॉर्स पुराणांतील सूर्यदेव **बाल्डर** हा आकाशांत बराच वेळ राहतो असें म्हटलें आहे. सूर्य आपला रथ सोडून मध्येच आकाशांत थांबतो असें जें ऋग्वेदांत म्हटलें आहे, त्यासारखेंच हे आहे. उत्तर ध्रुवाजवळील दीर्घ दिवसाचा संबंध या गोष्टीत असावा. स्लॅव्होनिक पुराणांत वैदिक **त्रिताच्या** गोष्टीचें प्रतिरूप आहे. ते असें–एका वृद्ध दंपतीला तीन पुत्र होते; त्यापैकी दोघे शहाणे असून, तिसरा **इवान्** हा भोळसर होता. इवान् ज्या ठिकाणी रहात असे तेथे नेहमीच रात्र असे. हे कृत्य अहीचें असल्यामुळें इवान् त्या अहीला मारावयास सिद्ध झाला. तेव्हां बारा शीर्षांचा एक साप तेथे आला. इवाननें त्याचा वध केल्यावर लगेच जिकडे तिकडे प्रकाश झाला. त्रिताचे स्थान दूरच्या प्रदेशांत ऊर्फ पाताळांतील अंधकारमय प्रदेशांत होतें असे जें वेदांत सांगितलें आहे त्याशीं ही **इवान्**ची गोष्ट उत्तम जुळते.

या सर्व कथांवरून, सेल्ट्, टयूटन्, लेट्, स्लॅव्ह्, ग्रीक आणि रोमन या यूरोपीय आर्यलोकांच्या पुराणांत ध्रुवाजवळील कालपरिमाणाच्या खुणा अद्यापिही राहिल्या आहेत असें दिसून येते. दीर्घ उषा, दीर्घ दिवस व रात्र, आणि काळोखाचे हिंवाळे या गोष्टींचे कमी जास्त स्पष्ट उल्लेख त्यांत आहेत, पण त्यांपैकीं एकावरूनही ध्रुवावरील आर्यांची वसति किंवा त्यांचा नाश होण्याचें कारण यांचा प्रत्यक्ष बोध होत नाही. पण ही उणीव वेद व अवेस्ता यांनीं पूर्णपणें भरून काढिली असल्यामुळें, त्यांच्या साहाय्यानें यूरोपीय आर्यांच्या पुराणांचा विचार केल्यास त्यांतील कथांवरून ध्रुवाजवळील मूलस्थानाचे अनुमान करतां येण्यासारखे आहे. वर सांगितलेल्या गोष्टींशिवाय आणखीही कित्येक गोष्टींत सूर्यदेवानें अंधकारावर मिळविलेल्या विजयाचे वर्णन या पुराणांत केलेले आहे. पण त्या सर्व येथें नमूद करण्याचें कारण नाही. वेदांतील विष्णूच्या अल्पकालिक आजाराप्रमाणे आयरिश व नॉर्स पुराणांतील देवही वर्षांतून कांहीं कालपर्यंत रोगग्रस्त होऊन पडत असत. हा रोगग्रस्तपणा ह्मणजे हिंवाळ्यांतील काळोख होय. या सर्व गोष्टींचा संबंध आतां ध्रुवस्थानाशी लावतां येतो, पण कांही वर्षांपूर्वी असे मत प्रतिपादन करणारावर वेडेपणाचा आरोप आला असता. अलीकडे भाषाशास्त्र आणि मानववंशशास्त्र यांतील शोधांमुळे पूर्वी ठरविलेल्या सिद्धांतांमध्यें बराच फरक झालेला आहे. आर्यांचें मूलस्थान मध्यआशियांत होते हे मत, भूस्तरशास्त्र, पुराणवस्तुशास्त्र, मस्तकविज्ञानशास्त्र इत्यादि शास्त्रांतील शोधांनी बदलून टाकिल्यामुळें, आतां ते मूलस्थान उत्तर जर्मनी किंवा स्वीडनचा दक्षिण भाग यांत होतें असे व्युत्पत्तिशास्त्रज्ञहि ह्मणू लागले आहेत. तुर्कस्तान खेरीज करून यूरोपांतील बहुतेक मोठीं राष्ट्रे आपली पूर्वपरंपरा नॉर्स लोकांच्या दिग्विजयापर्यंत नेऊन भिडवितात. पण उत्क्रान्तितत्वाला अनुसरून ही परंपरा आणखीही उत्तरेकडे पोचवितां येईल. वर सांगितलेल्या पुराणांतील गोष्टींत दिसून आल्याप्रमाणे त्या कथांचा रोख ध्रुववृत्ताच्या आंतील कोणत्या तरी स्थळाकडे आहे यांत कांहीं शंका नाही. ही गोष्ट फक्त आर्यांच्या मूलस्थानाची झाली. इतर मानववंशांच्या मूलस्थानाचा यांत कांही संबंध नाही. तरी त्यांचे मूलस्थान ध्रुवाजवळ असूं शकणार नाहीं असें मात्र यावरून समजावयाचें नाही. कांही वर्षांपूर्वी एम्. डी. सपोर्टा

नांवाच्या एका फ्रेंच पंडितानें संपूर्ण मानव जातीचें उत्पत्तिस्थान उत्तर ध्रुवप्रदेशच होय असें मत मोठ्या जोरदार रीतीनें प्रतिपादन केलें होतें.

प्रो. व्हिस या प्रसिद्ध पंडितानें यूरोपीय आर्यांच्या पुराणकथांचें तुलनात्मक परीक्षण करून जो सिद्धांत काढिला आहे त्याचें सार येथवर दिलें आहे. प्रो. मॅक्समुल्लर आणि प्रो. व्हिस या दोघांचीही शोध करण्याची दिशा एकच. परंतु ज्या कथांचा विचार करावयाचा त्यांतील हरएक बाबीचा कोणत्या तरी कल्पनेवर समाधानकारक उलगडा झाल्याशिवाय पुढें जावयाचें नाहीं, असा निर्धार केल्यामुळें प्रो. व्हिस याची अनुमानें जास्त व्यापक झाली व शेवटी सर्व बाबीचा उलगडा करणाऱ्या ध्रुवोपपत्तीचा आश्रय करणें त्याला भाग पडलें. या बाबतींत प्रो. व्हिस याची कामगिरी आपल्या उपपत्तीला फारच महत्वाची झालेली आहे. प्रस्तुत पुस्तकांत दाखल केलेल्या ध्रुवाजवळील वसतीसंबंधी वैदिक पुराव्याची जर त्यास माहिती असती, तर त्याने आपले सिद्धांत याहूनही अधिक जोरानें प्रतिपादिले असते. सेल्टिक आणि ट्यूटॉनिक कथांचें सूक्ष्म निरीक्षण करून व त्यांची ग्रिक कथांशी तुलना करून त्याने ही अनुमाने काढिली आहेत; आणि वैदिक व अवैस्तिक कथांचा स्वतंत्र रीतीने विचार करून आह्मी काढिलेल्या अनुमानांशी तीं पूर्णपणे जुळत असल्यामुळे आमच्या अनुमानांना दुप्पट जोर मिळाला आहे. प्रस्तुत अनुमानें तुलनात्मक व्युत्पत्तिशास्त्राच्या विरुद्ध नाहीत हे मागें सांगितलेंच आहे. भाषाशास्त्र व व्युत्पत्तिशास्त्र यांतील शोधांच्या धोरणावरून आशियांतील आर्यांच्या मूलस्थानाची कल्पना आतां पण्डितांनीं सोडून दिल्यासारखी आहे, आणि यूरोपांत रहाणारे नवपाषाणयुगांतील आर्यलोक हे मूळचे तेथलेच होते असेंहा अद्यापि सिद्ध झालेलें नाही. ह्मणजे आर्यांच्या मूलस्थानाचा अद्यापि निर्णय झालेला नाही. ह्मणून त्यांच्यासंबंधानें परंपरागत कथांच्या पुराव्याचा योग्य विचार करून त्यांवरून जी अनुमाने निघतील तीं काढण्याची आह्मांला पूर्ण मोकळीक आहे. उत्क्रान्ति नियमांस अनुसरल्यास आपले मूलस्थान शोधण्यासाठीं उत्तरेकडे ध्रुवप्रदेशांतच गेलें पाहिजे असें जे प्रो. व्हिस यानें म्हटलें आहे तें अगदी बरोबर आहे. त्याप्रमाणें पहातां खरोखर वर्षांतून सात महिन्यांचा सूर्यप्रकाश, शंभर

दिवसांच्या अवधीचा अखंड अंधकार, किंवा तीस दिवसांच्या अवधीची अखंड उषा, ही ज्या अक्षांशावर आहेत, तेथेंच आपलें मूलस्थान असलें पाहिजे. आर्य लोकांखेरीज इतर मानववंशांचेही मूलस्थान ध्रुवाजवळ असेल कीं नाहीं, या प्रश्नाचा सांगोपांग विचार डॉ. वारन् या पंडितानें आपल्या नंदनवनोपलब्धि ऊर्फ 'मानव जातीचें उत्तर ध्रुवाजवळील उत्पत्तिस्थान' नांवाच्या ग्रंथात केला आहे. एकंदर मनुष्यशास्त्राच्या दृष्टीनें हा प्रश्न महत्वाचा आहे. पण तो फार व्यापक असल्यामुळें त्याचा येथें विचार करतां येत नाही. तरी पण आपली उपपत्ति डॉ. वारन्च्या उपपत्तीच्या विरुद्ध नसून तिला उलट सहायकच आहे. एवढाच फरक आहे कीं आपला उद्देश त्याच्यापेक्षां संकुचित आहे. सर्व मनुष्य जातीचा विचार न करितां तीपैकीं फक्त आर्य शाखेतील लोक गेल्या हिमकालापूर्वी उत्तरध्रुवाजवळ रहात असत, व हिमकालानंतर त्या ठिकाणाचा नाश झाल्यामुळें तेथून त्यांना निघून जावे लागलें, एवढेंच आपल्याला दाखवावयाचें होतें. पूर्व प्रकरणांत सांगितलेल्या वैदिक व अवैस्तिक वचनांवरून या वसतीचा प्रत्यक्ष बोध होत असून, प्रो. ऱ्हिससारख्या पंडितांनी सेल्टिक, टयूटॉनिक इत्यादि युरोपीय आर्यांच्या पुराणांचा स्वतंत्र विचार करून तेच अनुमान काढिलें आहे. आधुनिक शास्त्रांतील शोधाचाही या अनुमानाला पाठिंबा आहे हे मागें दाखविलेच आहे. म्हणून आर्य लोकाचे मूलस्थान उत्तर ध्रुवाजवळ कोठे तरी होते ही गोष्ट सिद्ध झाली असे मानावयास आतां हरकत नाहीं.



# प्रकरण १३ वें.

## प्राचीन आर्यांची सुधारणा आणि धर्म यांशीं प्रस्तुत अनुमानांचा संबंध.

ध्रुवप्रदेशांतील वसतिस्थानाच्या सिध्यर्थ दिलेल्या प्रमाणांचा सारांश–त्यांवरून ध्रुवाजवळील वसतिस्थानाचा स्पष्ट बोध होतो, पण ध्रवप्रदेशांतील नक्की स्थान त्यांवरून निश्चित होत नाहीं–भूस्तरशास्त्रावरून पहातां ध्रुवाजवळील वसतिस्थान हिमान्तरकालांतच शक्य होतें–प्राचीन वैदिक कालगणनापद्धतीचे परीक्षण–हिमोत्तरकालाचा आरंभ आणि मृगशीर्षकाल यांतील अवधि ८०००० वर्षाइतका असावा असें त्यावरून दिसत नाही–वैदिक कालगणनेशी अमेरिकन शास्त्रज्ञांचे नेमस्त अंदाज जुळतात–पुराणांतील युगात्मक कालगणना, मन्वंतरे आणि कल्प--गेल्या प्रलयानंतरच्या दहा हजार वर्षांच्या चतुर्युगात्मक मूळ चक्रावरून पुराणांतील पद्धति निघाली असावी--देवांच्या वर्षांची कल्पना मनुस्मृतीत व भारतांत नाही—त्या नंतरच्या ग्रंथकारांनी तिचा अवलंब केला--त्यांना आपण कृत युगांत आहो असे वाटत नव्हतें--गेल्या प्रलयानंतर दहा हजार वर्षे होऊन गेली या मूळ कल्पनेचा वैदिक कालगणनेशीं चांगला मेळ पडतो--तसाच तो अमेरिकन भूस्तरशास्त्रज्ञांच्या अंदाजांशीही पडतो--या सर्वांवरून ध्रुवाजवळील वसतिस्थानाचा काल शकापूर्वी ८००० वर्षांच्या पलीकडचा ठरतो--प्राचीन दंतकथांचे विश्वासार्ह स्वरूप आणि त्या राखून ठेवण्याची पद्धति--सर्व मानवजातीचे मूलस्थान ध्रुवावर होते ही कल्पना आर्यांच्या तेथील वसतिस्थानाच्या विरुद्ध नाही–आर्यांची अत्यंत प्राचीन सुधारणा आणि धर्म यांविषयींच्या प्रचलित मतांचें परीक्षण–आर्यांचे मूळ पूर्वज आणि त्यांची सुधारणा ही हिमोत्तरकालीन नव्हत–हिमकालांत झालेला प्राचीन आर्यसुधारणेचा नाश–नवपाषाणयुगांतील यूरोपीय आर्यांच्या सुधारणेंतील कमीपणाचे कारण ते प्रलयोत्तरकालांत पुनः रानटी बनले हे होय–हिमान्तरकालांतील ध्रुवाजवळच्या वसतिस्थानांतील लोकांची रहाणी आणि कालमानपद्धति–देवयान, पितृयान आणि तत्कालीन देवता–आर्यांचे मूळ यज्ञयाग- अविभक्त आर्यांच्या ध्रुवजवळच्या मूलस्थानांतील सधारणेचें प्रमाण–

तुलनात्मक व्युत्पत्तिशास्त्राचीं अनुमानें-त्यांवरून दिसून येणारी आर्यांची सुधारणा लघुतम समजली पाहिजे-ह्मणजे ती खरोखर बरीच उच्च प्रकारची असली पाहिजे-अविभक्त आर्यांची सुधारणा पाषाणयुगांतील सुधारणेहून उच्च होती-धातूंचीं नाणीं त्यांच्यांत बहुधा प्रचलित असावीं-आर्यांच्या भाषेचा आरंभ, वर्णानुसार मनुष्यजातींचें वर्गीकरण इत्यादिकांच्या कालाचा पत्ता अद्यापि लागण्यासारखा नाहीं-आर्य जातीचें व त्यांच्या धर्माचे मूळ प्राचीन भूस्तर युगांत गुरफटलेले आहे-वेदांच्या उत्पत्ति व स्वरूपाविषयीं ब्रह्मवाद्यांची मते-षड्दर्शनकारांची मते-पतंजली आणि व्यास यांच्या मतें गेल्या प्रलयांत वेद नष्ट होऊन नवीन कल्पाच्या आरंभीं शब्दशः नव्हे तरी अर्थतः पुनः उत्पन्न झाले-हिमोत्तरकालाचे ज्योतिःशास्त्रदृष्ट्या करतां येण्यासारखे चार विभाग-ऐतरेय ब्राह्मणांतील चार युगांच्या लक्षणांशीं त्यांची तुलना-वेदांची उत्पत्ति आणि स्वरूप यांविषयींच्या ब्रह्मवाद्यांच्या आणि ऐतिहासिक मतांची तुलना-सूक्तांचे शब्द नवे असले तरी त्यांचा मथितार्थ प्राचीन आहे असे सांगणारीं वैदिक वचनें-वैदिक देवता आणि त्यांचे पराक्रम ही सर्व प्राचीन होत-वेद अथवा वैदिक धर्म स्वरूपतः हिमोत्तरकालीन असले तरी तत्वतः हिमान्तरकालीन होत-उपसंहार.

---

## प्राचीन आर्यांची सुधारणा आणि धर्म यांशीं प्रस्तुत अनुमानांचा संबंध.



वैदिक आर्यांच्या मूलस्थानाच्या प्रश्नाचा अनेक दृष्टींनीं केलेला विचार येथे पुरा झाला. त्यावरून असे दिसून येईल कीं, आमचा कोटिक्रम केवळ प्राचीन सुधारणेच्या इतिहासावर किंवा भाषाशास्त्रावरून निघालेल्या अनुमानावर उभारलेला नसून, वेद व अवेस्ता यांतील स्पष्ट वचनांवरच तो उभारलेला आहे. या वचनांवरून असे सिद्ध होतें कीं, केवळ ध्रुवप्रदेशांतच आढळून येणारे असे जे सृष्टचमत्कार आहेत त्यांची माहिती वैदिक ऋषींना होती; तसेच चक्राकार भ्रमण करणारी उषा, वृत्राने कोंडिलेली जले, सूर्यादि देवांना दुःखमुक्त करणारे अश्विन, विश्वाचें तीन पदांनीं आक्रमण करणारा विष्णु, रात्रि व समुद्र यांचा

राजा वरुण, सात महिन्याचे सात आदित्य, त्रित, इत्यादि मुख्य मुख्य वैदिक देवतांचीं लक्षणे मूळ ध्रुवसंबंधी आहेत. तात्पर्य तिसऱ्या प्रकरणांत सांगितलेली ध्रुवविशिष्ट लक्षणें व ध्रुवमंडल-विशिष्ट लक्षणें हीं सर्व वेदांत इतक्या स्पष्ट रीतीनें आढळून येतात कीं, त्यांवरून निघणाऱ्या अनुमानांविषयीं मुळीच शंका रहात नाहीं. सहा महिन्यांचा दिवस व तेवढीच रात्र, कित्येक दिवसांच्या अवधीची वर्तुलाकार फिरणारी तेजस्वी उषा, किंवा बारा महिन्यांपेक्षां कमी सूर्यप्रकाशाचे वर्ष इत्यादि गोष्टी वैदिक ऋषींना माहीत होत्या; व त्या त्यांनी सरळ शब्दांनीं सांगितलेल्या असूनही आज पावेतो त्यांचा नीट अर्थ लागला नव्हता. पण आतां नवीन शास्त्रीय शोधांच्या साहाय्यानें त्यांचा चांगला उलगडा करतां येणार आहे. या लक्षणांचा उल्लेख करणाऱ्या वचनांचा अर्थ करण्याची ख़री गुरुकिल्ली माहीत नसल्यामुळें एतद्देशीय व परदेशीय, तसेच प्राचीन व अर्वाचीन अशा सर्व वैदिक पंडितांनी त्यांची लागेल तशी ओढाताण कशी केली आहे, किंवा त्यांकडे मुळींच दुर्लक्ष केलें आहे. असें ह्मटले तरी निरुक्तकार यास्क किंवा भाष्यकार सायणाचार्य यांच्या श्रमाचें महत्व कमी करण्याचा आमचा मुळींच इरादा नाहीं. त्यांच्या मदती शिवाय वैदिक ग्रंथांच्या अर्थनिर्णयासंबंधानें आधुनिक पंडितांस कांहीं एक करतां आले नसतें ही गोष्ट कोणालाही कबूल करावी लागेल. आमच्या धर्मग्रंथांच्या स्पष्टीकरणार्थ यांनीं अत्यन्त श्रम केलेले आहेत याबद्दल कोणाचा मतभेद होईलसे वाटत नाहीं; आणि त्यांच्या या अत्यन्त महत्वाचा कामगिरीबद्दल भावी पिढ्यांतील वैदिक पंडित त्यांचे सदैव ऋणी रहातील. पण वेद हे जर आमचे अत्यन्त प्राचीन ग्रंथ आहेत, तर जुन्या पंडितांच्या दृष्टीआड राहिलेल्या त्यांतील कित्येक गोष्टी प्राचीन मनुष्यांविषयीच्या वाढत्या ज्ञानाबरोबर आज आमच्या नजरेस येणार नाहीत असें कसे होईल? अशा कांहीं गोष्टी त्यांच्या दृष्टीआड राहिल्या हा त्यांचा दोष नव्हे. तर आपल्या अत्यंत प्राचीन पूर्वजांची स्थिति ज्या शास्त्रांवरून जाणतां येण्यासारखी आहे ती शास्त्रेच कांहीं काळापूर्वी अस्तित्वांत आलेली नव्हतीं, किंवा अस्तित्वांत असल्यास अगदींच बाल्यावस्थेंत होतीं. म्हणून भाष्यकाराना न सुचलेल्या अशा कांहीं कल्पना वैदिक किंवा अवैस्तिक वचनांवरून आम्हांला सुचल्यास त्यांत आश्चर्य मानण्याजोगें कांहीं नाहीं.

ही गोष्ट लक्षांत ठेऊनच आमच्या वाचकांनी पूर्व प्रकरणांत आम्ही दिलेल्या वैदिक वचनांच्या अर्थाची आजपर्यंत केलेल्या अर्थाशी तुलना करावी.

या वचनांचा योग्य तो अर्थ केल्यास त्यांवरून केवळ ध्रुवविशिष्ट अशी लक्षणें दिसून येतात, व एवढी एकच गोष्ट जरी आमची उपपत्ति सिद्ध करावयास पुरेशी आहे, तरी आमची मुख्य भिस्त कांहीं आह्मीं केलेल्या या वचनांच्या अर्थावर नाहीं. वैदिक आर्यांच्या यज्ञग्रंथांत व पुराणकथांत आमची उपपत्ति सिद्ध करणाऱ्या अनेक गोष्टी आहेत; आणि त्यांना पारशी व यूरोपीय आर्य यांच्या पुराणांतील कथांचाही पूर्ण पाठिंबा आहे. दशग्वांचें दशमासावधि सत्र किंवा तितक्याच मुदतीचें संवत्सर सत्र ही या गोष्टींचीं मुख्य उदाहरणें असून त्यांना डिसेंबरांत संपणाऱ्या दहा महिन्यांच्या प्राचीन रोमन वर्षाची जोड आहे. सहा सहा महिन्यांच्या दिवसरात्रीची गोष्ट ही केवळ पौरस्त्य आर्यकथांतच केवळ नसून पाश्चात्य आर्यांच्या पुराणांतही आहे. सबंद वर्ष ज्यांत एका दिवसाप्रमाणे दिसत होतें तें इराणी नंदनवन व बर्फाचा जाड थर पडून झालेला त्याचा नाश यांच्या वदिदादांतील कथेवरून आमच्या उपपत्तीला फारच उत्तम आधार मिळत आहे. ह्मणून प्रो. र्‍हिस याच्या मताप्रमाणे पाश्चात्य आर्यांच्या कथाचा रोख जर त्यांचें आदिस्थान फिन्लंडांत होतें असें दाखविण्याचा असेल, तर वैदिक व अवेस्तिक कथांचा तो आणखी उत्तरेकडे ध्रुवाजवळ तें होतें असें दाखविण्याचा आहे. कारण ध्रुवाशिवाय इतर ठिकाणीं तीस दिवसाची अखंड उषा शक्य नाहीं. याप्रमाणे आमच्या आदिस्थानाचें अक्षांशमान जरी साधारण मानानें निश्चित करतां आलें तरी त्याचें रेखांशमान ठरविण्यासारखा ह्मणजे तें यूरोपच्या उत्तरेस होतें की आशियाच्या उत्तरेस होतें हे ठरविण्यासारखा पुरावा वेदांत आज तरी निदान दिसत नाहीं. परंतु ध्रुवस्थानासंबंधाच्या गोष्टी ब्राम्हण व पारशी यांच्यांच ग्रंथांत विशेष स्पष्ट रीतीनें राहिलेल्या आहेत, या गोष्टीचा विचार करितां तें स्थान रशियाच्या किंवा स्वीडन नार्वेच्या उत्तरेस नसून सैबेरियाच्याच उत्तरेस असावें असें अधिक संभवनीय दिसतें. पण याहून स्पष्ट पुराव्याच्या अभावीं उगाच कांहीं तरी तर्क करण्यांत मतलब नाहीं.

या पुस्तकाच्या आरंभीं भूस्तरशास्त्र व पुराणवस्तुशास्त्र यांत अगदीं अलीकडे झालेल्या शोधांचा सारांश देऊन त्यावरून आदि मनुष्य प्राणी व चतुर्थ युगांत युरेशियाच्या उत्तर भागावर पुनः पुनः आलेल्या हिमकालाच्या धाडी यांविषयीं कोणती माहिती मिळते त्याचें दिग्दर्शन केलें. असें करण्यांत भूस्तरशास्त्रावरील जुन्या ग्रंथांत पृथ्वीच्या कवचाचा इतिहास देतांना मनुष्य प्राणी हा हिमोत्तरकालांत उत्पन्न झाला असा जो सिद्धांत काढलेला होता, त्यावरून होणारा गैरसमज दूर व्हावा, हा उद्देश होता. मनुष्यप्राणी तृतीय युगांत अस्तित्वांत होता, व गेल्या हिमकालांपूर्वी ध्रुवप्रदेशांतील हवा सौम्य असून हिमकालांत पडलेल्या बर्फामुळे ती अतिशय कडक झाली, या गोष्टी जर भूस्तरशास्त्रानें अलीकडे सिद्ध केल्या नसत्या, तर आजही उत्तरध्रुवाजवळचे मूलस्थान ह्मणजे अशक्य गोष्ट वाटली असती. अतिशय कडक हिवाळ्याचा उल्लेख करणारी वचनें ऋग्वेदांत शोधून काढून त्यावरून ध्रुवस्थानाची सिद्धि करण्याचे प्रयत्न मागे फुकट कां गेले हे आतां आपल्याला चांगले समजून येईल. कारण त्या ठिकाणीं जेव्हां आमच्या पूर्वजांची वसति होती तेव्हां तेथील हिवाळे मुळींच कडक नसून हिमकालानंतर ते कडक होऊन ते ठिकाण मनुष्यांस रहावयास निरुपयोगी झालें. अवेस्त्यांत हा प्रकार उत्तम रीतीनें सांगितला आहे. अवेस्त्यांतील वर्णन व भूस्तरशास्त्रांतील नवीन शोध यांचा इतका मेळ पडल्यावर ध्रुववसतिकाल निश्चित करणे कठीण नाहीं. कारण ध्रुवाजवळ मनुष्यांनीं रहाण्यासारखी सौम्य हवा हिमोत्तर कालांत नसून हिमान्तरकालांतच होती असा भूस्तरशास्त्राचा सिद्धांत आहे.

आतां कांहीं भूस्तरशास्त्रज्ञांच्या मतें, गेला हिमकाल संपल्याला २०००० किंबहुना ८०००० वर्षें झालीं असावीं; आणि वेदांचा प्राचीनतम काल तर इ. स. पूर्वी ४५०० वर्षांच्या पलीकडे जात नाहीं. यावरून कोणी असें म्हणतील कीं हिमकालाचा शेवट, व वैदिक सूक्तांचा रचनाकाल यांमध्यें जो हजारों वर्षांचा खंड पडला, त्यांतून हिमान्तरकालांतील ध्रुवस्थानाची खरी हकीगत वंशपरंपरा जशीच्या तशीच निघून वैदिक ऋषींनां मिळाली असेल असें संभवत नाहीं. हा समज दूर करण्यासाठीं येथें थोडेंसे विवेचन करणें अवश्य आहे. **वेदकालनिर्णय** या पुस्तकांत असें दाखविलें

आहे कीं तैत्तिरीयसंहिता आणि ब्राह्मणें यांत नक्षत्रांना कृत्तिकांपासून आरंभ केलेला असून त्याचा अर्थ त्या वेळीं वसंतसंपात त्या नक्षत्रांत होता असा होतो, व त्या अन्वयें या ग्रंथाचा काल शकापूर्वी २५०० वर्षांच्या सुमारास ठरतो; तसेंच यांच्यापेक्षां प्राचीन असा जो ऋग्वेद त्यांतील कित्येक वचनांवरून ऋक्सूक्तें मृगनक्षत्रांत वसंतसंपात असतांना म्हणजे इ. स. पूर्वी ४५०० वर्षांच्या सुमारास रचिली असावी. आणखी त्यांत असेंही दाखविलें आहे कीं, वसंतसंपात पुनर्वसूंत (शकापूर्वी ६००० वर्षें) असल्याच्याही कांहीं अंधुक खुणा त्यांत आहेत. (टिळक म्हणतात) ही शेवटची मर्यादा याहूनही आणखी मागें ढकलतां येईल कीं नाहीं हें पहाण्यासाठीं संपाताच्या क्रांतिवृत्तांतील याहून प्राचीन स्थानाचा शोध करण्याचा आम्हीं प्रयत्न केला. पण तसें स्थान आम्हांला सांपडलें नाहीं. तथापि ध्रुवस्थानाचा उल्लेख करणाऱ्या वाक्यांकडे यापुढें आमचें अधिकाधिक लक्ष जाऊन त्यांवरून असें वाटूं लागलें कीं, शकापूर्वी ५००० ते ६००० वर्षांच्या सुमारास वैदिक आर्य मध्य आशियाच्या उंच मैदानावर स्थिरस्थावर झाले असावे, आणि त्या वेळीं त्यांनां आपल्या ध्रुवाजवळील मूलस्थानाची चांगली आठवणही असावी. तात्पर्य, वैदिक कालगणनेविषयीं केलेल्या शोधावरून, गेला हिमकाल मृगशीर्षकालाच्या पूर्वी किती तरी हजार वर्षें होऊन गेला असें म्हणावयास कांहीं आधार मिळत नाहीं. अमेरिकन भूस्तरशास्त्रज्ञांनीं हा हिमकाल इ. स. पूर्वी ८००० वर्षांच्याच सुमारास झाला असावा असें जे अनेक प्रमाणांवरून अनुमान केलें आहे, त्याशीं हा आमचा अंदाज चांगला जुळतो. म्हणजे अमेरिकनशास्त्रज्ञांच्या अनुमानाला आमच्या स्वतंत्र रीतीनें काढिलेल्या अनुमानांवरून चांगली पुष्टि मिळत असल्यामुळे, डॉ. क्रोल सारख्या शास्त्रज्ञांचे मनमुराद तर्क सोडून अमेरिकन शास्त्रज्ञांचें नेमस्त मत ग्रहण करणें हेच आजच्या ज्ञानाच्या स्थितीत योग्य दिसते. गेला हिमकाल संपून हिमोत्तर कालाला सुरवात शकापूर्वी ८००० वर्षांच्या सुमारास झाली असें अमेरिकन शास्त्रज्ञांचें मत आहे. हा काल आणि मृगशीर्षकाल यांत ३००० वर्षांचे अंतर आहे; इतक्या कालात आपल्या मूलस्थानाची स्मृति राखून ठेऊन ती सूक्तांत ग्रथित करणें कांहीं असंभवनीय नाहीं. तात्पर्य वैदिक कथा शास्त्रीय शोधांच्या मुळींच विरुद्ध नसून,

उलट त्यांवरून हिमयुगाच्या कालासंबंधीं बेसुमार तर्कांना आळाच पडणार आहे. अमेरिकन भूस्तरशास्त्रज्ञांचें नेमस्त मत स्वीकारल्यास, वैदिककथा व भूस्तरशास्त्र या दोहोंवरून हिमोत्तरकालाचा आरंभ आणि ध्रुवस्थानांतून झालेली आर्यांची फाटाफूट ही शकापूर्वी ८००० वर्षांपेक्षां फारशी प्राचीन नाहींत असें दिसून येईल.

हें अनुमान केवळ वैदिक कालगणनेवरूनच निघत नसून पौराणिक कालगणना पद्धतीचाही नीट अर्थ केल्यास तीवरूनही तेच अनुमान निघत आहे. कांही ठराविक कालानें पृथ्वीवर प्रलय होऊन तिचा नाश होतो, तसाच त्याहून फार मोठ्या कालान्तराने संपूर्ण विश्वाचाही होतो असे आपल्या पुराणांत सांगितले आहे. सृष्टिकर्ता ब्रह्मा आपल्या दिवसभर जागा असून त्यावेळी पृथ्वीही नीट चाललेली असते, परंतु रात्रीं तो निद्रावश झाल्यावर तिचा प्रळयांत नाश होऊन दुसरे दिवशीं ब्रह्मदेव पुनः उठल्यावर सृष्टिही पुनः पूर्ववत् होते, असा आपला समज आहे. ब्रह्मयाचा दिवस व रात्र ही प्रत्येकी एक एक कल्पाएवढी आहेत; अर्थात् असे ७२० कल्प ह्मणजे ब्रह्मयाचें एक वर्ष होतें. अशीं शंभर वर्षे ह्मणजे ब्रह्मदेवाचें आयुष्यमान असून या कालाच्या अखेरीस महाप्रलय होऊन ब्रह्मयासह संपूर्ण विश्वाचा त्यांत लय होतो. मनुस्मृति व महाभारत यात सांगितल्याप्रमाणें कृत, त्रेता, द्वापर आणि कलि अशी चार युगें मिळून देवाचें युग होते आणि अशीं १००० युगें किंवा १२,०००,००० वर्षे ह्मणजे ब्रह्मदेवाचा दिवस ऊर्फ कल्प होतो. पण पुराणांतील पद्धति याहून निराळी आहे. त्यांत सांगितल्याप्रमाणें कृत, त्रेता द्वापर आणि कलि अशी चार युगे मिळून एक महायुग होतें, असलीं ७१ महायुगें ह्मणजे एक मन्वंतर आणि १४ मन्वंतरांचा एक कल्प होतो. या पद्धतीप्रमाणें कल्पांत ४३२०,०००,००० वर्षे असतात. हा जो कल्पाच्या दोन प्रकारच्या अवधीत फरक त्याचें कारण असे कीं मनुस्मृति व महाभारत यांतील वर्षे आमच्यासारखीं साधीं असून पुराणांत तीं देवांची ह्मणून मानिलेली आहेत. याविषयीं विशेष विचार कै. शं. बा. दीक्षित यांच्या 'भारतीय ज्योतिःशास्त्रांत' केलेला आहे तो पहावा.§ भारतीय ज्योतिष ग्रंथकारांनीं ही पुराणांतील पद्धतीच घेतली

§ भा. ज्यो. पानें १०, १०२, १०३, १४१-१४३.

आहे. या कालगणनेप्रमाणें सांप्रत आपण चालू कल्पाच्या ७ व्या ( वैवस्वत ) मन्वंतरांतील २७ महायुगें टाकून २८ व्याच्या कलियुगाच्या ५०११ व्या वर्षांत आहो, ह्मणजे सध्या चालू असलेल्या श्वेतवाराह कल्पाच्या आरंभीं होऊन गेलेल्या प्रलयापासून आतांपर्यंत १९७,२९,४९,०११ वर्षे होऊन गेली आहेत. पण हा अंदाज भूस्तरशास्त्राच्या मर्यादेबाहेरचा आहे. आमच्या ज्योतिष्यांच्या मते कल्पाच्या आरंभीं सूर्य चंद्र आणि इतर सर्व ग्रह हे युतीत होते; या समजाप्रमाणे उलट गणित करून त्यांनीं या सर्व ग्रहांनी पृथ्वीभोवती पूर्ण प्रदक्षिणा करून एके ठिकाणी येण्याचा ह्मणजे त्यांच्या युतीचा काल ठरविला असण्याचाही संभव आहे. कसेंही असले तरी कृत, त्रेता, द्वापर आणि कलि या चार युगांचा पर्याय या सर्व कालगणनेच्या मुळाशीं असल्यामुळे, त्यामिळून होणाऱ्या महायुगाचा खरा अर्थ काय आणि आज त्यांचा जो काल ठरविलेला आहे तोच मूळचा होता कीं काय या प्रश्नांचा नीट विचार केला पाहिजे.

सातव्या प्रकरणांत **युग** शब्दाचा ' कालपर्याय ' असा अर्थ ऋग्वेदांत असून ' मानुषा युगा ' या प्रयोगांत त्याचा ' महिना असाच अर्थ केला पाहिजे असें दाखविले आहे. पण ' देवानां प्रथमे युगे ' इत्यादि वचनांत ' युग ' शब्द बऱ्याच मोठ्या कालाचा वाचक आहे हे उघड आहे. अथर्व वेदांत ( ८,२,२१ ) " आह्मी तुला शभर किंवा दहा हजार वर्षे किंवा दोन तीन अथवा चार युगें देतों " असें ह्मटले असून त्यांत **युग** शब्द दहा हजार वर्षांहून कमी कालाचा बोधक नाहीं यांत कांहीं शंका नाही. कारण दहा हजार ( अयुत ) वर्षे झाल्यावर ' एक युग ' देतो असें न ह्मणतां एकदम दोनपासून युगें देतो असें ह्मटले आहे. या गोष्टीचा विचार केल्यास ' युग ' शब्दाचा अर्थ अथर्ववेदकालीं १०००० वर्षें असा होता असें ह्मणावयास हरकत दिसत नाहीं. आतां मनुस्मृति आणि महाभारत या दोहोंतही कलि, द्वापर, त्रेता आणि कृत या युगांना अनुक्रमे १०००, २०००, ३०००, आणि ४००० वर्षे दिलेलीं आहेत; ह्मणजे द्वापर, त्रेता आणि कृत हीं युगें कलियुगाच्या अनुक्रमें दुप्पट, तिप्पट व चौपट होत. कृत शब्दाचा अर्थ संस्कृतांत चार असा आहे, ही गोष्ट लक्षांत घेतल्यास हीं युगांचीं नावें आवृत्तिवाचक संख्याविशेष-

---

१ शतं तेऽयुतं हायनान्द्वे त्रीणि चत्वारि कृण्मः अ. वे. ८,२,२१.

णात्मक असावी असें दिसतें. असो. या चार युगांची संकलित संख्या ( ह्मणजे महायुग ) १०००० वर्षे होते. मनु व महाभारतकार व्यास यांनी प्रत्येक युगाच्या आद्यन्ती धरावयाचा संध्येचा किंवा संध्यांशाचा काल एकत्र करून वरील १०००० या संख्येंत आणखी २००० वर्षे मिळविलीं आहेत. तीस घटिकांच्या दिवसांच्या आद्यन्ती ज्याप्रमाणे सुमारे ३ घटिकांची ह्मणजे दशांश संध्या असते त्याप्रमाणें या युगांच्याही आद्यन्तीं दशांश संध्या कल्पिली आहे. या हिशोबाप्रमाणें संध्या व संध्यांश धरून कृताची ४८०० त्रेताची ३६००, द्वापराची २४०० व कलीची १२०० अशी वर्षे होतात. आतां, महाभारत व मनुस्मृति यांच्या काळी कलियुगाला आरभ झालेला होता; आणि जर त्याचीं १००० वर्षे किवा संध्या धरून १२०० वर्षे झाल्यावर ते संपावयाचें असते, तर शकारंभापूर्वीच ते संपले असें ह्मणावयास पाहिजे. पण त्याच सुमारास लिहिलेल्या पुराणांच्या कर्त्यांना कलियुग संपून पुनः कृतयुग लागल्याचीं कांहीं लक्षणे दिसेनात. कारण कृत ह्मणजे अत्यंत पुण्यमय असें युग असून त्यावेळी तर जिकडून तिकडून अधोगतीचीं चिन्हे दिसत होतीं. ह्मणून पुराणकारांनी कलियुगाची मर्यादा वाढविण्याचा प्रयत्न केला; ह्मणजे त्याची १२०० वर्षे ही मानवी नसून देवांचीं होत असें त्यांनी मानिले. ३६० मानवी वर्षे ह्मणजे देवांचें एक वर्ष. असे करण्याला त्यांना श्रुतीचाही आधार सांपडला. तैत्तिरीय संहितेतील ' एकं वा एतद्देवानामहः यत्संवत्सरः ' हे वचन त्यांच्या उपयोगीं पडलें. व्यास व मनु या दोघांनीही कलीचा काल १००० वर्षे सांगितला. पण मनुस्मृतीत युगे व त्यांच्या सध्या यांचे अवधि सांगितल्यावर, " या १२००० वर्षांच्या चतुर्युगात्मक कालाला देवांचे युग ह्मणतात " अशी टीप दिली आहे, तेव्हां पुराणकारांना या युगांच्या अवधींची वर्षे देवांची होत असें मानावयाला मुळींच हरकत वाटली नाहीं. शिवाय त्या वेळच्या लोकांना कलियुग संपल्याचीं लक्षणें न दिसल्यामुळें पुराणकारांची ही युक्ति सर्वांना पसंत पडली आणि कलियुगाच्या १२०० साध्या वर्षांना देवांची वर्षे कल्पून त्यांना १२००×३६०=४३२००० साध्या वर्षांचें स्वरूप देण्यांत आलें. याच युक्तीनें महायुगाच्या १२००० वर्षांचीं ४३२०००० वर्षे होऊन, मन्वंतर, कल्प इत्यादिकांचे अवधीही या प्रमाणानें वाढले.

या विवेचनावरून असें दिसून येईल की, मनुस्मृति व महाभारत यांत, कृत, त्रेता, द्वापर आणि कलि यांमिळून होणाऱ्या १०००० वर्षांचा युगपर्यायच दिलेला असून, त्यांपैकीं १००० वर्षांचें असें जें कलियुग त्याला त्यावेळीं आरंभ झालेला होता. अन्य शब्दांनीं हेंच सांगावयाचे म्हणजे मनु व व्यास यांच्या मतें कृतयुगाच्या आरंभापासून कलीच्या अंतापर्यंतचा काल १०००० किंवा संध्या धरल्यास १२००० वर्षे इतकाच होता. कृतयुगाला प्रलयानंतर आरंभ झाला असें जें झटलें आहे, त्याचा विचार केल्यास मनु व व्यास यांना आपल्यापूर्वी १०००० वर्षांच्या सुमारास ( १२०० वर्षांच्या कलियुगाच्या आरंभीं हे होऊन गेले असें धरून ) कृतयुग सुरू होऊन नवीन सृष्टीची रचना झाली असें वाटत असावेसे दिसते; ह्मणजे त्यांच्यामतें जुन्या सृष्टीचा नाश करणारा प्रलय त्यांच्यापूर्वी १०००० वर्षांच्या सुमारास झाला. ही मूळ कथा निरनिराळ्या काळच्या परिस्थितीला जुळवून घेण्याच्या प्रयत्नांत तिची पुष्कळ ओढाताण झालेली आहे. तरी तिचें खरे स्वरूप ओळखून काढणे फारसे कटीण नाहीं. तें ओळखल्यास असें दिसून येईल की, नवीन सृष्टीचा आरंभ किंवा आधुनिक शास्त्रीय परिभाषेत सांगावयाचें झटल्यास चालू हिमोत्तरकालाचा आरंभ शकापूर्वी १०००० वर्षांच्या पलीकडे जात नाहीं. अमेरिकन भूस्तर शास्त्रज्ञांनी स्वतंत्र शास्त्रीय प्रमाणांवरून हाच काल ठरविलेला आहे; आणि वैदिक व पौराणिक

---

१ ही युगपद्धति महाभारतांत शांतिपर्व व वनपर्व अशा दोन ठिकाणी दिली आहे. वनपर्वांत (अ १८८,२१–२८) खालील मजकूर आहेः—"आदितो मनुजव्याघ्र कृत्स्नस्य जगतः क्षये । चत्वार्याहुः सहस्राणि वर्षाणां तत्कृतं युगम् ॥ तस्य तावच्छती संध्या संध्यांशश्च तथाविधः । त्रीणि वर्षसहस्राणि त्रेतायुगमिहोच्यते । तस्य तावच्छती सध्या संध्यांशश्च ततः परम् ॥ तथा वर्षसहस्रे द्वे द्वापरं परिमाणतः । तस्यापि द्विशती सध्या संध्यांशश्च तथाविधः ॥ सहस्रमेकं वर्षाणां तथा कलियुगं स्मृतं । तस्य वर्षशतं संधिः संध्यांशश्च ततःपरं ॥ संधिसंध्यांशयोस्तुल्यं प्रमाणमुपधारय । क्षीणे कलियुगे चैव प्रवर्तति कृतं युगं ॥ एषा द्वादशसाहस्री युगाख्या परिकीर्तिता । एतत्सहस्रपर्यंतमहर्ब्राह्ममुदाहृतम् ॥" यांत पहिल्या ओळींत प्रलयानंतर कृतयुग सुरू झाल्याचें स्पष्ट सांगितलें आहे.

कालगणनापद्धतीवरूनही तोच काल ठरत असल्यानें, गेल्या हिमकाला-संबंधानें २०००० किंवा ८०००० वर्षांसारखे बेसुमार अंदाज सोडून देऊन तो संपल्याला व हिमोत्तरकाल सुरू झाल्याला आज १०००० किंवा फार तर १२००० वर्षें झाली असावीं असे मानण्याला बिलकुल हरकत नाहीं.

याप्रमाणें ध्रुवाजवळील मूलस्थानाचा काल निश्चित केल्यावर, तें मूलस्थान, त्याचा हिमकालांतील बर्फानें झालेला नाश व त्या संबंधाच्या दुसऱ्या कांहीं गोष्टी मझ्दयस्नी लोकांच्या धर्मग्रंथांत आणि वैदिक ऋषींच्या सूक्तांत ग्रथित होईतोपर्यंत जशाच्या तशाच आठवणींत कशा राहिल्या याचा विचार करावयाचा. आमच्या धर्मग्रंथांचें संरक्षण आमच्या ब्राह्मणवर्गानें कसें केलें हें ज्याला माहीत आहे त्याला वरील गोष्टी वेदकालापर्यंत किंवा अवेस्ताकालापर्यंत अबाधित राहिल्या याचें मुळींच आश्चर्य वाटणार नाहीं. लेखनकला व मुद्रणकला यांचा प्रसार आज झालेला असल्यामुळें आह्मांला केवळ स्मरणशक्तीवर फार भिस्त टेवावी लागत नाहीं; म्हणून स्मरणशक्तीची नीट जोपासना केल्यास तिचें सामर्थ्य किती प्रचंड आहे याची कल्पनाही आतां आह्मांला करतां येत नाही. अंगासहित संपूर्ण वेद अक्षरशः व स्वरशः असे निदान ३००० किंवा ४००० वर्षें तरी आमच्या ब्राह्मणांनी राखून ठेविलेले आहेत; आणि हे ज्यांनीं केलें त्यांच्याच पूर्वजांनीं आमच्या ध्रुवप्रदेशांतील वसतीचा वृत्तान्त सूक्तांत ग्रथित होईपर्यंत होता तसा राखून ठेविला. सुनियंत्रित स्मरणशक्तीची ही कामगिरी आज आपल्याला आश्चर्यकारक वाटण्यासारखी असेल पण जेव्हां पुस्तकांपेक्षां तिच्यावरच सर्व भिस्त होती तेव्हां असला प्रकार ह्मणजे अगदी साधारण गोष्ट होती. त्यावेळी भावी पिढ्यासाठी राखून ठेवण्यासारख्या सर्व गोष्टी त्यांना बिनचूक पोंचविण्याचें साधन ह्मणजे ही कमावलेली स्मरणशक्तीच होती. स्मरणशक्तीला नीट कमावून व तिला नेहमीं सतेज ठेऊन तिच्या द्वारा आमचे धर्मग्रंथ पुढील पिढीला पोंचविण्याचेंच ज्यांचें व्रत त्या आमच्या वैदिक ब्राह्मणवर्गाला निष्कारण शिव्या देण्याचा प्रघात बऱ्याच प्राचीन काळापासून चालत आलेला आहे. यास्कासारख्या पंडितांनींही त्यांना भारवाहक ह्मटलें आहे; व दुसऱ्या कांहींनीं अर्थ समजल्याशिवाय शब्द पाठ करणाऱ्या पोपटाचें

त्यांना उपमा दिलेली आहे. पण आमच्या अगदी प्राचीन कथांच्या द्वारा आमचा प्राचीन इतिहास व धर्म राखून ठेवण्याच्या कामी त्यांनीं जी कामगिरी केली आहे ती केवळ अमूल्य असून, असल्या कामीं मुद्दाम कमावलेल्या स्मरणशक्तीचीच जरूरी असल्यामुळें आमच्या प्राचीन कथा आज हजारो वर्षेपर्यंत जशाच्या तशा राखून ठेविण्याचें पवित्र व धार्मिक काम ज्यांनीं पिढ्यान् पिढ्या केलें त्या आमच्या वैदिकांबद्दल आह्मांला अत्यंत कृतज्ञता वाटल्यावांचून रहात नाही. वैदिक सूक्तांचा अर्थ करण्यांत पंडित आपली सर्व चतुराई खर्च करतील; पण वैदिक ब्राह्मणांनीं स्मरणशक्ति कमावणे हा आपल्या जन्माचा व्यवसाय जर केला नसता तर या पंडितांनीं उभारावयाच्या इमारतीचा पायाच मुळीं पुष्कळ काळापूर्वी नाहीसा झाला असता हे विसरतां कामा नये. असल्या व्यवसायाची आवश्यकता[1] आज नाहींशी झाली तरीही तो तसाच आहे. यावरून कोणत्याही देशांत धार्मिक संस्था अजिबात नष्ट होणें बहुधा अशक्य आहे ही गोष्ट आपण लक्षांत ठेविली पाहिजे.

तर याप्रमाणे कमावलेल्या स्मरणशक्तीच्या साहाय्यानें अबाधितपणें राखून ठेवलेल्या वैदिक व अवैस्तिक कथावरून हिमांतरकालांत आर्य लोक उत्तरध्रुवाजवळ रहात होते ही गोष्ट निःसंशय सिद्ध होते. गेल्या हिमकालांत त्या स्थानाचा नाश झाल्यामुळे त्यांना दक्षिणेकडे यावें लागलें, आणि हिमोत्तरकालाच्या आरंभी ह्मणजे सुमारें १०,००० वर्षांपूर्वी यूरोप खडाचा उत्तर भाग अथवा मध्य आशियांतील उंच मैदाने येथे त्यांनीं प्रथम कायमची वसति केली. याप्रमाणें आर्यांचे प्राचीनत्व हिमान्तरकालापर्यंत पोंचविता येते व त्या वेळीं ते तीस दिवसांची अखंड उषा असलेल्या उत्तर ध्रुवाजवळच्या प्रदेशांत रहात होते असें सिद्ध होतें. आर्यांशिवाय इतर मानववंश मूळ ध्रुवावरच रहाणारे होते की काय हा प्रश्न प्रस्तुत पुस्तकाच्या मर्यादेबाहेरचा आहे. डॉ. वारन या पंडितानें आपल्या 'नंदनवनोपलब्धि' नांवाच्या ग्रंथांत ईजिप्शन, अक्केडियन्, आसिरियन्, बाबिलोनियन्, चिनी आणि जपानी इत्यादि पुराण कथांचा

---

१ ही आवश्यकता नाहींशी झाली आहे कीं काय हा प्रश्नच आहे; कारण किती झालें तरी लेखनकला किंवा मुद्रणकला यांवर कमावलेल्या स्मरणशक्ती इतकी भिस्त ठेवतां येणार नाहीं.

विस्तार करून या सर्व लोकांचें ह्मणजे पर्यायानें सर्व मानवजातीचें जन्मस्थान उत्तरध्रुवाजवळ होतें असें अनुमान काढिलें आहे. हें अनुमान आमच्या उपपत्तीशीं मुळींच विरुद्ध नाहीं. कारण आर्यां-शिवाय दुसरे कोणीही उत्तरध्रुवाजवळ रहात नव्हते असें ह्मणण्याचा आमचा मुळींच हेतू नाहीं. उलट ऋग्वेदांत अनेक वेळां आलेले पांच मानववंश (पंच जनाः) हे आर्यांच्याबरोबर त्यांच्या मूलस्थानांत राहणारे लोकच असावे असेंही मानण्यास आधार आहे. कारण मूलस्थानांतून निघाल्यावर आर्यांना पांचच प्रकारचे लोक आढळले असावेत किंवा त्यांच्या स्वतःच्याच पांच टोळ्या असाव्या असे मानावयास कांही आधार नाहीं. पण या प्रश्नाची अधिक वाटाघाट करण्याची येथे जरुरी नाहीं. उत्तरध्रुव हा अखिल मानवजातीचें उत्पत्तिस्थान होता असें यापुढें जर निःसंशय ठरेल तर त्यावरून आमच्या अनुमानांना मुळींच बाध येणार नाहीं, पण उलट आमचें स्वतंत्र प्रमाणावरून काढिलेलें अनुमान जर सत्य ठरलें, तर डॉ. वारनच्या अनुमानांनाच त्यावरून अधिक पुष्टि मिळेल. इतर कोणत्याही लोकांच्या प्राचीन कथांपेक्षां आर्यांच्या वेद व अवेस्त्यांतील कथाच बहु-तांशीं अबाधित राहिलेल्या असल्यामुळें, डॉ. वारन सारख्या पंडितांनीं घेतलेला व्यापक प्रश्न सोडून स्वतंत्र रीतीनें एकट्या आर्यांच्याच मूल-स्थानाच्या संकुचित प्रश्न प्रस्तुत पुस्तकांत चर्चेसाठीं घेतला आहे. वेद व अवेस्ता हे आर्यांचे अत्यंत प्राचीन ग्रंथ आहेत याविषयीं आतां कोणाचा मतभेद नाहीं; ह्मणून नवीन शोधांच्या साहाय्यानें त्यांतील कथांवरून आर्यांच्या ‘ नंदनवनाचें ’ स्थान निश्चित करणें कठिण नाहीं.

पण आर्यांचें मूलस्थान उत्तरध्रुवाजवळ होतें ही गोष्ट खास सिद्ध झाली ह्मणजे त्यांचा प्राचीन इतिहास व धर्म याविषयीं प्रस्तुत प्रचलित अस-लेल्या मतांत क्रान्ति झाल्याशिवाय रहाणार नाहीं. अगदीं रानटी स्थितीपासून ऋग्वेदावरून दिसून येणाऱ्या सुधारलेल्या स्थितीपर्यंत झालेली आर्यांची धार्मिक, मानसिक, नैतिक, अथवा सामाजिक उन्नति मध्य आशियांतील मैदानांवरच झाली असें मध्यआशियावादी पंडितांचें ह्मणणें आहे. त्यांच्यामतें, सूर्यादि सृष्टवस्तूंच्या अवलोकनानें आश्चर्य व भय यांनीं प्रेरित होऊन आर्य लोक सृष्टीच्या शक्तींचे उपासक झाले ते मध्य आशियांतच. वस्त्रें विणण्याची कला, रथादि तयार करण्याची विद्या,

अश्वादि पशूंना शिकविण्याचें कसब, किंवा सुवर्णादि धातूंचा उपयोग ते याच मैदानावर शिकले. तात्पर्य निरनिराळ्या आर्य शाखांत सामान्यत्वें-करून दिसणारी जी प्राचीन आर्यांची सुधारणा तुलनात्मक व्युत्पत्ति-शास्त्रावरून दिसून येते ती सर्व हिमोत्तरकालांत मध्य आशियांतील मैदानावरच घडून आली असें हे पंडित मानितात. पण तुलनात्मक व्युत्पत्तिशास्त्राची अनुमानें भाषेच्या किंवा इतिहासाच्या दृष्टीनें कितीही महत्वाचीं असली तरी त्यांवरून हें मूलस्थान कोठें होतें, त्यांत वसति केव्हां होती किंवा तें कां आणि केव्हां सोडून द्यावें लागलें इत्यादि गोष्टी कळणें बरेंच कठीण आहे. गो शब्द किंवा वे (विणणें) हा धातु सर्व आर्य भाषांत आढळतो, यावरून गाईची व वस्त्रें विणण्याच्या कलेची माहिती अविभक्त आर्यांना होती एवढेंच ह्मणतां येईल. पण या शब्दसाम्या-वरून आर्य लोक एकत्र असतांनां कोठें रहात होते किंवा ते विभक्त केव्हां झाले हें कांही सांगतां यावयाचे नाहीं. अलीकडे पुराणवस्तुशास्त्र व मानुष्यकशास्त्र यांवरून आर्य लोक मूळ मध्य आशियांत रहात होते व तेथूनच ते यूरोपांत गेले ही गोष्ट संभवनीय नाहीं असे दिसून आलें आहे. ह्मणून मध्यआशियावाद्यांचें मत आतां बहुतेक लुप्तप्राय झालें आहे; आणि पंडित लोक आतां असे ह्मणतात, की हल्लीं यूरोपांत जे लोक रहात आहेत त्यांचे पूर्वजही नवपाषाणयुगांत तेथेंच रहात होते. पण हे यूरो-पीय लोकांचे पूर्वज मूळ तेथलेच होते कीं दुसऱ्या कोठून ते यूरोपांत गेले या प्रश्नाचा कांही अद्यापि या पंडितांनी निर्णय केलेला नाहीं. तात्पर्य, मध्यआशियावादी झाले काय आणि हे उत्तरयूरोपवादी झाले काय, दोघेही आर्य सुधारणा हिमोत्तरकालीन होय असेंच मानीत असून आर्यांचा धर्म व कथा यांची परंपरा या कालाच्यामागें ढकलण्यास ते मुळीच तयार नाहींत.

पण आर्य लोकांचें मूळ आणि त्यांची सुधारणा या संबंधाचे तर्क हिमांतरकालांतील ध्रुववसतीच्या शोधामुळें आतां बरेच बदलावे लागतील. मूळचे आर्य केवळ हिमोत्तरकालीनच होते व अगदीं रानटी स्थितींतून त्यांची जी सुधारणा झाली ती मध्य आशियांत किंवा उत्तर यूरोपांत झाली असें आतां ह्मणतां यावयाचें नाहीं. निरनिराळ्या आर्य शाखांच्या पुराणांत सारख्याच देवता आढळून येत नसल्यामुळें हीं पुराणें आर्यांची

फाटाफूट झाल्यावरच तयार झाली असली पाहिजेत; उदाहरणार्थ उषस् हा शब्द जरी बहुतेक आर्य भाषांत आढळून येतो तरी उषेला देवतापद असे ऋग्वेदांतच दिलेलें असल्यामुळें वैदिक कथांचा जन्म व वाढ भरतखंडांतच झाली असली पाहिजेत; इत्यादि प्रकारचा कोटिक्रमही ध्रुवोपपत्तीमुळे अशक्य होणार आहे. वैदिक देवतांचीं लक्षणें जर खास ध्रुवविशिष्ट आहेत तर त्यांच्या संबंधाच्या कथा इतर ठिकाणीं उत्पन्न झाल्या असें कसें ह्मणावयाचें? भरतखंडांत दिसणारी उषा अगदी अल्पकालिक असून ध्रुवावरील उषेशी तिचें मुळींच साम्य नाही; व ह्मणून तिचें ऋग्वेदांतील भपकेदार वर्णन जे आहे तें हिंदुस्थानांत रहाणाऱ्या ऋषींनीं केलेलें असेल असें मुळीच संभवत नाहीं. इन्द्र, विष्णु, अश्विन इत्यादि देवतांनांहि हीच गोष्ट लागू आहे. या देवतांचीं नावें सेल्टिक किंवा ट्यूटॉनिक भाषांत आढळत नसली, तरी वैदिक देवतांची जी ध्रुवविशिष्ट लक्षणें आढळतात ती या भागांतील पुराणांतही आढळत असल्यामुळे, हे मूळचे साम्य जोंपर्यंत त्यांत दिसत आहे, तोपर्यंत केवळ शब्दात साम्य नाही एवढ्यावरून या कथांचें मूळ एक नव्हे असे ह्मणणे संयुक्तिक नाही. आर्यांच्या मूलस्थानाचा हिमपातामुळें नाश झाला हे समजल्यामुळे त्यांच्या सुधारणेच्या इतिहासाला एक नवीन दिशा लागणार आहे; आणि ह्मणून आशियांतील आर्य शाखांत जी सुधारणा आढळून येते तशी नवपाषाणयुगांत यूरोपच्या उत्तर भागांत रहाणाऱ्या आर्यांत दिसून येत नाही याचें कारण ते लोक त्या प्रलयानंतर आपली प्राचीन सुधारणा गमावून पुनरपि रानटी स्थितीत गेले हे होय. साधारणतः सुधारणेंत ज्यांची बरीच प्रगति झाली आहे असे लोक एकाएकी पुनः रानटी स्थितींत उलट येत नाहींत हें खरें; पण प्रलयपूर्वकालीन सुधारणा प्रलयोत्तरकालांत येण्याच्या वेळी हा नियम लागू पडेल असें नाहीं. असल्या भयंकर प्रलयांतून जगणारे लोक आधी थोडे, व जे जगले असतील त्यांना आपली मूळची सर्व सुधारणा, नवीन ठिकाणी, नवीन परिस्थितींत, रहाण्याच्या जागेसाठींसुद्धां आर्येतर लोकांशी भांडतांना कायम ठेवितां आली असेल असें दिसत नाही. शिवाल प्रलयानंतर कांहीं काळपर्यंत आशिया व यूरोप यांच्या उत्तर भागांतील हवा हल्लींपेक्षां बरीच कडक असली पाहिजे ही गोष्ट विचारांत

घेतां ध्रुवप्रदेशांतून या प्रदेशांकडे येणाऱ्या आर्यांना व त्यांच्या मुलांबाळांना या भयंकर व अस्थिर स्थितीत, ध्रुवावरील नंदनवनांत रहाणाऱ्या आपल्या पूर्वजांची प्रलयपूर्वकालीन सुधारणा राखतां आली असेल तर ती अगदी मोडक्या तोडक्या स्वरूपाचीच असली पाहिजे. ह्मणून नवपाषाण युगांत यूरोपीय आर्यांची सुधारणा अगदीच कनिष्ठ प्रकारची होती असे आढळल्यास त्यांत नवल नाहीं. उलट या प्रलयपूर्वकालीन धर्म व सुधारणा यांपैकी एवढा भाग तरी भारतीय व इराणी आर्यांना राखून ठेवितां आला हेच आश्चर्य आहे. आपल्या पूर्वजांपासून जो कांहीं सुधारणेचा अवशेष आपल्याला प्राप्त झाला तो नीट जतन करून पुढील पिढीच्या स्वाधीन करणे हे आपलें पवित्र कर्तव्य आहे असे त्यांच्या मनाने घेतल्यामुळेच त्यांना एवढे कठीण काम करतां आले.

ध्रुवप्रदेशांतील हवामान हिमान्तरकालांत फार सौम्य असून तेथे बहुतेक अक्षय वसंत होता व त्या वेळीं ध्रुवासभोवती एक विस्तीर्ण भूमिप्रदेश असून त्याचा पुढे हिमकालांत नाश झाला हे मागे सांगितलेच आहे. असल्या प्रदेशात रहाणाऱ्या आमच्या पूर्वजांना तेथे खरोखर मोठे सुखसमाधान वाटत असलें पाहिजे. तेथे गैरसोईची ह्मणजे एकच गोष्ट होती; ती ह्मणजे तेथील दीर्घ काळोखाची रात्र होय. हा काळोख व त्याचे इंद्रादि शत्रू याच्यांतील युद्धाचे वर्णन नाना तऱ्हेनें कथाच्या रूपाने वैदिक ऋषींनीं कसें केले आहे हे मागे सांगितलेच आहे. ध्रुवावरील कंटाळवाणी दीर्घ रात्र, व कित्येक महिने वाट पाहावयाला लाऊन मग क्षितिजावर दिसूं लागणारी उषा या गोष्टी आमच्या आद्य पूर्वजाचें विशेष लक्ष वेधणाऱ्या असून धार्मिक सामाजिक इत्यादि उत्सवाचे वार्षिक चक्र सुरू करणारी अशी उषा पाताळांतील समुद्रांतून वर आणणे ह्मणजे देवांचा मोठाच पराक्रम होय असे ते मानीत. तमोरूप वृत्राचा वध करून प्रकाशदेवतांचा विजयी होण्याचा काल म्हणजे उषेचा उदयकाल हा देवयानाचा आरंभ असून उषेचा पुत्र व देवांचा सेनापति असा जो कुमार तो मोठ्या विजयोत्सवानें या देवयान मार्गाचें आक्रमण करीत ऋग्वेदांत सांगितल्याप्रमाणें 'मानुषा युगांचें' चक्र चालू करी. याच्या उलट पितृयान ह्मणजे दोन पासून सहा महिन्यांच्या काळोखाची रात्र होती. हा काळ विश्रांतीचा असून सूर्यप्रकाशाच्या अभावीं त्यांत

मृत शरीराची व्यवस्था लावण्याचेंही काम लोक करीत नसत. या कालांत सर्व धार्मिक व सामाजिक विधीही बंद असत. तात्पर्य आर्यांच्या प्राचीन कालगणनापद्धतींत सात किंवा दहा महिन्यांचा उन्हाळा व त्या मानानें पांच किंवा दोन महिन्यांचा हिंवाळा असे वर्षाचे दोनच भाग होते. पण हे दोन्ही भाग एकत्र करून त्यावरून वर्ष मोजण्याच्या पद्धतीपेक्षां एकट्या उन्हाळ्याच्या किंवा हिंवाळ्याच्या अवधीवरूनच ते मोजण्याची पद्धत त्या काळीं होती असें दिसते. सात किंवा दहा महिन्याचें वर्ष व तितक्याच मुदतीचीं सत्रें वेदांत आढळतात याचें तरी कारण हेंच होय. पण ही पद्धत ध्रुववृत्ताच्या दक्षिणेकडील प्रदेशांत चालणें शक्य नसल्यामुळें तिकडे गेल्यावर आमच्या आर्यपूर्वजांना न्यूमा राजानें रोमचे वर्षांत फेरफार केल्याप्रमाणें या पद्धतींत फेरफार करावे लागले. तरी देवयानांतच यज्ञादि धर्मविधि करण्याची चाल त्यांनीं तशीच ठेविली, व अद्यापिही ती तशीच आहे. आमच्या गृह्य-सूत्रांत धार्मिक दृष्ट्या उत्तरायणाचें विशेष महत्व असून दक्षिणायनांत मरण येणें हें अशुभ आहे असें मानिलें आहे त्याचें कारण आतां समजून येईल.

हिमान्तरकालांतील सात किंवा दहा महिन्याचें वर्ष हिमोत्तरकालांत बारा महिन्याचें कसें झालें, वर्षाचा देवयानपितृयानरूप सांपातिक विभाग जाऊन त्याच्या ऐवजीं आयनिक विभाग कसा प्रचारांत आला व त्याअन्वयें उत्तरायणाचा मूळचा अर्थ कसा बदलला इत्यादि प्रश्न वैदिक कालगणनेच्या विचारांत महत्वाचे आहेत. पण त्यांचा प्रस्तुत विषयाशीं संबंध नसल्यामुळें त्यांचा येथें विचार करतां येत नाहीं. कित्येक पंडितांचें असें मत आहे कीं सृष्टींतील शक्तींची उपासना जरी बऱ्याच प्राचीन आर्यधर्मांत आढळली, तरी ती हे सर्व आर्य एकत्र असतांना उत्पन्न झालेली नव्हे. पण हें मत डॉ. श्रेडर या पंडितानें साफ खोडून काढिलें आहे. उषा, आदित्य, अश्विन, वृत्रहन्, इत्यादि देवतांची लक्षणें ध्रुवविशिष्ट असल्यामुळें, आकाश (द्यौः), उषा, अग्नि इत्यादि सृष्टीच्या शक्तींच्या निरनिराळ्या आर्यभाषांतील नामसादृश्यावरून निघणाऱ्या अनुमानांना चांगला आधार मिळतो. तात्पर्य, कोणत्याही दृष्टीनें पाहिलें तरी द्यौःपिता, सूर्य, अग्नि, उषस्, तन्यतु

( मेघगर्जना ) यांना अगदीं आदिकालींच देवतापदवी मिळालेली असून पूजार्थक जो संस्कृत यज् धातु तो झेन्द् यझ् आणि ग्रीक अझोमै या रूपानीं इतर आर्यभाषांत दिसत असल्यामुळे, या देवतांची यज्ञरूपानें त्याकाळी पूजाही होत असे असें निर्विवाद ठरतें. ही उपासना हिमान्तर-कालांतच सुरू झाली की त्याच्याही पूर्वीपासून ती चालत आलेली होती हें ठरविण्याला सांप्रत कांही साधन नाहीं. पण एवढें मात्र खास आहे कीं, दैवी शक्तीचीं व्यक्त रूपे या नात्यानें होणारी सृष्टीतील महाभूतांची उपासना, सर्व आर्य ध्रुवाजवळ एकत्र असतांना सुरू होती व तिच्या-पासूनच पुढे प्रलयोत्तर कालांतील निरनिराळे आर्यधर्म उत्पन्न झाले. सात नऊ किंवा दहा महिन्यांत आपलीं सत्रे संपविणारे, मनु, अंगिरस्, भृगु इत्यादि ऋग्वेदांत सांगितलेले प्राचीन यज्ञप्रवर्तक अविभक्त आर्यांचेच ऋत्विज् असून, ते सूर्यप्रकाश असे तों सात किंवा दहा महिने-पर्यंत यज्ञयाग चालवीत आणि सूर्य क्षितिजाखालीं जाऊन तेथील दीर्घरात्र सुरू झाली ह्मणजे इतर यज्ञ बंद करून, तमाचा पाडाव करून प्रकाशाला पुनः प्राप्त करून देणाऱ्या वृत्रहनालाच सोमाच्या आहुती देत. हिमा-न्तरकालांत यज्ञपद्धतीला अगदीं सुव्यवस्थित स्वरूप जरी कदाचित् आलेलें नसले तरी त्यावेळीं उपासनाविधींचें मुख्य अंग यज्ञ हेंच होतें, यांत कांहींच शंका नाहीं.

ईशशक्तीची व्यक्तरूपें जीं महाभूतें त्यांची उपासना करणारे, आपली भाषा स्वतंत्ररीतीनें सुसंस्कृत करणारे आणि ध्रुवाजवळील आपल्या सुखकर अशा मूलभूमींतील सृष्ट चमत्कारांवर रूपकें करून त्यावर नानाप्रकार-च्या कथा रचणारे असे जे आमचे आर्य पूर्वज त्यांची सुधारणेंत बरीच प्रगति झालेली असली पाहिजे यांत कांही शंका नाहीं. ती नक्की किती होती हें जरी सांगतां आले नाहीं, तरी तुलनात्मक व्युत्पत्तिशास्त्रावरून एवढें दिसतें की, आर्य लोक अविभक्त असतांना त्यानां सूत काढणें, कापड विणणें, धातूचे काम, नांवा बांधणें, रथ गाड्या करणें, इत्यादि कला, शहरें बांधून त्यांत रहाण्याची रीत, क्रयविक्रयाचे व्यवहार, शेतकीचें काम इत्यादि गोष्टींची चांगली माहिती होती. विवाहादि धार्मिक आणि सामाजिक संस्था त्यांच्यांत असून मालमत्तेसंबंधाचे नियमही त्यांनीं ठरवून टाकिले होते. प्राचीन भाषाशास्त्रावरून या आदि आर्यांना माहीत असलेल्या

बऱ्याच प्राण्यांची व वनस्पतीची माहिती मिळते. भाषाशास्त्रावरून अशाप्रकारच्या गोष्टी समजत असल्यामुळें प्राचीन आर्यांची सुधारणा नवपाषाणयुगांतील रानटी लोकांपेक्षां बरीच जास्त होती एवढें तरी खास ठरते. पण आतां ध्रुवोपपत्ति माहीत झाल्यामुळें, तुलनात्मक व्युत्पत्तिशास्त्रावरून दिसून येणारी तेवढीच काय ती सुधारणा प्राचीन आर्यांची होती किंवा कसे याविषयी जास्त विचार करणे जरूर आहे. बर्फाच्या प्रलयामुळें मूलस्थान सोडून वाटेल तिकडे जाणें भाग पडल्यावर, त्या संकटातून निभावलेल्या आर्यांनी व त्यांच्या मुलाबाळांनी आपल्या उरलेल्या मोडक्या तोडक्या सुधारणेच्या जोरावरही अगदी प्रतिकूल अशा परिस्थितीत नवीन देशांत जाऊन तेथील लोकांनां जिंकून त्यांना आपलेसे करून त्यांच्यावर आपलें वर्चस्व स्थापन केले व त्यांना भाषा, आचार, विचार इत्यादि गोष्टींत आपल्यासारखे आर्य करून सोडिले एवढ्या एकाच गोष्टीवरून आर्यांची मूळ सुधारणा कोणत्या प्रकारची होती याचें अनुमान करतां येईल. नवपाषाणयुगांत यूरोपच्या उत्तर भागांत रहाणारे आर्य मूळचे तेथीलच होते असे जोपर्यंत मत होते, तोंपर्यंत तुलनात्मक व्युत्पत्तिशास्त्राच्या अनुमानांबाहेर जाण्याची गरज नव्हती. पण या नवपाषाणयुगीन आर्यांची सुधारणा आर्यांच्या मूळ ध्रुवावरील सुधारणेचा एक यःकश्चित् अवशेष होय असें आतां आपल्याला कळून आल्यामुळे, अमुक एक सुधारणा दर्शिविणारे शब्द सर्व आर्य भागांत सांपडत नाहींत एवढ्यावरूनच केवळ ती सुधारणा मूळ आर्यांमध्ये नव्हती असा कोटिक्रम करणें अगदीं अयुक्त होईल. तात्पर्य एवढेंच की तुलनात्मक व्युत्पत्तिशास्त्राच्या अनुमानांचा उपयोग फक्त विध्यर्थी असून तो निषेधार्थी करणे बरोबर नाही. प्रलयामध्यें किती सुधारणा नाहींशीं झाली हें सांगतां येणें अगदीं अशक्य आहे. ह्मणून तुलनात्मक व्युत्पत्तिशास्त्रावरून दिसून येणारी मूळ आर्यांची सुधारणा एवढी तरी कमींत कमी होती एवढेंच फार तर आपल्याला खास सांगतां येईल. तुलनात्मक व्युत्पत्तिशास्त्राच्या अनुमानांना किती महत्व द्यावयाचें हे यावरून कळून येईल. आर्यांच्या मूलस्थानाचा प्रश्न अनिर्णित होता तोंपर्यंत सर्व भार या अनुमानांवर होता, हें ठीक होतें. पण आतां आर्य लोक व त्यांचा धर्म हीं हिमान्तरकालीन असून

त्यांचें खरें मूळ तर त्याच्याही पलीकडील भूस्तरशास्त्रांतील कालांत गुरफटून गेलें आहे असें समजल्यामुळें हिमान्तरकालांतील आर्य रानटी होते असें ह्मणणें युक्तीस धरून नाहीं. पुराणवस्तुशास्त्रज्ञांनी ठरविलेलीं जीं पाषाण, कांस्य, लोह इत्यादि युगे त्यांपैकीं पहिल्या पाषाण युगांतून आर्यलोक हे एकदां केव्हां तरी आलेले असले पाहिजेत हे खरे. पण आर्यांचे पाषाणयुग हिमोत्तरकालांत होते असे ह्मणावयाला पुराणवस्तु-शास्त्रांत कांहीं प्रमाण नाहीं. शिवाय तुलनात्मक व्युत्पत्तिशास्त्रावरून अविभक्त आर्यांना धातूंची माहिती होती असे दिसत असल्यामुळे त्यांची सुधारणा पाषाणयुगाहून वरच्या दर्जाची होती हे तर सहजच ठरते. धातूंचे काम करण्याची कला आर्य लोकांनीच इतर देशांतून यूरोपात नेली असे कित्येक पुराणवस्तुशास्त्रज्ञांचे मत असल्याविषयीं पहिल्या प्रकरणांत सांगितलेच आहे. ताब्याचे किंवा पितळेचे नाणे पाडून त्याचा क्रयविक्रयासाठीं उपयोग करण्याचेही प्राचीन आर्यांना माहीत होतेसं दिसते. क्रयविक्रय साधनाचा वाचक असा 'खल्कॉस' शब्द होमरने सांगितला आहे; व विकत घेणे किंवा अदलाबदल करणे या अर्थांही ग्रीक व संस्कृतांत समान शब्द आहेत. ग्रीक 'मे इ' संस्कृत 'मे'=अदलाबदल करणे; 'प्रिअमै'—संस्कृत, 'क्रि' विकत घेणे. ऋग्वेदात (८, १, ५) 'शुल्क' नावाचे मूल्यपरिमाण सांगितले असून त्याचा अर्वाचीन संस्कृत वाङ्मयांत 'दस्तुरीच्या नाक्यावर देण्याचा पैसा' असा अर्थ आहे. ह्मणजे हे शुल्क मूळचे होमरने सांगितलेल्या 'खल्कॉस' सारखेच ताब्यांचे किंवा पितळेचे नाणें असणे असंभवनीय नाहीं. साधारणतः ग्रीक 'ख' बद्दल संस्कृतांत 'ह' येतो; व हा नियम 'खल्कॉस' शब्दाला कडक-पणे लाविल्यास 'खल्कॉस' आणि 'शुल्क' हे स्वरशास्त्रदृष्ट्या एक होणार नाहींत. ह्मणून व्युत्पत्तिशास्त्रज्ञांनीं 'खल्कॉस' ला संस्कृत 'ह्रकु' शब्दाचें रूप मानिले आहे. पण या दोन शब्दाचा मुळींच संबंध दिसत नाहीं. 'ह्रकु' शब्द वैदिक नाही व त्याचा अर्थही तांबें किंवा पितळ असा नाहीं. आतां संस्कृत 'श' बद्दल ग्रीक भाषेत 'क' होतो व कधीं कधीं हा 'क' हकारयुक्त होऊन त्याचा 'ख' होतो. ह्मणून ग्रीक 'खल्कॉस' हें संस्कृत 'शुल्का' चेच रूप असावें असें दिसतें. हें साम्य वास्तव असेल तर अविभक्त आर्य तांबे किंवा

पितळ यासारख्या धातूचीं नाणीं क्रयविक्रयासाठीं वापरींत होते असें अनुमान करावें लागतें. अशा आणखी किती तरी गोष्टी आहेत; पण त्यांचा येथें विचार करतां येत नाहीं. तुलनात्मक व्युत्पत्तिशास्त्राच्या अनुमानांवर प्राचीन आर्यांच्या सुधारणेची मर्यादा ठरविण्यांत किती भिस्त ठेवावयाची एवढेंच आम्हांस दाखवावयाचें होतें. असो. मूळ आर्य सुधारणा हिमान्तरकालीन होती असें असतां, नवपाषाणयुगांतील यूरोपीय आर्य लोकांची सुधारणा जर कनिष्ठ प्रकारची असेल, तर मागे सांगितल्याप्रमाणें त्याच्या मूलस्थानांवर आलेल्या संकटांत त्यांनीं ती गमाविली असल्यामुळें असें झालें असेल. आशियांतील आर्योनीं मूळ सुधारणेचा व धर्माचा बराच भाग कायम ठेवला याचे कारण त्यांनी तो आपल्या सूक्तांत ग्रथित करून ठेवला, व त्यांच्यापैकीं कांहीं जणांनीं हीं सूक्तें जशीच्या तशीं पुढील पिढ्यांना पोचविण्याचें काम मुद्दाम कमावलेल्या स्मरणशक्तीच्या द्वारा करण्याचा आपल्या जन्माचा व्यवसायच करून टाकला हे होय. तरीही हें काम बरेंच कठीण होते. अवेस्त्यांतील मूळचा बराच भाग आज नाहीसा झालेला आहे; आणि आपले वेद हे जरी त्यांहून चांगल्या स्थितांत असले तरी ते मूळ वेदांचा एक भागच होत असा आपला समज प्रसिद्धच आहे. या ग्रथांत हजारों वर्षांपूर्वी अस्तित्वांत असलेल्या ध्रुवावरील वसतीची हकीगत दिसून यावी हे आश्चर्य तर खरेंच, पण प्रस्तुत पुस्तकात दिलेल्या पुराव्यावरून पहातां ते तितकेच खरेही आहे.

असो; याप्रमाणें हिमान्तरकालांत आर्यांची सुधारणा बऱ्याच उच्च प्रतीची होती एवढे जरी निश्चित असले, तरी अद्यापि त्यांच्या संबंधानें बऱ्याच गोष्टी अनिश्चित आहेत. उदाहरणार्थ, एकदर मानवजातीपासून आमचा हा आर्यवंश वेगळा कधी झाला, आर्यांची भाषा मूळ केव्हां व कशी उत्पन्न झाली इत्यादि प्रश्न मनुष्यशास्त्रदृष्ट्या बरेच महत्वाचे आहेत. पण त्यांचा उलगडा करण्याचे साधन प्रस्तुत उपलब्ध नाहीं. मनुष्यप्राणी तृतीय युगांतही अस्तित्वांत होता, आणि पृथ्वीच्या कवचांत हिमकालांत झालेल्या प्रचंड घडामोडी त्याने पाहिल्या होत्या हें भूस्तरशास्त्रावरून दिसून येतें. पण वर्ण किंवा भाषा यांच्या तत्वावर एकंदर मनुष्यजातीचे भेद केव्हां झाले हें ठरविण्यास मनुष्यशास्त्रांत कांहीं

आधार नाही. उलट अत्यन्त प्राचीन असे जे मनुष्यांचे अवशेष सांपडले आहेत त्यांवरूनही भिन्न भिन्न मानववंशाचेंच अस्तित्व सिद्ध झालें आहे; यावरून मनुष्यजातीच्या मूळ उत्पत्तीचा प्रश्न मुळींच सुटलेला नसून, एकमूलवादि व अनेकमूलवादि अशा दोघांनाही मनमुराद तर्क करण्यास वाव असून त्या तर्कांचे वस्तुस्थितीवरून खंडण होण्याचीही धास्ती नाही असे दिसून येतें. प्रस्तुत पुस्तकांत दिलेल्या प्रमाणांवरून एकंदर मनुष्यजातीच्या, किंवा एकट्या आर्यांच्याही मूळ उत्पत्तीचा प्रश्न मुळींच सुटण्यासारखा नाहीं. आर्यांचे मूळ हिमपूर्वकालापर्यंत पोंचवितां येईल की नाही, किंवा मनुष्यजाति एकाच दंपतीपासून झाली की अनेकांपासून झाली हे या प्रमाणांवरून मुळींच सांगतां येणार नाही. आर्यलोक व त्यांची समशीतोष्ण कटिबंधांतील हिमोत्तरकालीन सुधारणा याची परंपरा हिमान्तरकालीन ध्रुवप्रदेशांपर्यंत नेण्याचें काम काय ते या प्रमाणांवरून होणारें आहे. आर्यलोक व त्यांची भाषा एकदम सुधारलेल्या स्थितीतच हिमान्तरकालाच्या अखेरीस भूतलावर अवतरली असें जर ह्मणता येत नाही तर अर्थात् त्याचे मूळ अति प्राचीन भूस्तरीय काळांतच असले पाहिजे. तात्पर्य, सांप्रत या प्रश्नांत फार खोल न जातां, आर्यलोक व त्यांची सुधारणा याची परंपरा हिमान्तरकालापर्यंत पोचवितां येते व त्यांचे खास मूळ अति प्राचीन भूस्तरीय काळात गडप झालेलें आहे एवढे म्हणूनच स्वस्थ बसले पाहिजे.

आतां हे प्रकरण पुरे करण्यापूर्वी वेदांची उत्पत्ति, स्वरूप आणि प्रामाण्य याविषयींच्या ब्रह्मवाद्यांच्या मताशीं या आमच्या अनुमानांचा कितपत संबंध पोचतो हे थोडे पाहूं. ब्राह्मणकालापासून कमीजास्ती जोराने या प्रश्नाची चर्चा झालेली असून ब्रह्मवादिपक्षाच्या दृष्टीनें त्यासंबंधाने आतां कांही सांगण्याचे राहिलेले नाहीं. पण शास्त्रीय विवेचनासाठी ब्रह्मवादिपक्ष व प्राचीनविद्यापंडितांचा पक्ष हे दोन्ही अलग ठेविले पाहिजेत. शास्त्रीय दृष्टीने केलेला विचार पूर्ण झाल्यावर त्यावरून निघणारी अनुमानें ब्रह्मवादि पक्षाशीं कितपत जुळतात हे पाहिजे तर मग पहावें. ब्रह्मवाद्यांच्या मते वेद हे नित्य, अनादि, आणि अपौरुषेय आहेत; आणि ही विशेषणें या ग्रंथांना अगदी प्राचीन तत्वज्ञान्यांनींही दिलेलीं आहेत. वेदप्रामाण्यासंबंधानें ऋग्वेदभाष्याच्या प्रस्तावनेंत सायणाचार्यांनीं विचार

केलेला असून कै. महामहोपाध्याय राजारामशास्त्री बोडस यानीही 'वेद-प्रामाण्यचंद्रिका' नांवाच्या लहानशा संस्कृत पुस्तकांत या प्रश्नाची चर्चा केली आहे. त्यांतील वादात्मक गोष्टींचा विचार न करितां ब्रह्मवादि पक्षाच्या निरनिराळ्या मतांचा सारांश तेवढा येथे देऊं. प्रस्तुत प्रश्न असा आहे कीं, अनुक्रमणिकेत (वेदांच्या) सूक्तांचे जे ऋषि दिलेले आहेत त्यानीं तीं सूक्तें अक्षरशः, कालिदासानें शाकुंतलादि ग्रंथ रचिले त्याप्रमाणें रचिली, की तीं अनादि कालापासून तशींच आलेली आहेत ? या प्रश्नाचा निर्णय करण्याचे उत्तम साधन ह्मणजे प्रत्यक्ष हीं सूक्तेंच होत. पण त्यांत या विषयासंबंधाने सर्व ऋषींची एकवाक्यता नाहीं. त्यांत कित्येक ऋषींनी आपले विचार आशा, भीति इत्यादि निर्दिष्ट केली आहेत. कित्येकांनी ऐहिक सुखप्राप्तीसाठी, किंवा शत्रूंचा पराभव व्हावा म्हणून किंवा द्यूतादि व्यसनें लागूं नयेत म्हणून (१०, ३४) देवांची प्रार्थना केली आहे. कित्येकांनी पुढें दिसणाऱ्या वस्तुस्थितीचे चित्र रेखाटले आहे; कित्येकांनीं सुतार रथ करतो त्याप्रमाणे आपण स्वतः केलेल्या, किंवा रचिलेल्या (कृ, जन् तक्ष्) नवीन सूक्तांचा (नव्यमी, अपूर्व्य) निर्देश केला आहे* (१, ४७, २; ६२, १३; २, १९, ८; ४, १६, २०; ८, ९५, ५; १०, २३, ६; ५४, ६ इ०) तर कित्येक सूक्तांत तीं अमुकाचा पुत्र अमुक यानें रचिलीं असे ह्मटले आहे (१, ६०, ५; १०, ६३, १७; ६७, १ इ०). आतां या सूक्तांबरोबरच्या दुसऱ्या अनेक सूक्तांमध्यें ऋषींनी असे स्पष्ट ह्मटलें आहे की इंद्र, वरुण, सोम, अदिति इत्यादि देवतांच्या स्फूर्तीमुळेच हीं सूक्तें उत्पन्न झाली, किंवा या ऋचा प्रत्यक्ष विराट् पुरुषापासून उद्भवल्या, किंवा त्या देवांनी उत्पन्न केलेल्या असून पुढें त्या ऋषींनी पाहिल्या (पश्यात्) (१, ३७, ४; २, ३३, २; ७, ६६, ११; ८, ५९६, १०, ७२, १; ८८, ८; ९०, ९. इ.) **वाक्** ही नित्य असून (८, ७५, ६.) ती दिव्य वाक् व सूक्तें देवांनीं उत्पन्न केलीं (८, १००, १०; १०१, १६; १०, ८८,८)

---

* ब्रह्माकर्म भृगवो न रथं । ऋ. ४, १६, २०. स्तोमं त इन्द्र विमदा अजीजनन्नपूर्व्यं । ऋ. १०, २३, ६. सनायते गोतम इन्द्र नव्यमतक्षद्ब्रह्म । ऋ. १, ६२, १३.

असेंही कित्येक ठिकाणीं ह्मटलें आहे. त्यामुळे प्रत्यक्ष सूक्तांवरून आपल्या प्रश्नाचा कोणताही निर्णय होणार नाहीं. हीं सूक्तें कित्येकांना मानवी कृति वाटली, तर कित्येकांना ती थेट देवतांपासून मिळाली असें वाटलें; यावरून एवढें खरें कीं कांहीं ऋषींना तरी आपण गात असलेली सूक्तें प्रत्यक्ष ईश्वरी प्रेरणेनेच उत्पन्न झाली असे वाटत होतें. स्वतः सूक्तें केल्याचे जे निर्देश आहेत त्यांचाही स्फूर्तिवादाने उलगडा करतां येईल. पण ऋक्, यजुस् आणि साम हे तिन्ही विराट् पुरुषापासून उत्पन्न झाले असे जें स्पष्ट म्हटलें आहे त्याचा या युक्तीने उलगडा होत नाहीं. ह्मणजे वेदांच्या अनादित्वाची किंवा अपौरुषेयत्वाची कल्पना वेदांइतकीच प्राचीन आहे असे म्हणावें लागते. ब्राह्मणें व उपनिषदे यांत हेंच मत दृष्टीस पडतें. ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद हे अनुक्रमे अग्नि वायु व सूर्य यांपासून झाले असे त्यांत सांगितलें आहे ( श. ब्रा. ११,५,८;१ ऐ. ब्रा. ५,३२-३४; छांदोग्य उप० ४,१७,१ ); वेद हे परमात्म्याचे निश्वसित (निश्वास) होत ( बृहदारण्यक उप० २,४,१० ); प्रजापतीने दैवी वाचेपासून वेद निर्माण केले. हेंच मत स्मृति, व पुराणे यांत प्रतिपादन केलें आहे. कल्पान्तीं होणाऱ्या प्रलयांत इतर सर्व वस्तुप्रमाणे वेदही नष्ट होतात, पण पुढच्या कल्पाच्या आरंभीं ब्रह्मदेव स्वतः त्यांचे पुनरुज्जीवन करतो व लहान प्रलयांतून ऋषीच त्यांचें रक्षण करितात असे मत आहे. या मताला आधार महाभारतांतील एक श्लोक आहे; तो असा:-" युगान्तेऽन्तर्हितान्वेदान्सेतिहासान्महर्षयः । लेभिरे तपसा पूर्वमनुज्ञाता स्वयंभुवा " ॥ ( शांतिपर्व, अ. २१०, श्लो. १९ )-मागील युगाच्या अन्तीं नष्ट झालेले वेद व इतिहास महर्षींनीं स्वयंभू ब्रह्मयाच्या अनुज्ञेने तप करून पूर्वी परत मिळविले. या कारणास्तव ऋषी हे मंत्राचे कर्ते नसून द्रष्टे होत. तैत्तिरीय, काठक इत्यादि वेदांच्या शाखा ज्या ऋषींच्या नांवानें प्रसिद्ध आहेत, त्या ऋषींनीं अर्थातच त्या केलेल्या नसून ते त्यांचे द्रष्टे मात्र होत. पण या वेदांच्या नित्यत्वासंबंधानें षड्दर्शनांमध्यें फारच सूक्ष्म विवेचन केलेलें आहे. या विवेचनांतील कोटिक्रम भारदस्त

---

१ भवभूतीनेंही उत्तर रामचरितांत एके ठिकाणीं असेंच ह्मटलें आहे. ब्रह्मर्षयो ब्रह्महिताय तप्त्वा । परःसहस्राः शरदस्तपांसि ॥ एतान्यपश्यन् गुरवः पुराणाः । स्वान्येव तेजांसि तपोमयानि ॥

असून, त्यांतील उदाहरणे समजूत पटण्यासारखीं असल्यामुळें तें फार मौजेचे आहे. त्या सर्वांवरून एवढें तरी दिसून येतें कीं वेदांच्या अनादित्वाची गोष्ट वेदांइतकीच प्राचीन असून ते मनुष्यांनीं रचिले असे कोणत्याही काळीं कोणी प्रदिपादन केलेलें नाहीं. हे षड्दर्शनकार सामान्य व्यक्ति नसून त्यांचे अचाट बुद्धिवैभव व त्यांची उत्कट धर्मशीलता लक्षांत घेतल्यास त्यांनी दिलेल्या प्रमाणांसंबंधानें कोणत्याच प्रकारची शंका घेणें योग्य होणार नाही; म्हणून वेद नित्य आहेत ही समजूत अगदीं प्राचीन कालापासून चालत आलेली आहे, असें मानणें भाग आहे. पण ही समजूत ह्मणजे वेदांच्या अपौरुषेयत्वासंबंधाचा प्रत्यक्ष पुरावा नसून, वेदांचा मानवी कर्ता कोणत्याही काळीं ज्ञात नव्हता एवढेच फार तर तीवरून सिद्ध होईल. शब्द आणि अर्थ यांचा संबंध नित्य आहे, मनुष्यकृत नव्हे, ह्मणून वेदही नित्य होत असा कोटिक्रम पूर्वमीमांसाकार जैमिनि यानें केला आहे. एका विवक्षित क्रमाने आलेल्या अक्षरांचा समूह ह्मणजे शब्द. अक्षरांच्या या ठराविक क्रमामुळे शब्दांत अर्थोत्पत्ति होते. जैमिनीचें हें मत वैयाकरणांना पसंत नाही. त्यांचें मत असें आहे की, अक्षरे अनित्य असल्यामुळें त्यांच्या समूहावरून अर्थनिष्पत्ति होत नसून या अक्षरसमूहाचा उच्चार झाल्यावर 'स्फोटा' मुळे त्यांत अर्थ उत्पन्न होतो. वेदांमध्यें मुळीं अनित्यवस्तुवाचक शब्दच नाहींत, व त्यांतील शब्द आणि त्यांचे अर्थ हे नित्य असल्यामुळें वेद हे स्वतः सिद्ध असून सूर्याप्रमाणें स्वयंप्रकाश व अस्खलनशील आहेत; वेदांतील कित्येक भाग ऋषींच्या नांवाने प्रसिद्ध आहेत, ते त्या ऋषींनी केले ह्मणून नसून त्यांनीं त्याचें प्रथम अध्ययन करून इतरांना ते शिकविले ह्मणून होत, असें जैमिनीचें मत आहे. वेदांतसूत्रकार बादरायण व्यास आणि त्याचे भाष्यकार शंकराचार्य यांना शब्दाचें नित्यत्व कबूल आहे; पण त्यांचे ह्मणणें असें कीं खुद्द शब्द नित्य नसून तो ज्या वस्तुजातीचा वाचक आहे ती जाति नित्य आहे; ह्मणून इंद्रादि देवतांची नावे दिलेली अर्थात् अनित्य आहेत; तरी त्यांवरून वेदांच्या नित्यत्वाला बाध येत नाहीं; कारण ज्यांचे ते शब्द वाचक आहेत त्या इंद्रादिदेवतांची जाति नित्यच आहे. नैयायिकांनां शब्दाची नित्यता मान्य नाही, तरी ते वेद प्रमाण मानितात, कारण ज्यांना धर्माचें साक्षात्

ज्ञान झालेलें आहे ( साक्षात्कृतधर्माणः ) अशा विश्वासार्ह ( आप्त ) पुरुषांपासून त्यांची उत्पत्ति झालेली असून त्यांनी ऐहिक आचाराविषयीं ज्या आज्ञा केलेल्या आहेत, त्यांची अनुभवाने खात्री पटण्यासारखी असल्यामुळें त्या पुरुषांची विश्वासार्हताही सिद्ध होते, असें त्यांचें ह्मणणे आहे. वैशेषिक सूत्रांमध्यें ईश्वर वेदांचा कर्ता असे स्पष्ट ह्मटले आहे. सांख्यांना, नैयायिकांप्रमाणेंच, शब्दार्थामधील सबंध नित्य वाटत नसून ते आदिपुरुषापासून वेदांची उत्पत्ति झाली असे मानितात; मात्र ते त्यानें मुद्दाम केलेले नसून श्वासक्रियेप्रमाणें सहज लीलेनें ते उत्पन्न झाले असे त्यांचें मत आहे. या मताप्रमाणें पहातां मीमांसक ह्मणतात त्या अर्थानें वेद नित्य नसून, ज्या वेदवाक्यांत वेदांच्या नित्यत्वाचा उल्लेख केला आहे, त्यांत 'एकाच जातीच्या अर्थक्रमाचा प्रवाह कधीं बंद पडत नाहीं" असें सांगण्याचाच उद्देश आहे ( वेदनित्यतावाक्यानिच सजातीयानुपूर्वीप्रवाहानुच्छेदपराणि* ). या प्रश्नाचा पतंजलीनें महाभाष्यांत निकाल करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यानें शब्दानुक्रम ( वर्णानुपूर्वी ) व अर्थ हीं भिन्न समजून असें ठरविलें आहे की, वेदांच्या नित्यतेचा सबंध अर्थाच्या नित्यतेशीं असून, शब्दक्रमाशीं नाहीं; कारण हा क्रम नेहमी सारखा नसतो, आणि म्हणूनच अर्थ कायम असूनही, काठक, कालापक, मौदक, इत्यादि वेदांच्या शाखा आढळून येतात.† वेदांच्या अनेक शाखांचा, शब्दक्रमाच्या नित्यतेवर उलगडा होत नसल्यामुळे हें मीमांसक मत पतंजलीनें अमान्य केलें आहे. त्याच्या मतें पृथ्वीवर होणाऱ्या प्रलयांत वेद नष्ट होऊन, पुनः दुसऱ्या युगाच्या आरंभीं त्या प्रलयांतून बचावलेले ऋषी त्यांचें स्मृतीच्या जोरावर पुनरुज्जीवन करितात. याप्रमाणें प्रत्येक मन्वतरांतील वेद शब्दांनी

---

* वेदांतपरिभाषा या ग्रंथातही परमेश्वरानें सृष्टिकालीं पूर्व युगांतील वेदांसारखेच सजातीय वेद निर्माण केल्याचे सांगितले आहे—" सर्गाद्यकाले परमेश्वरः पूर्वसर्गसिद्धवेदानुपूर्वीसमानानुपूर्विकं वेदं विरचितवान् न तु तद्विजातीयं वेदम् । "

† ननु चोक्तं नहि च्छदांसि क्रियन्ते नित्यानि छंदासीति । यद्यप्यर्थो नित्यो या त्वसौ वर्णानुपूर्वी साऽनित्या । तद्भेदाच्चैतद्भवति काठकं, कालापकं, मौदकं, पैप्पलादिकमिति ॥

निराळा * असून त्यांत अर्थ मात्र एकच असतो, आणि निरनिराळ्या ऋषींनी पुराकल्पांतील वेदांचें पुनरुज्जीवन केल्यामुळें त्याच्या अनेक शाखा होऊन त्या ऋषींच्या नांवानें प्रसिद्ध होतात. हें मत व्यासाच्या वर दिलेल्या मतांशी बहुतांशी जुळतें आहे. षड्दर्शनांवर ग्रंथ लिहिणाऱ्या यापुढील ग्रंथकारांनीं नाना तऱ्हेनें शब्दप्रामाण्याची बाजू उचलिली आहे. पण त्या सर्वांचा विचार करण्याची कांहीं गरज नाहीं; कारण त्यांच्या मुळाशी पतंजली व व्यास यांचेंच मत आहे.

याप्रमाणें वेदांची उत्पत्ति, स्वरूप, व प्रामाण्य यांविषयींच्या आमचे ब्रह्मवादि, दर्शनकार व इतर पंडित यांच्या मतांचा सारांश आहे. त्यांत पतंजलि, व व्यास यांच्या मताला प्रस्तुत पुस्तकांत प्रतिपादन केलेल्या उपपत्तीवरून चांगलाच आधार मिळतो असें दिसून येईल. वैदिक धर्म व यज्ञपद्धति हिमान्तरकालीन आहेत, आणि जरी त्यांचें आदिमूल शोधून काढतां आलें नाहीं, तरी वैदिक देवतांच्या ध्रुवविशिष्ट लक्षणांवरून, निसर्गशक्तींना आदिआर्यांनीं जी देवतापदवी दिली ती ध्रुवाजवळील प्रदेशांत म्हणजे पुराणांतील मेरूवर रहात असतांना आर्यांनीच दिलेली होती हें मागें दाखविलेंच आहे. हिमपातामुळें या ध्रुवस्थानाचा नाश झाल्यावर त्यांतून बचावलेल्या आर्यांनी शक्य तेवढी सुधारणा व धर्म बरोबर घेऊन तेथून गाशा गुंडाळला, आणि या प्रलयांतून तगून निघालेल्या धर्माच्या अवशेषावर हिमोत्तरकालांतील धर्माची रचना त्यांनीं केली. या उपपत्तीप्रमाणें हिमोत्तरकालापासून तों गौतमबुद्धापर्यंतच्या काळाचे जे भाग होतात ते असेः—

१००००–८००० ( शकापूर्वी )—मूळ ध्रुवस्थानाचा हिमकालानें झालेला नाश आणि हिमोत्तरकालाचा आरंभ.

८०००–५००० (शकापूर्वी)—मूलस्थानांतून आर्यांचें प्रमाण. प्रलयांतून निभावलेले आर्य लोक या काळांत युरेशियाच्या उत्तर भागांत नवीन वसतिस्थानाच्या शोधार्थ भटकत होते. या काळांत वसंतसंपात पुनर्वसूंत होता; पुनर्वसू नक्षत्राची देवता अदिति असल्यामुळें, वेदकाल

*प्रतिमन्वंतरं चैषा श्रुतिरन्याऽभिधीयते ॥ नागोजी भट्टाची महाभाष्यावरील

निर्णयांत दिलेल्या संज्ञेअन्वयें या कालाला अदितिकाल ऊर्फ मृगशीर्ष पूर्व-काल हे नांव देऊं.

५०००–३००० ( शकापूर्वी )–मृगशीर्षकाल–या काळांत वसंतसंपात मृग नक्षत्रांत होता. बरीच वैदिक सूक्तें या काळाच्या आरंभींची असून तेव्हां ध्रुवस्थानासंबंधी आख्यायिकांच्या खऱ्या अर्थाची स्मृति नष्ट झाली नव्हती. पचांगाची सुधारणा करण्याचे व्यवस्थित प्रयत्न या कालांत होऊन यज्ञयागांतही विशेष शिस्त उत्पन्न झाली.

३०००–१४०० ( शकापूर्वी )–कृत्तिकाकाळ–यांत वसंतसपात कृत्तिका नक्षत्रांत होता. कृत्तिकांपासून नक्षत्रचक्राला आरभ करणारे, तैत्तिरीय सहिता व ब्राह्मणे इत्यादि ग्रथ या काळांत झाले. वैदिक सूक्ताची सहितात्मक रचना या काळाच्या आरभीं झाली. मूळ ध्रुवस्था-नाविपयीच्या आख्यायिका या सुमाराम अस्पष्ट होऊन वैदिक सूक्तांचा अर्थ या पुढे अधिकाधिक गूढ होत गेला. यज्ञपद्धतीला शास्त्रीय स्वरूप येऊन तिची याच काळांत वाढ झाली. या काळाच्या शेवटीं वेदांग ज्योतिष मूळ रचण्यांत आले, निदान त्यात सांगितलेली सपाताची स्थिति पाहून निश्चित करण्यांत आली.

१४००–५०० ( शकापूर्वी )–बुद्धपूर्वकाल. या काळांत सूत्रग्रथ व षड्दर्शनें यांचा अवतार झाला.

वेदकालनिर्णयांत सांगितलेल्या काळाहून सदर काळ जरा भिन्न आहेत, आणि अदितिकालाची पूर्व मर्यादा ध्रुवोपपत्तीमुळे चालू हिमोत्तर-कालाच्या आरभापर्यंत हटल्यामुळे हा भेद झालेला आहे. पुराणांच्या परिभाषेप्रमाणे प्रलयानंतरच्या युगाला ( शकापूर्वी ८०००–५००० ) कृतयुग ऊर्फ ऐतरेय ब्राह्मणांत ह्मटल्याप्रमाणे भटकण्याचे युग हे नांव आहे. मूलभूमीतून हद्दपार झाल्यावर या काळांत आर्य लोक युरेशि-याच्या उत्तर भागांत वसाहतीसाठी नवीन जमिनी शोधीत हिंडत होते. कृत-युगाला हिंडण्याचे युग ह्मणण्यांत ऐतरेय ब्राह्मणांचा हाच उद्देश असेल असे नाहीं. पण या ब्राह्मणांत सांगितलेल्या चारी युगांच्या लक्षणांचा[1] हा नवीन

---

१ कलिःशयानो भवति संजिहानस्तु द्वापरः । उत्तिष्ठंस्त्रेता भवति कृतं संपद्यते चरन् ॥ ऐ. ब्रा. ७, १५.

अर्थही मजेचा आहे. त्यांत, शयन करणारा तो कलि, थोडीबहुत हालचाल करणारा तो द्वापर, उभा राहिलेला त्रेता, आणि फिरूं लागलेला तो कृत, असे सांगितलें आहे. ध्रुवोपपत्तीवरून पाहिल्यास या वर्णनांत हिमोत्तरकालांत आर्यांना ज्या स्थितींतून जावे लागले त्या स्थितीपासून ह्मणजे नवीन भूमि शोधण्याच्या स्थितीपासून तों कायम वसाहती करून ते स्थाईक होईपर्यंतच्या स्थिति सांगितल्या असाव्यात अशीही कल्पना करितां येईल. हा श्लोक सोडून दिला तरीही वर दिलेल्यांपैकी पहिल्या काळांत आर्यांना हिंडावें लागत असून सुखकर भूमींत कायम वसाहत होईपर्यंत किती तरी ठिकाणें त्यांनी पाहून पुनः सोडली असतील असे सहज दिसून येईल. आर्यांचा धर्म, आणि यज्ञपद्धति ही हिमान्तरकालीन असून वैदिक धर्म व विधि हे हिमकालांतून राहिलेल्या प्राचीन आर्यधर्माच्या अवशेषावर उभारलेल्या इमारती होत हें पूर्वी सांगितलेच आहे. त्यावरून आतां ही अनुमानें व वेदांची उत्पत्ति, स्वरूप व प्रामाण्य यां विषयींचीं ब्रह्मवाद्यांची मतें यांची तुलना करणे सोईचे होईल. ऋग्वेदांतील प्रत्येक सूक्त केव्हां झालें हें आपल्याला सांगतां येणार नाहीं; तरी प्रलयकाल संपल्यावर राहिलेल्या मंडळींनीं अथवा त्यांच्या मुलांनीं आपल्या वाडवडिलांपासून मिळालेल्या पवित्र धर्मज्ञानाला, थोडेसे स्थिरस्थावर झाल्याबरोबर लगेच सूक्तांत गोवून टाकिलें असले पाहिजे एवढे मात्र खास म्हणतां येईल. हिमोत्तरकालांत नवीन उत्पन्न झालेला धर्म या सूक्तांत सांगितला असेल अशी कल्पना करतां येत नाहीं; व वैदिक देवतांच्या ध्रुवविशिष्ट लक्षणांवरून तर असल्या शंकेला जागाच रहात नाहीं. प्रलयपूर्वकालीन भाषा व या सूक्तांची भाषा यांत किती साम्य होते हा प्रश्न निराळा असून, त्याशीं आपला प्रस्तुत कांहीं संबध नाहीं; कारण पतंजली, व व्यास यांच्या मताप्रमाणे सूक्तांची भाषा कायम रहात नसून तात्पर्य मात्र कायम असतें. आपल्याला फक्त तात्पर्यच पहावयाचें आहे, आणि आपल्या प्रलयपूर्वकालांतील वाडवडिलांपासून प्राप्त झालेल्या धर्मज्ञानाचा तात्पर्यार्थ पुढच्या पिढ्यांसाठीं राखून ठेवून त्यांना पोंचविण्याचें पवित्र काम करण्याचें ज्यानी अंगावर घेतलें त्या वैदिक ऋषीच्या विश्वासार्हतेबद्दल किंवा योग्यतेबद्दल शंका बाळगण्याचें कारण नाहीं. वैदिक ऋषीप्रमाणेंच आजही निदान तीन चार हजार वर्षेपर्यंत तरी आमच्या वैदिक ब्राह्मणांनीं

वेदांचें रक्षण केलेले आहे. तेव्हां आज जी गोष्ट खरोखर आपण पहातो, तीच प्राचीन ऋषींनीं केलेली असल्यास त्यांत नवल तें काय ? त्यांच्या-वेळी तर ध्रुवस्थान व तेथील धर्म यांचे स्मरण जाग्रत होतें. हीं सूक्तं सार्वजनिक रीतीनें गाण्याचा परिपाठ असल्यामुळे, व सर्वांनाच आपले धर्मविधि कायम रहावे ही इच्छा असल्यामुळे ऋषींच्या सूक्तगायनाकडे सर्वांचें सूक्ष्म लक्ष असे. अशा रीतीनें कमावलेल्या स्मरणशक्तीच्या साहाय्यानें वैदिक ऋषीनी आपल्या मूलस्थानांतील धर्माचें स्वरूप आख्या-यिकांच्या रूपाने होतें तसें ठेविलें, आणि पुढें त्यांनां सूक्तांत स्थान मिळून कालान्तरानें त्यांची मडळे व संहिता या रूपानें रचना झाली. ह्या सूक्तांचा तात्पर्यार्थ हिमान्तरकालीन असून त्यांचे आदि मूल तर प्राचीन भूस्तरीय काळांत गडप झालेले आहे असें ठाम सांगावयास आतां कांहीं हरकत नाहीं. आतां ही दोन्ही प्रकारची, म्हणजे ब्रह्मवाद्यांचें व ऐतिहासिक अशी मते समोरासमोर मांडूंः—

| ब्रह्मवादिमत. | ऐतिहासिकमत. |
| --- | --- |
| १. वेद निल्य, अनादि आणि अपौरुषेय असे आहेत. | १. वेदान्तर्गत आर्यधर्म हिमा-न्तरकालीन आहे असें दाखवितां येतें; पण त्याचें आदिमूल मात्र प्राचीन भूस्तरीयकालांत गडप झालेलें आहे. |
| २. गत कल्पाच्या अखेरीस झा-लेल्या प्रलयांत वेद नष्ट झाले. | २. आर्यांचा धर्म आणि सुधा-रणा ही त्याच्या ध्रुवावरील स्थानांत बर्फाचा प्रलय झाला त्यांत नष्ट झाली. |
| ३. प्रस्तुत कल्पाच्या आरंभीं ऋषींनीं तपश्चर्या करून, ईश्वराच्या कृपेनें स्मरणांत राहिलेल्या वेदांचे, शब्दशः नसले तरी तात्पर्यतः पुन-रुज्जीवन केले. | ३. चालू हिमोत्तरकालांत ऋ-षींनी, आपल्या प्रलयपूर्वकालीन वाडवडिलांपासून परंपरागत आले-ल्या धर्मतात्पर्यावरून वैदिक सूक्तांची रचना केली. |

या दोन्ही प्रकारच्या मतांची तुलना केल्यास असें दिसून येईल की, वर सांगितलेल्या महाभारतांतील श्लोकांत व्यासानें वेदांचा नाश त्यांचे व पुन-रुज्जीवन यांविषयींची जी आख्यायिका दिली आहे ती ऐतिहासिक गोष्टीच्या

आधारावरच दिलेली आहे. पुराणांप्रमाणें पहातां, चालू कल्पाचा आरभ किती तरी हजार वर्षांपूर्वी झालेला आहे हें खरें, पण आजही जर कित्येक भूस्तरशास्त्रज्ञांच्या मतें गेल्या हिमकालाला ८०००० वर्षें होऊन गेलेली आहेत, तर पुराणांतील अंदाजाबद्दल आश्चर्य मानण्याचें कारण नाहीं. शिवाय नवीन कल्पापासून किंवा भूस्तरशास्त्राच्या भाषेंत बोलावयाचे ह्मटल्यास चालू हिमोत्तरकालापासून सुरू झालेल्या महायुगाचा अवधि योग्य तऱ्हेनें पाहिल्यास १०००० वर्षांचा आहे असें दिसून येत आहे. या दोन्ही मतांत आणखी एक भेद आहे तो वेदांच्या अनादित्वासंबंधी होय. वैदिक-धर्मकाल अनादि आहे असे ऐतिहासिक किंवा शास्त्रीय दृष्टया सिद्ध करतां यावयाचें नाही. एवढेच ह्मणतां येईल की त्यांचा आदि प्राचीन भूस्त-रीय काळांत गडप झालेला आहे, किंवा हा धर्म, आर्यभाषा व आर्य-जाति यांच्या इतकाच प्राचीन आहे. वेदांच्या अनादित्वाला शास्त्रीय दृष्टया मिळणाऱ्या एवढ्या आधारावर जर ब्रह्मवाद्यांचें समाधान होत नसेल तर ब्रह्मवादिमत व शास्त्रीयमत ही नेहमीच भिन्न रहाणार, कारण त्यांच्या तत्वनिर्णयाचे मार्गच मुळीं भिन्न आहेत; म्हणूनच वर ही मतं एकत्र न मिसळतां समोरासमोर मांडिली आहेत. शब्दा पासून सृष्टयु-त्पत्ति झाली की काय हा प्रश्न ऐतिहासिक विवेचनाच्या बाहेरचा आहे. तरी व्यावहारिकदृष्टया वेदांतर्गत धर्म अनादिच आहे असे म्हणावयास शास्त्रीय आधारांवरूनही हरकत दिसत नाहीं.

वैदिक सूक्तांचें सूक्ष्म निरीक्षण करणारास, वैदिक ऋषींनांही आपण गात असलेल्या सूक्तांचा मथितार्थ प्रलयपूर्वकालीन असून शब्द मात्र स्वतःचे आहेत असें वाटत असल्याचें दिसून येईल. सुतार रथ करतो त्याप्रमाणे सूक्तेंही ऋषींनीं केलीं आहेत असें सांगणारी, व याच्या उलट तीं सूक्ते देवांनीं दिलेलीं, उत्पन्न केलेली किंवा त्यांच्या स्फूर्तीने झालेलीं होत असे स्पष्ट सांगणारी, अशा दोन्ही प्रकारची वैदिक वचनें पूर्वी दिलीच आहेत. त्यासंबंधानें निरनिराळ्या ऋषींचीं भिन्न मतें होती, किंवा ऋषींनां स्फूर्तीची स्पष्ट कल्पनाच नव्हती असें मानून या भिन्न मतांचीं एकवाक्यता करण्याचा कित्येकांनीं प्रयत्न केला आहे. पण ही एकवाक्यता अगदीच दुर्बल आहे. त्यांची एकवाक्यता करण्याचा अधिक चांगला मार्ग ह्मटला ह्मणजे वेदांची भाषा किंवा शब्द व तात्पर्य किंवा अर्थ

यांत भेद करून मार्षेला किंवा शब्दांना मनुष्यकृत समजणे व तात्पर्यार्थाला प्राचीन किंवा अपौरुषेय समजणे हा होय. ऋग्वेदांत ' प्राचीन ऋषि ' ( पूर्वे ऋषयः ) किंवा प्राचीन सूक्तें याविषयीं अनेक उल्लेख आले आहेत ( १,१,२;६,४४,१३;७,२९,४;८,४०,१२;१०,१४,१५ इ० ). हे पूर्व ऋषि ह्मणजे वैदिक ऋषींचे हिमोत्तरकालांतीलच पूर्वज होत असें पाश्चात्य पंडितांचे मत आहे. पण हें मत खोडून काढण्यासारखा स्पष्ट पुरावा या सूक्तांतच आहे. कित्येक ठिकाणीं असें ह्मटलें आहे कीं ' हे सूक्त जरी नवें आहे ( नव्यसी ), तरी त्याची देवता प्राचीनच ( प्रत्न ) आहे ( ६,२२,७;६२,४;१०,९१,१३ इ० ). सूक्तांत वर्णन करीत असलेल्या देवतांचे पराक्रमही प्राचीन आहेत असेंही कित्येक ठिकाणीं ह्मटलें आहे. पहिल्या मंडळांतील ३२ व्या सूक्ताला ' इंद्रानें पूर्वी केलेले पराक्रम ( प्रथमानि ) सांगतो असें ह्मणून सुरुवात केली आहे; तसेंच १,११,३ व, १,६१,१३ यांत इंद्राच्या पराक्रमाना ' पूर्वी व पूर्व्याणि ' अशीं विशेषणें दिलीं आहेत. अश्विनांच्या ही पराक्रमांनां ' पूर्व्याणि ' हें विशेषण १,११७,२५ यांत लाविलें आहे; या सूक्तांत दिलेली अश्विनांच्या पराक्रमांची लांबच लांब याद पाहिली म्हणजे हे पराक्रम ऋषीनें स्वतः पाहिलेले नसून, परंपरेनें ठाऊक असलेल्याचाच साराश तो देत आहे असें स्पष्ट दिसतें. अंगिरस् किंवा वसिष्ठ यां सारख्या ऋषींना अतींद्रिय शक्ति होती ( ७,३३,७–१३ ) किंवा ते देवांजवळ संभाषण करीत ( १,१७९,२ ) अथवा देवांच्या भोगांचे वाटेकरी होत ( देवानां सधमादः, ७,७६,४ ) असें जे म्हटलें आहे त्यावरूनही हीच गोष्ट सिद्ध होते. या ऋषींनां पुढील पिढ्यांचे आद्यमार्गदर्शक ( पूर्वेभ्यः पथिकृद्भ्यः ) असेंही म्हटलें आहे ( १०, १४, १५ ). असें अमानुष सामर्थ्य आपल्या अगदीं जवळच्या पूर्वजांना होतें असें वैदिक ऋषींनीं म्हटलें असेल अशी कल्पना करवत नाहीं. म्हणून हे पूर्वज प्रलयपूर्वकालीनच होत ( नः पूर्वे पितरः ) असें आम्हांला वाटतें. हीच गोष्ट प्राचीन देवतांनांही लागू आहे. अदिति व तिचे सात पुत्र यांची गोष्ट गत युगांतील ( पूर्व्यं युगम् ) आहे असें स्पष्टच सांगितलेलें आहे. तात्पर्य ऋग्वेदांत सांगितलेलीं प्राचीन सूक्तें, ऋषी, किंवा देवता हीं हिमोत्तरकालीन नसून पूर्व युगांतीलच होत, असें मानिल्यानेंच या देवतांच्या

ध्रुवविशिष्ट लक्षणांचा उलगडा होणार आहे. वैदिक ऋषींनी नवीन सूक्तें रचिलीं असतील, पण एवढें ह्मटल्यानें ह्या सूक्तांचा विषयही नवीन होता कीं काय हे ठरत नाहीं. पण सूक्तें नवीन असून त्यांत वर्णिलेल्या देवता प्राचीन आहेत असें जे म्हटलें आहे ( ६,६२,४ ) त्यावरून या प्रश्नाचा उलगडा करतां येतो; म्हणजे या सूक्तांतील शब्द नवे असून आंतील मतलब मात्र प्राचीन काळापासून परंपरेनें आलेला होता. १०,७२,१–२ यांत " स्तुतीच्या आवडीमुळे गाइलेल्या सूक्तांच्या रूपानें देवांच्या जन्माचें वर्णन करूंया.—उत्तर युगामध्ये ज्याला ती दिसतील त्या कोणीही ( तसें करावे )[1]" असें म्हटलें आहे त्यांत देवांचे जन्म व त्यांना उत्तर युगांत पहाणारा यांच्यांत जो भेद केला आहे, त्यावरून सूक्ताचा विषय पूर्व युगांतलि असून, ऋषी त्याचे उत्तर युगांत वर्णन करीत आहे हें उघड दिसते. ८,५९,६[2] यांत " हे इंद्रावरुणौ, तुह्मी पूर्व कालीं ऋषींना जे ज्ञान, जी अर्थशक्ति, जी विद्या, आणि ऋषींनीं यज्ञ करून निर्माण केलेली जी स्थानें दिली ती सर्व मीं तपाच्या योगेकरून पाहिलीं आहेत. " असे म्हटले आहे. हा मजकूर वर दिलेल्या व्यासाच्या श्लोकांतील मजकुरासारखाच आहे. असली स्पष्ट वचनें पुढे असतांना सूक्तांच्या मानवी आणि दैवी उत्पत्ती-विषयांच्या परस्परविरोधी वचनांची एकवाक्यता करण्याचा एकच मार्ग ह्मटला म्हणजे त्यांची **शब्दरचना** मानवी असून विषय अनादि आहे असें पतञ्जलीनें सुचविल्याप्रमाणे मानणे हा होय. ८,९५,४–५ यांत ऋषीनें इंद्रासाठी अगदीं **नवीन** असे उत्तेजन देणारें सूक्त रचिलें; हें सूक्त सत्यपूर्ण अशा कुशाग्र मनांतून, **प्राचीन** बुद्धीचें फळ म्हणून उत्पन्न झालें " असे म्हटले* आहे. यांत एकाच सूक्ताला नवीन व प्राचीन

---

१ देवानां नु वयं जाना प्रवोचाम विपन्यया । उक्थेषु शस्यमानेषु यः पश्यादुत्तरे युगे ॥ ऋ. १०,७२,१.

२ इंद्रावरुणा यदृषिभ्यो मनीषां वाचो मतिं श्रुतमदत्तमग्रे । यानि स्थानान्य-सृजंत धीरा यज्ञं तन्वानास्तपसाभ्यपश्यम् ॥ ऋ. ८,५९,६.

* इंद्र यस्ते नवीयसी गिरं मंद्रामजीजनत् । चिकित्विन्मनसं धियं प्रत्नामृतस्य पिप्युषी ॥ ऋ. ८,९५,५.

म्हटलें आहे; व शब्द ( गिरम् ) आणि बुद्धि ( धियम् ) यांचा विरोध दाखवून प्राचीन बुद्धीला ( धियं प्रत्नाम् ) नवीन शब्दांनी सजविल्याचें स्पष्ट सांगितलें आहे. ब्राह्मण ग्रंथांत विषयांची जी सदरें केलेलीं आहेत त्यांत **पुराकल्प** म्हणजे 'गत युगांतील प्रघात' असें एक सदर आहे; अर्थात् या ब्राह्मणांतही प्रलयपूर्वकालीन आख्यायिका आलेल्या आहेत असें आमच्या ब्रह्मवाद्यांचें मत असलेलें दिसतें. "उषा संपून सूर्योदय होतो की नाही अशी ब्राह्मणांना पूर्वी भीति वाटत असे" हें तैत्तिरीय ब्राह्मणांतील वचन सायणाचार्यांनी पुराकल्पाचें उदाहरण म्हणून दिलें आहे; आणि त्याचा संबंध ध्रुवावर दिसणाऱ्या दीर्घ उषेशींच असल्याचें आम्ही पूर्वी दाखविलें आहे. ब्राह्मणांत जर पूर्व युगांतील आख्यायिका सांगितल्या आहेत तर वेदांत त्या असल्या पाहिजेत हें उघडच झालें. याप्रमाणें कोणत्याही दृष्टीनें या प्रश्नाचा विचार केला तरी अंतर्बाह्य प्रमाणांवरून एकच अनुमान निघतें, तें असें की वैदिक सूक्तांचा मथितार्थ प्राचीन म्हणजे हिमान्तरकालीन असून हिमोत्तरकालांत ऋषींनीं तो सूक्तांत ग्रथित केला.

वैदिक अर्थमीमांसेतील व वैदिक आणि पौराणिक कथांतील आणखीही कित्येक बाबींचा हिमान्तरकालातील ध्रुवस्थानाच्या कल्पनेवर सयुक्तिक उलगडा होणारा आहे. उदाहरणार्थ, पाश्चात्य पंडितांना जेव्हां प्रथम वेदांची माहिती झाली, तेव्हां त्यांना वाटलें कीं आपल्याला आर्य सुधारणेचें मूळच, किंवा सृष्टचमत्कारांच्या व निसर्ग व्यापारांच्या प्रथम दर्शनानें चकित झालेल्या आदि-आर्यांच्या मनांतील पहिल्या तरंगांचा सांठाच जणूं काय सांपडला; पण थोड्याच काळांत त्यांची निराशा झाली. ती कां हें आतां आपल्याला सांगता येईल. आमच्या उपपत्तीवरून असें दिसून येईल कीं वेद हे जरी आर्यांचे अत्यंत प्राचीन ग्रंथ आहेत, तरी त्यांत दिसणारी सुधारणा व देवतोपासना ह्या वैदिक ऋषींच्या कृती नसून त्या त्यांना त्यांच्या हिमान्तरकालीन पूर्वजांपासून मिळालेल्या होत्या; म्हणून जर कोणाला आर्यसुधारणेचें मूळ शोधून काढावयाचें असेल, तर त्याला गेल्या हिमकालाच्या पलीकडे जाऊन आर्यलोक आपल्या ध्रुवाजवळील मूलस्थानांत कोणत्या स्थितींत रहात होते हें पाहिलें पाहिजे. आर्यांची ही आद्य सुधारणा किती उच्च होती हें ठरविण्याचें साधन सांप्रत

ापल्याजवळ नाहीं; तरी पण हिमान्तरकालीन आर्यसुधारणा साधारणतः ानितात त्यापेक्षां बऱ्याच वरच्या दर्ज्याची असावी असें मानावयास ाधार आहे हें आह्मीं दाखविलेंच आहे. म्हणून आदिआर्यांना सुधा- ोच्या दृष्टीनें इतिहासपूर्वकालीन ईजिप्टच्या लोकांच्या पदवीस नेऊन वावयास कोणतीच हरकत नाहीं. नवीन जमिनीच्या शोधार्थ ध्रुवावरून क्षिणेकडे येतांना वाटेंत ज्या अनार्य लोकांशीं त्यांची गांठ पडली त्यांचा ायनाट करून किंवा त्यांचा आपला एकजीव करून त्यांनीं त्यांच्यावर ा वर्चस्व स्थापन केलें तें त्यांची मूल सुधारणा उच्च प्रतीची ासल्याशिवाय केलें असे म्हणतां येत नाहीं. ध्रुवोपपत्ति ार्वमान्य होऊन तिच्या साहाय्याने वेदांचे जेव्हां आणखी आ- ोडन होईल, तेव्हां सध्या अज्ञात असलेल्या आणखींही केत्येक गोष्टी कळून येऊन आमच्या मताला पुष्टि मिळेल. ांप्रत ध्रुवप्रदेशांत जे शोध चालले आहेत त्यांवरूही पुढें मागें आर्य ुधारणेचे मूळ शोधण्याच्या कामास मदत होईल. पण आर्यांचे मूल- थान ध्रुवाजवळ होतें ही कल्पना जेव्हां शास्त्रीय गोष्ट या नात्याने र्वमान्यता पावेल त्यावेळी पुढच्या शोधकांनीं करावयाचें हे काम आहे. हिमान्तरकालांत आर्य लोक ध्रुवाजवळ रहात होते असें वेद व अवेस्ता यांतील प्रमाणांवरून दाखविणे एवढाच आमचा उद्देश होता; आणि प्रस्तुत पुस्तकांत दिलेलीं प्रमाणें व कोटिक्रम ही जर वाचकांनी नीट समजून घेतली असतील, तर आमची उपपत्ति वेद व अवेस्ता यांतील स्पष्ट वचनांवरच उभारली असून तिला, भूस्तरशास्त्र, पुराणवस्तुशास्त्र, प्राचीनभाषाशास्त्र, तुलनात्मक गाथाशास्त्र आणि ज्योतिःशास्त्र या शास्त्रांतील अगदीं नवीन शोधांवरूनही स्वतंत्र रीतीने पुष्टि मिळते, असे त्यांस दिसून येईल. खरे सांगावयाचे तर (लो. टिळक ह्मणतात) ध्रुवस्था- नाविषयीची प्रमाणें वेदांतून शोधून काढण्याची कल्पना 'मूळ शास्त्रीय शोधांवरून जरी सुचली नसली, तरी तिला त्यांवरूनच उत्तेजन मिळाले, आणि तिला व्यक्त स्वरूप देण्यांत ज्या शास्त्रीय पद्धतीचा स्वीकार केला आहे ती जितकी कडक पाहिजे होती तितकी ठेवलेली आहे. आमच्या निरुक्तकारांनी वैदिक वाक्यार्थमीमांसेचा पाया घातल्याला आज शेकडों वर्षें होऊन गेलीं, तरी इतक्याही काळांत ध्रुवस्थानाचा मागमूस वेदांत त्यांस दिसला नाहीं,

हें आश्चर्य तर खरेंच; पण अशाप्रकारच्या संशोधनाच्या कामांत केवळ आश्चर्य मानून स्वस्थ न बसतां, वाढत्या ज्ञानाच्या स्थितींत तर्कशास्त्राचे कडक नियम व शास्त्रीय विवेचनपद्धति यांच्या साहाय्यानें जीं अनुमानें निघतील तीं मान्य करावयास प्रत्येकाने तयार असलें पाहिजे. आमच्या उपपत्तीच्या सिध्यर्थ आह्मी याच कडक नियमांवर भिस्त ठेविली आहे; आणि आमच्या अनुमानांच्या सत्यतेची परीक्षा जर या नियमांवरून केली, तर, आजपर्यंत निरर्थक म्हणून टाकून दिलेल्या, किवा मुळींच न समजलेल्या अशा अनेक वैदिक वचनांचा व कथांचा अर्थ लावण्याची खरी किल्ली शोधून काढण्यांत आह्माला यश आलें आहे असें समजून येईल. वाढत्या ज्ञानाच्या आजच्या काळांत आदि मनुष्याच्या सुधारणेच्या प्रश्नाचा अनेक दृष्टींनीं विचार चालला असतां एकट्या वेदार्थमीमांसेला अलग रहातां येणे किवा केवळ भाषाशास्त्र व व्याकरण यांवरच सर्वस्वी भिस्त ठेवणें शक्य नाहीं, आणि चालू युगाच्या आरंभापासून मोठ्या कळकळीने ज्या वेदांचे आमच्या पूर्वजांनी रक्षण केलें व ज्यांना आम्ही मनःपूर्वक अत्यंत पूज्य मानतो त्या आमच्या आर्यांच्या आद्य ग्रंथांतील कथा व अगदीं नवीन शास्त्रीय शोध यांचा मेळ घालण्याचा प्रयत्न करण्यांत आम्हीही या काळाच्या धोरणाचेंच अनुकरण केलें आहे.



## या पुस्तकांत आलेल्या कित्येक शास्त्रीय शब्दांचें स्पष्टीकरण.

---

**अक्षांश**—भूमध्य किंवा विषुव वृत्तापासून दक्षिणेकडील किंवा उत्तरेकडील अंशात्मक अंतर.

**अचैतन्ययुग**—भूस्तरशास्त्रांत ज्या अतिप्राचीनकाळीं पृथ्वीच्या कवचावर कोणत्याही प्रकारचे वनस्पति किंवा प्राणी उत्पन्न झाले नव्हते तो काळ.

**अनेकमूलवादी**—एकाच आदि जोडप्यापासून सर्व मनुष्य जाति उत्पन्न झाल्या असे न मानतां निरनिराळ्या मनुष्य जातींचीं निरनिराळी मूळे होतीं असे ह्मणणारे लोक.

**अयन**—सूर्याच्या उत्तर व दक्षिण गतीमुळे झालेले वर्षाचे दोन भाग.

**अयनचलन**—( सपातचलन पहा. )

**अयनबिंदु**—सूर्याची दक्षिणेकडे किंवा उत्तरेकडे जाण्याचीं परमावधीची स्थाने.

**अयनवृत्तें**—विषुववृत्ताशीं समांतर अशीं अयनबिंदूतन जाणारीं कल्पित वृत्त.

**अरीभवन**—चाकाच्या अरांप्रमाणे पदार्थाच्या पृष्टभागापासून उष्णता किंवा प्रकाश यांचे किरण बाहेर जाण्याची क्रिया.

**अरुणप्रकाश**—सूर्य उगवण्यापूर्वी दिशा फांकल्यापासून जो प्रकाश दिसतो तो—उषःप्रकाश यालाच ह्मणतात.

**अस्थिरमानें**—ज्योतिषांत ग्रहादिकांची सूर्यापासून अतरें, त्यांचे प्रदक्षिणाकाल, त्यांचे आपल्या आंसाभोवती फिरण्याचे काल इत्यादिकांना माने ह्मणतात. त्यांत परम किंवा लघुतम अंतरां सारखीं जीं कमी जास्त होतात त्यांस अस्थिरमानें ह्मणतात.

**अस्थिशेष**—प्राचीन काळच्या प्राण्यांचे भूपृष्ठांतील निरनिराळ्या थरांत सांपडणारे दगडासारखे झालेले अवशेष. त्यांना चैतन्या-

वशिष्टं असें व्यापक नांव रा. सा. नाना पावगी यांनीं दिलें आहे.

**उच्च**—ग्रहाच्या कक्षेंतील सूर्यापासून अतिदूरचा बिंदु.

**उत्तरक्रान्ति**—( क्रान्ति शब्द पहा. )

**उत्तरयूरोपवादी**—आर्यांचें मूलस्थान यूरोपच्या उत्तरभागांत नॉर्वे किंवा स्वीडनमध्यें होतें असें ह्मणणारे लोक.

**उत्तरवृत्त**—उत्तर ध्रुवापासून २३ अंश २८ कलांच्या अंतरावरून जाणारें विषुववृत्ताशीं समांतर असलेलें वृत्त.

**उत्तरायण**—( दक्षिणायनें पहा ).

**उत्तरारुण**—ध्रुवापासून कांहीं अंशांपर्यंतच्या प्रदेशांत दिसणारा एकप्रकारचा विद्युत्प्रकाश. यास इंग्रजींत 'अरोरा बोरिआलिस' असें नांव आहे.

**एकमूलवादी**—सर्व मनुष्यजातीचें मूळ एक जोडपें होतें असें ह्मणणारे लोक.

**कक्षा**—ग्रहाचा सूर्याभोंवती फिरण्याचा मार्ग.

**कदंब**—क्रांतिवृत्ताच्या आंसाचीं टोकें किंवा ध्रुव.

**कटिबंध**—हवामानाप्रमाणें भूमध्यवृत्तापासून ध्रुवापर्यंत जे पृथ्वीचे भाग पडतात ते. दोन्ही अयनवृत्तांच्या मधल्या सुमारें ४७ अंशांच्या पट्ट्याला उष्ण कटिबंध, अयनवृत्तें व दक्षिण आणि उत्तर वृत्तें यांच्यामधील सुमारें ४३ अंशाच्या प्रत्येक गोलार्धांतील पट्ट्याला समशीतोष्ण कटिबंध, आणि ध्रुवापासून सुमारें २३॥ अंशापर्यंयच्या प्रत्येक पट्ट्याला शीत कटिबंध अशी नांवें आहेत.

**कांस्ययुग**—पाषाणयुग पहा.

**केन्द्र**—दीर्घ वर्तुळाच्या मोठ्या व्यासावरील दोन विशिष्ट बिंदु.

**केन्द्रच्युति**—दीर्घ वर्तुळाच्या दोन व्यासांचें प्रमाण, किंवा त्याच्या दोन केन्द्रांमधील अंतर. ( विशेष विवेचन व व्याख्या प्रकरण १ लें पान ३५ पहा ).

**क्रांति**—खविषुवापासून ग्रहाचें किंवा तारेचें दक्षिणेकडील किंवा उत्तरेकडील अंतर.

**क्रांतिवृत्त**—पृथ्वीचा सूर्याभोंवती फिरण्याचा मार्ग. अर्थात् दिसण्यांत सूर्याचा पृथ्वीभोंवतीं फिरण्याचा मार्ग.

**खस्वस्तिक**—पहाणाराच्या बरोबर डोक्यावरील आकाशांतील बिन्दु.

**खविषुव**—आकाशाचें विषुववृत्त.

**जीवशून्यकाल**—अचैतन्ययुग पहा.

**त्रिविष्टपकाल**—तिबेटांत आढळून येणारे रक्तवालुकेचे थर जेव्हां बनले तो काळ. याचप्रमाणें भूस्तरशास्त्रांतील इतर कालांसंबंधानें समजावें.

**ध्रुवोपपत्ति**—आर्यांचें मूलस्थान ध्रुवाजवळ होतें अशी कल्पना.

**दक्षिणायन**—सूर्याचा दक्षिण मार्ग. याचे प्राचीन व अर्वाचीन असे दोन अर्थ आहेत. प्राचीन अर्थ, सूर्य शरत्संपातीं येऊन दक्षिणगोलार्धांत उतरल्यावर पुनः तो वसंतसंपातीं येईपर्यंतचा काळ. अर्वाचीन अर्थ, कर्क संक्रातीपासून मकर संक्रातीपर्यंतचा काळ. याचप्रमाणें उत्तरायणाविषयीं समजावें.

**दीर्घशीर्ष**—डोक्याच्याच्या कपालाची रुंदी लांबीच्या तीन चतुर्थांश किंवा कमी असलेले लोक.

**नवपाषाणयुग**—पाषाणयुगाचें उत्तरार्ध.

**नीच**—ग्रहाच्या कक्षेतील सूर्याच्या अति जवळचा बिन्दु.

**परावर्तन**—प्रकाशाच्या किरणाचा एखाद्या पदार्थाच्या पृष्ठभागावर पडून मागें वळण्याचा धर्म.

**मंदकर्ण**—ग्रहमालेचा मध्य जो सूर्य त्यापासून ग्रहाचें अंतर.

**मध्यआशियावादी**—आर्यांचें मूलस्थान मध्य आशियांत होतें असें ह्मणणारे लोक.

**मझ्दयस्नी**—पारशी, मझ्दाचे भक्त.

**मानववंशशास्त्र**—हा शब्द मानुष्यकशास्त्राबद्दल कांहीं ठिकाणीं आला आहे. उपोद्घात पहा.

**पाषाणयुग**—पुराणवस्तुशास्त्रांतील ज्या काळांत माणसें दगडाचीं किंवा हाडांचीं हत्यारे वापरीत होतीं तो काळ. याचप्रमाणें ताम्र-युग, कांस्ययुग, लोहयुग, इत्यादिकांविषयी समजावे.

**पूर्वपाषाणयुग**—पाषाणयुगाचे पूर्वार्ध.

**युरेशिया**—यूरोप आणि आशिया ही दोन्ही खंडें मिळून झालेला भूप्रदेश.

**लोहयुग**—पाषाणयुग पहा.

**वक्रीभवन**--प्रकाश किरणांचा एक धर्म. एका द्रव्यांतून दुसऱ्या कमी किंवा अधिक विरल अथवा घन द्रव्यांत जातांना किरणांची दिशा बदलून ते त्या द्रव्याच्या घनत्वाच्या किंवा विरलतेच्या मानाने कमजास्त तिरपे जाऊं लागतात. या तिरपे होण्याला वक्रीभवन ही संज्ञा आहे.

**संपात**—आकाशाचे विषुववृत्त आणि पृथ्वीची कक्षा ही दोन तिरपी असल्यामुळे ती एकमेकांस दोन ठिकाणी छेदितात. या छेदनबिंदूस संपात किंवा क्रांतिपात ह्मणतात. या बिंदूंपैकी ज्या जवळ सूर्य आला असतां वसंत ऋतु सुरू होतो तो वसंत संपात आणि दुसरा शरत्संपात हे बिंदु चल असून दर वर्षास थोडे थोडे मागें येतात. या गतीला संपातचलन म्हणतात. संपाताबरोबर अर्थात् अयनबिन्दूही मागे येत असल्यामुळे त्याला अयनचलनही म्हणतात.

**हिंदी-इराणी**—हिंदी व इराणी लोक एकत्र होते तो काळ.

**हिंदी-जर्मन**—हिंदी व जर्मन लोक ,, ,,

**हिंदी-यूरोपीय**—हिंदी व युरोपीय लोक ,, ,,

**हिमकाल**<br>
**हिमांतरकाल**<br>
**हिमोत्तरकाल**<br>
**हिमपूर्वकाल** } उपोद्घात, भूस्तरशास्त्र पान ४ पहा.

**ऱ्हस्वशीर्ष**—कपालाची रुंदी लांबीच्या शेंकडा ८३ हून जास्त असलेले लोक.

# सूचि.

## ऋ.



## ए.

## ख.



## ग.

# परिशिष्ट.

## श्रौतभूमि.

इंदूरच्या होळकर कालेजांतील गणित विषयाचे गुरु कै. प्रो. रा. स. आठवले एम्. ए. यांनीं श्रौतभूमि नांवाच्या लहानशा पुस्तकांत टिळकांच्या ग्रंथांतील सिद्धांताचा अनुवाद करून आर्यांचें वसतिस्थान ध्रुववृत्ताच्या आंत कोणत्या अक्षांशावर असावे हें ठरविण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांतील विवेचनाचा सारांश प्रस्तुत ग्रंथाची पुरवणी म्हणून देणें योग्य वाटल्यावरून येथे दिला आहे.

ध्रुवविशिष्ट किंवा ध्रुवमंडलविशिष्ट अशा ज्या गोष्टीचे उल्लेख वेदांत आहेत असे या पुस्तकांत प्रतिपादन केले आहे, त्या गोष्टींपैकी प्रो. आठवले यांनी सर्वांचा विचार न करतां ध्रुवप्रदेशांतील वर्षाच्या निरनिराळ्या भागांचे कमजास्त होण्याचे प्रमाण आधारभूत धरून त्यावरून त्या स्थानाचा अक्षांशनिर्णय केला आहे. प्रथमतः त्यांनीं ध्रुवबिंदूपासून २० अंशापर्यंत निरनिराळ्या ठिकाणी वर्षाचें अवयव-प्रमाण कसे असतें हे दाखविण्यासाठीं कित्येक कोष्टकें दिलीं आहेत. ध्रुवप्रदेशातील वर्षाचे मुख्य अवयव असे:—

| खुद्द ध्रुवावर | ६० घटिकांचे कालावधि. |
|---|---|
| अवयव. | |
| १ अखंड दीर्घ दिवस, ... ... | १८६–१८८ |
| २ अखंड संध्या ... ... .... | ४४–४३ |
| ३ अखंड दीर्घ रात्र .... .... .... | ९१ |
| ४ अखंड दीर्घ उषा ... ... ... | ४४–४३ |

ध्रुवापासून कांहीं अंतरावर.

१ सूर्यप्रकाश आणि संध्या यांचे पर्याय.
२ अखंड दीर्घ दिवस.
३ सूर्यप्रकाश आणि संध्या यांचे पर्याय.
४ अखंड संध्या.
५ संध्याप्रकाश आणि काळोख यांचे पर्याय.

६ अखंड दीर्घ काळोख.
७ काळोख आणि उषा यांचे पर्याय.
८ अखंड दीर्घ उषा.

खुद्द ध्रुवावर हे वर्षाचे भाग कसे होतात हें तिसऱ्या प्रकरणांतील विवेचनावरून दिसून येईलच. पण ध्रुवापासून कांही अंतरावरील वर्षाच्या भागांचें थोडें स्पष्टीकरण केलें पाहिजे. खुद्द ध्रुवावर सूर्य प्रथम दिसूं लागला ह्मणजे एकसारखा सहा महिने क्षितिजावर असतो, आणि एकदां खालीं गेला कीं, सारखा सहा महिने खालीच असतो. पण थोडें खालीं आलें असतां जरा निराळा प्रकार दृष्टीस पडतो. तेथें सूर्य एकदां दिसूं लागल्याबरोबर कांहीं कालपर्यंत सूर्यप्रकाश आणि संध्याप्रकाश* यांचे पर्याय होतात. त्यानंतर सूर्याची उत्तरक्रांति ध्रुवांशाएवढी (ध्रुवापापासून त्या स्थलाच्या अंशात्मक अंतराएवढी) झाली, ह्मणजे दीर्घ दिवस सुरू होतो. पुढे २२ जूनला सूर्याची उत्तरक्रान्ति $२३°\frac{१}{२}$ होऊन दीर्घ दिवसाचा मध्य होतो. पुनः कांहीं दिवसांनीं दीर्घ दिवस बंद होऊन सूर्यप्रकाश आणि संध्या प्रकाश यांचे पर्याय होतात. नंतर सूर्य क्षितिजाखालीं गेला कीं, कांही काळ सारखा संध्याप्रकाश होतो. पुढें कांहीं दिवस संध्याप्रकाश आणि काळोख यांचे पर्याय होतात. त्यानंतर कांहीं दिवस अखंड काळोख पडतो. हा काळोख संपला की, पुनः उषःप्रकाश आणि काळोख यांचे कांही पर्याय होतात. ते झाल्यावर कांहीं दिवस सारखा उषःप्रकाश पडतो आणि मग थोडे दिवसांनी सूर्य पुनः क्षितिजावर दिसूं लागून प्रकाश आणि संध्या यांचे पर्याय पूर्वीप्रमाणें सुरू होतात.

ध्रुवापासून $७\frac{१}{२}$ अंशाच्या पुढील स्थळी कोठेही पूर्ण काळोखाचा अवधि एका वेळीं २४ तासांहून अधिक असत नाहीं; ह्मणून तेथें अखंड संध्याप्रकाश संपला कीं, संध्या आणि पूर्ण काळोख यांचें पर्यायच होतात. ह्मणजे वर दिलेल्या वर्षाच्या आठ अवयवांपैकी अखंड दीर्घ काळोखाचा भाग या स्थळीं कमी होऊन सातच भाग रहातात. असो.

---

* या काळांत सूर्य केव्हां क्षितिजाखालीं गेला तरी तो १६ अंशांपेक्षां अधिक जात नसल्यामुळें तेथें पूर्ण काळोख न पडतां संध्याप्रकाश पडतो.

आतां या निरनिराळ्या अवयवांचे कित्येक अक्षांशावरील अवधि देऊं:—

उ. अ. ८८°½ ( ध्रुवापासून १°½ )

| अवयव | साठ घटिकांचा एक याप्रमाणें कालावधि. |
|---|---|
| १ सूर्य आणि संध्या यांचे पर्याय ... .... | ८ |
| २ दीर्घ दिवस ... .... .... | १७८–१८० |
| ३ सूर्यसंध्यापर्याय ... .... ... | ८ |
| ४ अखंड संध्या .... ... .... | ३५-३४ |
| ५ संध्या आणि काळोख यांचे पर्याय .... ... | १० |
| ६ दीर्घ रात्र ... ... ... | ८१ |
| ७ काळोख आणि उषा यांचे पर्याय ... .... | १० |
| ८ अखंड उषा ... .... ... | ३५–३४ |

उ. अ. ८६°½ } यावर हे अवधि अनुक्रमे, १७–१८, १६९–१७१, १८–१७, २४–२३, २४, ६५, २४, २४-२३ असे असतात.

उ. अ. ८५°½ ( ध्रुवापासून ४°½ )

| अवयव | कालावधि. | अवयव | कालावधि |
|---|---|---|---|
| १ | २३ | ५ | ३१ |
| २ | १६३–१६५ | ६ | ५६ |
| ३ | २३—२२ | ७ | ३१ |
| ४ | १९ | ८ | १९—१८ |

अक्षांश ७५° ( ध्रुवापासून १५° ).

| अवयव | कालावधि. |
|---|---|
| साधी अहोरात्रें ... .... .... ... | ३८ |
| संध्यासूर्यपर्याय ... ... ... ... | ४४ |
| अखंड दीर्घ दिवस ... ... ... ... | १०३ |
| सूर्यसंध्यापर्याय .... ... ... .... | ४४ |
| साधी अहोरात्रे ... ... ... .... | ३८ |
| पूर्ण काळोख आणि संध्या यांचे पर्याय ... ... | ९८ |

या कालमानांचा विचार करतां असें दिसून येईल कीं, रात्रि या शब्दाचा अनेक तऱ्हेनें अर्थ होऊं शकेल.

१ सूर्यास्तापासून सूर्योदयापर्यंतचा काळ.

२ सूर्यास्तापासून उषेच्या उदयापर्यंतचा काळ.

३ संध्याप्रकाशानंतरच्या काळोखापासून सूर्योदयापर्यंतचा काळ.

४ संध्या आणि उषा वगळून उरलेला खऱ्या काळोखाचा काळ.

५ चोवीस तासांचे एक अहोरात्र.

६ अज्ञान ( रूपकानें ).

या सहा अर्थांपैकीं शेवटचा आध्यात्मिक असल्यामुळें आपल्या उपयोगाचा नाही. कारण आपण नैरुक्त पद्धतीचा अवलंब केला आहे. सोमयागांपैकीं शतरात्र हा मूळ शंभर रात्रीच्या अवधीचा होता हें मूळ पुस्तकांत दाखविलेच आहे. तर त्यांत रात्रि शब्दाचा **अर्थ** काय असावा हें पाहिलें पाहिजे.

बऱ्याच उन्नत अक्षांशांत सूर्यप्रकाशरहित काळाचे पांच भाग असतात, ते असेः—

१ अखंड संध्या
२ संध्या आणि काळोख यांचे पर्याय
३ अखंड काळोख
४ काळोख आणि उषा यांचे पर्याय
५ अखंड उषा

या पांच भागांची निरनिराळ्या प्रकारांनीं जुळणी केल्यास 'रात्रि' शब्द नऊ प्रकारांनीं दर्शविला जाईल. ते असेः—

| प्रकार. | एकत्र घ्यावयाचे भाग. | प्रकार | एकत्र घ्यावयाचे भाग. |
|---|---|---|---|
| १ | १ ते ५ | ६ | २—३ |
| २ | १—४ | ७ | ३—५ |
| ३ | १—३ | ८ | ३—४ |
| ४ | २—५ | ९ | ३ |
| ५ | २—४ | | |

आतां या नऊ प्रकारच्या रात्रींचे कित्येक अक्षांशांवरील अवधि देऊं.

| रात्रि प्रकार / ध्रुवांश | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ०° | १७९ | १३५ | १३५ | १३५ | ९१ | ९१ | १३५ | ९१ | ९१ |
| १° | १७४ | १३६ | १२९ | १३६ | ९८ | ९१ | १२९ | ९१ | ८४ |
| १° १/२ | १७१ | १३६ | १२६ | १३६ | १०१ | ९१ | १२६ | ९१ | ८१ |
| ३° १/२ | १६१ | १३७ | ११३ | १३७ | ११३ | ८९ | ११३ | ८९ | ६५ |
| १५° | ९८ | ९८ | ४९ | ९८ | ९८ | ४९ | ४९ | ४९ | ० |

ध्रुवबिंदूपासून २० अंशापर्यंतची अशीं निरनिराळीं कोष्टकें देऊन प्रो. आठवले यांनीं असें दाखविलें आहे कीं, वरील पैकी नवव्या अर्थाची ह्मणजे पूर्ण काळोखाची रात्र १०० दिनावधीची अशी कोठेही—खुद्द ध्रुवावरही-नाहीं. पूर्ण काळोखाच्या रात्रीचें खुद्द ध्रुवावरील मान ९१ दिवसांचे आहे. उषःकालीं करावयाचे यज्ञ स्वतंत्र असल्यामुळें उषेचा रात्रींत अंतर्भाव करतां येत नाहीं. त्याचप्रमाणे संध्याप्रकाशाचा काळही तीतून काढून टाकिला पाहिजे. असें असल्यामुळें वृत्राची किंवा शंबराची १०० पुरें, शंभर रात्रिक्रतु इत्यादिकांवरून दिसून येणाऱ्या शंभर रात्री वरील रात्रीच्या अर्थांपैकीं पांचव्या अर्थानेंच घेतल्या पाहिजेत, व त्या १° १/२ किंवा १५° या ध्रुवांशावरीलच असल्या पाहिजेत. म्हणजे ८८° १/२ किंवा ७५° अक्षांशावरील प्रदेशांत हे १०० रात्रिक्रतू पूर्वी करीत असले पाहिजेत असें झालें. केवळ गणितानें पाहिल्यास तिसऱ्या व सातव्या अर्थानें १०० रात्री ५° १/२ या ध्रुवांशावरही येतात. या साटीं या तीन स्थळांपैकीं खरें कोणते याचा निर्णय केवळ गणितानें होणार नाहीं. परंतु **चतुर्विंश** या शब्दाचा खरा अर्थ किंवा अखंड उषेचा अवधि यांवरून तसा निर्णय करतां येईल. १०० दिनावधि अखंड रात्र आणि अखंड दीर्घ उषा या दोन्ही गोष्टी एका ठिकाणासंबंधींच आहेत, असें मानिल्यास वरील पैकीं ७५° अक्षांशावरील प्रदेश वगळावे लागतील. कारण, तेथें अखंड दीर्घ उषा होतच नाहीं. तेव्हां प्रश्न उरला १° १/२ किंवा ५° १/२ या ध्रुवांशासंबंधानें. परंतु वर सांगितल्याप्रमाणे संध्या व उषा रात्रींतून गाळल्या पाहिजेत, व त्या तशा गाळल्या ह्मणजे १° १/२ ध्रुवांशावरील प्रदेशच प्राधान्येंकरून शतरात्र यागाच्या उत्पत्तीचें स्थान दिसतात. तरी रात्रिक्रतूंची संख्या शंभरांहून

कमीही असल्यामुळें १°१/२ च्या खालच्या ध्रुवांशांतही आर्यांच्या वसतीचें अनुमान करावें लागेल. पुढे दिलेल्या कारणांवरून ८६°१/२ अक्षांशही संभवनीय दिसतो. यानंतर **चतुर्विंश, दशरात्र, द्वादशाह, अभिप्लव, पृष्ठ्य,** इत्यादि संवत्सरसत्रांतील यागांच्या नांवाच्या अर्थावरून या अक्षांशाचें अनुमान होतें असें प्रो. आठवले यांनी दाखविलें आहे.

**चतुर्विंशः**— याचा अर्थ चोविसावा. याला आरंभणीय असेंही नांव आहे. ते कां असावे ? हा सत्राचा पहिला दिवस असून त्याला **प्रथम** न ह्मणतां **चतुर्विंश** कां ह्मटलें ? या दिवशी ह्मणावयाचा **स्तोम** ( स्तवन ) चोवीस प्रकारचा असल्यामुळे त्याला हे नांव मिळाले असे ब्राह्मणांत सांगितलें आहे. पण हा **स्तोम** तरी चतुर्विंश कां ? वास्तविक सत्रारंभापूर्वीच्या दीर्घ अखंड उषेच्या प्रत्येक दिवशी एक याप्रमाणे चोवीस दिवसांचे चोवीस स्तोम मूळचे असून आर्य लोक जेव्हां खालीं आले तेव्हां तेथें चोवीस दिवसांच्या अवधीची उषाच नाहीशी झाल्यामुळे ते चोवीस स्तोम सर्व एका दिवशींच ह्मणण्याचा प्रघात पडला; आणि त्या दिवसाला चतुर्विंश असे नांव मिळालें. ह्मणजे चतुर्विंशाचे मूळ चोवीस दिवसांची अखंड उषा जेथे होती, त्या ३°१/२ या ध्रुवांशावरचे होते असे झालें.

३°१/२ या ध्रुवांशावर सत्र संपल्यावर ११३ दिवसांच्या अवधीची रात्र (पांचव्या अर्थानें) येई. या रात्रीच्या मागे पुढें **अतिरात्र** करीत. दशरात्राचा हल्लीं द्वादशाहात अंतर्भाव करितात. पण तो मूळचा १०० रात्रींतील यज्ञांचाच पूरक असावा. तसे धरिल्यास शतरात्र, दशरात्र, आणि अतिरात्र मिळून जवळ जवळ ११३ रात्रींची संख्या येते. अनेक कारणांमुळें या रात्रींची नक्की मुदत ठरविणेंही प्रेक्षकाला कठीण असल्यामुळे या हिशोबांत एक दोन दिनावधींची तफावत पडल्यास फारशी हरकत नाही.

कित्येक ठिकाणी तीस उषांचा उल्लेख आहे. तो ८८° अक्षांशावरील स्थळांचा दर्शक आहे.

**सप्तगु** शब्दावरून ८२°१/२ अक्षांशाचा बोध होतो.

**नवग्वांचें** ठिकाण ७४°१/२ अक्षांशावरील असावें.तसेंच **दशग्वांचें** जवळ जवळ ७०° अक्षांशावरील असावें.

सध्या प्रचलित असलेल्या संवत्सराच्या रचनेंत ३६० याग असून त्यांत रात्रिक्रतूंचा अंतर्भाव होत नाहीं. ही रचना अर्थातच ७७°½ अक्षांशाच्या अलीकडील आहे. संवत्सरसत्रापैकीं फक्त २२ याग कायते न बदलणाऱ्या अवधीचे असून बाकीचे ३३८ षळहांनी भरून काढलेले असल्यामुळे विकारक्षम होत हें १६४ पानांत पूर्वी सांगितलेंच आहे. वर्षाचे दिवस चंद्रावरून व सूर्यावरून मोजल्यास दोहोंत १२ दिवसांचें अंतर पडतें. हें अंतर भरून काढण्यासाठी चांद्रवर्षांत बारा दिवस अधिक धरून त्याला द्वादशाह म्हणत असत. या द्वादशाहांत दशरात्राचा अंतर्भाव सध्या करतात. परंतु पूर्वी तसा करीत नसून द्वादशाह हा सत्रांतील बदल न होणारा विशिष्ट भाग असावा. दशरात्राच्या मागाहून तो येत असल्यामुळें त्यांच्या सांनिध्यावरून पुढें द्वादशाहांत दशरात्राचा अंतर्भाव होऊं लागला. असा अंतर्भाव होऊं लागल्यामुळें दशरात्राला रात्रिक्रतूंतून काढून स्वतन्त्र अस्तित्व देण्यांत आलें. ८३°½ अक्षांशावर रात्रीचें मान ११२ दिवसांचें असून त्याचे १०० आणि १२ असे दोन भाग करून त्यावरून रात्रिक्रतूंचे सत्र आणि अहीन असे वर्ग करण्यांत आले असावे. अहीनाचा अवधि तेरांहून अधिक दिवसांचा कां नसावा याचेंही कारण आतां समजण्यासारखें आहे.

६७½ अक्षांशाचा अलीकडील प्रदेशांत ३६० ( ३६५ ) दिवसांचें वर्ष असल्यामुळें तेथें संवत्सरसत्रांत ३६० याग असणें योग्यच आहे. रात्रीचे याग यांत धरावयाचे तर आणखी २६० होतील. परंतु हे रात्रीचे याग १०० च आहेत. हे याग पूर्वी अखंड रात्रींत करीत असत हें पूर्वी दाखविलेंच आहे. यावरून तेव्हां दिनयागांची संख्या २६० असावी असें दिसतें. आतां पुढें दिनयागांची संख्या १०० नी वाढली ती अभिप्लव भागांत १०० मिळवून वाढविली असें मानिल्यास अभिप्लवांची पूर्वीची संख्या १७० होती असें दिसेल; कारण सध्या ती २७० आहे. ८६½ अक्षांशावरील दीर्घ दिवसाचा अवधि १७० आहे ही गोष्ट लक्षांत घेतल्यास अभिप्लव आणि दीर्घ दिवस हे परस्परसंबद्ध असावेत असें सहज दिसून येईल. अभिप्लवाच्या व्युत्पत्तीवरूनही हेंच अनुमान दृढ होतें. या शब्दाचा अर्थ वाटोळा ( अभि ) फिरणारा किंवा वहाणारा ( प्लव ) असा आहे. सूर्यबिंब क्षितिजावर वाटोळ्या प्रदक्षिणा

करीत' असण्याचा काळ म्हणजे जो दीर्घ दिवस तोच **अभिप्लवाचा** काळ होय. अभिप्लवाचा हा अर्थ मान्य झाल्यास **पृष्ठ्य** शब्दाचाही मूळ अर्थ कळून येईल. पृष्ठ्य षळहांची संख्या ११ असून त्यांचे ६६ दिवस होतात. ८६°½ अक्षांशावरील सूर्य आणि संध्या यांचे पर्याय आणि अखंड दीर्घ संध्या यांचा काळ ६० दिवसांचा आहे. या दोहोंत दिसणारा सहा दिवसांचा फरक पहाण्याच्या दोषामुळें पडूं शकेल. म्हणून पृष्ठ्य षळहांचा अवधि वर सांगितलेल्या सूर्यसंध्यापर्यायांच्या आणि अखंड संध्येच्या अवधीचा दर्शक असावा असें वाटतें. पृष्ठ्य शब्दाच्या व्युत्पत्तीवरूनही ह्या म्हणण्याला जोर मिळतो. पृष्ठ्य शब्दाचा 'पृष्ठभागावरील' किंवा 'पाठीवरील' असा अर्थ आहे. ८६°½ अक्षांशावर सूर्यसंध्यापर्यायकाळांत सूर्याची क्षितिजापासून महत्तम उंची ७ अंशाहून अधिक नसल्यामुळें तो पृथ्वीच्या पाठीवर फिरतो आहेसा वाटेल; केव्हा जरा क्षितिजाखालीं जाईल; केव्हां थोडा वर डोकावेल. तात्पर्य क्षितिजाच्या पाठीवर फिरण्याचा सूर्याचा काळ ह्मणजे **पृष्ठ्य** होय.

या प्रमाणे चतुर्विंश, द्वादशाह, दशरात्र, अभिप्लव, पृष्ठ्य, या शब्दांचे अर्थ एकमेकांशी इतके जुळत असल्यामुळें (८६°½ अक्षांशा संबंधाने) त्यांचे मूळ ८६°½ अक्षांशावर होतें असें म्हणावयास मुळींच हरकत नाहीं. हे शब्द भाषेंत एकदां रूढ झालेले असल्यामुळें बदललेल्या परिस्थितींतही ते तसेच राहिले. परिस्थितीत बदल झाल्याबरोबर जुने सर्व टाकून सगळें नवे घेण्याचा कोणाचा प्रघात नाही. या निसर्गसिद्ध पुराणप्रियतेमुळें अगदी नवीन परिस्थितींतही जुना इतिहास उपलब्ध होण्याचें साधन मिळणें शक्य झालें आहे. आमचे पूर्व ऋषि पुराणप्रिय नसते तर आज आम्हाला या गोष्टी कळण्याला मार्गच राहिला नसता.

